


# चांदोबा

संस्थापक : 'चक्रपाणी'

संचालक : नागिरेड्डी

या महिन्याची वेताळ कथा 'व्यापार एक जुगार' ही आहे. प्राचीन काळी वैश्य शेती, पशुपालन व व्यापार धंदा करीत. परंतु हळूहळू त्यांनी शेती व पशुपालनाचा धंदा सोडला आणि पूर्णपणे व्यापाराकडे वळले. परंतु काही लोकांनी शेती व पशुपालनच कायम ठेवले. त्याचे कारण वरील गोष्टीवरून कळते.

## अमर वाणी

अत्यल्प मपि साधूनां शिलालेखेव तिष्ठति ।
जललेखेव नीचानां यत् कृतं तत् विनश्यति ॥

[साधू व संत यांनी केलेले काम किती लहान असले तरी ते काळ्या दगडावरच्या रेषे सारखे टिकते. परंतु नीच माणसांनी केलेले काम पाण्यावरच्या रेषेसारखे तत्काळ नाहीसे होते.]

वर्ष : २९ जानेवारी १९८० अंक : ७

एक प्रत : १-५० :: वार्षिक वर्गणी : १८-००



# प्रश्नोत्तरे

**प्र. : दूध हे शाकाहारात मोडते की मांसाहारात?**

उ. : आहार हा वृक्षवनस्पतींवर आधारलेला व प्राण्यांवर आधारलेला अशा तऱ्हेने विभागल्यावर दूध हे प्राण्यांकडून मिळते हे स्पष्टच आहे. परंतु आहाराचे भाग हिंसा करून मिळणारा व हिंसेशिवाय मिळणारा असे पाडले तर दूध हा हिंसेशिवायचा आहार होतो. आपल्या देशात शाकाहारी म्हणून जे लोक आहेत ते या अहिंसेलाच प्राधान्य देतात. म्हणून त्यांच्या मते दूध व दुधाचे दही, लोणी, तूप, साय वगैरे पदार्थ शाकाहारात येतात. कारण त्यात प्राण्याचे मांस, हाडे, रक्तवाहिन्या वगैरे प्राण्याच्या शरिराचे भाग नसतात. परंतु अमेरिकेत 'व्हेजिटेरियन्स' म्हणविणारे प्राण्याशी संबंध असलेला कोणताही पदार्थ शिवत नाहीत. 'लिव्हर एक्स्ट्रॅक्ट' सुद्धा पूर्वी घेत असत त्यांना देखील ते 'व्हेजिटेरियन्स' मानीत नाहीत. गांधीजींना किंवा बर्नार्डशॉला सुद्धा 'व्हेजिटेरियन्स' म्हणून मानायला ते तयार नाहीत.

**प्र. : बुद्ध हा अहिंसावादी होता. तरी बौद्धांत जास्त लोक मांसाहारी कसे काय आहेत? स्वतः बुद्धाने मांस खाऊन आजार आपल्यावर ओढून घेतला आणि त्यातच तो मरण पावला, हे कसे काय?**

उ. : बौद्ध धर्माने शाकाहाराचे प्रतिपादन केले नाही, फक्त अहिंसेचाच प्रचार केला. श्रीलंका, चीन, जपान, इंडोचायना कोरिया वगैरे देशात आजपर्यंत बौद्ध धर्म असला तरी त्या देशातील लोक शाकाहारी कधीच नव्हते व नाहीत. परंतु बौद्धांनी जीवहिंसा करू नये, प्राण्यांचा वध करू नये असाच नियम आहे. बुद्धाचा हाडवैरी देवदत्त याने आपले काही नियम मान्य करायला बुद्धाला सांगितले. स्वतः शाकाहारी असल्या कारणाने बुद्धाने ते मान्य केले नाही. बौद्धभिक्षु भिक्षान्न ग्रहण करतात, त्यांना भिक्षा घालणारे सर्व शाकाहारीच असले पाहिजेत असा नियम घालून देण्याचा अधिकार आपल्याला नाही, असे बुद्धाचे म्हणणे. आपल्या देशात शाकाहाराचा प्रचार करणारे जैनमतवाले होते,



# अघटित अनपेक्षित



सहस्रबुद्धी, शतबुद्धी व एकबुद्धी यांची गोष्ट ऐकून अतिलोभी म्हणाला—"तू म्हणतो आहेस, त्यात नशिबाचे असे काहीच नाही. एकबुद्धीला लोकज्ञान असल्यामुळे तो त्या संकटातून वाचला. इतर दोघांना ते ज्ञान नव्हते. शिवाय ते अतिलोभाला बळी पडले. अतिलोभाचे होणारे दुष्परिणाम कसे असतात हे 'मूर्ख लोभी माकडे' या कथेवरून स्पष्ट कळते." असे सांगून तो गोष्ट सांगू लागला.

एके काळी चंद्र नावाचा राजा होता. त्याच्या मुलांना माकडांशी खेळायला खूप आवडे. म्हणून त्यांनी माकडांना खूप खायला घालायला सुरवात केली आणि अनेक माकडांना राजवाड्यात जमविले.

माकडांना खूप खायला मिळाले, म्हणून ती खूप माजली, आणि राजवाड्याच्या आवारात मोकळेपणे खूप हिंडू फिरू लागली. त्या सर्वांचा नायक बृहस्पती व चाणक्यासारखा हुशार असा एक वानर होता. राजनीती वैद्यकशास्त्र पशुवैद्यकशास्त्र वगैरेची त्याला चांगली माहिती होती.

राजवाड्याच्या आवारात मेंढरांचा एक कळपही होता. त्यांत पुष्कळ मेंढेएडकेही होते. त्यांच्यावर मुले बसत व मजामजा करीत. त्यांच्यातला एक एडका भयंकर खादाड होता. तो संधी मिळाली की सरळ राजाच्या सैंपाक घरात शिरायचा आणि तेथे ठेवलेली पक्वान्ने फस्त करायचा. सैंपाकी संतापून दांडके, पळी, झारा, किंवा मडके किंवा काशाचा तांब्या, जे काही हाताला येई त्याने त्या एडक्याला खूप बडवीत.

ते पाहून माकडांच्या नायकाने विचार केला, या एडक्याचे व सैंपाक्यांचे वैर



चांगलेच वाढत चालले आहे. याचा माकडांना त्रास होण्याची शक्यता आहे. या एडक्याला पक्वानांचे आकर्षण आहे. त्याला पाहून सैपाकी चिडून हाताला लागेल ते घेऊन त्याला बडवितात. चुकून त्यांनी जळत्या लाकडाने त्याला बडविले तर त्याचे पाठीवरचे केस पेटतील व ते विझविण्यासाठी हा पळत जाऊन गोठ्यात अगर तबेल्यात शिरेल व आग विझविण्यासाठी गवतावर जाऊन लोळेल. मग गवत पेटेल. त्यानतर गुरे व घोडे होरपळून निवतील. त्यांच्या अंगावरचे फोड बरे करायला औषधपाणी करावे लागेल. पशुवैद्यकशास्त्राप्रमाणे औषध म्हणून त्या फोडांवर माकडांच्या चरबीचे लेपच द्यावे लागतील. त्यावेळी खाऊन पिऊन माजलेल्या माझ्या अनुयायांचाच बळी पडेल. तेव्हां वेळीच त्यांना सावध करून इकडून जंगलात पळून जाणे हिताचे होईल.

असा विचार करून त्याने आपल्या सर्व अनुयायांना एकत्र जमायला सांगितले व त्यांना त्याने त्यांच्यावर केवढे मोठे घातक संकट येणार आहे त्याची कल्पना करून देत म्हणाला–"एडक्यांचे आणि सैंपाक्यांचे दररोज भांडण होऊ लागलं आहे. हे वैर नित्य वाढतच जाणार. मी सांगितल्याप्रमाणे आपल्या माकडांच्या जातीवर त्याचा फार मोठा दुष्परिणाम होण्याची शक्यता आहे. दोघांच्या भांडणात विनाकारण आपला जीव जाईल. भांडणामुळे मोठमोठी राज्ये रसातळाला मिळाल्याचे इतिहास सांगतो. दोन मोठ्या राज्यांचे युद्ध होते आणि त्यात प्रजा व जवळपासची राज्ये रसातळाला मिळाल्याचे इतिहास सांगतो. दोन मोठ्या राज्यांचे युद्ध होते आणि त्यात प्रजा व जवळपासची राज्ये चिरडून जातात. मैत्री व प्रेम त्या आगीत भस्म होऊन जातात. म्हणून शहाण्यांनी वेळीच सावध होऊन स्वतःचा बचाव करून घ्यावा. आपल्यावर संकट येऊन कोसळण्यापूर्वीच आपण आपलं कायमचे निवासस्थान जे जंगल आहे तिकडे निघून जाऊ या."

माकडे हा हितोपदेश ऐकून हसली व आपल्या नायकाला म्हणाली–

"तुम्हांला म्हातारपण आलं आहे. साठीबुद्धी नाठी म्हणतात तसे झालं आहे. म्हणून उगाच काल्पनिक संकटांचा बाऊ तुमच्या मनात उभा राहातो आहे आणि असले निरर्थक विचार तुमच्या मनात येत आहेत. येथे सर्व स्वर्गसुख प्राप्त असतां हे सोडून जाण्यात काय शहाणपण आहे? राजकुमार इतकी छान पक्वान्ने खायला घालीत असतां ती सर्व सोडून जंगलात झाडावरची अर्धीकच्ची फळे खायला आम्ही मुळीच तयार नाही."

ते ऐकून म्हाताऱ्या नायकाच्या डोळयातून घळघळा अश्रुधारा वाहू लागल्या व तो म्हणाला–

"मूर्खांनो! ही सर्व सुखे धोक्याची जाळी आहेत, ती तुम्हाला दिसत नाहीत. ही सर्व पक्वान्नेच उद्या विषप्रयोग झाल्यासारखी तुमचा प्राण घेतील. माझ्या डोळयादेखत तुम्ही तडफडून मराल, मला ते पाहवणार नाही. मी एकटाच जंगलात निघून जातो. मित्रांचे दैन्य, शत्रू घरात शिरल्याचे दृश्य, स्वदेशावर परक्यांची सत्ता आणि स्वतःच्या बायकामुलांचे मरण ज्याला स्वतःच्या डोळयांनी पहावे लागत नाही तो धन्य होय!"



असे सांगून म्हातारे माकड एकटेच जंगलात निघून गेले.

ते निघून गेल्यावर थोड्याच दिवसात तो एडका त्याच्या संवयीप्रमाणे सैंपाक घरात शिरला आणि पक्वान्ने एकामागून एक खाऊ लागला. अजून सर्व सैंपाक झालेला नव्हता. चुलीवर सैंपाकाच्या मोठमोठ्या भांड्यात पदार्थ खदखदत होते.

सैंपाक्यांनी त्या एडक्याला पक्वान्नावर ताव मारतांना पाहिले मात्र इतके संतापले की त्यांच्यापैकी एकाने चुलीतले जळते लाकूडच काढले आणि त्याने तो त्या

एडक्याला बडवू लागला. एडक्याच्या पाठीवरच्या केसांनी पेट घेतला. ती आग असह्य झाल्याने एडका पळत जाऊन घोड्याच्या तबेल्यात शिरला व तेथल्या गवतावर गडगडा लोळू लागला. त्या गवताने पेट घेतला आणि सर्व तबेल्यालाच आग लागली. काही घोडे जागच्या जागी मेले. काही घोड्यांचे डोळे कायमचे गेले. नोकरांनी काही घोड्यांना फार कष्टाने वांचविले. तरी त्यांचे अंग होरपळून निघाले होते. ते हिणहिणत राजवाड्याच्या आवारात पळू लागले.

राजाचे घोड्यांवर स्वतःच्या मुलांसारखे प्रेम होते. त्यांची ती स्थिती पाहून तो फार हळहळला. दरबारी पशुवैद्याला बोलावून तो म्हणाला—"या घोड्यांचा काय तो लौकर इलाज करा. काय औषध आहे?"

पशुवैद्य ग्रंथाची पाने उलटून म्हणाला—"महाराज, पशुवैद्यकशास्त्रात महापंडित अशा शालिहोत्राचे म्हणणं आहे की मारल्या बरोबर माकडांचे रक्त व चरबी काढून त्यांचे लेप भाजलेल्या जागी लावावेत, म्हणजे रात्रीचा काळोख जाऊन उजाडल्यावर जसा उजेड होतो तसा रात्रीच्या रात्री घोड्यांच्या अंगावरचे फोड बरे होतील. म्हणून तीच चिकित्सा आता करतो."

"राजवाड्याच्या आवारात असलेल्या सर्व माकडांना ठार करून त्यांचे रक्त व चरबी काढा." राजाने हुकूम सोडला.

नोकरांनी पक्वान्नांचं मिष दाखवून माकडांना जमा केले आणि त्यांना धरून ठार केले. त्यांचे रक्त व चरबी काढून त्यांचे लेप घोड्यांच्या फोडावर लावण्यात आले.

आपले सर्व अनुयायी ठार झाल्याची गोष्ट म्हातार्‍या माकडाला एका कावळ्याच्या तोंडी कळली. तो दुःखाने रडू लागला. त्या मेलेल्या माकडात त्याची पिल्ले, पिल्लांची पिल्ले, म्हणजे मुले व नातवंडे, किंबहुना सर्व वंश वृक्षच होता व तो नष्ट झाला.





# भल्लूक मांत्रिक

[ १७. ]

[मायावी मर्कट कालीवर्मा व भल्लूक मांत्रिकाच्या हातातून निसटून मंत्रदंडासह राजधानीत दाखल झाले. राजवाड्यासमोर एक रानटी माणूस अस्वलाचा खेळ दाखवीत होता. त्यावेळी तेथे पाहारेकर्‍यांचा नायक आला. तो अस्वलाकरवी मर्कटाला धरून राजाकडे निघाला. पुढे—]

राजवाड्याच्या पायर्‍यांजवळ पाहारेकर्‍यांचा नायक तलवार वर उचलून व पाठीमागून येणार्‍या सर्व लोकांना थांबायला सांगून प्राण्यांचा नाच दाखविणार्‍याला म्हणाला—"अरे ए, अस्वलाच्या मालका महाराज यावेळी राजसभेत असावेत. तेथे तुझ्या या भिकारड्या अस्वलाला घेऊन जाण्यात शहाणपण नाही, त्या अस्वलाच्या खांद्यावर जे माकड आहे त्याला आपल्या खांद्यावर घेऊन तू माझ्या बरोबर महाराजांकडे येऊ शकशील का?"

ते ऐकून प्राण्यांचा नाच करणार्‍याला राग आल्यासारखे त्याच्या तोंडावरून दिसले. म्हणाला—"तुम्ही मला काय वाटेल ते म्हणा, परंतु माझ्या पाळलेल्या व शिकलेल्या अस्वलाला 'भिकारडा' म्हणून त्याचा अपमान करू नका. त्याची हुशारी व कौशल्य पाहून मोठमोठ्या



महाराजांनी व सामंतांनी एवढेच नव्हे तर मोठमोठ्या विद्वानांनी त्याचे गुणगान केले आहे. याचा एक पूर्वज रामाने बांधलेल्या सेतुबंधाच्या वेळी होता त्याचे प्रमाण म्हणून हे ताडपत्र वाचून पहा, हवे तर!" असे म्हणत त्याने एक ताडपत्र आपल्या अंगरख्याच्या खिशातून काढून दाखविले.

पाहरेकऱ्यांचा नायक मोठ्याने हसून म्हणाला—"तुझ्या अस्वलाचा वंशवृक्ष आपण दरबारी पुरोहिताला नंतर सावकाश दाखवू आणि महाराजांकडून तुला चांगलेसे बक्षिस सुद्धा देववूं. पहिल्याने तो शत्रूचा हेर एका मर्कटाचे सोंग करून आला आहे त्याला अस्वलाच्या खांद्यावरून उतरवून आपल्या खांद्यावर घे."

प्राण्यांना नाचवणारा रानटी माणूस अनिच्छा दर्शवून अस्वलाजवळ गेला व त्याच्या पाठीवर प्रेमाने हात फिरवीत म्हणाला—"वीर भल्लूका! आपल्या खांद्यावरच्या त्या माकडाला खाली जमिनीवर टाक." असे म्हणत त्याने मायावी मर्कटाच्या कंबरेला बांधलेली दोरी घट्ट धरून जोराने ओढली.

अस्वलाला ते आवडले नसावे. तो दात बाहेर काढून ओरडून मायावी मर्कटाची कंबर धरून त्याला खाली फेकू लागला. परंतु तितक्यात माकडाने स्वतःच खाली उडी मारली व म्हणाले—"तुमच्या शहरावर भल्लूक मांत्रिक चालून येत आहे आणि मोठे संकट ओढवणार आहे. तेव्हां तुमचे महाराज कोठे आहेत, हे प्रथम सांगा. माझा मंत्रदंड कोठे आहे?"

माकडाला बोलत असलेला पाहून तेथे जमलेले लोक हसू लागले व टाळ्या वाजवू लागले. त्यांच्यापैकी एकजण एक लांब काठी माकडाकडे दाखवीत म्हणाला—"हा घे तुझा मंत्रदंड! काहीतरी गंमत करून दाखव!"

मायावी मर्कटाने ती काठी ओढून घेतली व ती जमिनीवर उभी केली व तिच्या टोकावर चढून एका पायावर उभा राहिला आणि म्हणाला—"मूर्ख हो! असल्या गंमती कोणी दाखवू शकेल का? तुमच्या राज्यावर एक मोठे संकट ओढवणार आहे. अशा वेळी गंमत पाहण्याची हाव असणाऱ्यांना काय म्हणावयाचे?"

पाहारेकऱ्यांचा नायक मायावी मर्कटाजवळ जाऊन व तो ज्या काठीवर उभा होता ती कापून टाकायला आपली तलवार उगारीत म्हणाला—"खरं बोल, तू शत्रूचा हेर खरोखरच नाहीस का? तू म्हणतोस तो भल्लूक मांत्रिक खरोखरच येणार आहे का?"

मायावी मर्कटाने त्याचे उत्तर न देता चटदिशी खाली उडी मारून पाहरेकऱ्यांच्या नायकाच्या हातातली तलवार हिसकावून घेतली आणि आपल्या कंबरेला बांधलेली दोरी कापून टाकून दातओठ चावीत म्हणाला—"मूर्खांनो! तुम्ही आपल्या राजाला इकडे बोलावून आणा."

पाहारेकऱ्यांच्या नायकासह तेथे जमलेले सर्व लोक भयकंपित झाले. मायावी मर्कट तलवार दाखवून पाहारेकऱ्याच्या जवळ जाऊन दरडावून म्हणाला—"काय रे ए मूर्खा! माझी आज्ञा तुला ऐकू आली नाही का?"

पाहारेकऱ्यांचा नायक प्राणभयाने थरथर कापत म्हणाला—"महाराज, दरबारात



बसलेले असतां त्यांना इकडे यायला सांगायचं? माझं डोकं उडून जाईल!"

"तसे असेल तर मीच त्यांच्याकडे जातो. तू पुढे होऊन वाट दाखव." मायावी मर्कट म्हणाले.

पाहारेकऱ्यांचा नायक 'हूं' की 'चूं' न म्हणता पायऱ्या चढून गेला आणि दरबार महालात जाण्याच्या वाटेने चालू लागला. लोक त्यांच्या पाठीमागून जायला धाडस नसल्यामुळे जागच्या जागी थबकले.

जितकेतू राजा सिंहासनावर बसून दरबारात त्याच्या दर्शनास आलेल्या प्रमुख नागरिकांशी बोलत होता. त्या वेळी



महाराजांनी व सामंतांनी एवढेच नव्हे तर मोठमोठ्या विद्वानांनी त्याचे गुणगान केले आहे. याचा एक पूर्वज रामाने बांधलेल्या सेतुबंधाच्या वेळी होता त्याचे प्रमाण म्हणून हे ताडपत्र वाचून पहा, हवे तर!" असे म्हणत त्याने एक ताडपत्र आपल्या अंगरख्याच्या खिशातून काढून दाखविले.

पाहरेकऱ्यांचा नायक मोठ्याने हसून म्हणाला–"तुझ्या अस्वलाचा वंशवृक्ष आपण दरबारी पुरोहिताला नंतर सावकाश दाखवू आणि महाराजांकडून तुला चांगलेसे बक्षिस सुद्धा देववू. पहिल्याने तो शत्रूचा हेर एका मर्कटाचे सोंग करून आला आहे त्याला अस्वलाच्या खांद्यावरून उतरवून आपल्या खांद्यावर घे."

प्राण्यांना नाचवणारा रानटी माणूस अनिच्छा दर्शवून अस्वलाजवळ गेला व त्याच्या पाठीवर प्रेमाने हात फिरवीत म्हणाला–"वीर भल्लूका! आपल्या खांद्यावरच्या त्या माकडाला खाली जमिनीवर टाक." असे म्हणत त्याने मायावी मर्कटाच्या कंबरेला बांधलेली दोरी घट्ट धरून जोराने ओढली.

अस्वलाला ते आवडले नसावे. तो दात बाहेर काढून ओरडून मायावी मर्कटाची कंबर धरून त्याला खाली फेकू लागला. परंतु तितक्यात माकडाने स्वतःच खाली उडी मारली व म्हणाले–"तुमच्या महरावर भल्लूक मांत्रिक चालून येत आहे आणि मोठे संकट ओढवणार आहे. तेव्हां तुमचे महाराज कोठे आहेत, हे प्रथम सांगा माझा मंत्रदंड कोठे आहे ?"

माकडाला बोलत असलेला पाहून तेथे जमलेले लोक हसू लागले व टाळ्या वाजवू लागले. त्यांच्यापैकी एकजण एक लांब काठी माकडाकडे दाखवीत म्हणाला–"हा घे तुझा मंत्रदंड! काहीतरी गंमत करून दाखव !"

मायावी मर्कटाने ती काठी ओढून घेतली व ती जमिनीवर उभी केली व तिच्या राजधानीवर थोड्याच वेळात कालीवर्मा नावाचा एक शूर पराक्रमी वीर आणि भल्लूक मांत्रिक चालून येत आहेत. तुम्हांला या गोष्टीची सूचना देऊन सावध करण्यासाठी मी आलो आहे."

मायावी मर्कट ते म्हणतांच सभेत गोंधळ उडून गेला. राजा जितकेतू एक क्षणभर किंकर्तव्य विमूढ स्थितीत सिंहासनावरून उतरून उभा राहिला व मायावी मर्कटाला म्हणाला–"तुझ्या बोलण्यावरून तू सामान्य माकड नाहीस हे कळले. पण तू जी सूचना दिलीस ती ऐकून मी विचारतो, मी त्या कालीवर्माला व त्याच्या बरोबरच्या इतर सर्वांना कैद करून आणायला आपल्या प्रधान मंत्र्याला काही सैनिकांरोबर पाठविले होते ते सर्व कोठे आहेत ?"

तो प्रश्न ऐकून मायावी मर्कट 'किच किच' करीत हसत म्हणाले–"त्या सर्वांना कालीवर्मा आपल्या तलवारीने व भल्लूक मांत्रिक आपल्या मंत्रदंडाने..." व असे म्हणत एकदम मध्येच थांबले व भयभीत झाल्यासारखे चहुकडे पहात ओरडले–"तांत्रिक गुरू की जय! माझा मंत्रदंड कोठे आहे ?" लगेच त्यानंतर पाहारेकऱ्यांचा नायक उभा होता त्याच्यावर धावून जाऊन त्याची नरडी पकडून आवळू लागले.



मायावी मर्कटाच्या हातातून आपला गळा सोडविण्याचा नाना प्रकारे प्रयत्न करीत पहारेकऱ्यांचा नायक ओरडला–"मर्कट प्रभो! मंत्रदंडाची गोष्ट मला काय माहीत? महाराज, मला वांचवा!"

दरबारात हजर असलेल्या दोघां बलदंड माणसांनी पुढे होऊन मर्कटाची कंबर घट्ट धरून त्याला ओढले व म्हणाले–"आमच्या राज्यात कोणाचाही जीव घ्यायचा अधिकार फक्त आमच्या महाराजांनाच आहे. तुझं हे वागणे कायद्याविरुद्ध आहे."

मायावी मर्कट दांतओठ चावून ओरडले–"जितकेतू राजा! मी सांगायचे आहे ते दोन शब्दांत सांगतो आहे, ते कान उघडून



ऐक! तू नगराची द्वारं बंद करून येथे दरबारांत निश्चित होऊन गप्पा मारीत बसला आहेस. म्हणून तुला राजधानीच्या बाहेर काय घडले आहे त्याची कल्पना-देखील नाही. तुझा तो मुख्य चांडाळ आता भल्लूक झाला आहे. एवढेच नव्हे तर तो कालीवर्मा व भल्लूक मांत्रिकाबरोबर आणि एका राक्षसाबरोबर राजधानीवर चालून येत आहे!"

राक्षसाचे नाव ऐकताच जितकेतू राजा धडकी भरल्यासारखा म्हणाला—"राक्षस? आम्ही राक्षस असतात असे फक्त ऐकले आहे, आजपर्यंत राक्षसाला कधी प्रत्यक्ष पाहिले नाही!"

राजाचे दोघे मंत्री थरथर कापत पर-स्परांची तोंडे पहात कापऱ्या आवाजात म्हणाले—"महाराज! आतां या संकटांतून आपली सर्वांची सुटका कशी व्हायची?"

"हा प्रश्न मी तुम्हांला, आपल्या मंत्र्यांना विचारावयाचा आहे आणि तुम्ही मलाच विचारतां आहां? तुम्हां दोघांना मी या क्षणांपासून या पदावरून काढून टाकतो. तो माझा प्रधान मंत्री जर का यावेळी येथे असता तर योग्य विचार काढून व काही तरी युक्ती करून या संकटातून त्याने आम्हांला सोडविले असते." असे म्हणत जितकेतू सिंहासनापासून घाईघाईने चालत मायावी मर्कटाजवळ येऊन सभेत हजर असलेल्या सर्वांना संबोधन करून म्हणाला—"आपल्या राजधानीवर भल्लूक मांत्रिकांबरोबर राक्षसही चालून येत आहेत, आपण या वेळी काय केले तर बरे होईल?"

सभेत कोणाच्याही तोंडी एकही शब्द उमटला नाही. प्रत्येकाच्या मनात एकच गोष्ट होती की आपल्या घरातले धन आणि मूल्यवान वस्तू उचलून घेऊन राजधानी बाहेर पळून जायचं कसं?"

राजा जितकेतु दरबारी लोकांपैकी कोणाच्याही तोंडातून 'ब्र' ही निघत नसलेला पाहून व सर्व भयभीत होऊन बोलण्याच्या स्थितीत नाहीत हे ओळखून मायावी मर्कटाजवळ जाऊन म्हणाला—"तू रूपाने माकडासारखा असलास तरी मंत्रणा देण्यात माझा प्रधान मंत्री जीवगुप्त याच्या सारखाच हुशार दिसतो आहेस. मंत्र्याला आतांपर्यंत त्या राक्षसाने ठार केले नसले तर त्याच्या मुसक्या नक्कीच बांधल्या असणार. म्हणून मी तुलाच माझा प्रधान मंत्री म्हणून नेमतो. तेव्हां तू लौकर विचार करून सांग की शत्रूचा संहार करून राज-धानीचे रक्षण करण्यासाठी आपण आतां काय केले पाहिजे?" असे म्हणत जितकेतु मर्कटाचा हात धरून त्याला सिंहासनापर्यंत घेऊन आला.

सर्व दरबारी लोकांनी टाळ्या वाजवून नव्या प्रधानाचे स्वागत केले. मायावी मर्कट सर्वांना जणुकाही अभयदान देण्यासाठी तलवार दातांनी पकडून ठेवून व दोन्ही हात वर उचलून काही म्हणणार इतक्यात दातांत धरलेली तलवार निसटून खाली जमिनीवर पडली व 'खणण' असा आवाज झाला. मायावी मर्कटाने खाली वाकल्या-शिवाय आपल्या शेपटीने तलवार उचलेली व तो काही बोलणार इतक्यात दरबाराच्या बाहेर कसला तरी ओरडा ऐकू आला. राजा जितकेतु व दरबारातले सर्व लोक तिकडे पाहू लागले.



त्याच वेळी मंत्री जीवगुप्त फाटक्या कपड्यानिशी शिरस्त्राण वगैरे शिवाय दरबारात आला. त्याच्या थोड्या पाठी-मागून सामंत सूर्यभूपती आणि दोघां सैनिकांनी दरबारांत पाऊल टाकले. ते दोघे व सैनिक आपला जीव कसा तरी वाचवून आपले घोडे भरधांव पळवीत पुढे आले होते. जीवगुप्ताला पाहतांच काही दरबारी उत्साहाने म्हणू लागले—"प्रधान मंत्री जिवंत आहेत, महाराज! राक्षसाच्या आहारी पडले नाहीत."

मायावी मर्कटाला ते ऐकून राग आला त्याने हातातली तलवार वर उचलून ओरडायला सुरवात केली—"काय रे, मूर्ख

नागरिकांनो! आत्तांच नाही का तुमच्या महाराजांनी मला आपला प्रधान मंत्री नेमले आहे. तुम्ही सर्व ते विसरलात वाटते?"

असे म्हणत नंतर जितकेतू राजाकडे वळून म्हणाला–"काय रे, ए राजा! तुझं काय म्हणणं आहे? मी मंत्री आहे की शत्रूला पाठ दाखवून पळून आलेला हा पळपुटा जीवगुप्त?"

राजा जितकेतू म्हणाला–"मर्कटच आपल्या राज्याचा प्रधान मंत्री आहे. ती गोष्ट मी पुन्हां सांगत आहे. जीवगुप्त या क्षणापासून राजधानीतला एक सामान्य नागरिक झाला आहे."

मंत्री जीवगुप्त सर्व आधार सुटल्यासारखा चटदिशी तलवार उपसून डोळे वटारून मायावी मर्कटाकडे पहात म्हणाला–"हे लबाड माकड का चंद्रशिला नगरीची प्रधानकी संभाळणार आहे? याला राक्षसाच्या दगडी गदेचा वार होण्यापूर्वी मीच वांचविले. आतां मात्र मी स्वतःच याचा स[illegible] करतो." असे म्हणत मंत्री जीवगुप्त मर्कटावर धावला.

राजा जितकेतू रागाने म्हणाला–

"जीवगुप्ता थांब! हे सामान्य माकड नाही, भ्रांतिमती नावाचा थोर तांत्रिक आहे!"

"या तांत्रिकाने भल्लूक मांत्रिकाचा मंत्रदंड चोरून आणला तो कोठे आहे? त्या मंत्रदंडाशिवाय हे मर्कट म्हणजे रानातल्या झाडांवर फिरणारे काळ्या तोंडाचे सामान्य माकडच तर आहे. मी आपल्या तलवारीने याचे डोके एका क्षणात उडवितो, व शेपटी छाटून टाकतो पहा." असे म्हणत जीवगुप्त घाईघाईने तलवार घेऊन मर्कटावर धावून गेला.

मायावी मर्कट–"तांत्रिक गुरू की जय!" असा एकदां जयघोष करून व आपली शेपटी विद्युत वेगाने फिरवून तिने जीवगुप्ताच्या हातातली तलवार हिसकावून घेत आपल्या तलवारीने जीवगुप्तावर वार करायला निघाला. (क्रमशः)



# व्यापार एक जुगार

विक्रमादित्याने आपला हट्ट सोडला नाही.

तो झाडाजवळ गेला, प्रेत खांद्यावर काढून घेतले आणि नेहमीप्रमाणे मौन होऊन स्मशानाच्या दिशेने चालू लागला तेव्हां प्रेतात बसलेला वेताळ त्याला म्हणाला–"राजा! काही लोकांना काही कामात यश येत नाही. मला अशी शंका आहे की तू ही यशस्वी होणार नाहीस. हे कळल्यावर की एका विशिष्ट कामात यशस्विता मिळणे शक्य नाही, ते काम रंगूशेटसारखे सोडून द्यावे, असे मला वाटते. तुला कंटाळा येऊ नये म्हणून मी त्याची गोष्ट सांगतो, लक्ष देऊन ऐक." असे सांगून वेताळ गोष्ट सांगू लागला.

फार पूर्वीची गोष्ट आहे. रंगूशेट आणि सदाशिव नावाचे दोघे मित्र होते. रंगूशेट जातीचा वाणी होता. तरी तो व्यापार धंदा न करतां शेतीभातीची कामे करी.



त्यात तो सुखी होता. सदाशिवने व्यापार करून त्यात खूप पैसे मिळविले. सदाशिवने एकदा रंगूशेटला विचारले–"काय रे, तू आपला वडिलार्जित धंदा सोडून शेती कसा काय करू लागलास?"

"व्यापारधंद्यात आम्हांला कित्येक पिढ्या बरकत नाही." रंगूशेट म्हणाला.

रंगूशेटचे वाडवडील मोठे व्यापारी होते आणि परदेशाशी त्यांचा व्यापार होता. परंतु रंगूशेटचे आजोबा आपल्या गलबताबरोबर पाण्यात बुडून मरण पावले. त्यांचा सर्व धंदाच कायमचा बंद पडला. म्हणून रंगूशेटच्या वडिलांनी शेतकामाला सुरवात केली आणि त्यात त्यांना चांगली मिळकत होऊ लागली; रंगूशेटने शेतकाम करून पुष्कळ धान्य पिकविले व त्यात त्याचा संसार सुखाचा झाला.

एकदां सदाशिव अगदी अनपेक्षितपणे रंगूशेटकडे आला आणि म्हणाला–"मित्रा, दर्यापार परदेशात व्यापाराला निघालो आहे. खूप पैसा मिळेल. तू सुद्धां बरोबर आलास तर जो फायदा होईल तो अर्धा अर्धा वांटून घेऊ. दोघांवर खर्च वांटला जाईल व फायदाही दुप्पट होईल."

रंगूशेट त्यादिवशी कोणत्या विचारांत निमग्न होता, नकळे, त्याने सदाशिवबरोबर परदेशी व्यापाराला जायचे मान्य केले. बायकोने अनेक प्रकारे समजावून सांगितले, परंतु तिकडे दुर्लक्ष करून रंगूशेटने आपले अर्धे शेत विकून भांडवल उभे केले आणि सुवासिक तेले व अत्तरे घेऊन आपल्या चौघां मुलांसह सदाशिवबरोबर गलबतात बसून परदेशी निघाला.

वाटेत मोठे वादळ आले आणि गलबतात पाणी शिरून सर्व मालाची नासाडी झाली गलबत किनाऱ्याला लागले. परंतु माल चांगला नसल्यामुळे स्वस्त दराने विकावा लागला. म्हणून फार मोठे नुकसान झाले.

रंगूशेटच्या बायकोने विचार केला, पापाचे धन आले नाही व आपले जे होते ते देवाने नेले, तरी पती व पुत्र तर सुखरूप पोचले. तिने जे नवस केले होते ते पुरे केले आणि देवाचे आभार मानले.

परंतु रंगूशेटच्या बायकोच्या मनासारखे झाले नाही. रंगूशेटने उरलेली जमीन विकून भांडवल उभे केले व पुन्हां सुवासिक द्रव्ये विकत घेऊन परदेशी निघायचे ठरविले. त्याने सदाशिवला भेटून विचारले–"कायरे सदोबा, मग चलायचं ना पुन्हां परदेशी व्यापाराला?"

"बाबारे, तू पुन्हां या फंदात कशाला पडतोस?" रंगूशेटचे धाडस पाहून सदाशिवने चकित होऊन विचारले.

रंगूशेटने आपल्या मुलांना बरोबर चलता का विचारले. परंतु एकही मुलगा बरोबर यायला तयार होईना. थोरला मुलगा म्हणाला–"कंदमुळे खाऊन आम्ही जगू, परंतु पुन्हां गलबतात पाऊल ठेवणार नाही. तुम्ही सर्व शेत विकून टाकले आहे. शेतीभाती करणेसुद्धा आतां शक्य नाही. मजुरी करू नाहीतर भीक मागू, परंतु परदेशाशी व्यापार करून जीव धोक्यात घालणार नाही."

म्हणून रंगूशेट एकटाच निघाला. या खेपेस त्याला व्यापारात खूप फायदा झाला. त्याने जेवढे भांडवल लावले होते त्याच्या दहापट फायदा झाला. त्याने व्यापार करण्यापूर्वी जेवढी जमीन विकली होती तिच्या दुप्पट जमीन खरेदी करून मुलांना दिली.



या खेपेस सदाशिव त्याच्या बरोबर व्यापाराला आला नव्हता. त्याला त्याबद्दल पश्चात्ताप झाला. त्याने रंगूशेटकडे येऊन त्याला विचारले–"काय रे, पुन्हां तू परदेशात व्यापाराला जाणार आहेस का?"

रंगूशेट निरुत्साह दर्शवून म्हणाला–"सदोबा, आतां पुन्हां मी त्या आगीत हात भाजून घ्यायला तयार नाही. व्यापार माझ्या नशिबी नाही. शेतीभातीची कामेच माझ्या नशिबात आहेत. म्हणून मी या पुढे तोच धंदा करायचे ठरविले आहे."

येथवर गोष्ट सांगून वेताळ म्हणाला–"राजा, रंगूशेटला व्यापारात बरकत नाही, असे खरोखरीच वाटत होते तर तो





सदाशिवाबरोबर पहिल्या खेपेस व्यापार करायला निघालाच कां? त्यात त्याला पुष्कळ नुकसान सोसावे लागले आणि व्यापार त्याच्या भाग्यात नाही हे स्पष्ट झाले. अशा परिस्थितीत दुसऱ्या खेपेला त्याने व्यापार करण्याचे कां ठरविले? आपली सर्व जमीन त्याने विकून टाकली, ती कां? नंतर व्यापारात खूप फायदा झाल्याचे पाहिल्यावर त्याने त्यातून अंग कां काढून घेतले? रंगूशेटच्या या विचित्र मन:स्थितीचे गुपित माहीत असून तू उकलले नाहीस तर तुला माहीतच आहे की तुझ्या डोक्याची शंभर शकले होऊन तुझ्याच पायांवर लोळू लागतील."

विक्रमादित्य म्हणाला–"शेतीची कामे व व्यापार दोन निरनिराळ्या चित्तवृत्तींची ओळख देतात. व्यापार करणाऱ्याची चित्तवृत्ती जुगाऱ्यासारखी धाडसाची व तन्मयतेची असते. या उलट शेतीभातीच्या कामात काबाडकष्ट व सहनशक्तीची गरज असते. रंगूशेटने, व्यापार त्याच्या भाग्यात नाही, असे जे म्हटले त्यात, जुगाऱ्याचे धाडस त्याच्या अंगी नाही, हे त्याला सांगावयाचे होते. परंतु त्यात व्यापार केल्याने नुकसानच होईल असे म्हणण्याचा त्याचा हेतू नव्हता. सदाशिवने त्याला बरोबर व्यापार करायला बोलाविले त्यावेळी त्याच्यात त्याच्या वाडवडिलांची जी जुगाऱ्याची वृत्ती होती ती बळेच डोके काढू लागल्याचे दिसते. व्यापारात नुकसान झाल्यावर त्या वृत्तीचाच पगडा त्याच्या मनावर बसलेला दिसून येतो. म्हणून त्याने आपली सर्व इस्टेट पणाला लावून जुगार खेळून पाहिली व त्यात त्याला फायदा झाला. त्यानंतर त्याच्या सहज वृत्तीने उचल खाल्ली व जुगाऱ्याची वृत्ती त्याला अनुकूल नसल्याचे त्याने ओळखले. म्हणून तो पुन्हां शेतीभातीच्या कामाकडे वळला.

अशा तऱ्हेने राजाचे मौन भंग होताच वेताळ प्रेतासह नाहीसा झाला आणि पुन्हां झाडाजवळ जाऊन लोंबकळू लागला.

(कल्पित)





# सैंपाकी

पालीच्या बाजारात गोपू व रघू हे बालमित्र कित्येक दिवसांनी परस्परांना अचानक भेटले. लग्न झाल्यानंतर दोघे निरनिराळ्या गावात राहू लागले होते. गोपू व्यापार करू लागला. त्याच्या बायकोचे नाव शांताबाई होते. दोघांना एक मुलगा होता. त्याचे लग्नाचे वय झाले होते.

रघू शेतकामात रमला होता. त्याची बायको रुक्मिणी हुशार होती. त्यांना सतरा अठरा वर्षांची एक मुलगी होती व तिचे लग्नाचे वय झाले होते.

दोघांचा व्यवसाय निराळा होता, परंतु एका गोष्टीत त्यांच्या आयुष्यात साम्य होते. दोघांच्या बायका फार आळशी होत्या. त्या कधी सैंपाक करीत नसत. नवऱ्यालासुद्धा भात उकडून वाढीत नसत. त्यांना सैंपाक करता येत नव्हता असे मुळीच नाही. परंतु सैंपाक करणे त्यांना आवडत नसे. नाइलाजाने त्यांना सैंपाक करावाच लागे तेव्हां त्या असा करीत की खाववत नसे व सर्वांना उपाशी रहावे लागे. म्हणून दोघे मित्र घरी आल्यावर सैंपाकही करीत.

दोघे बाजारात भेटले तेव्हां दोघांना त्यांच्या बायकांचा हा आळशीपणा घालवायला एक युक्ती सुचली. असे ठरलं की गोपूच्या घरी रघूनं व रघूच्या घरी गोपूनं जायचं व स्वत:ची ओळख जाऊन सांगायची, त्याप्रमाणे दोघे मित्र परस्परांच्या घरी अचानकपणे पोचले आणि त्यांनी आपापली ओळख जाऊन सांगितली.

रघू शांताबाईंना म्हणाला–"अहो वहीनी, म्हणजे गोपू घरी नाही म्हणता, मग कसं व्हायचं हो? अहो, मी तुमच्याकडे आपल्या मुलीकरितां स्थळ पहायला आलो होतो."

शांताबाईंना परमानंद झाला. रघू बाजाराकरितां आला होता, म्हणून त्याचा



पोशाख त्या दिवशी श्रीमंतासारखा दिसत होता. मुलाला चांगला हुंडा मिळण्याची आशा तिला वाटू लागली. "म्हणाली– "येतील हो बाजारात गेले आहेत!" असे सांगून शांताबाईने सुग्रास जेवण तयार करून पाहुण्यांना वाढले. गोपू तरी परतला नाही. तरी शांताबाई रघूला आग्रह करून म्हणाली–"भावजी, उद्यां नक्की परत येतील, तुम्ही थांबलंच पाहिजे."

चार दिवस झाले, तरी गोपू परतला नाही. रघूने गोपूच्या घरी चारही दिवस खूप मेजवान्या उडविल्या. शेवटी शांताबाईंना हे सांगून की आतां मात्र घरी परतलेच पाहिजे, गोपू आपल्या गावी निघाला.

रघू निघून गेल्यावर दुसऱ्याच दिवशी गोपू परतला.

तिकडे रघूच्या बायकोने गोपूचा आतिथ्य सत्कार चार दिवस केला. दररोज नवे पक्वान्न तयार होई. तिचा आळशीपणा कोठे गेला कोणास ठाऊक? गोपूला मेजवान्या मिळत होत्या. त्यानेसुद्धा रघू येईल म्हणून चार दिवस वाट पाहाण्याचे नाटक केले आणि घरी जाणे आवश्यक असल्याचे सांगून पांचव्या दिवशी आपल्या वहिनींचा निरोप घेतला.

दोघे आपापल्या घरी आले तेव्हां त्यांना त्यांच्या बायकांनी त्यांचे मित्र स्थळाच्या चवकशीसाठी आल्याचे सांगून वाट पाहून शेवटी निराश होऊन परतल्याचे सांगितले.

त्यानंतर दोघांच्या बायकांनी लग्ना-विषयी बोलणी करायला आपापल्या नवऱ्याच्या मागे टुमणे लावले. दोघे मित्र पुढल्या आठवड्याच्या बाजारात भेटले आणि त्यांच्या त्यांच्या बायकांकडून कसा पाहुणचार झाला याच्या गमती परस्परांना सांगून आणि त्यांची युक्ती यशस्वी झाल्याचा आनंद व्यक्त करीत पुढला कार्यक्रम ठरवून आपापल्या घरी परतले.

गोपू परतल्याबरोबर शांताबाईंनी त्याला विचारले–"मग काय झालं हो? भावजी काय म्हणाले स्थळाविषयी?"

गोपूने राग आल्याचा अभिनय करीत उत्तर दिले–"ते किती श्रीमंत झाले, म्हणून काय झाले, इतका गर्व करण्याची त्यांना गरज काय होती? हे स्थळ नकोच!"

"असे झालं तरी काय?" शांताबाईंनी विचारले.

"व्हायचं काय? म्हणाला, त्यांची मुलगी म्हणे सैंपाक करणार नाही. म्हणजे लग्नानंतर आपला मुलगा तिला सैंपाक करून वाढणार का?" गोपूने रागाचा आव आणून विचारले.

"इश्श! ते कसं होईल? काहीतरीच बाई!" शांताबाई म्हणाली.

"रघूला कोणीतरी सांगितल्यासारखं दिसतं आहे की आपल्या घरात सैंपाक मलाच करावा लागतो म्हणून! आणि मला कळलं आहे की त्याची बायकोसुद्धा सैंपाक करीत नाही!" गोपू म्हणाला.

शांताबाईंना वाटू लागलं की आपल्या अशा वागणुकीमुळे एक चांगलं चालून आलेलं स्थळ हातातून निसटणार. ती नवऱ्याला म्हणाली–"तुम्ही जाऊन त्यांचा गैरसमज दूर करा. सांगा की माझी तब्येत कधी बरोबर नसली, म्हणजे तुम्हांला सैंपाक करावा लागतो. बाकी नेहमी मीच सैंपाक करते."

"हे गं काय तुझं म्हणणे? त्यांनी मला येऊन तोंडावर हे थोडेच सांगितले! मी आपल्या तर्फे हे जाऊन सांगू लागलो तर माझंच हसं होईल. एक चांगलं स्थळ



हातचं निसटतं आहे, एवढे मात्र खरे!" गोपू असं म्हणत गप्प झाला.

तिकडे रघू उदास चेहरा घेऊन घरी परतला व म्हणाला—"आतां मी तरी काय सांगू आपल्या नशिबातच नाही, हे चांगलं स्थळ चालून आलेलं परत गेलं!"

"म्हणजे! झालं तरी काय?" रुक्मिणीने विचारलं.

"ते म्हणाले, लग्न झाल्याबरोबर सैपाक्याला काढून आमच्या मुलीकडून ते सैपाक करविणार म्हणे! त्यांना कळलं म्हणे की आमच्या घरी पुरुषच सैपाक करतात!"

"पण, हे काय बोलणं झालं? तुम्ही स्वतःच हौशीने सैपाक करतां! मी सैपाक करणार नाही असे कधी म्हटलं का? तुम्ही घरी नव्हतां तेव्हां मी नव्हता का सर्व सैपाक करून त्यांना वाढला. दररोज नवं पक्वान्न वाढलं मी त्यांना! भावजींना चार दिवस मीच सैपाक करून वाढलं नव्हतं का?" रुक्मिणी म्हणाली.

"मग तुझं म्हणणं काय?" रघूने विचारलं.

"आमची मुलगी सैपाक कां नाही करणार? एक सैपाक करण्याची गोष्ट घेऊन का चांगलं स्थळ हातचं जाऊ द्यायचं? तुम्ही आतां जाऊन मुहूर्त ठरवून या." रुक्मिणीने रघूला आग्रह केला.

रघू गोपूकडे जाऊन म्हणाला—"मित्रा, आणि वहिनी! माझी मुलगी सैपाक करायला तयार आहे. मग ठरवायचा का मुहूर्त?"

ते ऐकून शांताबाईना भांड्यात जीव पडल्यासारखं वाटलं. रुक्मिणीला रघूकडून मुहूर्त ठरल्याचे कळलं तेव्हां ती शपथ घेऊन म्हणाली—"देवा! मी कान धरते, यापुढे मी ह्यांना कधी सैपाक घरात पाऊल टाकू देणार नाही."

लग्नकार्य उरकल्यावर सर्व गुपित प्रगट झालं. कृत्रिम परिस्थिती नाहीशी झाली आणि रघूला आणि गोपूला सैपाक्याच्या कामातून कायमची सुटका मिळाली.



# दूषित बुद्धिचा परिणामही दूषित

करटकशास्त्री सर्पदंश उतरविणारे एक मांत्रिक होते. दमनकशास्त्री अर्धांगवायू बरा करणारे एक थोर वैद्य होते. परंतु दोघेही संकुचित बुद्धीचे होते. आपापल्या विद्येत निष्णात असल्या कारणाने त्यांना अपार धनवैभव प्राप्त झाले व त्यांनी ते सर्व कोठेतरी गुप्त स्थानी पुरून ठेवले. त्यांनी आपली विद्यासुद्धा तितकीच गुप्त ठेवली. वृद्धापकाळीसुद्धा कोणाला शिकविली नाही. त्यांच्याकडे कित्येक तरुण मंडळी त्यांचे शिष्यत्व करावे म्हणून आली. परंतु त्यांनी कोणालाही आपली विद्या शिकविली नाही. मृत्युसमयी फक्त आपल्या मुलांना शिकवायची असे मनाशी ठरविले. कारण त्यांना त्यांच्या व्यवसायात बराच फायदा होत असे.

एके दिवशी पहाटे दमनकशास्त्रींना साप चावला आणि घरी आल्यावर त्यांनी मुलाला साप चावल्याचे सांगितले आणि लगेच बेशुद्ध होऊन ओकू लागले. कुटुंबाशी व मुलाशी काही बोलायलाही फुरसत मिळाली नाही.

त्यांचा मुलगा करटकशास्त्र्यांकडे गेला. त्याने सापाचा मंत्र टाकून वडिलांना वाचवायला सांगितले. परंतु दुर्दैवाने त्याच वेळी करटकशास्त्र्यांना अर्धांगाचा झटका लागला व त्यांचे हातपाय व तोंड लुळे झाले.





# प्रेमाची किंमत

मगध राज्याच्या गादीवर चंद्रसेन नावाचा राजा बसताच त्याचे सहाध्यायी चौघे मित्र त्याच्याकडे, राजा काही मदत करील या आशेने आले.

राजाने त्यांना विचारले–"तुम्हांला नोकरी देऊ की धन सहाय्य हवे?"

एकजण म्हणाला–"मला धन सहाय्यच कर, म्हणजे मी स्वत:बरोबर चार चौघांना अन्नाला लावीन."

चंद्रसेन राजाने त्या मित्राने मागितले तितके त्याला धन सहाय्य करून त्याला निरोप दिला.

दुसरा म्हणाला–"धन घेऊन पुढे त्या भांडवलावर आणखी पैसे मिळविण्या इतका मला कोणताही धंदा येत नाही. तेव्हां मला आपल्या पदरी नोकरीच दे."

चंद्रसेनाने त्याला एका पदावर नेमून चांगला पगार द्यायची व्यवस्था केली.

तिसरा म्हणाला–"शेतीभातीची कामे करून त्यावर आपल्या कुटुंबाचा निर्वाह मला चालविता येईल." चंद्रसेन राजाने त्याला हवी होती तेवढी जमीन दिली.

चवथा म्हणाला–"राजा, मला तुझ्या प्रेमाव्यतिरिक्त आणखी कोणत्याही गोष्टीची गरज नाही. तेवढे मिळाले की ते मला अष्टसिद्धी व नवनिधी मिळाल्यासारखंच आहे. शिवाय माझ्यासारखा मित्र मिळाल्याचा तुझ्यासारख्या राजाला सुद्धा काही तरी फायदाच होईल." त्याचे नाव रामदास होते.

आपल्या प्रेमाचा रामदासाला कसा काय उपयोग होतो हे पाहू या, असा विचार करून चंद्रसेन राजाने त्याला होकार दिला.

चंद्रसेन राजा दररोज संध्याकाळी आपल्या उद्यानात विहार करण्यासाठी रथात बसून जात असे. तेव्हां रामदासाला बरोबर बसवून नेई. ते पाहून तो राजाचा एक आत्मीय असल्याचे नागरिकांना, व्यापाऱ्यांना व अधिकाऱ्यांना कळलं.

एके दिवशी रथ बाजारातून जात असतां रामदास राजाला म्हणाला–"मला थोडं काम आहे, येथल्या एका दोघां व्यापाऱ्यांना भेटायचं आहे," असे सांगून तो रथातून उतरून गेला.

लगेच मोठमोठे व्यापारी रामदासच्या चारी बाजूला घोळका करून उभे राहिले. रामदासाने त्यांना राजा लौकरच नवे कर बसविणार असल्याचे सांगितले.

लगेच व्यापाऱ्यांनी रामदासाला अनेक भेटी सादर केल्या व राजाने त्यांच्यावर नवीन कर लावू नये यासाठी सर्व प्रयत्न करायला विनविले.

रामदासाने नकार दिला नाही. व्यापारी दर आठवड्यात त्यांना जो फायदा होई त्यातला काही भाग रामदासाला आणून देऊ लागले. थोड्याच दिवसात रामदासाची राजधानीतला एक श्रीमंत म्हणून गणना होऊ लागली. हा सर्व व्यवहार फार गुप्तपणे होई. व्यापाऱ्यांचे हिशोब तपासणारे सरकारी अधिकारी व न्यायाधीश सर्वांना त्यांचा वांटा परस्पर पोचता होई.

काही दिवसांनी रामादासाने राजधानीतच एक मोठा वाडा बांधला आणि गृहप्रवेशाच्या वेळी राजाला, मंत्र्यांना,



अधिकाऱ्यांना, प्रमुख व्यापाऱ्यांना निमंत्रणे पाठविली. त्याने एक मोठी मेजवानी दिली व त्यावेळी नृत्य गायनाची व्यवस्था केली.

राजाने चकित होऊन रामदासाला विचारले–"काय रे, इतक्या थोड्या अवधीत इतके पैसे कसे काय मिळविलेस?"

"महाराज, आपली कृपा असली तर मोठमोठी राज्येसुद्धा मिळतील!" रामदास म्हणाला.

"तू हे सर्व वैभव कसे संपादन केलेस हे सांगशील का?" राजाने त्याला विचारले.

"उद्या रात्री माझ्या घरात माझ्या खोलीत आपण लपून बसावे आणि सर्व गोष्टी पहाव्या व ऐकाव्या. आपल्या कृपेचा

लाभ मला जो झाला तो आपल्या समक्ष आहेच. आपल्याला जो फायदा होईल तोही पहावा." रामदास म्हणाला.

दुसऱ्या दिवशी रामदासाने हिशेब तपासनीसास व न्यायाधिशाला कळेल अशी अफवा उडविली. त्या दिवशी रात्री राजा रामदासाच्या घरी त्याच्या बैठकीच्या खोलीच्या बाजूच्या खोलीत लपून बसला. काही वेळाने हिशेब तपासनीस आला व म्हणाला–"या खेपेस माझा वाटासुद्धा तुम्हीच ठेवून घ्या आणि मला एका गोष्टीचं सहाय्य करा."

"कोणती मदत पाहिजे तुम्हांला?" रामादासाने त्याला विचारले.

"मी मन लावून काम करीत नसल्याचे ऐकून महाराजांनी मला काढून टाकून आणखी एकाला नेमण्याचे ठरविले असल्याचे कळले आहे. मिळकत होत होती, ती एकाएकी बंद होणार की हो! मी मन लावून काम करीत असल्याचे महाराजांच्या कानावर घालून माझी नोकरी कायम राहील असे काहीतरी करा." तपासनीस म्हणाला.

"ठीक, करतो काहीतरी!" रामदास म्हणाला. तो निघून गेल्यावर थोड्या वेळाने न्यायाधीश येऊन म्हणाला–"या खेपेस माझा वाटासुद्धा तुम्हीच ठेवून घ्या आणि महाराज माझी बदली करणार आहेत ती थांबवा. व्यापारी ज्या जागी नाहीत व फक्त शेतकरी जेथे राहतात तेथे काय मिळकत होईल हो?"

"ठीक, करतो काहीतरी!" रामदास म्हणाला व त्याला निरोप देऊन राजाला येऊन म्हणाला–"पाहिलेत, महाराज! आपली मर्जी संपादन करून मी सर्व लांचखाऊंना स्वतःकडे लोहचुंबकासारखे आकर्षित करून घेतले आहे. आपल्या सरकारात लांचखाऊ लोकांना बाहेर काढायला आपल्या प्रेमाचा उपयोग झाला की नाही?"

चंद्रसेन राजाने ते मान्य केले आणि हिशेब तपासनीसाला व न्यायाधीशाला योग्य कारण सांगून कमी केले.





# भृगु ऋषी

'भृगु' या शब्दाचा अर्थ 'प्रकाशित करणे' असा आहे. भृगु हे अग्नीचे एक नाव असावे असे काही विद्वानांचे मत आहे. भृगु वंश हा वेदकाळातील अत्यंत प्राचीन वंश आहे. ऋग्वेदात अग्नि संबंधाने ज्या सूक्ती आहेत त्यांवरून भृगूंनी मानवाला अग्नीची ओळख करून दिली हे कळते. म्हणजे त्यांनी अग्नी हा लाकडात गुप्तरूपे असतो, हे लाकडाला लाकूड घासून दाखवून अग्नी निर्माण केला व त्याच्याशी मानवाची मैत्री करून दिली असे ऋचांवरून कळते.

वेदकालात भृगूचा अग्नीशी जवळचा संबंध असल्याचे दिसते तर पुराण कालात भृगू ऋषींचा राक्षसांशी जवळचा संबंध असल्याचे आढळते. ब्रह्मदेवाच्या हृदयातून जन्मलेले हे मुनिवर्य हे फार प्राचीन व जुने होते. तरी यांची पहिली पत्नी हिरण्यकशिपूची मुलगी दिती ही होती. (कश्यपाच्या पत्नीचे नांव सुद्धा दिती होते असे सांगतात; परंतु तिच्या पोटी राक्षस जन्मले, ती राक्षसाची मुलगी नव्हती. ती दक्षाची मुलगी होती.) भृगू व दितीच्या पोटी कवी नावाचा मुलगा झाला. याचा मुलगाच राक्षसांचा गुरु शुक्र होता!

राक्षस भृगूच्या आश्रमातच राहून देवांवर लपून छपून हल्ला करीत. भृगुपत्नी दितीने त्यांना आश्रय दिला होता. ते कळल्यावर विष्णूने आपल्या सुदर्शन चक्राने तिचा शिरच्छेद केला. ते कळल्यावर भृगूने विष्णूला शाप दिला की त्याला पत्नीविरहाचे दुःख सहन करावे लागेल. म्हणूनच रामावतारात रामाला सीतेचा विरह सहन करावा लागला होता, म्हणे.

भृगूचे ख्याती नावाच्या एका स्त्रीशी सुद्धा लग्न झाले होते, म्हणे. ती कर्दम

प्रजापतीची मुलगी. तिच्या पोटी भृगूला धाता व विधाता नावाचे दोन मुलगे झाले.

भृगूची पुलोमा नावाची आणखी एक पत्नी होती. एकदा भृगूने तिला अग्नीकडे लक्ष ठेव म्हणून सांगितले व तो बाहेर निघून गेला. त्यावेळी पुलोम नावाचा एक राक्षस अग्निगृहात शिरला व त्याने "ती कोण?" असे अग्नीला विचारले.

"ही भृगूची पत्नी आहे." असे अग्नीने उत्तर दिले. तिला आपली बायको करून घेणार आहे असे सांगून पुलोम राक्षस तिला उचलून घेऊन गेला. त्यानंतर तिच्या पोटी च्यवन जन्मला व त्याने त्या राक्षसाला भस्म करून टाकले.

आपल्या पत्नीच्या अपहरणाला कारण अग्नी होता हे ओळखून भृगूने अग्नीला "तू सर्वभक्षक हो!" असा शाप दिला.

"मला माहीत असलेली गोष्ट मी सांगितली त्यात माझी काय चूक?" असे सांगून अग्नी रागाने कोठे तरी जाऊन लपला आणि देवांना त्याने हव्य पोचविण्याचे बंद केले. देवांनी त्याला— "नाहीरे बाबा, तू नित्य पवित्र आहेस" अशी त्याची स्तुती करून त्याला परत बोलाविले.

भृगूला ऋषिश्रेष्ठ असेही म्हणतात. हिमालय पर्वतालाही भृगूने शाप दिला होता म्हणे. भृगूत निग्रह शक्तीबरोबर अनुग्रह शक्ती सुद्धा होती. वसिष्ठांनी निमीला 'तू मर!' असा शाप दिला तेव्हां भृगूने निमीला "निमिष" (पापणी लवणे) रूपे जिवंत ठेवले म्हणे.

भृगूने एकदां खोटे बोलून वीतहव्य नावाच्या क्षत्रियाला ब्राह्मण केले म्हणे. वत्स देशाचा राजा वीतहव्य याच्या मुलांनी काशीराजाच्या कुटुंबाला ठार केले व देवोदास याचा पराभव केला. देवोदासाचा मुलगा प्रतर्थ वीतहव्याच्या मुलांचा वध करून वीतहव्याचा वध करण्यासाठी आला असता वीतहव्य भृगूच्या आश्रमात लपला. प्रतर्थ वीतहव्याच्या शोधार्थ आला तेव्हां भृगू 'त्याच्या आश्रमात कोणी क्षत्रिय आला नाही, बुवा' म्हणाला.





## सरस्वती उचंबळून आली

गौतम नावाच्या ऋषीला एकत, द्वित व त्रित नावाचे तीन मुलगे होते. पित्याने तिघांकडून उत्तम वेदाभ्यास करवून घेतला.



तिघां भावात त्रितच सर्वात श्रेष्ठ. त्याचे प्रवचन ऐकायला दूरदूरून लोक येत.



एकदां तिघां भावांनी यज्ञ करायचे ठरविले आणि त्यासाठी योग्य जागेच्या शोधार्थ निघाले.



ते एका निर्जन प्रदेशातून जात असता, पुढे त्रित चालत होता. त्याला अकस्मात एक वाघ आडवा आला. तो जवळ येईपर्यंत त्रितला दिसला नाही.

परंतु एकतला व द्वितला तो वाघ आधीच दिसला असूनही त्यांनी त्रितला सावध केले नाही व ते पळून जाऊन झाडावर चढून बसले.





त्रित धावरून पळत असता एका विहीरीत पडला आणि वाघाच्या दाढेतून वांचला. लौकरच त्याला शुद्धी आली.

त्याच्या थोरल्या भावांना त्याला वाघाने खाल्ले असावे असे वाटले व त्यांना फार आनंद झाला. त्यांना वाटलं की त्याला यज्ञभाग देण्याची गरज राहिली नाही.





परंतु भूतपिशाचांचे उच्चाटन करण्याचा मंत्र फक्त त्रितलाच माहीत होता. त्याच्या दोघां थोरल्या भावांना माहीत नव्हता. त्यांनी आरंभिलेल्या यज्ञ-भूमीत भूतपिशाच्चे शिरली.

जुन्या ओसाड विहिरीत यज्ञाचा मुहूर्त जवळ येत असलेला पाहून त्रितने दगडावर दगड मारून अग्नी निर्माण केला आणि पावोळा घालून अग्नि पेटविला व तोच आपला यज्ञ आहे असे मानले.





ते पवित्र स्थान नव्हते. त्याच्या जवळ यज्ञसामुग्रीसुद्धा नव्हती. परंतु त्याची आस्था व श्रद्धा पाहून देव प्रसन्न झाले व त्याला दर्शन देऊन वर मागायला सांगितले.



"या विहिरीला पवित्र करा. या विहिरीत जो स्नान करील तो पवित्र होईल असे करा. असा त्याने देवांकडे वर मागितला. लगेच विहिरीला पाणी लागले व तो पाण्यावर तरंगत विहीरी-बाहेर आला.



अंतर्वाहिनी सरस्वती त्याला मिळा-लेल्या वरामुळे उचंबळून वर आली. सर्व आनंदाने त्याची स्तुती गाऊ लागले.



# अष्टावक्र मुनी

अष्टावक्र हे एकपाद नावाच्या ब्राह्मणाचे पुत्र. एकपादाजवळ अनेक शिष्य विद्या-भ्यास करीत. त्यांना एक क्षणाचीही विश्रांती लाभत नसे. एकपादाची बायको सुजाता गरोदर असतांना तिच्या पोटातील मुलगा एकपाद म्हणाला–"तुम्ही आपल्या शिष्यांना निद्रा आहार वगैरेला सुद्धां वेळ न देतां त्यांच्याकडून कशासाठी अभ्यास करवितां आहां? त्यांचे आरोग्य बिघडत चाललं आहे."

"तू असे वांकडे बोललास म्हणून तू अष्टावक्र होऊन जन्माला येशील." असा एकपाद मुनींनी मुलाला शाप दिला.

सुजाताचे दिवस भरत आले होते. घरात बाळंतपणासाठी लागणारी सामुग्री व पैसा अडकाही नाही. म्हणून तो जनक राजाकडे गेला. तो घरात नव्हता व प्रसवकाळ जवळ येऊन ठेपला. म्हणून सुजाता माहेरी आपल्या भावाकडे गेली. तिच्या भावाचे नाव उद्दालक होते. तेथेच अष्टावक्र जन्मला. त्याच सुमारास उद्दालकाला श्वेतकेतू नावाचा मुलगा झाला.

मुलं लहानाची मोठी झाली. एकदा अष्टावक्र मामाच्या मांडीवर जाऊन बसला. ते श्वेतकेतूला आवडले नाही. तो ओरडला–"तू माझ्या बाबांच्या मांडीवर कां बसलास. तू जा आपल्या बाबांकडे."

अष्टावक्राने आईला विचारले–"आई, माझे बाबा कोठे आहेत ग?"

"पैसे घेऊन यायला ते जनक राजाकडे गेले आहेत." ती म्हणाली.

अष्टावक्र लगेच जनकराजाकडे गेला. तेथे त्याला कळले की जनकराजाच्या दरबारात वरुणाचा मुलगा बंदी याच्याशी शास्त्रार्थ करीत असतां एकपाद हारला आणि त्यामुळे त्याला पाण्यात बुडवून

ठेवण्यात आले आहे आणि एकपादाच्या बरोबर बंदीशी शास्त्रार्थात हारलेले आणखी अनेक विद्वान पाण्यात ठेवले गेले आहेत.

अष्टावक्र राजाच्या दरबारात गेला व त्याने बंदीला शास्त्रार्थं करण्यास आव्हान केले. दोघांचा शास्त्रार्थ झाला व त्यात बंदी हारला. अष्टावक्र जिकला त्याबद्दल पुरस्कार म्हणून त्याने त्याच्या वडिलांना व पाण्यात बुडवून ठेवलेल्या इतर विद्वानांना मुक्त करावे, असे सांगितले. अशात्ऱ्हेने अष्टावक्राने शाप देणाऱ्या पित्याला ही, त्या अपमानांतून वांचविले.

अष्टावक्राने वदान्याची मुलगी सुप्रभा हिच्याशी लग्न करण्याची इच्छा दर्शविली. वदान्याने अट घातली की तो घेईल त्या परीक्षेत अष्टावक्र उत्तीर्ण झाला तर त्याच्याशी मुलीचे लग्न करून देईन. म्हणे हिमालयात एक स्त्री दिसेल, त्या स्त्रीला पाहून ये, अशी अट वदान्याने अष्टावक्र.ला घातली. अष्टावक्र हिमालय पर्वतावर जात असतां त्याने कुबेराचे अतिथ्य स्वीकारले. कुबेराने खूप थाटाने त्याचा अतिथिसत्कार केला. आणि त्याच्या करमणुकीसाठी नृत्य गायनादीची व्यवस्था केली. गंधर्वांनी गायन केले आणि अप्सरांनी नृत्य केले. एक वर्ष लोटले.

त्यानंतर तो वदान्याने सांगितलेल्या स्त्रीला जाऊन भेटला. तिने आपल्या सुवर्ण-मंदिरात त्याचे यथायोग्य आतिथ्य केले व त्याच्यावर मोहिनी घालण्याचा प्रयत्न केला. परंतु अष्टावक्र थोडादेखील नमला नाही. तिने तिच्याशी लग्न करून घ्यायला अष्टा-वक्राला आग्रह केला.

अष्टावक्र म्हणाला–"तू स्वतःच स्वतःचे कन्यादान कसं काय करणार? तुझ्या वडिलांचे नाव काय? त्यांनी कन्यादान केले तर मी तुझ्याशी लग्न करीन."

तेव्हां तिने खरी गोष्ट उघड सांगितली. वदान्याने अष्टावक्राची परीक्षा घेण्यासाठी तिची सृष्टी केली होती. त्या परीक्षेत अष्टावक्र यशस्वी झाला. नंतर त्याचे सुप्रभेशी लग्न झाले.





# मिथ्यापवाद

**फार** पूर्वी एक अत्यंत श्रीमंत वाणी होता. त्याला सुबुद्धी नावाचा एक मुलगा व सुमित्रा नावाची एक मुलगी होती. मृत्युसमयी आपल्या मुलाला जवळ बोलावून तो म्हणाला–"बाबा रे, माझ्या मागे व्यापारात चांगलं लक्ष घालून काम कर. तू व तुझी बहीण दोघं चांगलं नाव मिळवा." एवढीच माझी शेवटची इच्छा आहे.

वडील वारल्यावर काही दिवसांनी सुबुद्धीने चार गलबते भरून माल घेतला व परदेशात व्यापार करायला निघाला. निघतांना आपल्या बहिणीला समजावून सांगून तो म्हणाला–"मी आता बरेच दिवस परतणार नाही. मी परत येईपर्यंत तू काळजीपूर्वक रहा. वाकडे पाऊल पडले तर अपकीर्ती शिवाय काय मिळणार. कोण-त्याही परपुरुषाशी बोलू नकोस." परत केव्हां भेट होते, कोण जाणे, असा विचार करून त्याने स्वतःचं चित्र सुमित्रेला दिले व सुमित्रेचं चित्र आपल्याजवळ ठेवून घेतलं आणि आपल्या गलबतात बसून निघाला.

दोन वर्षे लोटली. तिसरे वर्षं चालू होते. सुबुद्धीची गलबते एका बंदराला लागली. त्याने नांगर टाकविला आणि गलबतातले गालिचे वगैरे बहुमूल्य माल काढून घेऊन तो त्या देशाचा राजा सुदर्शन याच्याकडे गेला.

राजासाठी आणलेला नजराणा राजाला देऊन सुबुद्धी म्हणाला–"महाराज, मी परदेशी व्यापारी आहे, आपल्या देशात व्यापार करायला परवानगी मागायला आलो आहे."

सुबुद्धीने आणून दिलेला नजराणा पाहून राजा खूष झाला. त्या दिवसापूर्वी दुसऱ्या कोणत्याही व्यापाऱ्याने इतक्या अमूल्य नजराणा त्याला आणून दिला नव्हता.



म्हणून राजाने खूष होऊन सुबुद्धीने मागितल्याप्रमाणे व्यापार करण्यास परवानगी तर दिलीच, शिवाय त्याने गलबतांत आणलेला अनमोल माल पहायला आपल्या राजपरिवारासह निघाला.

गलबतांतील माल पाहात असतां गलबतात ठेवलेले सुमित्रेचे चित्र राजाला दिसले.

"कोण ही सुंदर तरुणी?" सुदर्शनने सुबुद्धीला विचारले.

"प्रभो, ती माझी धाकटी बहीण आहे."

"रुपलावण्यासारखेच तिचे शील व आचरणही आहे का?" सुदर्शनने विचारले.

"तिच्या आचरणाविषयी कोणी दोष निंदा करणेच शक्य नाही." सुबुद्धी म्हणाला.

"तरमग मी हिला आपली पट्टराणी करून घ्यावी, म्हणतो." सुदर्शन म्हणाला.

ते सर्व ऐकत व पहात असलेल्या सेनापतीच्या मनात एकाएकी मत्सराग्नी भडकला. 'ओहो, तरमग ही वाण्याची पोर आमची मालकीण होणार का? आणि आमच्या बायका हिची सेवा करणार का?' असे मनात म्हणत सेनापती उघड राजाला म्हणाला–"प्रभो, मी या बाईला चांगला ओळखतो. ही कुळटा आहे."

ते ऐकून सुदर्शनला सुबुद्धीचा भयंकर राग आला.

"एका कुलटेला तू शीलवती म्हणालास नाही का? मी तुझे डोके उडवितो." राजा सुबुद्धीला म्हणाला.

"प्रभो! आपल्या सेनापतीने जे काही सांगितले आहे ते सर्व खोटे आहे. मी म्हणतो ते खोटे वाटत असेल तर तो म्हणाला ते खरे असल्याचे त्याला सिद्ध करायला सांगा. तो माझ्या बहिणीला ओळखतो म्हणाला तर त्याला माझ्या बहिणीची अंगठी घेऊन यायला सांगा आणि तिची जन्मखूण तीळ कोठे आहे विचारून यायला सांगा." सुबुद्धी म्हणाला.

सुदर्शनला सुबुद्धी म्हणाला ते रास्त वाटले. तो सेनापतीला म्हणाला–"तू दोन महिन्यांच्या आत त्या स्त्रीची अंगठी व तिच्या जन्मखुणेचा तीळ कोठे आहे या गोष्टीची माहिती घेऊन आला नाहीस तर मी तुझे डोके उडवीन! लक्षात असू दे!"

सेनापती लगेच निघाला व सुमित्रा रहात होती त्या गावी आला. तेथे तो एका गरजू म्हातारीला भेटून म्हणाला–"आजी, तुम्ही त्या मुलीच्या हातातली अंगठी व तिची जन्मखूण कोठे आहे, ते गुपित काढून येऊन सांगितलेत तर तुम्ही मागाल तेवढे सोने देईन."

ती म्हातारी मोहाला बळी पडली आणि सुमित्रेच्या घरी जाऊन तिला इकडच्या तिकडच्या गप्पात गुंतविले आणि तिच्या पाठीवर डाव्या बाजूला तीळ असलेला पाहून घेतला व संधी साधून तिची अंगठी चोरून सेनापतीला आणून दिली.

सेनानी लगेच स्वदेशी निघाला व आपल्या गावी पोचताच त्याने राजाला भेटून सुमित्रेच्या अंगावरच्या तिळाची गोष्ट सांगून तिची अंगठीपण राजाला दिली. सेनापतीने सुमित्रेवर जो मिथ्यापवाद लावला होता तो खरा ठरला. म्हणून सुदर्शनने संतापून सुबुद्धीला मृत्युदंडाची शिक्षा द्यायला आज्ञा केली.

परंतु सुबुद्धीने एक शेवटची इच्छा व्यक्त केली. म्हणाला–"महाराज, या परमुलुखात मरण्यापूर्वी मला माझ्या बहिणीला भेटण्याची फार इच्छा आहे. आपण तिला बोलवावे व तिची भेट घ्यायला मला



परवानगी द्यावी. त्यानंतर आपण केलेली शिक्षा मी आनंदाने उपभोगीन."

ती गोष्ट सुदर्शनने मान्य केली. सुबुद्धीने एक पत्र लिहून सुदर्शनच्या दूताच्या हाती ते सुमित्राकडे पाठविले. आपल्या भावाने सांगितल्याप्रमाणे न वागता त्या म्हातारीशी बोलल्याचा असा परिणाम झाला हे ओळखून सुमित्रा आपल्या वडील भावाला भेटण्याचे ठरवून निघाली.

सुदर्शनच्या राज्यात पोचताच ती सरळ राजाकडे गेली व म्हणाली–"महाराज, आपण माझ्या कानातले हे एक कर्णाभूषण पहावे, हे किती मूल्यवान आहे की नाही?"

सुदर्शनने ते कर्णाभूषण लक्षपूर्वक पाहून व त्यातील मूल्यवान हिरे पाहून विचारले–"होय, हे आहे खरे फार मूल्यवान. परंतु हे मला दाखविण्याचे कारण काय?"

"आपल्या सेनापतीने या कर्णाभूषणाच्या जोडीचे एक चोरले आहे. आपण धर्मभीरू आहां. आपण ते मला त्याच्याकडून देवविण्याची कृपा करावी." ती म्हणाली.

राजाने सेनापतीला बोलाविले व सुमित्राने त्याच्यावर जो आरोप लावला होता तो सांगून म्हणाला–"तू तिचे कर्णाभूषण चोरले आहेस ते, तू तिला देऊन टाक."

सेनापती आश्चर्यचकित होऊन म्हणाला–"महाराज, ही स्त्री कोण हेसुद्धा मला माहीत नाही. मी या जन्मात हिला कधी पाहिलेसुद्धा नाही. मग हिचे कर्णाभूषण कसा चोरून आणीन?"

लगेच सुमित्रा राजाकडे वळून म्हणाली–"महाराज, मी सुबुद्धीची बहीण आहे. आपल्या सेनापतीने मला कधी जन्मात पाहिले नाही, म्हणतो आहे, तर आपण माझ्या दादाला मृत्युदंडाची शिक्षा सांगून तुरुंगात कसे काय टाकलेत?"

सेनापतीने केलेली लबाडी आणि सुमित्रेची हुशारी पाहून राजा चकित झाला. त्याला सर्व गोष्टी कळल्या. त्याने सेनापतीला मृत्युदंडाची शिक्षा केली व सुबुद्धीला तुरुंगातून मुक्त करून सुमित्रेशी विवाह करून तिला आपली पट्टराणी केली.






चंद्रहास नांवाच्या एका मुलाच्या मनात राजा व्हावे अशी महत्त्वाकांक्षा बालपणीच निर्माण झाली. त्यासाठी त्याने कसून विद्याभ्यास सुरू केला. त्याचबरोबर राजाला योग्य असलेल्या शस्त्रास्त्र विद्येचाही अभ्यास केला. त्याने काही तरुण मंडळींना आपला अनुयायी करून घेतले आणि एका निर्जन प्रदेशात आपली राजधानी स्थापन करण्याचे ठरविले. चंद्रहासला त्याच्या पुरोहिताने राजधानी स्थापन करण्यापूर्वी त्या जागेचे स्थल महात्म्य पाहून घ्यायचा सल्ला दिला.

चंद्रहासाने तशा एका जागेचा शोध सुरू केला व सुदैवाने त्याला एक उपयुक्त जागा मिळाली. त्या जागी त्याला एक नवीन अनुभव आला. काही शिकारी कुत्री सशांचा पाठलाग करीत त्या जागेपर्यंत आली. परंतु त्या जागेपर्यंत आल्यावर सर्व ससे थांबले व त्यांनी शिकारी कुत्र्यांवर हल्ला करून त्यांना पळवून लावले. म्हणून तीच जागा राजधानी स्थापन करण्यायोग्य मानून चंद्रहासने राजधानी स्थापन करून तिचे नाव शशांक नगर ठेवले. ते नगर लवंग देशाच्या सीमेवर होते. लवंगनरेशाने शशांक नगरावर स्वारी केली. शशांक नगराचे सैन्य मोठे नव्हते. परंतु कोट दुर्भेद्य होता आणि सैनिकांना ते स्थान अजिंक्य असल्याचा आत्मविश्वासही होता. परिणामी लवंग देशाचा पराभव झाला.

चंद्रहासशी युद्धाला जो कोणी राजा आला त्याचा पराभवच होत गेला. हळूहळू चंद्रहासाच्या राज्याचा विस्तार झाला व तो एक चक्रवर्ती राजा म्हणून प्रसिद्ध झाला. चंद्रहासला एक मुलगा होता त्याचे नाव पद्मसेन होते. पद्मसेनाने बालपणी विद्याभ्यास केला नाही आणि लहानपणापासूनच तो दुर्व्यसनात पडला.

पद्मसेन ऐन तारुण्यात असतां चंद्रहास मरण पावला आणि पद्मसेन राजा झाला. परंतु राज्यकारभार संभाळण्याची लायकी त्याच्या अंगात नव्हती. म्हणून तो नेहमी भीतभीत राज्यकारभार पाही. तेव्हां प्रधानाच्या मुलाने त्याला धीर दिला. म्हणाला–"महाराज, शशांक नगराचे स्थल महात्म्यच असे आहे की भिण्याचे कारणच नाही."

हळूहळू सर्व सामंत राजांना आपला चक्रवर्ती राजा राज्यकारभारात अयोग्य असल्याचे कळले. लवंग नरेश पराभव झाल्यानंतर सामंत राजा झाला होता तरी त्याने बंडाचे निशाण उभारले व शशांक नगरावर चालून आला. त्या युद्धात पद्मसेनचा पराभव झाला. पद्मसेन प्रधानाच्या मुलाबरोबर जंगलात पळून गेला.

पद्मसेन विचार करू लागला–"स्थल महात्म्य असल्या कारणानेच तर माझ्या वडिलांना एवढे मोठे साम्राज्य स्थापन करतां आले होते. परंतु ज्या जागेवरून सशांनी शिकारी कुत्र्यांना पळवून लावले होते ती जागा आपले रक्षण करू शकली नाही. याचा अर्थ असा की मी सशांहून जास्त भितरा व नालायक ठरलो."

परंतु प्रधानाचा मुलगा त्याला समजावून सांगू लागला–"महाराज, आपण एवढे मनाला लावून घेण्याचे कारणच काय? आपल्या पराभवाचे कारणही स्थल महात्म्यच आहे; नाहीतर येथवर सशांना पळवून आणणारी शिकारी कुत्री येथे पोचताच परतली नसती. याचा अर्थ असा की सशांना धैर्य देणाऱ्या जागेने शिकारी कुत्र्यांच्या मनात भीती उत्पन्न केली असे म्हणायला हवे! आपण महापराक्रमीच आहां, परंतु स्थल महात्म्यच असे आहे की आपला पराक्रम क्षीण झाला आणि सशांसारखा भितरा लवंग देशाचा राजा विजयी झाला."

स्थल महात्म्य हे दुधारी तलवारीसारखे आहे. म्हणून माणसाने स्वतःच्या बळावरच अवलंबून राहण्यात शहाणपण आहे हा ज्ञानबोध पद्मसेनाला झाला.





# नोकरांशी वागणूक

रंगरावांची मुलगी सुजाताचे लग्न होऊन बरेच दिवस झाले होते, परंतु ती सासरी नांदायला गेली नव्हती. त्याच सुमारास संक्रांतीचा सण आला. शुभप्रसंगी रंगरावांनी आपल्या जांवयाबरोबर आपले व्याही विश्वनाथराव यांनासुद्धा येण्यासाठी आग्रहाचे बोलावणे पाठवले. विश्वनाथराव सकुटुंब मुलाला घेऊन रंगरावांकडे आले.

रंगराव खूप श्रीमंत असावेत. त्यांचा वाडा खूप मोठा आणि सुंदर होता. घरात नोकरचाकरसुद्धा पुष्कळ होते. हाक मारायची खोटी, एकदम चारपाच नोकर धावून येत. रंगरावांनी व्याह्यांचा पाहुणचार श्रीमंती थाटाने केला. कोणत्याही गोष्टीची उणीव भासू दिली नाही. त्यांचे अगत्य डोळ्यात भरण्यासारखे होते.

दुसऱ्या दिवशी उजाडतांच विश्वनाथरावांची झोप मोडली. तेव्हां घराच्या परसात काहीतरी ओरडा चालू असलेला त्यांना ऐकू आला. त्यांनी परसांत डोकावून पाहिले. तेथे त्यांना रंगराव नोकरांची हजेरी घेत असल्याचे त्यांना दिसले.

रंगरावांच्या नोकरांना मालक म्हणत होते त्याची फिकीरच नसल्यासारखे दिसले. रंगरावांना थोडे आश्चर्य वाटले. इतका श्रीमंत मालक आणि नोकर मालकाच्या म्हणण्याकडे लक्ष देत नाहीत, हे काय? तितक्यात रंगरावांच्या बायकोने पुढे येऊन नोकरांची समजून काढली. म्हणाली–"घरात पाहुणे मंडळी आली असतां तुम्ही असे वागलात तर पाहुण्यांना काय वाटेल?" ते ऐकून नोकर गप्प राहिले व कामाला लागले.

विश्वनाथरावांना हे समजायला वेळ लागला नाही की या सर्व भांडणाचे कारण स्वतः रंगरावच आहेत. ते प्रत्येक लहान सहान गोष्टीबद्दल नोकरांवर कावत म्हणून

नोकरांच्या मनात मालकाबद्दल प्रेम किंवा आदर थोडासुद्धा उरला नव्हता.

थोड्या वेळाने रंगराव विश्वनाथरावांकडे येऊन सांगू लागले—"हल्ली नोकर नोकर राहिला नाही. तो उलटी उत्तरे देऊ लागला आहे. कामाच्या नावाने बोंब. फुकटाचा पगार मात्र हवा. मी यांना संभाळून घेण्याचा किती प्रयत्न करतो, पण सर्व फुकट!"

विश्वनाथराव म्हणाले—"खरंच, तसं सगळीकडे झालं आहे खरं!" परंतु त्यांनी रंगरावांची चूक त्यांच्या पदरात बांधून दिली नाही. कारण ते व्यवहार कुशल होते. ते तसे लक्षाधीश नव्हते, परंतु खाऊनपिऊन सुखी होते. त्यांच्या घरीसुद्धा तीनचार गडी कामाला होते. त्यांच्याशी त्यांना कधी भांडावे लागलं नाही. ते कधी त्यांच्यावर कावत नसत. नोकर मालकाला फार मानीत व त्यांचा आदर करीत.

विश्वनाथराव रंगरावांच्या घरी चार पांच दिवस राहिले. रंगराव नोकरांवर पुष्कळदां विनाकारण ओरडतांना दिसले. विश्वनाथरावांना त्यांची ही संवय बरोबर वाटली नाही. रंगरावांची ही संवय मोडता आली तर मोडायचे त्यांनी ठरविले.

विश्वनाथराव आपल्या गावी सूनबाईला घेऊन निघाले तेव्हां त्यांनी रंगरावांना आपल्या गावी सकुटुंब येण्याचे आग्रहाचे निमंत्रण दिले. रंगरावांनी अत्यंत आदराने येण्याचे मान्य केले.



विश्वनाथरावांचे घर तसे मोठे नव्हते. परंतु स्वच्छ होते. घरातले सामानसुमान जागच्या जागी ठेवलेले होते. आंगणात फुलझाडे लावलेली होती. परसात भाजीपाला लावलेला होता. नोकरच झाडांना खतपाणी घालीत. सर्व परिसर कसा मोहक होता. नोकर आल्या गेलेल्यांच्या सेवेला नम्रपणे हजर असत. मालक व नोकर दोघांची कधी बाचाबाची झालेली कोणाला माहीत नव्हती. रंगरावांना ते सर्व पाहून आश्चर्य वाटले. नोकर व गडी मालकाजवळ नम्रपणाने वागतात, त्याचे कारण काय बरे असावे, त्यांना कळेना.

एकदां विश्वनाथराव आपल्या बैठकीत रंगरावांशी बोलत बसले होते. तेव्हां बैठकीची खोली स्वच्छ नव्हती. विश्वनाथरावांच्या ते लक्षात आले. त्यांना नोकरांच्या त्या हलगर्जीपणाचा राग आला. परंतु त्यांनी एकाही नोकराला बोलावून त्याची हजेरी घेतली नाही. इतक्यात तेथे एक नोकर आला. त्याला पाहून ते म्हणाले—"अरे, हे कपाट तुम्ही दोघे तिथे मिळून पुढल्या पडवीत नेऊन ठेवा." असे सांगून त्यांनी केरसुणी घेतली आणि स्वतःच केर काढू लागले.

परंतु तेवढ्यात गडी धावत येऊन म्हणाला—"मालक, आपण काय काढता केर? आज आम्हीच केर काढायला विसरलो होतो. माफ करा." असे सांगून त्याने मालकाच्या हातातली केरसुणी घेतल व केर काढू लागला.

विश्वनाथरावांना तेच हवे होते. रंगरावांच्या लक्षात ती गोष्ट आली. विश्वनाथराव नोकरांशी निराळ्याच तऱ्हेने वागतांना दिसले. त्यांना राहवले नाही. म्हणाले—"विश्वनाथराव! नोकरांशी कसे वागायचं आणि त्यांच्याकडून कशी कामे करवून घ्यायची, हे तुमच्या उदाहरणावरून आतांच मला कळले."

"होय हो, नोकरांच्या तोंडी लागून काम भागत नाही. स्वतः काम करायला लागलं की धावतात." विश्वनाथराव म्हणाले.






एका गावी एक चांभार रहात असे. त्याला एक मुलगी होती. तो दिवसभर काम करी व घर खर्चाकरिता लागणारा खर्च करून चार पैसे मागे टाकी. त्याने तीन चार वर्षं काबाडकष्ट करून मुलीच्या लग्नापुरेसे पैसे जमविले. मुलीचे लग्न ठरले व मुहूर्तही ठरला. परंतु त्याच्या दुर्दैवाने मुहूर्ताच्या दोन दिवस आधी त्याच्या घरात चोरी झाली आणि त्याने जी रक्कम मुलीच्या लग्नासाठी जमविली होती ती सर्व चोरीला गेली. मुलीचे लग्न कसे होणार या काळजीने बिचारा रडू लागला.

त्याच वेळी तिकडून गावातला सोनूशेट सावकार जात होता. तो चांभाराला रडण्याचे कारण विचारून घेऊन सहानुभूती दाखवीत म्हणाला–"एवढ्यासाठी रडत बसण्याचे कारण काय? तुला लग्नाला हवे असतील तेवढे पैसे मी देतो. तू पाटलाकडे चल. कर्जरोखा लिहून दे. परंतु कर्जफेड दहा दिवसांनी कर बरं का?"

सोनूशेट म्हणजे एक नरराक्षस असल्याचे सर्व गावकऱ्यांना ठाऊक होते. तरी बिचाऱ्या चांभाराला त्या विकट परिस्थितीत सोनूशेट देव पावल्यासारखा वाटला. सोनूशेटचे पाय धरून त्याने त्याचे आभार मानले. म्हणाला–"मालक, गरिबाचावाली तो परमेश्वर आहे. मी त्याची शपथ घेऊन सांगतो. मी कर्ज फेडू शकलो नाही तर आपल्या कातड्याच्या वहाणा शिवून तुमच्या पायात घालीन."

त्यानंतर सोनूशेटने पाटलासमोर कर्ज-रोखा लिहून चांभाराकडून त्यावर अंगठा निशानी करून घेतली. चांभाराच्या मुलीचे लग्न ठरलेल्या मुहूर्तावर झाले.

दहा दिवस लोटले. अकराव्या दिवशी सोनूशेटने आपल्या गड्याला पाठवून चांभाराला बोलावून कर्ज फेडायला सांगितले. चांभार म्हणाला–"असा कहार करू नका मालक! दहा दिवसांत कर्ज फेडणे मला शक्य तरी होईल का?"

"ते सर्व मला माहीत नाही. उद्या संध्याकाळपर्यंत तू कर्ज घेतलेली रक्कम आणून दिली नाहीस तर मी तुझ्या बायको पोरांकडून बेगार करवून पैसे वसूल करीन नाहीतर तुझ्या घराचा लिलाव करीन. हे सर्व तुला नको असेल तर तू आपल्या कातड्याच्या वहाणा करून मला दे.

ते ऐकून चांभाराला त्याच्या डोक्यावर आकाश कोसळल्यासारखे झाले. त्याच्या शेजारपाजारच्या लोकांनी त्याला सल्ला दिला–"तू पाटलांकडे जाऊन आपले गाऱ्हाणे सांग. ते काढतील काहीतरी मार्ग."

चांभार पाटलांकडे गेला व त्यांच्या पाया पडून त्याने आपले गाऱ्हाणे सांगितले. म्हणाला–"पाटील, तुम्हीच सांगा, या स्थितीत मी चोरी करू, की बेगारी? तुम्हीच मला पैलतिरी कसे ते पोचवा. मला तुमचा एकट्याचाच भरंवसा आहे!"

पाटलाला सोनूशेट कर्दनकाळ असल्याचे ठाऊक होते. त्यांना चांभाराची कीव आली. त्यांनी विचार करून चांभाराला एक सल्ला दिला. तो म्हणाला–"परंतु पाटील, सोनू-शेट ओरडू लागला तर मी काय करू?"

"त्यांना तू माझ्याकडे बोलावून घेऊन ये आणि हे बघ, साक्षीदार म्हणून तू आपल्या व्याह्यालासुद्धा बरोबर बोलावून आण." पाटलांनी सांगितले.





अवधी संपला होता तरी चांभाराने कर्जाची फेड केली नाही तेव्हां सोनूशेट पाटलांकडे गेले व कर्जरोखा दाखवून न्याय करायला विनंती केली.

पाटलाने चांभाराला बोलावून विचारले—"कर्जफेड तुला करता आली नाही तर तू व तुझ्या घरचे सर्व लोक सोनूशेटकडे बेगारी करायला तयार आहां का? किंवा घराचा लिलांव करून कर्जफेड करणार की आपल्या कातड्याने जोडे शिवून सोनूशेटला देणार? बोल काय ते!"

"मालक, मी आपल्या कातड्याचे जोडे शिवून देतो." चांभार म्हणाला.

"काय सोनूशेट? मान्य आहे का तुम्हांला?" पाटलाने विचारले.

"मान्य आहे." सोनूशेट म्हणाले.

तत्क्षण चांभाराने एक वहाणांचा जोड आपल्या पोतडीतून काढून समोर ठेवला व म्हणाला—"मालक, हा घ्या!"

सोनूशेट संतापून ओरडले—"गुलामा, तुझी लबाडी माझ्याजवळ नाही चालणार. तू आपल्या कातड्याचे जोडे शिवून देतो आहेस का? पाटील साहेब! पहा हो, हा मला इतका मूर्ख समजतो आहे की काय?"

पाटलाने सोनूशेट म्हणाला ते ऐकून आश्चर्य वाटल्याचे सोंग करून विचारले—"चांभाराने कोणती लबाडी केली म्हणता? त्याने आपल्या कातड्याचे जोडे शिवून देतो म्हटले होते. हे कातडे त्याने विकत घेतलेले कातडे त्याचे नाही का? दुसऱ्याचे आहे का? म्हणून त्याने वचन दिल्याप्रमाणे आपल्या कातड्याचे जोडे शिवून दिले आणि कर्ज-मुक्त झाला. तुम्हांला मी या खेपेस माफ करतो. तुम्ही यापुढे गरिवाला असे नड-वलेत तर मात्र मला कायदेशीर इलाज करावे लागतील, बजावून ठेवतो."

हा निवाडा ऐकून चांभार एका मोठ्या संकटातून वाचला. सर्व गावकऱ्यांना आनंद झाला की चांभाराने सोनूशेटला चांगला धडा दिला. त्यानंतर सोनूशेटने पुन्हां कोणाला त्रास दिला नाही.





# देवी भागवत

दानव पुत्र रंभ व करंभ असे दोघे होते. त्यांना मुले नव्हती म्हणून त्यांनी दीर्घकाळ तपश्चर्या केली. करंभने पंचनद तीर्थक्षेत्रात पाण्यात बुडी मारून राहून तर रंभने एका झाडावर चढून तपश्चर्या केली.

इंद्राला धास्ती वाटली. त्याने मगरीच्या रूपे पंचनद तीर्थात बुडी मारून करंभला ठार केले. आपला धाकटा भाऊ मेल्याचे दुःख रंभला इतके वाटू लागले की त्याने अग्नि-होत्रात आपल्या डोक्याची आहुती देण्याचे ठरवून हातात तलवार घेतली.

तेव्हां अग्निनारायण प्रगट होऊन म्हणाला—"तू आत्महत्या करून इहलोक व परलोकही घालवून बसशील, तुझी तपश्चर्या पाहून मी प्रसन्न झालो आहे. कोणताही वर मागून घे!"

"देवा, तुझा माझ्यावर अनुग्रह असेल तर तू मला एक पुत्र दे. इच्छिल ते रूप त्याला प्राप्त व्हावे आणि देव, दानव किंवा मानव कोणालाही तो अजिंक्य असा असावा." रंभने वर मागितला.

"तुला तू मागितल्याप्रमाणेच पुत्र होईल व तुझे जिच्या वर अत्यधिक प्रेम असेल तिच्याच पोटी तो जन्माला येईल." असा वर देऊन अग्निनारायण अंतर्धान पावला.

रंभ परत येत असतां यक्षांच्या एका म्हशीवर त्याची नजर पडली. तो प्रदेश अत्यंत रम्य होता. त्या प्रदेशाचा त्याच्या मनावर फार परिणाम झाला व तो त्या



म्हशीवरच भाळला. रंभ राक्षसाच्यामुळे ती म्हैस गाभण झाली आणि रंभ राक्षसाबरोबर पाताळलोकी गेली.

तेथे त्या महिषीवर एका महिषाचे म्हणजे रेड्याचे प्रेम जडले. ते पाहून रंभला भयंकर राग आला. तो त्या रेड्याला मारायला गेला. रेड्याने त्याला आपल्या शिंगावर उचलून ठार केले. ते पाहून त्या महिषीने म्हणजे म्हशीने रंभच्या चितेत उडी टाकली. त्या चितेतून दोन राक्षस बाहेर आले. एकाचे नाव महिष व दुसऱ्याचे रक्तबीज असे होते.

राक्षसांनी महिषासुराला आपला राजा केले. त्याच्या सेनापतींची नावे अनुक्रमे चिक्षर, ताम्र, असिलोम, सुदर्क, बिडाल, बाष्कल, त्रिनेत्र, कालबंधक अशी होती. त्यांच्या सहाय्याने महिषासुराने सर्व भूलोक पादाक्रांत केला आणि यज्ञहोमादी ध्वंस करीत सुटला. देव व दानव यांचे परस्परांशी एक भयंकर मोठे युद्ध झाले.

-हे युद्ध होण्या पूर्वी महिषासुराने कांचनपर्वतावर घोर तपश्चर्या केली व ब्रह्मदेवाला प्रसन्न करून असा वर मागितला की त्याला कधी मरण येणार नाही.

तेव्हां ब्रह्मदेव म्हणाला–"जो जन्माला येईल त्याला मृत्यू हा येणारच. तसेच तो मरण पावतो तो पुन्हां जन्म घेतो. तेव्हां मरण न येण्याचा वर मी कसा देऊ शकेन? अमरत्वाशिवाय दुसरा एखादा वर मागून घे."

महिषासुराने विचार केला की स्त्रीच्या हाती आपल्याला मरण येणे शक्य नाही आणि वर मागितला–"देवा! देव, दानव किंवा मानव पुरुषाच्या हाती मला मरण येणार नाही, असा वर दे."

ब्रह्मदेव "तथास्तु!" म्हणाला व त्याने बजावून सांगितले की तुला जेव्हां कधी मरण येईल ते एका स्त्रीच्या हातीच येईल.

तो वर प्राप्त होताच महिषासुराला शक्तिमद चढला तो आपल्या एका सेवकाला बोलावून म्हणाला–"तू इंद्राला जाऊन विचार की मुकाट्याने तू आपले स्वर्गाचे राज्य देतोस की युद्धाला येतोस, काय ते स्पष्ट उत्तर विचारून परत ये."

महिषासुराचा दूत स्वर्गलोकी जाऊन इंद्राला भेटला व म्हणाला–"मी महिषासुराचा दूत आहे. त्याने तुला सांगायला सांगितले आहे की तू मुकाट्याने आपले राज्य देऊन स्वर्गातून निघून जाणार की युद्धाला आव्हान करणार?"

"काय रे मूर्खा! तुझ्या मालकाला इतका गर्व चढला आहे का? आणि तू त्याचा दूत असा उर्मटपणाने बोलतो आहेस का? दूत आहेस म्हणून वाचलास. मी त्याची घमेंड जिरवितो. त्याला जाऊन माझा निरोप सांग, अरे रेड्या, फुकटाचे गवत खाऊन तुझ्या अंगात मस्ती चढलेली दिसते आहे. मी तुझी सर्व चरबी उतरविणार आहे." इंद्र म्हणाला.

दूत महिषासुराला येऊन म्हणाला–"महाराज, इंद्राने ज्या शब्दात आपली निंदा केली आहे त्या शब्दांचा मी उच्चारही करणार नाही."

महिषासुराचा क्रोधाग्नी भडकला. त्याने शेपटी झाडली व डोळे वटारून आग पाखडीत म्हणाला–"या अपराधाबद्दल मी इंद्राचा वध केला तर मला कोण दोष देईल? व युद्ध म्हणजे अप्सरांना पाठवून तपोभंग करणे वाटले काय त्याला? माझ्या समोर



सहस्रावधी इंद्र आले तरी मी त्यांना धुळीला मिळवीन. त्याला मी क्षमा केली तर शहाणे लोक मला हसतील. त्या इंद्राला मदत करणारा तो विष्णूसुद्धा असाच आहे. त्याने वराहाचे सोंग करून हिरण्याक्षाचा आणि नरसिंहाचे सोंग करून हिरण्यकश्यपूचा वध नव्हता का केला? म्हणून विष्णू व इंद्र दोघांवर विश्वास करणे धोक्याचे आहे."

त्यानंतर महिषासुराने मनाशी ठरविले की अष्टदिग्पाल आणि सर्व देवांचा पराभव करून त्यांना जे सुख आणि ऐश्वर्य प्राप्त आहे ते राक्षसांना मिळवून दिले पाहिजे. तो आपल्या सेवकांना बोलावून म्हणाला–"हे पहा रे! ब्रह्मदेवाच्या कृपेने कोणी



पुरुष, देव, दानव किंवा मानव माझा वध करणे शक्य नाही. तुम्ही सर्व स्वर्गावर स्वारी करायला तयार व्हा. मी आपल्या शिंगांनी व खुरांनी शत्रूचा संहार करीन आणि तुम्हांला देवांना प्राप्त असलेले सर्व सुखोपभोग प्राप्त करून देईन."

तिकडे सर्व दिक्पालांना बोलावून इंद्र म्हणाला–"रंभचा मुलगा महिषासुर ब्रह्मदेवाचा वर प्राप्त करून त्या गर्वाने ससैन्य स्वर्ग जिंकण्याच्या विचाराने येतो आहे. त्याने एक दूत पाठवून मला धमकी दिली आहे की युद्धाला तयार हो, नाहीतर शरण मागायला ये. मी त्याला लौकर काय ते कळविले पाहिजे म्हणे. म्हणून मी तुम्हांला सर्वांना बोलाविले आहे. बोला आपण या प्रसंगी काय करणे बरोबर होईल? शत्रू कितीही बलवान असला तरी त्याला क्षमा करणे भ्याडपणाचे होईल. जय पराजय हे परमेश्वराच्या कृपेवर अवलंबून आहेत. तरी आपण प्रयत्न हा केलाच पाहिजे. सामोपचाराने समेट करून युद्ध टाळणे चांगले. परंतु अशा दुष्ट राक्षसांशी संधीच्या गोष्टी करणे व्यर्थ आहे. परिणाम उलटाच होणार. युद्ध करायचे झाले तर शत्रूच्या व आपल्या बलाबलाचा विचार करणे आवश्यक आहे. शत्रूच्या शक्तीची माहिती गुप्तपणे काढून आणायला मी एका व्यक्तीची नेमणूक करतो."

इंद्राचा एक दूत महिषासुराच्या राज्यात गेला आणि त्याने परत येऊन महिषासुराच्या सैनिक शक्तीची माहिती इंद्राकडे येऊन निवेदन केली. इंद्र चकित झाला. त्याने आपले पुरोहित बृहस्पती यांच्याकडे निरोप पाठवून त्यांना बोलवून घेतले व त्यांचा सल्ला घेतला. म्हणाला–"महिषासुर अफाट सैन्य घेऊन स्वर्गावर स्वारीला येतो आहे. अशा प्रसंगी काय करणे योग्य होईल?"

इंद्राला घाबरलेला पाहून बृहस्पती म्हणाला–"विपत्काल आला की धैर्य सोडून चालायचे नसते. जे व्हायचे असेल ते होईल. तरी आपण यथाशक्ति प्रयत्न हा केलाच पाहिजे. म्हणूनच तर थोर ऋषी व मुनी तपश्चर्या करतात. फक्त ईश्वर कृपेवर भरंवसा ठेवून राहणं तर काम भागणार नाही. आपल्या प्रयत्नाला यश आले नाही तर ती ईश्वराची इच्छा म्हणून सोडून द्यायला हरकत नाही."

इंद्र म्हणाला–"गुरुवर्य! प्रयत्नाशिवाय कार्यसिद्धी प्राप्त होत नाही, हे मला मान्य आहे. ऋषी व मुनींना ज्ञानप्राप्तीची अभिलाषा असते तशी क्षत्रियांना आणि राजांना शत्रूचा संहार करण्याची अभिलाषा असते. आपण सल्ला दिलात तर मी युद्धाला जाऊन शत्रूचा संहार करीन. मला आपलीच मदत आहे आणि मी वज्रायुधावर व हरिहरांच्या कृपेवर अवलंबून आहे."

बृहस्पती इंद्राला म्हणाला–"मी तुला युद्ध कर किंवा करू नकोस हे नाही सांगणार. तुम्ही सर्व मला मोठा मेधावी मानता. परंतु तुम्हांला माहीतच आहे, माझा शिष्य चंद्र माझ्या बायकोला पळवून घेऊन गेला तेव्हां माझी बुद्धिमत्ता निरुपयोगीच ठरली ना? म्हणून तुम्ही स्वतःच्या बुद्धीवर अवलंबून राहून काय ते करा."

तेव्हां इंद्र ब्रह्मदेवाकडे गेला. म्हणाला–"देवाधिदेवा! महिषासुर आपले राक्षसांचे अफाट सैन्य घेऊन स्वर्गावर स्वारीला येतो



आहे. त्याला पाहून मला भीती वाटू लागली आहे. या कठीण प्रसंगातून सुटका व्हायला काही तरी उपाय सुचव."

ब्रह्मदेव म्हणाला–"आपण शिव व विष्णू यांना बरोबर घेऊन युद्धाला गेलो तर आपल्याला यश मिळेल. तर चल, आपण कैलास पर्वतावर प्रथम शंकराकडे जाऊ."

दोघे कैलास पर्वतावर गेले आणि शंकरासमोर त्यांनी सर्व गोष्टी निवेदन केल्या. शंकराला बरोबर घेऊन दोघे विष्णूकडे वैकुंठलोकी गेले. सर्वांनी मिळून महिषासुराशी युद्ध करण्याचे ठरविले. हंसावर बसून ब्रह्मदेव, गरुडावर बसून विष्णू,



नंदीवर बसून शंकर, मोरावर बसून कार्तिकेय आणि ऐरावतावर बसून इंद्र युद्धाला निघाले. अशातऱ्हेने देवांचे आणि दानवांचे युद्ध सुरू झाले.

घोर युद्ध झाले. दिक्पालांनी, इंद्राने आणि ब्रह्मा, विष्णू व महेश या त्रिमूर्तींनी आपल्या पराक्रमाची पराकाष्ठा केली. परंतु कोणाचाही महिषासुरासमोर टिकाव लागला नाही. महिषासुराने स्वर्ग जिंकला आणि इंद्राच्या आसनावर जाऊन बसला. त्याने सर्व मुख्य पदांवरून देवांना काढून टाकून राक्षसांना त्यांच्या जागी नेमले. देवांचा खजिना काबीज केला आणि देवांना प्राप्त सर्व ऐश्वर्य उपभोगु लागला. देव डोंगरात व जंगलांत पळून गेले आणि नानाप्रकारचे कष्ट सहन करू लागले.

तेव्हां देवांनी पुन्हां ब्रह्मदेवाला विचारले–"बोला, आतां काय करायचे? काही मार्ग काढाल की नाही?"

ब्रह्मदेव म्हणाला–"मी काय उपाय सांगणार? महिषासुराने माझ्याकडूनच एक वर प्राप्त करून कोणत्याही पुरुषाच्या हाती त्याचा वध होणार नाही असे माझ्याकडून म्हणवून घेतले आहे. त्याचा वध एखाद्या स्त्रीच्या हातीच शक्य आहे. तर मग चला, प्रथम शंकराला व नंतर विष्णूला जाऊन विचारून पाहू या."

म्हणून ब्रह्मदेवाबरोबर देव शंकराकडे गेले. शंकराने त्यांना विचारले–"तुम्ही सर्व येण्याचे कारण काय?"

"तुला माहीत नाही असे काय आहे? महिषासुराने स्वर्गावर अधिकार स्थापन करून इंद्राला व सर्व देवांना हाकलून लावले आहे. त्यांना तुझ्या मदतीची गरज आहे." ब्रह्मदेव म्हणाला.

शंकर स्मित करून म्हणाला–"तूच तर देवांची अशी दुर्गत व्हायला कारणीभूत आहेस! तू वर दिलास म्हणून कोणी पुरुष महिषासुराला जिंकणे शक्य नाही. मग त्याला जिंकायला कोणत्या स्त्रीची निवड करावी? तू आपल्या बायकोला पाठवायला तयार आहेस का? की मी आपल्या बायकोला पाठवू? नाही तर इंद्राने आपल्या बायकोला पाठवावे. आपल्या बायकांपैकी एकीलाही युद्ध करण्याची कधी गरज पडली नाही. तेव्हां आपण सर्व विष्णूचा सल्ला घेऊ या. तो काहीतरी मार्ग काढील."

त्यानंतर सर्व विष्णूकडे गेले. सर्व वृत्तांत ऐकून विष्णू म्हणाला–"आपण सर्व महिषासुराशी युद्धात माघार घेऊन आपापल्या घरी येऊन बसलो आहो. त्याचा वध एका नारीच्या हातीच होणे शक्य असेल तर आपण तिघांनी आपल्या तिघांच्या तेजाने एका नारीची सृष्टी केली पाहिजे. तिला आपली सर्व आयुधे देऊ या व तिच्या हाती महिषासुराचा वध करू या."

विष्णूच्या तोंडचे ते शब्द बाहेर पडतांच सर्व देवांच्या अंगातून एकेक तेजस्वी किरण बाहेर निघाले आणि त्या सर्व किरणांची एक अठरा हाताची एक स्त्री तयार झाली. देवांनी तिच्या हातात आपापले आयुध दिले.

तेव्हां ती स्त्री देवांना म्हणाली–"तुम्ही भिण्याचे कारण मुळीच नाही. मी त्या राक्षसाचा वध करते." असे म्हणत तिने गर्जना केली. त्या आवाजाने आसमंत दुमदुमले.

तो आवाज ऐकून महिषासुर म्हणाला–"हा कसला आवाज आहे? कोणाचा



आहे. जाऊन धरून आणा त्या व्यक्तीला. माझ्या हाती मार खाऊन पळून गेलेल्या देवांच्या अंगात एकाएकी एवढी शक्ती कोठून आली?"

राक्षस त्या आवाजाच्या दिशेने जाऊन व देवीचे उग्र रूप पाहून परतले व म्हणाले–"महाराज! कोणीतरी देवी आहे व ती सिंह वाहनावर बसून येते आहे. तिच्या सर्वांगावर आभूषणे आहेत. तिला अठरा हात आहेत व प्रत्येक हातात एक शस्त्र आहे. तिला पाहूनच आम्हांला भीती वाटली."

महिषासुर आपल्या मंत्र्याला म्हणाला–"तुम्ही काही जणांना बरोबर घेऊन जाऊन त्या बाईला धरून घेऊन या. मी तिला आपली पट्टराणी करीन."

मंत्र्याने ती देवी उभी होती त्या बाजूला जाऊन तिला हाक मारली–"माते! तू कोण आहेस ग? इकडे कशाला आली आहेस? त्रिलोकाचे मालक तुझी भक्ती करीत आहेत."

देवी स्मित करून म्हणाली–"मी तुझ्या मालकाचा वध करण्यासाठी आले आहे. तू चांगला दिसतो आहेस. मी तुझा वध करणार नाही. तू जा आणि मी सांगते तो निरोप आपल्या मालकाला सांग."

मंत्र्याने तो निरोप महिषासुराला येऊन सांगितला. त्याचा त्या निरोपावर विश्वासच बसेना. त्या देवीशी समेट करून घेण्यासाठी महिषासुराने आपला सेनापती ताम्र याला पाठविले. देवीने त्याचा वध केला. त्यानंतर महिषासुराने आपल्या इतर सेनापतींना एका मागून एक युद्धाला पाठविले. देवीने त्या सर्वांचा वध केला. शेवटी स्वतः महिषासुर देवीशी युद्धाला आला. दोघांचे युद्ध झाले. महिषासुराला कामरूप वर होता. म्हणून तो निरनिराळी रूपे घेऊन देवीशी युद्ध करू लागला. परंतु शेवटी देवीने सुदर्शन चक्र सोडून त्याचे मुंडके उडविले.

देवांनी आनंदाने देवीचे स्तोत्र गाऊन देवीला प्रसन्न केले.





# शेजाऱ्यांची पीडा

मालती व नंदना दोघी मैत्रिणी होत्या. नंदनाच्या वडिलांनी जिल्ह्याच्या गावी दुकान काढले. म्हणून नंदना आईवडिलांबरोबर शहरात जाऊन राहू लागली. दोघी मैत्रिणी निरोप घेतेवेळी भेटल्या तेव्हां नंदनाने मालतीला आग्रह करून त्यांच्या घरी येऊन चार दिवस राहून जायला सांगितले. सासरी गेल्यावर तिने मालतीला आपला पत्ता लिहून कळविला.

नंदनाला भेटायची व शहर पाहायाची मालतीला फार उत्सुकता होती. तिला शहरात जायला अनायास एक सोबत मिळाली. त्या गावातला एक वाणी कामानिमित्त जिल्ह्याच्या गावी निघाला. त्याने मालतीला आपल्या गाडीत नंदच्या घरापर्यंत पोचवायचे मान्य केले. शहरात पोचल्यावर त्या वाण्याने मालतीला नंदनाच्या घरापर्यंत पोचविले, परंतु घाईचे काम होते म्हणून तेथे थांबू शकला नाही. घाईघाईने निघून गेला.

मालतीला नंदनाचे घर सहजी सापडले. परंतु नंदनाच्या घराला कुलूप लावलेले होते. परंतु तिने शेजारच्या घरी जाऊन दारातून डोकावून पाहिले. त्या घरातल्या एका मध्यम वयाच्या बाईने तिला पाहून विचारले–"कोण ग बाई? काय पाहिजे तुला?"

मालती परिस्थिती समजावून सांगून म्हणाली–"नंदना कोठे गेली व केव्हां परत येईल, कोणास ठाऊक?"

"तिच्या नातेवाइकांकडे लग्न आहे म्हणे, म्हणून सर्व मंडळी शेजारच्या गावी गेली आहेत. काळोख पडल्यावर येतील. तोंपर्यंत आमच्याकडे रहा पाहिजे तर." ती बाई म्हणाली.

मालतीला 'हाय'से वाटले. पूर्वी कळविल्याशिवाय कोणाच्याही घरी जाऊ नये,














असे तिचे वडील नेहमी सांगत, त्याचे कारण आतां तिच्या लक्षात आले.

त्या शेजारच्या बाईला एक मुलगी होती. तिचे नाव जानकी. जानकीची व मालतीची मैत्री लौकरच जमली. जानकीच्या बाबांना काही नोकरी धंदा नव्हता. तरी त्या लोकांनी किती प्रेमादरपूर्वक, तोंड ओळख सुद्धा नसता, मालतीला ठेवून घेतले.

दिवसभर जानकीने मालतीला सर्व गाव फिरवून दाखवून आणले. त्या दिवशी संध्याकाळी जानकीच्या एका मैत्रिणीकडे लग्नाची मेजवानी होती. निदान जानकीने तरी त्यांच्याकडे जायला हवे होते. नाहीतर मैत्री न निभावल्याचा दोष लागेल. परंतु जायला मागेपुढे करीत होती.

"मी नाही जात आई, त्या लग्नाच्या मेजवानीला. लग्नाला मोठमोठी मंडळी आलेली असणार, नेसून जायला एखादं चांगलं पातळही नाही. हात व बुच्चा गळा. लोक कोण ही मोलकरीण आली म्हणतील? म्हणून मी नाही जात बाई!" जानकी आईला म्हणाली.

ते ऐकून मालती आपल्या पेटीतून रेशमी साडी काढून जानकीला देत म्हणाली–"ही रेशमी साडी नेसून जा आणि हे माझे दागिने घालून जा."

जानकी 'हो' 'ना' केल्याशिवाय दागिने घालून घेऊन व साडी नेसून लग्नाला गेली.

काळोख पडला व बरीच रात्र लोटली. लग्नाला गेलेली नंदना व तिच्या घरातली मंडळी परतली नाहीत. जानकी लग्नाला गेली होती, तीसुद्धा परतली नाही. जानकीला मी जाऊन घेऊन येतों, असे सांगून तिचा बाप निघाला आणि दारात पडलेली चिठ्ठी उचलून वाचून मोठ्याने ओरडला.

मालतीने चटदिशी पुढे होऊन त्याच्या हातातली चिठ्ठी घेऊन वाचली. ती जानकीने तिच्या आईच्या नावे लिहिलेली चिठ्ठी होती. चिठ्ठीत हा मजकूर होता–

"दागिने हे स्त्रीचे शत्रू असतात हे आज मला कळले. मेजवानी झाल्यावर मी घरी यायला निघाले तेव्हां एका गल्लीत मला एकटीला पाहून चार जणांनी अडविले आणि सुरा दाखवून अंगावरचे सर्व दागिने काढून नेले. मालतीला मी तोंड कसे दाखवू? मी परक्याची वस्तू अंगावर घालून गेले त्याबद्दल बाबा माझा गळा कापतील, मला माहीत आहे. म्हणून मी कोठेतरी तोंड काळे करते आहे. ते पत्र वाचून मालतीच्या डोळ्यांना पाणी आले. इतकी रात्र उलटली आणि जानकी कोठे गेली असेल? काही घोर तर घडले नाही ना?

पत्र वाचून जानकीची आई कपाळावर हात ठेवून रडू लागली.

जानकीचा बाप मालतीला म्हणाला– "बाई, मी काही दिवसांनी तुझ्या दागिन्यांची सर्व किंमत देईन हो, या जानकीचा शोध कसा लागणार आता? माझ्याजवळ एक फुटकी कवडी सुद्धा नाही!" म्हणत आंसवे ढाळू लागला.

"अहो काका? माझ्या दागिन्यांची किंमत तुम्ही भरायची गरज नाही. पहिल्याने जानकीला शोधून आणा. काल रात्री तुम्ही आश्रय दिला नसतात तर चोरांनी माझे दागिने माझ्या गळयातून काढून घेतले नसते का?" मालती म्हणाली.

जानकीचा बाप जानकीला शोधायला काळोखात निघून गेला.





काही वेळाने त्या गल्लीत एक गाडी थांबल्याचा आवाज ऐकू आला. मालती व जानकीची आई दार उघडून बाहेर आल्या. नंदनाच्या घरची मंडळी गाडीतून उतरली.

शेजारच्या दारात मालतीला नंदनाने तत्क्षण ओळखले व आनंदाने तिला धावत जाऊन भेटली. नंतर ती आपली पेटी घेऊन नंदनाच्या घरी गेली.

घरात आल्याबरोबर नंदनाने मालतीला विचारले–"पहिल्याने पेटी उघडून तुझं सर्व सामान आहे की नाही, पाहून घे, बाई!"

मालतीने आश्चर्यचकित होऊन घडलेले वृत्त सांगितले व म्हणाली–"तू असे कां ग, म्हणते आहेस? ती किती चांगली मंडळी आहेत? जानकी कोठे निघून गेली बाई?"

नंदना स्मित करून म्हणाली–"कोठे गेली नाही, त्यांच्या कोणत्यातरी नातेवाईकाकडे जाऊन राहिली असेल. हे सर्व नाटक रचलं आहे त्या सर्वांनी! शहरात चालणारी लबाडी तुला अजून कळली नाही. केव्हां गळा कापतील कळणारसुद्धा नाही. या लोकांच्या विषयी सर्व गांवकऱ्यांना चांगली माहिती आहे. कपडे, भांडी जे हाती लागेल ते उचलून नेणारी ही माणसं आहेत! यांचा त्रास असह्य झाला आहे आम्हांला. चोरांनी तिच्या अंगावरचे दागिने काढून नेले तर तिला पत्र लिहायला कागद आणि पेन कोठे मिळालं आणि तिने एवढे पत्र कोठे बसून लिहिलं ग? तूच सापडलीस याच्या हातात अशी फसायला?"

मालतीला भयंकर राग आला. म्हणाली–"मी एक खेडवळ असेन. परंतु या शहरी लोकांची लबाडी उघडकीला आणल्याशिवाय राहणार नाही! तू मला मदत कर म्हणजे झाले." असे सांगून मालतीने नंदनाच्या कानांत काहीतरी सांगितलं.

"हुशार आहेस ग! तुझी ही युक्ती यशस्वी व्हायला माझा मावसभाऊसुद्धा मदतीला आहेच! तो सोंग करण्यात वस्ताद आहे, बघ!" नंदना म्हणाली.

गावभर बातमी पसरली. मालती पातळाचा पदर डोक्यावर घेऊन जानकीच्या घरी गेली व दाराची कडी वाजविली. ती थोडी काळोखातच उभी राहिली. जानकीच्या बापाने दार उघडले.

आवाज बदलून मालती म्हणाली–"आतां घरी यायला काही हरकत आहे का? जानकीने विचारायला पाठविले आहे."

जानकीची आई बाहेर येऊन म्हणाली–"काय तरी बाई, ही मुलगी! मी तिला बजावून सांगितले होतं की मालती परत आपल्या गावी जाईपर्यंत तू येण्याची घाई करू नकोस. परत केव्हां यायचं हे आम्हीच कळवू, असं सांग तिला. बरं पण तू कोण?"

"मालती!" असं म्हणत मालती उजेडात येऊन उभी राहिली. दोघां नवराबायकोवर आकाश कोसळल्यासारखे झाले.

"चांगली वागणूक दाखवून तुम्ही असा गळा कापलात का? माझे दागिने चोरी गेल्याची फिर्याद मी पोलीसात केली आहे." मालती म्हणाली.

काळोखात तिच्या मागे पोलीसाच्या वेषात नंदनाचा मावसभाऊ उभा होता. तो पुढे येऊन म्हणाला–"तुमचे सर्व नाटक आतां बंद करा. चला तुरुंगात तुम्ही तिघंही आणि गज मोजीत बसा तिकडे!"

पोलीसला पाहून दोघं नवराबायको थरथर कापू लागली. म्हणाली–"आम्हांला क्षमा कर, मालती! आमच्या अकलेने धोका दिला. आमची अब्रू चव्हाट्यावर आणू नकोस! तुझे दागिने तुला आणून देतो."

"माझ्या दागिन्याबरोबर शेजार पाजारच्या घरांतून चोरलेला सर्व माल तुम्ही दिला नाहीत तर क्षमा करण्याचा प्रश्नच नाही!" मालती म्हणाली.

त्यांनी लगेच जानकीला बोलावून आणले आणि मालतीचे दागिने आणि पूर्वी चोरलेले शेजारच्या लोकांचे सामान आणून दिले. उजाडण्यापूर्वी जानकी व तिचे आई वडील घर सोडून कोठे निघून गेले कोणाला कळलेही नाही. "शेजाऱ्यांचा त्रास तुझ्यामुळे गेला बाई!" नंदना व तिचे आईवडील म्हणाले.













# प्रश्नोत्तरे

**ए. मदनकुमार, बरमपुर**

प्र.: भय वाटते तेव्हां छाती जोराने धडधड कां होते?

उ.: माणसाच्या शरिरात मूत्राशयाच्या खाली कुंडलीच्या दोन्ही बाजूंना दोन ग्रंथी असतात त्यांना 'एड्रिनलीन' ग्रंथी म्हणतात. या ग्रंथींना बाहेरचा व आतला असे दोन पदर (कांद्यासारखे) असतात. शरीराला गरज असेल त्याप्रमाणे या ग्रंथींतून निरनिराळ्या प्रकारच्या द्रव पदार्थांचा स्त्राव होतो.

कोणत्याही कारणाने हा स्त्राव कमीजास्त झाला की आरोग्याला धक्का पोचतो. माणसाला आकस्मिक पण भयादी मनोविकार तीव्र प्रमाणात झाले की 'एड्रिनलीन' ग्रंथीच्या आतल्या पदरातून 'एपिनेफ्लिन' नावाच्या पदार्थचा स्त्राव रक्तात सुरु होतो. त्याचा परिणाम घाम सुटणे इत्यादि लक्षणांबरोबर छातीत धडधड होणेसुद्धा सुरु होते.

**वि. केशवनारायण, व्यासरपाडी**

प्र.: सूर्याच्या विविध दिशांना ग्रह असतात. परंतु सर्व ग्रह सूर्याच्या एकाच दिशेला असते तर परिणाम काय झाला असता, कृपा करून सांगावे.

उ.: काही वर्षांपूर्वी अष्टग्रहांचा समूह सूर्याच्या एकाच दिशेला येणार म्हणून व परिणामी समुद्र उसळून सर्व शहरे मातीचे ढीग होणार अशी अफवा उडाली होती. पण काही एक झाले नाही. अफवा उडविणारे व अफवा ऐकून गावे सोडून पळून जाणारे सर्वच जगाच्या थट्टेला पात्र झाले. पृथ्वीच्या निसर्गाविरुद्ध होणाऱ्या गोष्टी, म्हणजे प्रलय, भूकंप, उल्कापात, ज्वालामुखीचा लावा वाहू लागणे वगैरे होतच असतात. परंतु त्यांचा ग्रहांशी काय संबंध असतो, हे कोणी सांगू शकणार नाही.

असे असूनही सुमारे १८० वर्षांनी एकदा सर्व ग्रह सूर्याच्या एकाच बाजूला एका रांगेत उभे होतात. म्हणून इतिहासात अनेक वेळां तुम्ही विचारलेत तसे झाले असणार. म्हणून काय होते, हे इतिहासाच्या आधारे कळण्यासारखे आहे! बहुतेक काही होत नसावे. जर काही घडले असते, तर



# अघटित अनपेक्षित

[७८]

म्हातारे माकड बराच वेळ शोक करीत राहल्यावर विचार करु लागले— "त्या दिवशी त्यांनी मी सांगितले ते ऐकलं नाही, म्हणून त्यांची ही दुर्गत झाली. त्या दुष्ट राजावर मी कशा तऱ्हेने सूड उगवायचा? आपल्या वंशावर झालेला अन्याय भीतीने किंवा स्वार्थाने जे सहन करतात ते नीच होत, असे सांगतात. माझ्या वंशाचा सर्वनाश झाला त्याचा प्रतीकार झालाच पाहिजे!"

सूड कसा उगवायचा याविषयी विचार करीत ते माकड अरण्यात वणवण फिरले. किती फिरले तरी काही युक्ती सुचली नाही. त्या दिवशी कडक ऊन पडले होते. त्याला तहान लागली. पाण्याच्या शोधार्थ हिंडत ते एका कमळे असलेल्या सरोवराजवळ पोचले. तेथे सर्व निर्जन वातावरण होते, तेच धोक्याचे भासत होते. ते लक्षपूर्वक पाहल्यावर एक गोष्ट त्याला कळली. पाण्याच्या बाजूला जाणाऱ्या पावलांच्या खुणा दिसल्या, परत येणाऱ्या दिसल्या नाहीत.

नक्कीच या सरोवरात मगरी असल्या पाहिजेत. पाणी प्यायला येणाऱ्या प्राण्यांना धरून त्या नक्कीच खात असणार. म्हणून आपण पाण्यात पायदेखील न ठेवतां कमळाच्या देठाच्या मदतीने पाणी प्यावे. असा विचार करून म्हाताऱ्या माकडाने पाण्याच्या पातळीपासून उंच काठावर चढून काठीने कमळाचा वेल पाण्याबाहेर ओढला आणि कमळाच्या पोकळ देठाने पाणी पिऊ लागले.

त्याच वेळी एका यक्षाने पाण्यावर डोके काढले. त्याच्या गळ्यात एक अत्यद्भुत हिऱ्यांचा हार होता. तो म्हणाला—"या



सरोवरात पाय ठेवणारा प्रत्येक प्राणी माझा आहार होत आला आहे. तू बुद्धिमान दिसलोस. म्हणून तू पाण्यात पाय ठेवला नाहीस. तू पाणी पितो आहेस त्यात तुझे चातुर्यच कळते. तुझी हुशारी पाहून मी खूष झालो आहे. तू काय वाटेल ते मागून घे. मी देतो"

माकडाला एक विचित्र कल्पना सुचली. त्याने विचारले–"तू एकदम किती प्राण्यांना खातोस?"

"पाण्यात फक्त पाऊल पडले की पुरे, मग लक्षावधी प्राणी असले तरी मी खातो. पाण्याबाहेर मात्र मी कोल्ह्याचीही बरोबरी करू शकणार नाही." यक्ष म्हणाला.

आहे. त्याचे सैन्य व सर्व परिवार माझा शत्रू आहे. तू आपला हिऱ्याचा हार मला एकदां दे. मी तो राजाला दाखवीन, त्याच्या लोभाने तो ससैन्य तुझ्या या सरोवरांत येईल व तुला अनायास खूप आहार मिळेल." माकड म्हणाले.

यक्ष ते ऐकून खूष झाला व आपला हार माकडाला देऊन म्हणाला–"मित्रा, त्या सर्वांना तू लौकर इकडे घेऊन ये. मी तसला आहार पूर्वी कधीच खाल्ला नाही. आपली मैत्री कायमची होईल."

माकड तो हार गळ्यात घालून राजवाड्यासमोरच्या पटांगणात गेले आणि सर्वांना दिसेल अशा तऱ्हेने एका झाडावरून दुसऱ्या झाडावर उड्या मारू लागले. राजाच्या नोकरांनी त्याला पाहिले व म्हणाले–"वानरराजा! इतके दिवस कोठे होतास रे? तुला तो हिऱ्यांचा हार कोठे मिळाला? सूर्याहून जास्त तेजस्वी आहे तो."

"येथून जवळच अरण्यात एका गुप्तस्थानी कुबेराने आपले ऐश्वर्य लपवून ठेवण्यासाठी एक कमळाचे सरोवर निर्मिले आहे. रविवारी सकाळी त्या सरोवरात जो कोणी स्नान करतो त्याला कुबेर आपला पाहुणा मानून स्नान करून बाहेर

गळ्यात घालतो." माकड म्हणाले.

ती गोष्ट राजाच्या कानावर गेली. त्याने लगेच माकडाला बोलाविले व विचारले–"वानरेंद्रा! तू म्हणतोस ते खरे आहे ना? त्या सरोवरात स्नान करणाऱ्याला खरोखरच रत्नहार मिळतो का?"

"महाराज, आपणाला माझ्या गळ्यातला हार दिसतोच आहे! असा हार हवा असल्यास आपण माझ्या बरोबर काही जणांना पाठवून पहावे. मी ते सरोवर दाखवितो." माकड म्हणाले.

राजा मोहाला बळी पडला. तो माकडाला म्हणाला–"आणखी कोणाला काय पाठवायचे? मीच सकुटुंब सपरिवार स्वतः येतो स्नानाला. इतक्या थोड्यावेळात कुबेर सर्वांना रत्नहार देईल का?"

"कुबेराकडे तुम्ही केव्हांही जा. समुद्र किनाऱ्यावर जसे वाळूचे ढीग पडलेले असतात तसे त्याच्याकडे रत्नांचे ढिगारे पडलेले असतात." माकड म्हणाले.

"तर मग ठरलं. मी येणार!" असे सांगून राजा आपल्या राण्यांना ती आनंदाची वार्ता कळवायला गेला.

रविवार उजाडला. सूर्योदयाची वेळ होती. राजा, सर्व राण्या, राजाचे सर्व दरबारी व अधिकारी, तबेल्याचे अधिकारी



व पशुवैद्यतज्ञ आणि प्रमुख नागरिक त्या सरोवरात स्नानाला निघाले. न्हाताऱ्या माकडाला तर राजाने स्वतःच्या मांडीवरच पालखीत बसवून घेतले होते.

मोहा, लोभा! तुम्हांला नमस्कार असो! तुमच्या प्रेरणेने मोठे मोठे श्रीमंतही बुद्धिभ्रष्ट होऊन कामे करतात, भयंकर अरण्यातही जातात. शंभर शंभर सोन्याचे वाडे असणाऱ्याला हजार वाड्यांची इच्छा असते. हजार वाडेवाला लक्ष वाड्यांचा मालक होऊ पाहातो. लक्ष वाडे असणारा राज्यच मिळावे म्हणून पाहातो. राज्य असणारा सर्व जगच जिंकण्याची आशा धरतो. ते मिळाले तर त्रिलोकाची हाव त्याला असते.

वार्धक्य आले की केस पिकतात, तोंडाचे बोळके होते, डोळ्यांना दिसत नाही, कानांना ऐकू येत नाही, परंतु त्याच्या मनातली आशा मात्र नित्य युवतीच असते.

सरोवराच्या काठी पोचल्यावर माकड राजाला म्हणाले–"सुर्यबिंब क्षितिजावर अर्धे येईल त्या वेळी सर्वांनी पाण्यात शिरायला तयार रहावे. तोच ठीक मुहूर्त आहे. सर्वांनी पाण्यात उतरावे. सर्व बाहेर परत आल्यावर आपण व मी पाण्यात उतरू. मी आपणांला एका गुप्तस्थानी घेऊन जाऊन कुबेराकडून अत्यंत मूल्यवान रत्नहार देववीन." राजाने ते ऐकून आनंदाने मान डोलविली.

सूर्यबिंब अर्धे क्षितिजावर येतांच राजा व माकडाशिवाय बाकी सर्व पाण्यात उतरले. परंतु बराच वेळ झाला तरी त्यांच्यापैकी कोणीच परत न आलेला पाहून राजाने विचारले–"ह्यांच्यापैकी कोणीच परतले नाहीत की रे?"

माकडाने लगेच एका वडाच्या झाडावर उडी मारली व म्हणाले–"दुष्ट राजा, तुझ्या सर्व प्रजेला या सरोवरातील यक्षाने खाऊन टाकले आहे. तू आपल्या घोड्यांचा आजार बरा करण्यासाठी माझ्या सर्व अनुयायांना निर्दयपणे ठार केलेस. आता माझी पाळी आहे. मी तुझ्या सर्व अनुयायांना निर्दयपणाने यक्षाला भक्षण होण्यासाठी या सरोवरात तुझ्या करवीच पाठविले. मी हा तुझ्यावर सूड उगविला. तू राजा आहेस म्हणून तुला मी सोडले. तू आजन्म हे दुःख सहन कर आणि केलेल्या पापाची फळे चाख. ठोश्यास ठोसा! हीच आमच्या माकडांची नीती आहे! आम्ही माणसांचीच नक्कल करतो. तू माझा वंश निर्मूळ केलास, मी तुला निर्वंश केले."

राजा ते ऐकून दुःखीकष्टी होऊन पायी परतला. राजा निघून गेल्यावर यक्ष सरोवरातून बाहेर डोके काढून म्हणाला–"काय उत्तम काम केलेस रे, माकडा? तू आपल्या शत्रूचा नाश केलास. रत्नहार मिळविलास व एक मित्रही मिळविलास!"

माकड आनंदाने जंगलात निघून गेले.





# उलूक मांत्रिक

[ १८ ]

[ मायावी मर्कटाने जितकेतू राजाला राजधानीवर येत असल्याच्या संकटाची पूर्वसूचना दिली. राजधानीवर चालून येणाऱ्यांत एक राक्षसही असल्याचे ऐकल्यावरोबर राजाने मायावी मर्कटाला आपला मंत्री नेमले. मंत्री जीवगुप्त तलवार उपसून मर्कटावर धावला. मर्कट मंत्र्याची तलवार फेकून देऊन आपली तलवार उपसून त्याच्यावर धावला. पुढे ]

मायावी मर्कटाला तलवार उपसून जीवगुप्तावर वार करायला निघालेला पाहून दरबारात हाःहाकार उडाला. राजा जितकेतू लगेच पुढे येऊन मर्कटाचा हात धरीत म्हणाला–"मर्कटामात्या! अशी घाई करू नकोस. दरबारात रक्तपात झाला तर तो राज्याला अशुभ आहे. शिवाय मी जीवगुप्ताला शिरच्छेदाची शिक्षा दिली आहे. त्या हुकुमाचे पालन झाले पाहिजे. त्याचा अधिकार राज्याचा जो मुख्य चांडाळ आहेच त्याला आहे!"

राजाने तसे म्हटल्यावर मर्कटाने आपली तलवार म्यानेत ठेवली व दातओठ चावीत म्हणाले–"कायरे, जुन्या मंत्र्या! तू आतां तर वांचलास. तरी तू आतांच्या आतां राज्याच्या हद्दी बाहेर निघून जा."

जीवगुप्ताने, मर्कटाने त्याची खाली पाडलेली तलवार उचलून म्यानेत ठेवली



आणि एकदां रागाने मर्कटाकडे आणि नंतर राजाकडे पाहून म्हणाला—"महाराज म्हणताहेत की त्यांनी मला शिरच्छेदाची शिक्षा केली आहे आणि हे मर्कट मला देश सोडून जा म्हणते आहे." असे म्हणत प्रमुख नागरिकांकडे वळून म्हणाला—"प्रमुख नागरिक हो, आतां मी काय करावें, म्हणता, महाराजांचा हुकूम मोठा की या मर्कटाचा?"

सभेतले नागरिक राजाज्ञा बरोबर म्हणावी की मर्कटामात्याने म्हटले ते बरोबर आहे म्हणावे, या विचारात मागेपुढे करीत असतां सामंत सूर्यभूपती राजाला नमस्कार करून म्हणाला—"महाराज!

गुप्ताला क्षमा करावी. आपल्या राजधानीवर चालून येणाऱ्यांत उदयगिरीचा राजा दुर्मुखही एक आहे. पहिल्याने राजधानीचें रक्षण कसे करावयाचे याची आवश्यक ती व्यवस्था करा."

जितकेतू राजा दुर्मुखाचे नाव ऐकताच दचकला आणि काही अंतरावर उभा असलेल्या पाहरेकऱ्यांच्या नायकाला म्हणाला—"जा रे, तू लौकर जाऊन किल्लयाचे मुख्य द्वार बंद कर आणि शत्रू-पासून त्याचे रक्षण कर. आपल्या सेना-पतीला कळव की सैन्य तयार ठेव व बुरुजावर व इतर मोक्याच्या जागांवर सैन्य उभे करायला माझी आज्ञा आहे, असे सांग."

"जो हुकूम, महाराज!" असे म्हणत पाहारेकऱ्यांचा नायक तेथून निघाला.

राजा जितकेतू सामंत सूर्यभूपतीकडे वळून म्हणाला—"त्या दुर्मुख राजाला तू ओळखतो आहेस तर! तो मोठे सैन्य घेऊन आमच्या राज्यावर चालून येतो आहे म्हणे, खरंच का?"

सूर्यभूपति त्याच्यावर मोठे संकट आल्या-सारखे तोंड करून म्हणाला—"महाराज, मी त्या राजाचा कित्येक वर्षे एक सामंत म्हणून होतो. पुढे तो राजा अयोग्य

केले व त्याचे राज्य बळकावले. त्यावेळी त्याचे बरेच सैनिक त्याच्या विरुद्ध उलटले व माझ्या बाजूला आले. परंतु मध्यंतरी कालीवर्मा नावाचा एक क्षत्रिय तरुण, भल्लूक मांत्रिक, अस्वलाच्या रूपात असलेला एक जण आणि जंगलातले चोर असे सर्व लबाड जमले व त्यांनी माझ्या किल्लयात शिरून मला किल्लयाबाहेर हुसकावले. त्या दुर्मुख राजाला मदत करणारे हेच सर्व लोक आहेत. त्याच्या जवळ तसे मोठे सैन्य नाहीच."

सूर्यभूपतीने हे सर्व सांगितल्यावर जितकेतू राजा थोडा भ्याल्यासारखा मर्कटाला म्हणाला—"मर्कटामात्या! हा सूर्यभूपती म्हणतो आहे त्यावरून शत्रू तसा मोठा नसला तरी बलवान दिसतो आहे. आपण किल्लयाबाहेरच्या रक्षणाच्या गोष्टी मागाहून पाहू, प्रथम या किल्लयाचे रक्षण कसे करावयाचे याचीच काळजी घेतली पाहिजे."

आतांपर्यंत सूर्यभूपती व जितकेतू राजाचे जे संभाषण झाले ते सर्व लक्षपूर्वक ऐकत उभे असलेले मायावी मर्कट म्हणाले—"अरे ए राजा! किल्लयाच्या रक्षणाची तेवढी फिकीर करण्याची गरज नाही. तो भल्लूक मांत्रिक व त्याच्या बरोबरचे सर्व लबाड सूर्यभूपतीच्या किल्लयात कसे शिरले



वाटलं तुला? त्या किल्लयाच्या फाटकाला आग लावली होती त्यांनी! म्हणून तू त्या फाटकाच्या रक्षणाचीच काळजी घे, कळलं का?"

राजा कळल्यासारखी मान हलवून सूर्य-भूपतीला म्हणाला—"एकदां फाटकाचे रक्षण चांगलं करू न शकल्यामुळे तू सिंहासनच घालवून बसला आहेस. म्हणून किल्लयाच्या फाटकाच्या रक्षणाची व्यवस्था मी तुझ्यावरच टाकीत आहे. ती जबाबदारी तू योग्य प्रकारे पार पाडलीस की मी तुलाच आपला प्रमुख सामंत म्हणून नेमीन."

सूर्यभूपती म्हणाला—"आपली मेहेरबानी महाराज!" आणि तिकडून निघाला.



तेवढ्यात जीवगुप्त मोठ्याने ओरडून म्हणाला–"पण महाराज, मग माझ्या-विषयी काय हुकूम आहे? माझी नोकरी आहे की गेली?"

तो प्रश्न ऐकतांच मायावी मर्कट 'किच किच' आवाज काढीत चिडून म्हणाले–"अरे माजी मंत्र्या! तुझी नोकरी केव्हांच गेली. तुझे डोकंच काय ते काही दिवसां-पुरते वांचले आहे. तू आत्तांच्या आत्तां या सभेतून बाहेर चालता हो, पाहू!"

पुढे सूर्यभूपती, त्यांच्या पाठीमागून मंत्री जीवगुप्त आणि त्यांच्या पाठीमागून थोड्या वेळाने इतर प्रमुख नागरिक बाहेर निघून गेले. अशातऱ्हेने सर्व सभागृहातून बाहेरच्या [illegible] पाठोपाठ मायावी मर्कट घाईघाईने बाहेर आले व सभागृहाच्या पायऱ्याजवळ येऊन हातातली तलवार फडकवीत आणि आपली शेपटी हवेत गरगर फिरवीत म्हणाले–"माझा मंत्रदंड अस्व-लाचा खेळ चालू होता तेथे कोणीतरी उडवला आहे. तो आणून देणाऱ्याला जितकेतू महाराज आपल्या अर्ध्या राज्या बरोबर त्याच्याशी आपल्या मुलीचे लग्नही करून देतील."

मर्कट म्हणाले ते ऐकून तेथे उभे असलेले सर्व थक्क होऊन परस्परांकडे पाहू लागले. सर्वं प्रथम मंत्री जीवगुप्त थट्टेने हसला व म्हणाला–"या मर्कटाला, आपल्या महा-राजांना मुलगी नसल्याचे, वास्तविक मूल-बाळही नसल्याचे माहीत नाहीसे दिसते आहे!"

मंत्र्याने ते म्हटल्या बरोबर सर्व मोठ्याने हसले. तितक्यात जितकेतू महाराज तेथे आले. मायावी मर्कट त्यांच्याकडे रागाने पहात म्हणाले–"कायरे राजा! मी हे काय ऐकतो आहे? तू राजा कसा आहेस रे? तुला खरोखरच मूलबाळ नाही का रे? मग माझा मंत्रदंड?"

"मर्कटामात्या, ते मी मागाहून सांगेन. प्रथम हे सांग तुला त्या मंत्रदंडाची इतकी गरज आहे का? त्याच्या शिवाय शत्रुवर [illegible] मिळविणे तुला शक्य नाही का?" राजाने विचारले.

"गरज म्हणतोस? हा काय प्रश्न झाला? तो मंत्रदंड ज्याच्या हातात असेल त्याला असाध्य असे इहलोकात काहीच नाही. तुझे सिंहासनच नव्हे, तुझ्या प्राण रक्षणासाठी सुद्धा त्याची गरज आहे." मर्कट म्हणाले.

लगेच राजा हात वर करून म्हणाला–"मला मुलगी नाही, याबद्दल कोणी शंका कुशंका काढण्याचे कारण नाही. मला मुलगी दत्तक घ्यावी लागली तरी घेऊन मंत्रदंड आणून देणाऱ्या बरोबर मी तिचे लग्न करून देऊन आणखी वर अर्धे राज्य-सुद्धा देईन." ते ऐकून तेथे जे हजर होते त्यांनी सर्वांनी टाळ्या वाजवून राजा म्हणाला त्याचे स्वागत केले.

त्यापूर्वी अस्वलाचा खेळ पहायला आलेल्या लोकांपैकी काहीजण दूर उभे होते. त्यांच्यापैकी बैराग्याचा वेष करून उभे असलेले दोघे तरुण राजा म्हणाला ते ऐकताच डोके फिरल्यासारखे उड्या मारू लागले. त्यांच्यापैकी एक जण आपल्या झोळीत हात घालू लागला तेव्हां दुसरा त्याला थांबवून म्हणाला.

"कायरे, उपशिष्या अशी घाई करू नकोस. पहिल्याने आपल्या गुरुवर्यांना काय वाटतं हे विचारून घेणे आवश्यक आहे."

लगेच ते दोघे बैरागी तरुण तेथून निघाले. तेव्हां नागरिक जितकेतू राजाला





हा सल्ला देऊ लागले, की मंत्रदंड आणून देणाऱ्याला जे पारितोषिक महाराज देणार आहेत त्याची घोषणा दवंडी पिटून राज्यभर करावी, परंतु तितक्यात 'सूंइ...' करीत एक बाण किल्ल्याच्या भिंतीवरून येऊन त्यांच्या मधोमध पडला.

काहीजण खाली पडलेला बाण उचलू लागले, परंतु तितक्यात मायावी मर्कट ओरडले–"थांबा!" आणि त्याने धावत जाऊन बाण उचलला. त्याने तो बाण लक्षपूर्वक पाहून घेतला आणि आपल्या दातांनी तो तोडून त्याचे तुकडे दूर फेकून दिले व म्हणाले–"या बाणाची जी स्थिती झाली आहे, तीच गत माझ्या शत्रूची मी

क[illegible] आहे. [illegible] ओरडला–"माझा मंत्रदंड कोठे आहे?"

इतक्यात एक मोठा खडक कोटावरून आत येऊन राजवाड्याच्या भिंतीवर आदळला आणि खाली पडला. दगडाच्या धक्क्याने राजवाड्याच्या भिंतीला मोठी चीर पडली.

जितकेतू राजा जागच्या जागी थरथर कापत म्हणाला–"इतका मोठा दगड किल्ल्याबाहेरून आत फेकू शकणारी व्यक्ती सामान्य माणूस असणे शक्य नाही. ती व्यक्ती म्हणजे राक्षसच असणार. मर्कट अमात्या! आपण सामान्य माणसे अशा राक्षसांबरोबर युद्ध करून जिवंत राहू शकू का?"

तो दगड पाहताच प्रमुख नागरिकांबरोबर इतर लोक सुद्धा घाबरून तेथून दूर पळून गेले. मायावी मर्कट राजाला धीर देत म्हणाले–"अरे, ए राजा! तू राजा कसा झालास रे? असा भितोस काय? ब्रह्मपुत्रा नदीच्या दऱ्याखोऱ्यांत राहणाऱ्या अशा कित्येक राक्षसांना आमचे गुरु मिथ्यामिश्र यांनी धरून आपले गुलाम करून घेतले आहे आणि त्यांच्याकरवी वाटेल ती कामे करवीत आहेत."

राजा घाबऱ्या आवाजात म्हणाला–"नरमा त्यांना इकडे बोलावून आपण

तू माझे व माझ्या राज्याचे रक्षण करू शकशील का?"

ते ऐकून मायावी मर्कट 'किचकिच' करून हसत म्हणाले–"अरे राजा, तू किती भोळा दिसतोस रे! आमचे गुरु म्हणजे तंत्रशास्त्रात पारंगत आहेत. ते तुझ्या या एवढ्याशा राज्याच्या रक्षणार्थ त्या नदीचे खोरे सोडून येतील असे वाटले का तुला? ते आपल्या मंत्र व तंत्र शक्तींनी इह परलोक जिंकणार आहेत. परंतु त्या गोष्टीत भल्लूकपाद नावाची एक तुच्छ व्यक्ती आडवी येते आहे. त्या भल्लूकपादाचाच शिष्य भल्लूक मांत्रिक आतां किल्ल्याच्या बाहेर आला आहे."

मायावी मर्कट ते म्हणाल्यावर जितकेतू राजाला एका गोष्टीची शंका वाटू लागली. कोणीतरी दोघे महाशक्तिशाली मांत्रिक आपसात भांडत आहेत आणि आपल्या सारख्यांचा प्याद्यांसारखा उपयोग करीत आहेत. या मायावी मर्कटाला माझ्या सिंहासनाचे रक्षण करण्यापेक्षा, त्याच्या गुरूचा शत्रू जो भल्लूकपाद व त्याचा शिष्य भल्लूक मांत्रिक आहे, त्यांना ठार करण्याचीच चिंता जास्त दिसते आहे. म्हणून किल्ल्याच्या रक्षणाची जबाबदारी आपण स्वतःच उचलली पाहिजे!

राजाने असा विचार केला व मर्कटाला म्हणाला–"मर्कट अमात्या! आपण कोटाच्या भिंतीवर चढून शत्रू किती अंतरावर आहेत पाहून येणे आवश्यक आहे. त्याच बरोबर सैन्यालाही सावध रहायला सांगणे जरुरी



आहे." असे सांगून जवळच्या एका बुरुजा-वर चढू लागला.

मायावी मर्कट ओरडले–"अरे रे! माझा मंत्रदंड कोठे आहे?" आणि राजाच्या पाठीमागून निघाले.

राजा जितकेतूने आणि मायावी मर्कटाने किल्लयाच्या भिंतीवर चढून समोरच्या मैदानाकडे पाहिले. त्यांना त्यावेळी खाली घोड्यावर कालीवर्मा, रेड्यावर भल्लूक मांत्रिक, हत्तीवर चांडाळ भल्लूक, उग्रदंड राक्षस आणि काही मोजके सैनिक दिसले.

त्यांना पाहून राजाच्या सर्वांगाचा थरकांप उडाला. म्हणाला–"अमात्या! इतर सर्वांची गोष्ट सोडून दे, परंतु या एकट्या राक्षसाला पाहूनच माझा सर्व धीर खचला आहे. त्याला जिंकणे आमच्या सारख्या सामान्य माणसांना शक्य तरी होईल का?"

"मानवसाध्य जे नसते मंत्रसाध्य असते. असे थोरांमोठ्यांचे म्हणणे आहे. जे मंत्रसाध्य नसते ते तंत्रसाध्य असते, असे विद्वान लोक सांगतात. परंतु आतां काय करायचे, माझा मंत्रदंड कोठे आहे?" असे म्हणत 'किचकिच' करून ओरडत मर्कटाने उडी मारली.

मर्कटाचा आवाज ओळखून रानटी शिकारी हत्तीवर उभा राहिला आणि धनुष्यावर बाण चढवून मर्कटावर नेम धरला आणि ओरडला–"अरे माकडाच्या पिल्ला! हा बघ तुझा मंत्रदंड या बाणाच्या रूपे येतो आहे!" असे म्हणत त्याने बाण सोडला. तो 'सुंई...' असा आवाज करीत आला आणि मर्कटाच्या गुढग्याला लागला.

बाण लागताच मायावी मर्कट खाली पडले व ओरडले–"तांत्रिक गुरो!" आणि उभे राहून दोन्ही हातांनी त्याने तो बाण धरून ओढून बाहेर काढला व म्हणाले–"अरे ए! या भ्रांतिमतीला तुमचे बाण काय करणार आहेत रे?" नंतर तो बाण कालीवर्मा आणि भल्लूक मांत्रिकाच्या दिशेने फेकला.

(क्रमशः)





# बोलाचं मोल

विक्रमादित्याने आपला हट्ट सोडला नाही.

तो झाडाजवळ गेला, प्रेत खांद्यावर काढून घेतले व नेहमीप्रमाणे मौन होऊन स्मशानाच्या दिशेने चालू लागला. तेव्हां प्रेतात बसलेला वेताळ त्याला म्हणाला– "राजा! तुझ्या सारख्या काही राजांना कोणी काही बोललं तर त्याला किती महत्व द्यायचं याचं तारतम्य नसतं. सुखाने विश्रांती घ्यावयाचे सोडून तू अनेक कष्ट सहन करीत आहेस. चंद्रगिरीच्या राजाने एक असभ्य माणूस काही उपमर्दपणाने म्हणाला ते सहन केले, परंतु एका विद्वान पंडिताने काही म्हटले त्याबद्दल मात्र फार संतापला. तुला कंटाळा येऊ नये म्हणून मी तुला ती गोष्ट सांगतो." असे सांगून वेताळ गोष्ट सांगू लागला.

चंद्रगिरीच्या दरबारात मोठमोठे कवी व विद्वान होते. राजा त्यांचा फार आदर



करी. देशातले थोर कवी व विद्वान त्याच्याकडे येऊन पारितोषिकही मिळवीत. त्याच्या दरबारात धनंजय नावाचा सर्वात मोठा विद्वान कवी होता. त्याला आपल्या पांडित्याची थोडी घमेंडही होती.

राजा वेष पालटून आपल्या राज्याची पाहणी करीत असतां एकदां एकाएकी फार मोठ्या संकटात सापडला. सुदैवाने त्याला एका धनगराने वांचविले. राजधानीत परतल्यावर राजाने आपल्या नोकरांना पाठवून त्या धनगराला सन्मानपूर्वक दरबारात बोलावून घेतले.

दरबारात पाऊल टाकताच धनगराने राजा

"काय रे बुवा, ओळखलंस का मला? तूच माझा जीव वांचविलास. तुझा सत्कार करण्यासाठी मी तुला येथे बोलाविले."

धनगराला सर्व आठवले व त्याने राजाला विचारले–"कायरे, तू राजा आहेस का? तू स्वतःच रक्षण करू शकला नाहीस, आणि आमचं रक्षण कसं करणार?"

त्याचा तो उर्मटपणा पाहून राजा त्याला शिक्षा करणार, असे प्रत्येक दरबाऱ्याला वाटले. परंतु राजा अगदी शांतपणे म्हणाला–"तुझी शंका बरोबर आहे! एकाएकी परिस्थिती प्रतिकूल झाली की कोणी कितीही पराक्रमी असला तरी त्याचा पराक्रम निरुपयोगी होतो. आपल्या देशाच्या राजाचे तू रक्षण केलेस याबद्दल..." असे म्हणत राजाने त्या धनगराला एक हजार सुवर्णमुद्रा इनाम म्हणून दिल्या.

एवढे सोने पाहून धनगर थक्क होऊन पहात राहिला. तो भीतभीत सोने उचलीत म्हणाला–"संभाळून रहा. वाटेल तेव्हां तुझं रक्षण करायला मला वेळ मिळेलच असे नाही!"

ते ऐकून राजा खदखदां हसला. राजाची ती सहन शक्ती पाहून दरबारी चकित झाले.

ही गोष्ट घडली तेव्हांपासून धनंजयच्या मनात खळबळ उडाल्यासारखे झाले. राजाने सत्कार केला, यात काही गैर नाही. परंतु त्या असभ्य माणसाने भरसभेत उर्मटपणाने बोलून राजाचा अपमान केला तरी राजाला राग न येता, राजाने ते हसण्यावारी सोडून कां द्यावे? त्याचे ते बोलणे इतके मोलाचे वाटावे का राजाला? धनंजयला या गोष्टीचे आश्चर्य वाटले. आपण सुद्धा तसंच बोलून राजा त्याला महत्व देतो की नाही हे पाहण्याची इच्छा त्याच्या मनात उद्भवली. धनंजयला तशी एक संधी मिळाली. राजाने एक शंका प्रगट करून प्रश्न केला. तो ऐकून धनंजय म्हणाला–"प्रभो! महामूर्ख माणसाच्या मनातही उत्पन्न न होणारी ही शंका आपल्या मनात कशी काय उद्भवली?"

ते ऐकून राजा संतापला. त्यावेळी त्याचे डोळे आग पाखडत होते. राजा एक शब्दही न बोलता सभेतून उठून निघून गेला.

दुसऱ्या दिवशी धनंजयला राजकवीच्या पदावरून काढून टाकण्यात आले.

येथवर गोष्ट सांगून वेताळ म्हणाला–"राजा, चंद्रगिरीच्या राजाच्या या विचित्र वागण्यात काही अर्थ आहे का? धनगराने सरळ सरळ अपमान केला असता राजा रागावला तर नाहीच, तर उलट त्याला आनंद झाला आणि एका विद्वान पंडिताने आपली एक प्रतिक्रिया व्यक्त करतांच राजाला इतका राग कां यावा? या शंकेचे समाधानकारक उत्तर माहीत असून तू दिले नाहीस तर परिणाम तुला माहीतच आहे,



तुझ्या डोक्याची शंभर शकले होऊन तुझ्याच पायावर लोळू लागतील."

विक्रमादित्य म्हणाला–"राजाला तसा राग यायला अनेक कारणे होती. पहिली गोष्ट प्राणदाता हा पित्यासमान असतो. त्याला मुलाला रागावण्याचा अधिकार असतो. प्राणदात्या धनगराने राजाची कान-उघाडणी केली. राजाचा अपमान करण्याची इच्छा त्याच्या मनात नव्हती. शिवाय तो म्हणाला त्यात एक विनोद होता. दरबारातल्या जो विदूषकाला राजा-बरोबर थट्टामस्करी करण्याचा अधिकार असतो. त्या दृष्टीनेही धनगर म्हणाला त्यात वावगे असे काहीच नव्हते. तिसरी गोष्ट, दरबारात पाऊल टाकताच धनगर बुचकळ्यात पडल्यासारखा झाला. कसे बोलावे व वागावे हे त्याला कळले नाही. शक्य तितक्या सावधपणानेच वागण्याचा त्याने प्रयत्न केला. परंतु त्या प्रयत्नात त्याचा गावंढळपणाच प्रगट झाला. राजाने त्याचा सत्कार करावा, असे कधी त्याच्या मन... म्हणून त्याने सभ्यपणाने वागावे असे वाटले असते तर ते विचित्रच दिसले असते. शेवटची गोष्ट ही की एक गावंढळ काही म्हणालाच तर तिकडे कोणी लक्ष देईल का? त्याच्या बोलण्यावरून राजा-विषयी दरबाऱ्यांच्या मनात जो आदर होता तो कमी होण्याची शक्यता नव्हती. काहींना त्या धनगराचा राग आला एवढेच. परंतु दरबारी कवीच्या प्रत्येक शब्दाला ते महत्व देणार हे साहजिक होते. धनंजय जे म्हणाला त्यात राजाचा सरळ अपमानच प्रगट होत होता. राजाने जर तो सहन केला असता तर दुसऱ्या दिवसापासून राजाविषयी दरबाऱ्यांच्या मनातला आदर कमी झाला असता. म्हणून राजाने धनंजयला दरबारा-तून हाकलले ते न्याय्यच होते!"

अशा तऱ्हेने राजाचे मौन भंग होताच वेताळ प्रेतासह नाहीसा झाला आणि झाडाला जाऊन लोंबकळू लागला.

(कल्पित)





# विक्षिप्त गवई

फार पूर्वी सिंधदेशाच्या गादीवर जयसिंह नावाचा राजा राज्य करीत होता. एके दिवशी त्याच्या दरबारात एक गवई आला व म्हणाला–"महाराज, मला आपल्या दरबारी गवयाच्या पदावर नेमण्याची कृपा करावी."

राजा म्हणाला–"माझ्या दरबारात अनेक दरबारी गवई आहेत, म्हणून तूर्त आणखी कोणाला त्या पदावर नेमण्याचा विचार आमच्या मनात नाही."

तो गवई त्या दिवशी निघून गेला. परंतु दुसऱ्या दिवशी पुन्हा दरबारात हजर झाला व म्हणाला–"मी एक गवई आहे, आपल्या दरबारात दरबारी गवई म्हणून काम करण्याची इच्छा आहे." राजाने पुन्हां तेच उत्तर देऊन त्याला परत पाठविले.

परंतु तो विद्वान दर दिवशी दरबारात येई आणि राजाला तीच विनंती करी आणि राजा त्याला दर वेळी तेच उत्तर देऊन परत पाठवी. त्या गवयाला राजाकडून आपला अपमान होत असल्याबद्दल काहीच वाटत नसे.

असे कित्येक दिवस होत राहिले. राजाला वाटू लागले, आपलेच काही चुकत तर नाही. हा माणूस स्वतःला गवई म्हणून येतो आणि आपण त्याला दर रोज परत पाठवितो. तरी हा त्यात अपमान न समजून येतो आहे. त्याचा सोशिकपणा पाहून राजाला आश्चर्य वाटले. त्याचबरो-बर असेही वाटले की याच्या चिकाटीत काहीतरी गुपित असावे. पाहू या तरी, इतक्या गवयांबरोबर हाही राहील त्यात बिघडले काय?

असा विचार करून दुसऱ्या दिवशी तो गवई पुन्हां जेव्हां दरबारात आला तेव्हां राजा जयसिंह त्याला म्हणाला–"आपण

गेले कित्येक दिवस येतां आहां. मी असे सुचवितो की आपण आमच्या दरबारात गाणे म्हणावे. जर आमच्या दरबारी गवयांना आपले गाणे आवडले तर मी आपणाला आपला दरबारी गवई म्हणून नेमीन."

तेव्हां तो गवई म्हणाला–"महाराज, माझा असा नियम आहे की जेव्हां माझ्या मनात कोणाला संगीत ऐकवावे .असे येते त्याच वेळी मी गातो. कोणी सांगावे आणि मी गावे व अशातऱ्हेने आपल्या कलेचं प्रदर्शन करावे, हे माझ्या नियमा-विरुद्ध आहे. ही अट आपल्याला मान्य असेल तरच आपण मला आपल्या दरबारी नेमावे."

ते ऐकून राजाला राग आला. म्हणाला– "अशा विक्षिप्त गवयाला माझ्या दरबारात जागा नाही."

लगेच तो गवई निघून गेला. परंतु दुसऱ्या दिवशी पुन्हां दरबारात आला. या खेपेसही राजाने त्याला दरबारी गवयाचे पद देण्यास नाकारले.

असेच आणखी काही दिवस घडले.

एके दिवशी अचानक राजा जयसिंह याच्या मनात एक विचार आला. तो असा की त्या गवयाच्या मनातही काही विशेष असले पाहिजे. त्याचे इतके येणे कायमचे बंद करणे शक्य आहे परंतु तसे केल्याने त्याच्या मनात आहे तरी काय, हे समजून घेणे शक्य होणार नाही.

असा विचार करून राजाने एके दिवशी दरबारात अचानकपणे जाहीर केले–"आज-पासून मी तुम्हांला आपला एक दरबारी गवई म्हणून नेमतो. तुमच्यासाठी रहायला वाडा, योग्य पगार व इतर सोयींची व्यवस्था केली जाईल."

ते ऐकून सर्व दरबारी चकित झाले, परंतु त्या गवयाला मात्र मुळीच आश्चर्य वाटले नाही. तो ठरल्या वेळी दरबारात त्याच्यासाठी ठरलेल्या जागेवर येऊन बसू लागला.

राजाने केलेली ही नेमणूक कोणालाही आवडली नाही. परंतु ह्या गवयात काही तरी विशेष प्रतिभा असेल असा विचार करून सर्व गप्प राहिले. परंतु कित्येक महिने लोटले तरी त्या गवयाने एकदाही आपल्या विद्वत्तेची चुणुक दाखविली नाही. पुढे काही दिवसांनी राजाला एक मुलगा झाला. तोच त्या राज्याच्या गादीला वारस होता. म्हणून राज्यभर उत्सव झाला. राजवाड्यात दहा दिवस नृत्यगायन चालू होते. दरबारी गवयांच्या व इतर गवयांच्या मैफिली झाल्या. परंतु नव्या गवयाला त्या उत्सव प्रसंगी गाण्याची इच्छा झाली नाही तर पुन्हां केव्हां होणार? राजाने इतर गवयाकरवी त्या गवयाला गाणार का विचारले. परंतु त्याने काहीच उत्तर दिले नाही. मंत्र्याने स्वतः जाऊन कारण विचारले तेव्हां तो म्हणाला– "आतां नाही, योग्य वेळी कोणी विचारल्या-शिवाय मी गायनाला सुरवात करीन."





राजाने अनेक वेळी त्याला दरबारी गवयाच्या पदावरून काढून टाकण्याचा विचार केला. परंतु ती गोष्ट तेवढीच राहून गेली. त्या गवयाच्या ह्या विचित्र वागण्या मागे काहीतरी महत्वाचे गुपित असले पाहिजे असा विचार करून राजा गप्प राहिला. पाच वर्षे अशीच लोटली.

अचानक राजकुमार एका भयंकर आजाराने आजारी पडला. कित्येक वैद्यांनी औषधपाणी केले, परंतु गुण पडला नाही व आजार वाढतच गेला. सर्वांनी आशाच सोडली. सर्व शेवटच्या घटकेची वाट पाहू लागले.

अशा समयी तो गवई आपला तंबोरा घेऊन आला आणि थोड्या अंतरावर बसून गाऊ लागला.

"काय पण मूर्ख आहे! राजकुमाराच्या बारशाच्या वेळीसुद्धां याला गावेसे वाटले नाही आणि या शेवटच्या घटकेला हा गायला बसतो आहे! काय म्हणावे या मूर्खपणाला?" या शब्दात सर्व आपसांत बोलू लागले.

परंतु त्या विद्वानाच्या संगीताचा पगडा सर्वांच्या मनावर असा काही बसला की सर्व नकळत डोलू लागले. राजकुमाराच्या आजाराची गोष्टही सर्व विसरले. कोणालाही देहभान राहले नाही. स्वत: राजाने सहज मुलाच्या पलंगाकडे पाहिले तेव्हां राजा झोपेतून जागा झाल्यासारखा पलंगाकडे चकित मुद्रेने पहात राहिला. कारण पलंग रिकामा होता. त्याने चहूकडे दृष्टी फिरवून पाहिले आणि आश्चर्य म्हणजे राजकुमार सर्वांबरोबर बसून गाणे ऐकत होता.

राजकुमाराला उठून बसलेला पाहून सर्व चकित होऊन त्याच्याकडे पहात होते. कोणालाही तो गवई उठून गेल्याचे कळलेही नाही.

त्यानंतर राजाने त्या गवयाच्या नावे एक जहागीर लिहून दिली व त्याला दरबारात बोलावून त्याचा सत्कार करण्याचा विचार त्याच्या मनात आला. परंतु तो गवई कोठे गेला कोणाला कळलेच नाही.





# ज्ञानबोध

अवंती राज्यात विनोद नावाचा एक तरुण राजाच्या कचेरीत लहानशा पदावर नोकरीला लागला. त्याचे वडील सरकारी नोकरी करीत असतां मरण पावले, म्हणून विनोदला त्यांच्याच जागी नोकरी लागली. बरेच दिवस त्याने लग्न केले नाही. कारण चांगली मोठी नोकरी लागली तर त्याला समाजात आदर मिळेल व चांगली श्रीमंत घराण्यातली मुलगी सांगून येईल, असे त्याला वाटले.

परंतु आई पाठीस लागली तेव्हां नाइलाजाने त्याला लग्न करावे लागले. एका गरीब शेतकऱ्याची मुलगी चंद्रा विनोदची बायको होऊन सासरी आली. ती दिसायला चांगली होतीच, गुणी ही होती. गरीब कुटुंबातून आली असली तरी आल्यागेल्याचे आतिथ्य करण्यात ती काही उणीव ठेवीत नसे. घरातल्या लहानथोर माणसांशी वागण्यात बोलण्यात कोणत्याही बाबतीत दोष दाखविण्यासारखे तिच्यात काही नव्हते. ती सासूजवळ व नवऱ्याजवळ नम्रपणे बोले व वागे.

परंतु विनोद बायकोसमोर आपला मोठेपणा दर्शविण्यासाठी खूप खर्च करू लागला. या मोठेपणाच्या नादात त्याने पुष्कळ कर्ज करून ठेवले.

चंद्राला नवऱ्याची मिळकत किती आहे, या गोष्टीची चांगली कल्पना होती. परंतु नवऱ्याला तो श्रीमंत नसल्याचे न सांगता, म्हणजे त्याचे मन न दुखविता ती नवऱ्याला अनावश्यक खर्च टाळायला सुचवी.

हात संभाळून राहण्यात कमीपणा मानून विनोद बायकोला म्हणायचा–"इतका चिक्कूपणा करण्याची गरज काय ग, आपल्याला? आपल्या पदाला शोभेल असं नको का रहायला?"



कर्जाचे ओझं डोक्यावर वाढत चाललं तसतसा तो दुसरी एखादी मोठी नोकरी मिळते का याचा प्रयत्न करू लागला. परंतु त्या प्रयत्नात त्याला मुळीच यश मिळाले नाही.

अशा परिस्थितीत विनोदचा मामा आपल्या बहिणीला व भाच्याला भेटून जायला म्हणून आला. त्याला उच्च पदावर सरकारी नोकरी होती. ते कळल्यावर विनोदने त्याच्या वशिल्याने मोठ्या पदावर नोकरी मिळेल का, विचारले.

सर्व ऐकून घेतल्यावर त्याच्या मामाला आश्चर्य वाटले. कारण विनोदला त्याच्या योग्यतेपेक्षा वरच्या दर्जाचीच नोकरी मिळ[illegible] होती. [illegible] विनोदच्या कुटुंबाचा खर्च होता, त्या मानाने त्याला चांगला पगार मिळत होता. त्यात चार पैसे वाचविताही आले असते. नंतर त्या जागेवर त्याने चांगले काम करून दाखविले असते तर त्याला पदोन्नतीही मिळण्याची शक्यता होती.

ते सर्व माहीत असल्यामुळे मामा त्याला समजावून सांगू लागला–"हे पहा, विनोदा! तू त्या पदावर चांगले काम करतो आहेस हे तुझ्या वरिष्ठांना पटलं पाहिजे, म्हणजे आपोआप तुला वरची जागा मिळेल. आहे त्या पगारात समाधान मानून काम करायला प्रथम शीक."

विनोदला अर्थातच हा उपदेश रुचला नाही. आपल्याला मदत करायला मामा तयार नाही, म्हणून हा सर्व उपदेश करतो आहे. असा एक गैरसमज त्याने करून घेतला. मामाने ते लगेच ओळखले. म्हणून त्याने विनोदला विचारले–"तुला कशी काय नोकरी हवी म्हणतोस रे?"

विनोद उत्साहाने म्हणाला–"खजिनदाराची नोकरी मिळाली तर एक अधिकारी म्हणून लौकिक वाढेल व प्राप्तीसुद्धा वाढेल."

भाच्याची ती महत्वाकांक्षा ऐकून मामाला हंस आले व थोडा रागही आला.

[illegible] व. खजिनदाराची व माझी ओळख आहे. पाहू या प्रयत्न करून."

विनोद दुसऱ्या दिवशी आपल्या मामाबरोबर राजधानीला निघाला. दोघे खजिनदाराकडे गेले. खजिनदाराशी काही वेळ एकट्यानेच बोलल्यावर मामाने विनोदची व त्यांची ओळख करून दिली.

खजिनदाराने विनोदला एकदां खोल नजरेने वरपासून खालपर्यंत पाहिले व तो तूर्त जे काम करीत होता त्या कामाविषयी चवकशी केली. नंतर म्हणाला–"तुझा विचार बरोबर आहे, मी नाही म्हणणार नाही. परंतु तुला वाटते आहे तेवढे खजिनदाराचे काम सोपे सुखाने करण्यासारखे मात्र नाही. तलवारीच्या धावेवरची कसरत आहे. खजिन्याची जबाबदारी आहे ती. थोडेदेखील कमी जास्त काही झालं की राजाची तलवार मानेवर बसते. या कामात माणसाची हुशारी व बुद्धिमत्ता पुरत नाही. अनुभव आणि मनाचा बळकटपणा असावा लागतो.

विनोदला ते बोलणे काही आवडले नाही.

खजिनदार आणखी पुढे म्हणाला–"मला ही खजिनदाराची नोकरी सहजी मिळाली असे नाही. ही नोकरी मिळण्यापूर्वी मी बाहेर फाटकाजवळची घंटा वाजवीत असे. नंतर द्वारपालकाचे काम काही काळ केले. त्यानंतर काही दिवस एक पाहारेकरी












म्हणून काम केले. त्यानंतर खजिन्यावरचा पाहरेकरी झालो. महाराजांनी माझी कित्येक वेळां कडक परीक्षा घेतली आणि त्यानंतर मला या पदावर नेमले. जिने चढल्याशिवाय सर्वांत उंच मजल्यावर चढता येईल का?"

विनोदला हे सर्व व्याख्यान अनावश्यक वाटले. त्याच्या तोंडावरून त्याच्या मनावर होत असलेला परिणाम त्याचे मामा लक्षपूर्वक पहातच होते. दोघांनी खजिनदाराचा निरोप घेतला आणि तेथून निघाले.

"हा म्हणाला ते काय म्हणा, परंतु मंडळप्रमुख काय म्हणतो ते त्याला भेटून पाहु या का?" मामाने विनोदला विचारले.

विनोदच्या मनात पुन्हां आशा अंकुरली. दोघे मंडलप्रमुखाच्या घरी निघाले. वाटेत त्यांना दहा एक तरुण भेटले. विनोदच्या मामाने थांबवून त्यांना विचारले–"कोठे रे चालला आहांत, तुम्ही सर्व एकत्र होऊन?"

त्यांच्या पैकी एक जण म्हणाला– "आम्ही बेकार तरुण आहो, नोकरीच्या शो[illegible] इतके दिवस केलेला विद्याभ्यास आम्हांला उदरनिर्वाहाच्या कामाचा दिसत नाही. राजधानीतही आमच्या पदव्यांना मान व किंमत नाही, मग इकडे राहून काय उपयोग? खेडेगावात जाऊन नांगर हाती धरला तर मिळेल थोडे खायला."

असे म्हणत तो व त्याचे साथीदार निघून गेले.

विनोदच्या मनात एकाएकी बदल घडून आला. त्याचा भ्रम मृगजलासारखा नाहीसा झाला.

"मंडळप्रमुखाचे घर जवळच आहे. चल, त्याला भेटू या." मामा म्हणाला.

"आतां आणखी कोणाला भेटायची गरज नाही, मामा! मला आहे ती नोकरी बरी आहे! मी याच कामात आपली योग्यता दाखवून वरिष्ठ जागेसाठी प्रयत्न करतो. तुम्हांला उगाच त्रास झाला." विनोद म्हणाला.

मामा मनातल्या मनात हसला.





# शुक्र

राक्षसांचा गुरू म्हणून प्रसिद्धीस प्राप्त झालेले शुक्राचार्य हे भृगूचे चिरंजीव होते. शुक्र हा बृहस्पतीच्या बरोबर बृहस्पतीचे वडील अंगीरस यांच्याकडे विद्याभ्यास करीत असे. परंतु अंगीरस दोघांमध्ये भेदभाव करीत असल्याचे पाहून शुक्र अंगीरस यांचे शिष्यत्व सोडून गौतम ऋषींकडे गेला व त्यांना आपला शिष्य करून घेण्यास विनंती केली.

गौतम ऋषींनी शुक्राला शंकराची आराधना केल्यास तुला सर्व विद्यांत प्राविण्य प्राप्त होईल असे सांगितले. शुक्राने तपश्चर्येने शंकराला प्रसन्न करून त्याच्याकडून संजीवनी विद्या शिकून घेतली.

त्यानंतर शुक्र राक्षसांचा गुरू झाला. देवादानवांच्या युद्धात मरण पावलेल्या राक्षसांना शुक्राचार्य संजीवनी विद्येचा प्रयोग करून जिवंत करू लागले. अंधकासुर नावाच्या एका राक्षसाचा वध करणे त्यामुळेच राक्षसांना शक्य झाले नाही, आधीच त्याला ब्रह्मदेवाचा वर प्राप्त होता म्हणून गर्व चढला होता. त्याला कोठे सुंदर स्त्री दिसली की तो तिला भ्रष्ट करी. एकदां त्याची दृष्टी पार्वतीवरच पडली. त्याचा वध करायचा तर शुक्राचार्यांची संजीवनीविद्या त्याच्या पाठीशी होती. म्हणून शंकराने शुक्राचार्याला काही वेळ गिळले आणि अंधकासुराचा वध केला. त्यानंतर शुक्राचार्य शंकराच्या पोटातून बाहेर आले.

शुक्राचार्यांच्या संजीवनीविद्येमुळे देवांना राक्षसांवर जय मिळविणे अशक्य झाले. इंद्राने जयंती नावाच्या आपल्या मुलीला शुक्राचार्यांकडे पाठविले. शुक्राचार्य तिच्या मोहपाशात गुरफटले आणि त्यामुळे राक्षसांना मदत करू शकले नाहीत. राक्षस

शुक्राचार्यांच्या शोधार्थ निघाले तेव्हां बृहस्पती शुक्राचार्यांचे रूप घेऊन प्रगट झाला. त्यालाच शुक्र समजून राक्षस त्याच्या जवळ मोकळेपणाने बोलू लागले. बृहस्पतीने राक्षसांच्या गोटात शिरून त्यांची गुपिते काढून घेतली. इतक्यात खरे शुक्राचार्य आले. दोघां शुक्राचार्यांत खरे शुक्राचार्य कोण हे राक्षसांना ओळखतां आले नाही.

पुढे देवांनी शुक्राचार्यांकडून संजीविनी-विद्या चोरून आणण्यासाठी बृहस्पतीचा मुलगा कच याला पाठविले. कच शुक्राचार्यांचे शिष्यत्व करू लागला. तेव्हां शुक्राचार्यांची मुलगी देवयानी ही त्याच्यावर प्रेम करू लागली. म्हणून राक्षसांनी अनेक वेळा कचला एकट्याने गाठून त्याचा वध केला. परंतु देवयानीच्या हट्टाने शुक्राचार्य संजीवनी विद्येचा प्रयोग करून कचला जिवंत करीत राहिले. शुक्राचार्यांना मद्य-पानाची फार संवय होती. राक्षसांनी कचचा वध करून त्याला जाळले व त्याची राख मद्यांत घालून शुक्राचार्यांना ते मद्य पाजले. आतां शुक्राचार्य स्वतः मेल्याशिवाय कच पोटातून बाहेर यणे शक्य नव्हते. म्हणून शुक्राचार्यांनी कचला तो पोटातच असतां त्याला संजीवनी विद्या शिकविली. कच बाहेर आला व मृत शुक्राचार्यांना संजीवनी मंत्राचा प्रयोग करून जिवंत केले. त्यानंतर शुक्राचार्यांनी मद्यपान करणे महापाप असल्याचा नियम केला.

'शुक्राचार्य म्हणजे एकाक्ष' असे म्हण-तात बली वामनाला तीन पावले जमीन देण्याचे मान्य करून दान करण्यासाठी झारीने हातावर पाणी सोडू लागला तेव्हां शुक्राचार्य पाणी पडू नये म्हणून झारीच्या तोटीत शिरून बसले. तेव्हां दर्भाने तोटी कोरली व शुक्राचार्यांचा एक डोळा फुटला.

पुराणात शुक्राचार्यांचे थोरपण किती होते हे कळतेच. त्याचबरोबर आकाशात शुक्राचा तारा सर्वात जास्त तेजस्वी असतो हे मात्र आपणां सर्वांनाच माहीत आहे.



# आदर्श शिष्य



फार पूर्वी अरण्यात धौम्य मुनींचा एक आश्रम होता. त्यात त्यांचे शिष्य विद्याभ्यासाबरोबर गुरुची सेवासुद्धा करीत असत.



धौम्य मुनींच्या शिष्यवर्गात उपमन्यु नावाचा एक शिष्य होता. तो गुरूच्या गाई रानात चरायला नेई आणि सायंकाळी परत घेऊन येई.



एकदां धौम्य मुनींनी उपमन्यूला विचारले–"कायरे, तू काय खातोस पितोस ?" गाई चरत असतात त्यावेळी जवळ पासच्या गावांत जाऊन भिक्षा मागून खातो, असे उपमन्यू म्हणाला. "माझ्या अनुमती शिवाय तू ते अन्न



दुसऱ्या दिवसापासून उपमन्यू भिक्षान्न आणून गुरूला देऊ लागला. त्यातले गुरू थोडे आपल्याला देतील असे त्याला वाटले. परंतु तसे झाले नाही. तरी सुद्धा उपमन्यू भिक्षान्न आणून गुरूला देत राहिला.

त्यानंतर उपमन्यू गाईचे दूध काढून पिऊ लागला. ते कळल्यावर गुरूने त्याला बजावून सांगितले की गाईचे दूध आश्रमात काढल्यावर ओटीत उरलेले दूध तिच्या वासराच्या वाट्याचे असते.





वासरे गाईचे दूध प्याल्यावर त्यांच्या तोंडाला जो फेस लागून राही, उपमन्यू तो चाटून खाऊ लागला. परंतु तो खायलासुद्धा मनाई करण्यात आली. कारण त्याच्यावरच्या प्रेमामुळे वासरे जास्त फेस सोडतील असे वाटले.

भुकेने जीव कासावीस होत असल्या-मुळे उपमन्यू झाडांचा पाला खाऊ लागला. एकदां कसल्या तरी पाल्याचा रस डोळ्यात पडल्यामुळे त्याचे डोळे गेले. तो चाचपत पडत आश्रमाच्या वाटेने निघाला.





वाटेत तो एका दरीत पडला. अशक्त-पणामुळे त्याला वर चढून येतां आले नाही, कोणाला मदतीला ओरडून बोलावतां ही आले नाही. त्यात काळोख पडला.

गाई आश्रमात परतल्या. पण उपमन्यू नव्हता. त्याच्या वर काहीतरी संकट आले असावे असे समजून गुरु त्याच्या शोधार्थ निघाले.





दरीत पडलेला पाहून जवळ येऊन गुरूने त्याला घडलेले सर्व वृत्त ऐकले व देवांचे वैद्य अश्विनीकुमार यांचे स्मरण करण्यास शिष्याला सांगितले.



तेव्हां शिष्याने त्याप्रमाणे अश्विनीकुमारांचे स्मरण केले. दोघांनी त्याला दर्शन दिले व त्याला खायला एक भाकर दिली व म्हणाले–"तू ही खाल्लीस तर तुझे अंधत्व जाईल." तेव्हां उपमन्यु म्हणाला–"मी गुरूच्या आज्ञेशिवाय कसे खाऊ ?"



ते उत्तर ऐकून अश्विनीकुमार प्रसन्न झाले व ते उपमन्यूला त्याच्या गुरूकडे घेऊन गेले. गुरूची अनुमती मिळाल्यावर उपमन्युने ती भाकर खाल्ली लगेच त्याला दृष्टी आली व त्या बरोबर त्याला आरोग्य लाभले. गुरूने व अश्विनीकुमारांनी त्याला आशीर्वाद दिला.



# अवीक्षित

अवीक्षित हा करंधम नावाच्या राजाला वीरा नावाच्या राणीच्या पोटी जन्मलेला मुलगा होता. तो जन्मला तेव्हां ज्योतिष्यांनी त्याची जन्म पत्रिका तयार करून सांगितले की 'याच्यावर दुष्टग्रहांची दृष्टी पडणार नाही.' म्हणून त्याचे नाव अवीक्षित म्हणजे, ग्रहाची दृष्टी न पडलेला असे ठेवण्यात आले.

करंधमाचा बाप एक अत्याचारी शासक होता, म्हणून त्याच्या मंत्र्यांनी त्याला सिंहासनावरून काढून टाकले आणि करंधमाला गादीवर बसविले. मंत्री व प्रजा आपल्याला सुद्धा गादीवरून कदाचित काढून टाकतील या भीतीने करंधमाने खूप पैसे वाटले. रिकामा खजिना झाला. शेजारी राजांनी स्वारी केली आणि त्याला राजधानी बाहेर पळवून लावले. त्याने जंगलात सैन्याची जमवाजमव केली आणि आपले राज्य पुन्हां मिळविले.

अवीक्षित मोठा प्रतिभाशाली होता. वीरा, गौरी, सुभद्रा, लीलावती, दारिका, माल्यवती व कुमुद्वती नावाच्या राजकन्यांनी अनुक्रमे स्वयंवरात त्याला वरले. आणि त्याच्या राण्या झाल्या. इतक्यात विशाला नावाच्या राजकन्येचे स्वयंवर ठरले. अवीक्षित त्या स्वयंवरालाही गेला. त्याचा हेवा वाटत असलेल्या राजकुमारांनी एक होऊन त्याच्याशी युद्ध केले व त्याचा पराभव केला. परंतु विशालाने इतर कोणत्याही राजकुमाराला वरण्याचे नाकारले. स्वयंवर होऊ शकले नाही.

तिकडे करंधमला त्याच्या मुलाचा पराभव झाल्याचे कळले व तो सैन्य घेऊन आला व त्याने सर्व राजकुमारांना पळवून अवीक्षितला सोडविले. विशाला त्याच्याशी

लग्नाला तयार झाली. परंतु तिच्यासमोर नामुष्की झाली म्हणून तिच्याशी लग्नाला तयार नसल्याचे अवीक्षितने सांगितले.

परंतु त्याचे विशालावर प्रेम होते. म्हणून त्याने ब्रह्मचर्यव्रत घेण्याचे ठरविले. तिकडे विशाला लग्न करायचे तर अवीक्षितशीच असे सांगून वडिलांच्या अनुमतीने अरण्यात जाऊन तपश्चर्या करू लागली.

अवीक्षिताला गृहस्थाश्रमात आणायचे ठरवून त्याची आई त्याला म्हणाली– "बाळा, मी 'किमिच्छिक' व्रत घेणार आहे. कोणी काही मागितले तरी ते तू दिले पाहिजेस." अवीक्षिताने होकार दिला. आईने आपले व्रत प्रारंभ केले.

अवीक्षितकडे करंधमाने येऊन मला नातू हवा आहे तो तू दे अशी इच्छा प्रगट केली. म्हणून अवीक्षितने गृहस्थाश्रमात प्रवेश करण्याचे मान्य केले.

एकदा तो शिकारीसाठी रानात गेला असतां त्याला "मी अवीक्षिताची बायको आहे, माझे रक्षण करा, रक्षण करा!" असा एका स्त्रीचा आर्तनाद ऐकू आला.

अवीक्षिताचा स्वतःच्याच कानावर विश्वास होईना. तो आवाजाच्या दिशेने गेला. तेथं त्याने एका राक्षसाने एका स्त्रीला धरले असल्याचे पाहिले. त्याने त्या राक्षसाचा वध करून त्या स्त्रीला सोडविले. तेथे प्रगट झालेल्या दिव्यपुरुषाने "तु पाहिजे तो वर मागून घे!" असे म्हटले.

अवीक्षित म्हणाला–"माझ्या वडिलांना एक नातू, म्हणजे मला मुलगा हवा आहे."

"मग आणखी काय हवे? हिच्याच बरोबर संसार कर. मुलगा होईल." दिव्य-पुरुष म्हणाले.

"मी विशालाला वरले आहे. तिच्या-शिवाय इतर कोणत्याही स्त्रीबरोबर संसार करण्याची माझी इच्छा नाही." अवीक्षित म्हणाला.

"हीच ती विशाला! तू तिला पत्नी म्हणून स्वीकारावे, यासाठी ही तपश्चर्या करीत होती." देव म्हणाले.





# हरिदासाची कथा

एका गावातल्या देवळात हरिकथा चालू होती. आख्यानाच्या संदर्भात हरिदास म्हणाले–"कोणाची वस्तू चोरी करून नेली तर ती पचत नाही. चोरी करणाऱ्याचेच नुकसान होते."

ती गोष्ट तीन चोर साथीदारांनी ऐकली व म्हणाले–"या हरिदासाच्या घरीच चोरी करून याची गोष्ट आपण खोटी ठरवू या." त्या चोरांची नावे अनुक्रमे दगडू, खंडू व बंडू होती.

एके दिवशी रात्री त्या तिघांनी हरि-दासाच्या घराच्या भिंतीला भोंक पाडले आणि घरात शिरले. त्यांनी हरिदासाला आणि त्याच्या बायकोला बांधून ठेवले व त्यांच्या तोंडात बोळे कोंबून ठेवले. नंतर त्यांनी घरात त्यांना जे दागिने, पैसे व किंमती भांडी मिळाली त्यांचे एक गाठोडे बांधून तेथून निघून गेले.

त्या दिवशी रात्री ते गाठोडे कोठेतरी पुरून ठेवून चोरी संबंधी गावातला ओरडा शांत झाल्यावर काढून वाटून घ्यायचे ठरवून गावा बाहेर एका खोलगट जागी त्यांनी एक खड्डा खणला व त्यात ते गाठोडे पुरून ठेवले. नंतर एकाच वाटेने जाणे धोक्याचे असल्याचे ओळखून ते तिथे तीन दिशांनी निघाले.

तिघांच्याही मनात एकच विचार घोळत होता, दुसरा कोणीतरी इतर दोघांना फसवून गाठोडे उचलून नेणार नाही कशावरून?

दगडू थोडेच अंतर चालून गेला असेल त्याला एक पायऱ्या असलेली बावडी दिसली. तो चार पायऱ्या उतरून पांचव्या पायरीवर लपून बसून राहिला. तीन प्रहर रात्र उलटल्यावर ते गाठोडे काढून घेऊन जायचे त्याने ठरविले होते.

खंडू गेला त्या वाटेवर एका नव्या घराचे बांधकाम चालू होते. एका जागी विटा एकावर एक रचून ठेवलेल्या होत्या. दगडूने ठरविले होते तसेच ठरवून खंडू विटांच्या ढिगाऱ्याआड लपून बसला.

काही वेळ गेल्यावर त्याने काही विटा एका गाठोड्यात बांधल्या व त्या खोलगट जागी आला. त्याने दागिन्यांचे गाठोडे काढले. ते कोठेतरी ठेवून त्याच्या जागी विटांचे गाठोडे पुरून ठेवायचा विचार करून त्याने विटांचे गाठोडे त्या खोलगट जागी ठेवून दिले आणि दागिन्यांचे गाठोडे घेऊन जाऊन त्या पायऱ्या असलेल्या विहीरीजवळ जाऊन त्या विहिरीत ते गाठोडे टाकून दिले.

पायऱ्यांवर बसलेल्या दगडूच्या डोक्यावरच ते गाठोडे पडून खाली पाण्यात जाऊन पडले. दगडू सुद्धा गाठोड्याच्या धक्क्याने विहिरीतल्या पाण्यात पडला.

ते माहीत नसल्यामुळे खंडू परत त्या खोलगट जागी आला आणि त्याने विटांचे गाठोडे उचलले.

[illegible] तिसरा बंडू त्याच हेतूने त्या खोलगट जागी आला व खंडूला गाठोडे उचलतांना पाहून म्हणाला–"काय रे चोरा! सर्वच्या सर्व माल तू एकटचाने गिळंकृत करायला निघाला आहेस का? लबाडा!" असे म्हणत त्याने एक दांडके खंडूच्या कपाळात हाणले. खंडू बेशुद्ध होऊन खाली पडला.

बंडू विटांचे गाठोडे उचलून बांधकाम चालू होते त्या घराकडे पळत गेला.

पळण्याचा आवाज ऐकून तेथला पाहारेकरी जागा झाला व ओरडला–"कोणरे तो चोर?" आणि त्याने बंडूच्या पायांवर दांडके जोराने हाणले. बंडू खाली आदळला. त्याचे गाठोडे सोडून पाहिले तर त्यात विटा होत्या. यानेच विटा चोरल्या असे पाहारेकऱ्याला वाटले.

उजाडल्यावर खोलगट जागेवर पडलेला खंडू व विहिरीत पडलेला दगडू सापडले. चोरी बाहेर पडली. चोरीचा माल पचला नाही. हरिदासाची कथा खरी ठरली.





# वठणीवर आलेला बैल

सदोबाने दोन पाडे निरनिराळ्या आठवड्याच्या बाजारात विकत घेतले व त्यांची नावे रामू व भीमू ठेवून त्यांची जोडी गाडी व नांगराला जुंपू लागला.

रामू चांगला बैल होता. तो लौकर कामे शिके, परंतु भीमू थोडा खट्याळपणा करी. नांगराला किंवा गाडीला जुंपलेला असला की जोखडाखालची मान काढून घेऊन अडून उभा रहायचा. खाणे मात्र व्यवस्थित आणि खूप खायचा. कधीकधी तर दावे तोडून शेतात शिरायचा.

सहा महिने झाले तरी भीमू मार्गावर येईना. शेताची कामे तुंबून राहिली होती. शिवाय ऊस कापून गुऱ्हाळाकडे पोचविणे आवश्यक होते. वेळेवर ऊस पोचला नाही तर मोठे नुकसान होणार. शेताला खत आणायचे होते. तीळ लावण्यासाठी शेत नांगरायची वेळ जवळ येऊन ठेपली होती.

सदोबाने भीमूला वठणीवर कसा आणायचा, याविषयी बराच विचार करून लखू तेल्याकडे त्याला दोन दिवस घाण्याला जुंपायला पाठवून दिले. दिवसभर डोळ्यांवर झापड बांधून गोल फिरावे लागले भीमूला. सर्व जग त्याला काळोख्या रात्रीसारखे भासले. बरोबर रामूसुद्धा नाही. फिरताफिरतां मध्येच थांबला की पाठीवर काठीचा मार पडे.

दोन दिवस दोन युगासारखे वाटले भीमूला.

तिसऱ्या दिवशी सदोबाने भीमूला वीरू नावाच्या एका बैलाची भाड्याची गाडी चालविणाऱ्या वीरूकडे पोचते करून दोन दिवस गाडीला जुंपायला सांगितले. दोन बैलाच्या गाडीच्या जोखडाखालून सहजी मान काढून घेता येत होती. एका बैलाच्या गाडीचे जोखड, मान कशी काढणार?

खताची पोती कुळकर्ण्यांच्या घरी, पाटलांच्या घरी आणखी कोणाकोणाच्या घरी पोचवावी लागत. भीमूला ते दोन दिवस यमयातना सोसाव्या लागल्या.

वीरूकडे दोन दिवस भीमूला ठेवल्यानंतर सदोबाने भीमूला खंडू मळेवाल्याकडे मोटेला जुंपायला भीमूला पोचते केले. मोट ओढायला भीमूला उन्हांत चालावे लागे. त्या पेक्षा तेलाच्या घाणीचे कामच त्याला चांगले वाटले असावे. कारण ते काम सावलीत करावे लागे. भीमू घामाघूम झाला तोंडातून फेस येऊ लागला तरी खंडूने भीमूला मोटेला बांधले होते.

मोटेचे काम भीमूला जास्तच कष्टाचे वाटले कारण मोट भरली म्हणजे पुढे उतरणीवर धावत पळावे लागे आणि रिकामी झाली की पुन्हां ती विहिरीत सोडण्यासाठी उलटे चढणीवर यावे लागे. भीमूने थोडीसुद्धा कुचराई दाखविली की खंडूची काठी पाठीवर पडे.

त्यानंतर सदोबाने भीमूला एका भिश्त्याकडे पोचते केले. भिश्ती भीमूच्या पाठीवर दोन चामड्याच्या पिशव्या भरून टाकी. पाण्याचे ओझे वाहून नेताना भीमूची पाठ मोडल्यासारखी झाली.

दोन दोन दिवस वेठीची ही कामे एक आठवडाभर केल्यावर भीमूची मस्ती उतरली असेल असे वाटून सदोबा त्याला घरी घेऊन गेले. एका आठवड्यानंतर रामूची भेट झाल्यावर भीमूला परमानंद झाला. किती वर्षांनी मित्र भेटल्याचा आनंद त्याला झाला. इतरांपेक्षा आपला धनीच आपल्याला वेळेवर दाणापाणी देतो, गवत घालतो या गोष्टीची जाणीव भीमूला झाल्यासारखे दिसले. कारण त्यानंतर भीमूने नांगराला किंवा गाडीला जुंपल्यावर मान काढून घ्यायचा खटयाळपणा दाखविला नाही आणि गुण्यागोविंदाने सर्व कामे करू लागला.

बैल वठणीवर आल्याचे पाहून सदोबालासुद्धा आनंद झाला.



# मुलाकरिता

विजयदुर्ग नावाच्या गावी विश्वनाथशास्त्री नावाचे एक सुप्रसिद्ध वैद्य होते. त्यांना स्वतःच्या हातगुणाबद्दल फार गर्व होता. तो हातगुण त्यांच्या मुलातही उतरला. एकदा स्वतः विश्वनाथशास्त्री आजारी पडले. त्यांना स्वतःचे औषध घेऊनही गुण पडला नाही. मरण जवळ येत असल्याची त्यांना खात्री वाटू लागली. आणखी एखाद्या वैद्याकरवी इलाज न करविता ते आपल्या मुलाकरवी आपलीच औषधेच घेत राहिले.

विश्वनाथशास्त्रांचा आजार वाढत चाललेला पाहून गंगाधरशास्त्री त्यांना भेटायला आले, त्यांचा मूळ हेतू हा होता की विश्वनाथशास्त्री मरण पावल्यावर त्यांची जागा त्यांना पटकावता येईल. विश्वनाथशास्त्रांना तो हेतू कळला. अंगातले सर्व बळ एकवटून ते खाटेवर उठून बसले आणि म्हणाले—"माझ्या मुलाच्या हाताला चांगला गुण आहे." गंगाधर शास्त्री काही न बोलता विजयदुर्गाहून निघून गेले. मुलाला चकित झालेला पाहून विश्वनाथशास्त्री म्हणाले—"मुला, तुझा मोठेपणा दाखविण्यासाठी मला त्रास होत होता तरी उठून बसलो. नाहीतर गंगाधरशास्त्री आपल्या गावात ठाणे देऊन बसले असते व तुझ्या पोटावर पाय आला असता." असे बोलत असतांच विश्वनाथशास्त्री कोलमडून पडले ते पुन्हां उठले नाहीत.





# लखुजीची भुतं

लखुजीच्या मुलीचे लग्न ठरलं. परंतु आपल्या गावीच लग्न केले तर सर्व गावाला बोलवावं लागेल व अव्वाच्या सव्वा खर्च होईल, असा विचार करून त्यांनी दुसऱ्या गावी लग्न करायचे ठरविले आणि गांवकऱ्यांना खोटे सांगितले की व्याह्यांची इच्छा त्या गावी लग्न करण्याची असल्यामुळे तिकडे सर्व तयारी केली आहे.

लग्नाच्या दोन दिवस आधी सर्व तयारी करण्यासाठी लखुजींनी आपल्या मुलाला त्या गावी पाठविले होते व स्वत: बायकोबरोबर बैलगाडीत बसून आदल्या दिवशी निघाले.

वाटेत काही विघ्न आले नसते तर ते रात्री त्या गावी पोचले असते. परंतु वाटेत एक बैल आजारी पडला. म्हणून त्याला एका गावी एका गृहस्थाकडे सोडून दुसरा बैल घेऊन पुढला प्रवास सुरू करावा लागला. म्हणून संध्याकाळ होईपर्यंत ते अर्धी वाटच जाऊ शकले.

लखुजी काळजीत पडले की मुलगा वाट पहात असेल. त्याने तिकडे लग्नाची सर्व तयारी केली असेल, धर्मशाळेत भाडे देऊन जागा घेतली असेल आणि कदाचित सैंपाक वगैरेही करविला असेल. आता हा सर्व खर्च फुटकच जाणार.

आणखी एक विघ्न आलं. ते म्हणजे जोराचा पाऊस आला. म्हणून सर्व रस्ताभर चिखल झाला. रस्त्याच्या बाजूलाच एका स्मशानातून कोल्हेकुई व घुबडांचे ओरडणे ऐकू येत होते. काळोखी रात्र असल्या कारणाने भीती वाटत होती. रस्ताभर खाचखळगे होते आणि आणखी एक दुर्दैव म्हणजे गाडी एका जागी चिखलात रुतली.

सर्व लोक गाडीतून उतरले आणि खड्यातून गाडी वर काढू लागले. परंतु काही उपयोग झाला नाही. इतक्यात लखुजीला कोणीतरी बडबडल्याचा आवाज ऐकू आला. त्यांनी गाडीच्या टापावर पाहिले तर ते चकितच झाले. टापावर काही खुजी भुते मांडी ठोकून बसण्याच्या प्रयत्नात होती.

"कोण तुम्ही, येथे काय काम तुमचं?" लखुजींनी करड्या आवाजात विचारले.

"आम्ही खुजी भुते आहो. परंतु तुम्ही इकडे स्मशानात आलातच कशाला?" भुतांनी उत्तर द्यायच्या ऐवजी उलट प्रश्न विचारला.

लखुजी धीर करून म्हणाले—"स्मशानात यायची आम्हांला गरजच काय? आमचं नशीब इतकं फुटकं वाटलं की काय तुम्हांला? उद्यां आमच्या मुलीचं लग्न आहे."

"वाहवा! लग्न आहे का? तरमग खायला लाडू आणि जिलब्या मिळणार!" असे म्हणत ती भुते नाचू लागली.

"परंतु लग्न होणार कसे? गाडी तर चिखलात रुतली आहे. चिखलातून निघेल तर ना;" लखुजी म्हणाले.

"तरमग ऐक, आम्हांला बरोबर लग्नाला घेऊन गेलात तर आम्ही एका क्षणात गाडी बाहेर काढून देऊं आहे कबूल?" भुतांनी अट घातली.

"गाडी बाहेर तर काढा तुम्हांला लग्नाला घेऊन जाऊ." लखुजी म्हणाले.



त्यानंतर सर्व लोक गाडीत जाऊन बसले. भुते गाडीच्या टापावरुन खाली उडी मारुन आली व एका क्षणात गाडी चिखलातून बाहेर काढली. गाडी दुप्पट वेगाने चालू लागली.

लखुजीची बायको म्हणाली–"तुम्हांला आता काय म्हणायचे? गावकऱ्यांना व नातेवाइकांना सोडून आपण आतां या या भुतांना बरोबर बोलावून लग्नाला नेतो आहो."

"तुला काय कळते? त्या गावात पोंचे-पोंचेतो चांगले उजाडेल. भुते पळून जातील." लखुजींनी योजलेली युक्ती सांगितली.

"परंतु ज्या वेगाने गाडी चालते आहे, त्यावरुन असे वाटते आहे की आपण उजाडण्याच्या आधीच त्या गावात पोहोचू. मग तुम्ही काय करणार? या भुतांचा पाहुणचार करायला मी नाही तयार. तुम्हांलाच त्याची जबाबदारी उचलावी लागेल." लखुजींची बायको म्हणाली.

"बायका कधी दूरचा विचार करतील तर ना! गावात पोचतांच मी कालीच्या देवळासमोर गाडी थांबवून भुतांना म्हणेन–'चला आत! येथेच लग्न व्हायचं आहे.' ते ऐकतांच सर्व भुते पळ काढतील." असे म्हणत लखुजी मोठ्याने हसले. लखुजीच्या बायकोला नवऱ्याची युक्ती फार आवडली. परंतु वरकरणी रागदाखवीत म्हणाली–"एवढे मोठ्याने काय बोलतां? भुतांना ऐकू येईल."

त्यानंतर त्यांना झोप आली दोघे झोपली. गाडीचा हिसका लागला व दोघांच्या झोपा मोडल्या. तोंपर्यंत छान उजाडलं होतं.

लखुजींनी गाडीतून उतरून पाहिले. गाडी चिखलात रुतली होती त्याच जागी होती. एक पाऊलही पुढे गेली नव्हती.

"अग, तू मला फुकट बडबड करू दिलंस. माझं बोलणं त्यांना ऐकू गेलं असणार. त्यांनी गाडीची चाकं नुसतीच फिरत ठेवली वाटतं आणि नंतर या खड्ड्यात गाडी टाकून पसार झालेली दिसताहेत." लखुजी उलट बायकोवरच उलटले.





# अंधविश्वास

रत्नपूरचा व्यापारी धनगुप्त कित्येक वर्षे समुद्रपार व्यापार करीत पूर्वेकडील बेटावरच राहू लागला. तेथेच त्याने एका सुंदर मुलीशी लग्न केले. त्याने अपार संपत्ती मिळविली आणि ती घेऊन तो स्वदेशी परतला. तो आपला बालमित्र रामगुप्त याला भेटायला त्याच्या घरी गेला.

रामगुप्तने सुद्धा व्यापार करून पुष्कळ पैसे मिळविले. तो राजघराण्यातल्या लोकांसारखा ऐशआरामात आयुष्य घालवीत होता. दोघे मित्र बरेच दिवसांनी भेटले होते. म्हणून आपल्या जुन्या आठवणींची उजळणी करू लागले.

रामगुप्ताच्या घरावर 'सुदर्शन' अशी पाटी पाहून धनगुप्तने विचारले–"मित्रा, हा सुदर्शन कोण रे?"

"सुदर्शन माझ्या मुलाचे नाव आहे. तो जन्मल्यानंतरच माझं नशीब उघडलं. तेव्हां पासून मी हातात माती धरली की तिचं सोनं होऊ लागलं, म्हण ना!" रामगुप्त म्हणाला.

त्यानंतर दोघे मित्र बराच वेळ बोलत राहिले. प्रत्येक वेळी रामगुप्त आपल्या धाकट्या मुलाचे गुणगान करी, परंतु मोठ्या मुलाविषयी बोलायला लागलं तर तो टाळाटाळ करून विषय बदली. म्हणून धनगुप्ताने त्याला विचारले–"काय रे, पण तुला मुलगे किती हे नाही, तू सांगितलेस?"

"मला दोन मुलगे आहेत. थोरला सुमंत, तो दहा वर्षांचा आहे आणि धाकटा सहा वर्षांचा." रामगुप्त म्हणाला.

धनगुप्ताला आश्चर्य वाटलं की रामगुप्तासारखा कर्तबगार माणूस आपल्या कर्तृत्व शक्तीवर अवलंबून न राहतां आपल्या नशिबावर कसा अवलंबून राहातो?



त्याहून जास्त वाईट गोष्ट ही की रामगुप्त जेव्हां आपल्या धाकट्या मुलामुळे आपलं नशीब उजळल्याचे सांगू लागला तेव्हां धनगुप्ताला साहजिकच वाटलं की असं तो नेहमी बोलत राहला तर धाकट्या मुलाचं डोकंच फिरेल. तिकडे थोरला मुलगा त्याचा तेजोभंग झाल्याने कमकुवत मनाचा होईल. असा विचार करून धनगुप्त रामगुप्ताला म्हणाला–"कायरे मित्रा! मी एक गोष्ट विचारू का? मला मूलबाळ नाही. माझी बायको परदेशात राहणारी आहे. तिला एकलकोंडेपणा वाटू नये, यासाठी तू आपल्या मोठ्या मुलाला आमच्या घरी राहायला कां नाही पाठवीत?"

पुष्कळच श्रीमंत होता. म्हणून रामगुप्त आपल्या मोठ्या मुलाला धनगुप्ताच्या घरी पाठवायला तयार झाला.

मोठा मुलगा धनगुप्ताकडे राहू लागल्या-वर काही दिवसांनी रामगुप्त धनगुप्ताला भेटायला गेला. धनगुप्त उदास दिसत होता. रामगुप्ताने त्याचे कारण विचारले.

धनगुप्त म्हणाला–"मित्रा, मी समुद्रपार व्यापार सुरू केला तेव्हांपासून आजपर्यंत केव्हांही माझ्यावर असले प्रसंग ओढवले नाहीत. आजच मला कळलं की माझं गलबत बुडालं आणि त्यात लक्षावधी रुपयांचा माल बुडाला. कारण नाही माहीत, परंतु मला असं वाटू लागलं आहे की तुझ्या मुलाने जेव्हांपासून माझ्या घरात पाऊल टाकलं, तेव्हांपासून असंच काहीतरी घडतं आहे बुवा!"

ते ऐकून रामगुप्ताला थोडे वाईट वाटले. त्याने आपल्या मित्राला झालेल्या नुकसानाबद्दल सहानुभूती दर्शविली.

आणखी काही दिवस गेले एके दिवशी संध्याकाळी धनगुप्त कोणतीतरी मोठी काळजी लागल्यासारखा रामगुप्ताच्या घरी गेला. रामगुप्तने आपल्या मित्राला काळजीत पडलेला पाहून विचारले–"मित्रा! कायरे, बुवा? पुन्हां काही झालं का रे?"

नुकसान झालं आहे. यावेळी माझी बायको आजारी पडली आहे, व आजार काय आहे कळत नाही. वैद्यांना सुद्धा आजाराचं निदान होत नाही. हे पहा, रामगुप्त! तुला कशी आपल्या थोरल्या मुलामुळे तुझ्यावर काही मोठे संकट आल्याचं आठवतं आहे का? कारण तो माझ्या घरी आल्यानंतर मला आनंद होईल अशी एकही गोष्ट घडली नाही." धनगुप्त म्हणाला.

धनगुप्त म्हणाला ते ऐकून रामगुप्तला मनस्वी राग आला. तो संतापून म्हणाला–"माझ्या मुलामुळे माझं कोणतेही कधी नुकसान असे झालेच नाही. तूच त्याला आपल्या घरी बोलावून घेऊन जातो म्हणालास. तुझं काही नुकसान झालं असेल तर त्याचे खरे कारण काय ह्याची माहिती काढण्याचा प्रयत्न न करतां सर्वांचे खापर माझ्या मुलाच्या माथी फोडण्याची काय गरज? हा तुझा अंधविश्वास आहे. मी आपल्या मुलाला घरी घेऊन येतो."

रामगुप्त म्हणाला ते ऐकून धनगुप्ताला आनंद झाल्यासारखे भासले. तो म्हणाला–"होय, रामगुप्त! मलाही तेच बरोबर दिसते आहे. तू आपल्या मुलाला आपल्या घरी घेऊन जा. चल माझ्या बरोबर."

रामगुप्ताने धनगुप्ताच्या घरी जाऊन पाहिले. तेथे काळजी करण्यासारखे क ही नव्हते. त्याच्या घरात आनंदी वातावरण होते. धनगुप्ताची बायको आनंदाने सर्व










दागिने घालून हसतमुखाने पुढे आली तेव्हां प्रत्यक्ष लक्ष्मीच आल्याचा भास झाला. तिने रामगुप्ताला घरच्या सर्व लोकांची खुशाली विचारली.

त्याहून आश्चर्य वाटण्यासारखी गोष्ट म्हणजे रामगुप्ताचा मुलगा आनंदाने उड्या मारीत मनमोकळेपणाने खेळत होता. परंतु बापाला आलेला पाहून हिरमुसल्यासारखा कोपऱ्यात जाऊन बसला. ते पाहून रामगुप्त थक्कच झाला.

"रामगुप्त! तुला कळलं का सर्व? कळलं नसेल तर ऐकून घे समज, माझं काही नुकसान झालंच असतं तरी मी हे कदापि मानलं नसतं की हे तुझ्या मुलामुळेच झाले आहे. मी इतका मूर्ख नाही. तू आपल्या धाकट्या मुलाच्या पायगुणाची वाखाणणी सर्वासमक्ष करीत फिरतोस की तोच तुझं नशीब उघडायला कारण झाला आहे. त्याचा परिणाम तुझ्या मोठ्या मुलाच्या मनावर कसा होईल याचा कधी तू विचार केला आहेस का? त्याचप्रमाणे तुझ [illegible] गर्व उत्पन्न होण्याची शक्यता आहे, याचा ही विचार तुझ्या मनाला शिवलेला दिसत नाही. मी ते सर्व पाहूनच थोडा भ्यालो व ठरविले की तुझी कानउघाडणी करावी. म्हणून मी तुझ्याजवळ दोनदां खोटे बोललो. तू अन्यथा मानू नकोस. समज, आणखी काही दिवसांनी तुझ्या भाग्याने पाठ फिरविली व त्याचे कारण तोच असल्याचे मानून तुझा धाकटा मुलगा किती दुःखी होईल? याचाही विचार कर. तू माझ्यात अंधविश्वास असल्याचे म्हणालास तेव्हांच माझा प्रयत्न यशस्वी झाल्याची माझी खात्री झाली. आतां तू आपल्या मुलाला घेऊन जा."

तेव्हां रामगुप्त नम्रपणे म्हणाला– "मला माझी चूक कळली. माझ्यात बदल व्हायला थोडा वेळ लागेल. म्हणून तू काही दिवस आणखी थोरल्या मुलाला आपल्या घरीच ठेवून घे. मला असे वाटू लागले आहे की तुझ्या घरच्या मोकळ्या वातावरणाचा त्याला पुष्कळ फायदा झाला आहे."






महिषासुराचा वध करून देवी अंतर्धान पावल्यावर देवांनी महिषासुराचे राज्य शत्रुघ्न नावाच्या एका सूर्यवंशी राजाला देऊन त्याचा राज्याभिषेक केला आणि देवलोकी निघून गेले.

सर्व जग सुखासमाधानाने रहात असतां पुन्हां राक्षसांचा त्रास सुरू झाला. रसातळात शुंभ व निशुंभ नावाचे दोन राक्षस भाऊ घोर तपश्चर्या करू लागले.

त्यांच्या तपश्चर्येवर प्रसन्न होऊन ब्रह्मदेवाने त्यांना दर्शन दिले व वर मागायला सांगितले.

दोघे म्हणाले–"तुझ्या हाती किंवा इतर कोणाच्याही हाती आम्हांला मरण येणार नाही, असा वर दे!"

"ते मला मान्य नाही. तुम्ही दुसरा एखादा वर मागून घ्या!" ब्रह्मदेव म्हणाला.

"स्त्रीच्याशिवाय आणखी कोणाच्याही हाती आम्हांला मरण येणार नाही, असा वर दे. कोणी स्त्री आमचा वध करायला येईल तेव्हां काय करायचे ते आम्ही पाहून घेऊ." शुंभ व निशुंभ म्हणाले.

ब्रह्मदेवाने त्यांना तसा वर दिला.

ब्रह्मदेवाकडून असा वर प्राप्त केल्यावर दोघां भावांनी भृगु महर्षींना आपला पुरोहित केले. नंतर सुमुहूर्त पाहून शुंभने स्वतःचा राज्याभिषेक करून घेतला आणि आपला धाकटा भाऊ निशुंभ याला आपला मंत्री म्हणून नेमले आणि राज्यकारभार पाहू लागला. चंड व मुंड असे त्याचे दोन

शूर सेनापती होते. पाताळातून धूम्रलोचन व रक्तबीज नावाचे दोन राक्षस दोन अक्षौहिणी सैन्यासह येऊन शुंभ व निशुंभाच्या दरबारात आले.

रक्तबीज राक्षसाला युद्ध करीत असतां जखम झाली की जे रक्त जमिनीवर सांडे त्याच्या प्रत्येक थेंबातून एक रक्तबीज राक्षस उभा राही. म्हणूनच त्याला रक्तबीज हे नाव प्राप्त झाले. एकदां निशुंभच्या मनात इंद्राला जिंकायची महत्वाकांक्षा उत्पन्न झाली. तो इंद्राची राजधानी अमरावती या नगरावर चालून गेला. तेव्हां इंद्राने त्याच्यावर आपल्या वज्रायुधाचा प्रयोग केला. त्यामुळे निशुंभ बेशुद्ध होऊन पडला.

आपला धाकटा भाऊ वज्रायुधाचा प्रहार झाल्याने बेशुद्ध होऊन पडल्याचे ऐकून शुंभ संतापला, त्याने स्वर्गावर स्वारी केली, इंद्राचा पराभव केला व देवांना पळवून लावले. त्याने स्वतः इंद्रपद स्वीकारले आणि अष्ट दिक्पालांना वश करून त्रिलोकपती झाला. तो नंदनवनात शिरून अप्सरांबरोबर विहार करू लागला.

दिग्पालकांच्या जागांवर शुंभचे अनुयायी नेमले गेले. शुंभच्या राज्यात देवांचे हाल होऊ लागले. ते जंगलात पळून गेले किंवा गुहात राहू लागले.

गुरु बृहस्पती यांना भेटले व म्हणाले– "एक हजार वर्षे अशीच लोटली. दुःख असह्य झाल्याने इंद्रादी देव विचार करू लागले की पुन्हां स्वर्गाचे राज्य कसे संपादन करावयाचे? त्यापूर्वी शुंभचा वध करणे आवश्यक होते. पण ते कसे साध्य होणार हे कळेना! म्हणून ते एके दिवशी आपले गुरुवर्य! आपल्याला माहीत नाही, असे या जगात काय आहे? देवांवर हा जो प्रसंग ओढवला आहे तो कसा दूर व्हायचा याचा काहीतरी उपाय सुचवा. मंत्रांचा फार मोठा प्रभाव असतो. म्हणून कोणतातरी मोठा होम करून किंवा आणखी काहीतरी करून आमचे राज्य आम्हांला परत मिळवून द्या!"

देवगुरु बृहस्पती म्हणाले– "इंद्रा, मंत्र-तंत्र झाले तरी ते विधिलिखिताप्रमाणेच कामाचे असतात. त्याच्याविरुद्ध काही करतां येणे शक्य नाही. तुम्ही सर्व शक्तिसंपन्न असून या स्थितीत आहांत तर तुम्हांला ते सर्व मंत्र काय उपयोगाचे? परंतु एक करता येण्यासारखे आहे. जगज्जननीने महिषासुराचा वध केला होता, हे तुम्हांला माहीतच आहे. पुन्हां तिच्याच आश्रयाला जा. तुम्ही हिमालय पर्वतावर जाऊन त्या देवीचा मायाबीज मंत्र आहे ना त्याचा जप करा. तुमची इच्छापूर्ण होईल."

त्याप्रमाणे देव हिमालय पर्वतावर गेले व मायाबीज मंत्राचा जप करीत देवीचा स्तोत्रपाठ करू लागले.

देवी एक सुंदर साडी नेसून व मनोहर आभूषणे धारण करून गंगेवर स्नानाला निघाल्यासारखी एका गुहेतून बाहेर आली व तिने देवांना पाहून विचारले–"देवां-सारखे दिसतां आहां! कोणत्या कामाने इकडे आलां? फार चिंतामग्न दिसतां आहां?"

त्यांनी हात जोडले व तिला म्हणाले– "माते! आमच्यावर आलेल्या संकटातून आम्हांला वांचव. आम्ही युद्धात दानवां-समोर टिकाव धरू न शकल्यामुळे आपले दुःख घेऊन तुझ्या आश्रयाला आलो आहो. तर एक आधार आम्हांला. शुंभ व निशुंभ नावाच्या राक्षसांनी आमचा पराभव करून स्वर्गाचे राज्य बळकावले आहे. ब्रह्मदेवाने दिलेल्या वरामुळे त्यांना ठार करणे आम्हांला अशक्य झाले आहे. परंतु यांचा वधही महिषासुराप्रमाणेच एका स्त्रीच्या हातीच आहे. तेव्हां त्यांचा वध कोणती स्त्री करू शकणार? म्हणून आम्ही निरुपाय होऊन असा त्रास भोगत आहो. पूर्वी तू महिषा-सुराचा वध केलास तेव्हां आमच्यावर कधी संकट आले तर उद्धार करीन, असे वचन दिले होतेस. शुंभ निशुंभच नव्हे तर रक्तबीज, चंड, मुंड इत्यादी राक्षसही आमचे शत्रू आहेत. आज अष्ट दिग्पालक राक्षसच आहेत. म्हणून आमच्यावर



अनुग्रह कर आणि सर्व राक्षसांचा संहार कर."

देवांची ती दीन अवस्था पाहून देवीला कींव आली व तिने आपल्या देहातून कौशिकी नावाच्या एका शक्तीची सृष्टी केली. ती शक्ती अंगाने काळी होती म्हणून तिला कालिका, काळरात्री ही नावे पडली तिने महाभयंकर रूप धारण केले.

"देवांनो! तुम्ही काळजी करण्याचे कारण नाही. शुंभ निशुंभांचा व इतर राक्षसांचा संहार करून तुमचे मी कल्याण करीन." असे सांगून देवीने देवांना अभय-दान दिले. तिच्या देहातून सृष्टी केलेल्या कौशिकीला आपल्या बाजूला ठेवून ती

[illegible] नगरा-बाहेरच्या वनात राहू लागली. तेथे तिने मनोहर गायन सुरू केले. ते गायन ऐकून सर्व देवांना फार आनंद झाला. रानटी जनावरे देहभान विसरून गेली. पक्षी कान टवकारून ऐकू लागले.

त्यावेळी चंडमुंड वनविहार करीत ते गायन काही वेळ ऐकून जवळ आले. त्या जगन्मोहिनी मातेचा तो मनोहर अवतार आणि तिच्याबरोबर आलेल्या कौशिकीला पाहून ते आश्चर्यचकित झाले व राजधानी-कडे निघून गेले. तेथे शुंभला भेटून नमस्कार केला व म्हणाले–"कोठून तरी एक स्त्री सिंहवाहनावर बसून आली आहे. त्रिलोकांत इतकी सुंदर स्त्री मिळणे अशक्य आहे. आपल्या उद्यानवनात ती गात असतां सर्व पशुपक्षी देहभान विसरून गेले होते. तिच्या त्या मधुर कंठाचे वर्णन आम्ही काय करणार? तिच्याबरोबर आणखी एक स्त्री आहे. हे सर्व कशाला, तू स्वतःच जाऊन पहा ना, आणि तिला घेऊन येऊन तिला पट्टराणी कर. त्याहून जास्त सुख आणखी काय असू शकेल? ऐरावताला, पारिजातक वृक्षाला, उच्चश्रवा नावाच्या इंद्राच्या घोड्याला आणि विमानाला जिंकून घेतले आहेस, हीच तुझी पट्टराणी होण्यालायक आहे."



ते सर्व ऐकून शुंभने विचार केला की काय वाटेल ते करून त्या स्त्रीला आपली पट्टराणी करायचे. जवळच सुग्रीव नावाचा एक राक्षस उभा होता, त्याला शुंभ म्हणाला—"तू माझ्या वतीने जा आणि त्या स्त्रीला घेऊन ये. हे पहा, शृंगार इत्यादीत फक्त साम व दान यांचाच उपयोग करावयाचा असतो. भेदनीती व दंडनीतीचा नाही, लक्षात असू दे."

सुग्रीव निघाला व सिंहवाहनावर बसलेल्या जगदंबेला नमस्कार करून म्हणाला—"देवी, शुंभने सर्व देवाने जिंकले आहे. तो मदनाचा पुतळा आहे. मी त्याचा दूत आहे. तुझ्या सौंदर्याचे वर्णन ऐकून तो तुझ्यावर [illegible] पाठविले आहे. तो तुला आपली पट्टराणी करून घेणार आहे व नेहमी तुझ्या आज्ञेप्रमाणे वागेन असे त्याने तुला सांगायला सांगितले आहे." ते ऐकून देवी स्मित करून म्हणाली—"तुमच्या राजाने सर्व देवांना जिंकले असल्याचे ऐकून व तो इतका मोठा आहे, म्हणूनच मी त्याच्याकडे आले आहे. हे त्याला सांग व त्याला आणखी एक गोष्ट सांग की मी सामान्य व्यक्तीशी विवाह करीत नाही. माझ्याशी युद्ध करून जो मला जिंकील त्याच्याशीच मी लग्न करीन अशी मी प्रतिज्ञा केली आहे. मी ही प्रतिज्ञा केली त्या दिवसापासून माझा गर्व भंग करणारा एकही पराक्रमी वीर पुढे आला नाही. तुझ्या मालकाने हा पराक्रम दाखवून माझे पाणिग्रहण करावे."

ते ऐकून सुग्रीव थक्कच झाला व म्हणाला—"देवी, स्त्री स्वभावानुसार तू दुस्साहस दर्शवून असे म्हणालीस, परंतु तुला माहीत नसेल, शुंभचे नुसते नाव ऐकूनच मोठमोठे वीर थरथर कापतात! त्याला तू कशी काय जिंकणार? तू तो सर्व विचार मनातून काढून टाक व तू शुंभ किंवा त्याचा धाकटा भाऊ निशुंभ दोघांपैकी कोणा एकाला आपला पती म्हणून स्वीकारून सुखाने आयुष्य घालव."

[illegible] प्रतिज्ञा भंग करणार नाही. माझ्या मनाची इच्छा पुरी न करणाराशी मी कसं काय लग्न करीन? माझ्याशी युद्ध करायची तयारी नसेल तर तू आपल्या मालकाला सांग की स्वर्ग व मर्त्यलोक सोडून सकुटुंब सपरिवार रसातळाला निघून जा, म्हणावे. मी जे सांगितले त्यात काही बदल होणार नाही."

सुग्रीवाला काय उत्तर द्यावे, कळेना. तो शुंभकडे गेला व प्रथमच क्षमा मागून देवीने त्याला जसं सांगितलं होतं त्याच शब्दात त्याने सर्व निवेदन केले.

शुंभ निशुंभाकडे वळून म्हणाला—"एक बाई आणखी एका बाईला बरोबर घेऊन आमच्याशी युद्धाला आली आहे, म्हणे! तू जातोस की मी जाऊ तिच्याशी युद्धाला?"

"तू जाऊ नकोस व मी ही जात नाही. धूम्रलोचनाला पाठविले तर तो तिला जिंकून घेऊन येईल. ती लगेच तुझे पाणिग्रहण करील." निशुंभ म्हणाला.

शुंभला ते पटले व तो धूम्रलोचनाला म्हणाला—"तू जा आणि त्या सुंदर स्त्रीला मदत करणारी जी दुसरी स्त्री आहे तिचा वध करून त्या सुंदरीला घेऊन ये. तिने तुझ्यावर तीक्ष्ण बाण सोडले तरी तू तिच्यावर बाण सोडू नकोस, बरं का! तिच्या अंगाला कोणत्याही प्रकारचा धक्का किंवा व्रण पडता कामा नये."



धूम्रलोचन ससैन्य देवी होती तेथे गेला व आपल्या मालकाने सांगितलेला प्रेमसंदेश देवीला निवेदन केला.

तो म्हणाला ते ऐकून घेऊन कालिका त्याला उत्तर देत म्हणाली—"काय रे, तू निर्लज्जासारखा बोलतो आहेस? युद्ध कर माझ्याबरोबर. माझी मालकीण येथे कशासाठी आली आहे, वाटलं तुला?"

धूम्रलोचन संतापला व म्हणाला—"तू मरायला तयार होऊन आली आहेस ना? मी तुझा गर्व व घमेंड उतरवितो, पहा! इतका वेळ तू उर्मटपणाने बोलत राहिलीस

त्याचे प्रायश्चित्त मी तुला देतो." असे म्हणत तो युद्धाला तयार झाला. परिणाम व्हायचा तोच झाला. तो स्वत: तर मेलाच त्याचे सर्व सैन्यही नष्ट झाले.

त्यानंतर देवीने शंखनाद केला. सर्व दिशा दुमदुमल्या. तो आवाज ऐकून शुंभ काही तरी भयंकर घडले आहे असे वाटून निघाला व शंखध्वनी झाला त्या दिशेने आला. तेथे धूम्रलोचनाचा ससैन्य फडशा उडालेला पाहून व राक्षसांची आणि घोड्यांची प्रेते पाहून थक्क झाला. जे जिवंत होते त्या राक्षसांच्या तोंडी त्याने सर्व वृत्त ऐकले.

शुंभची प्रणयगाथा एकदम संपुष्टात आली. तरमग त्या स्त्रीशी युद्धाशिवाय दुसरा मार्गच नाही. नाही तर संधीची बोलणी. तिच्याशी युद्ध करण्याची शक्ती असलेले कित्येक राक्षस शुंभकडे होते. सर्व प्रथम चंड मुंड देवीशी युद्धाला गेले. ते मेल्यावर रक्तबीज युद्धाला गेला व त्याने पुन्हां एकदां शुंभ किंवा निशुंभ दोघांपैकी कोणशीही विवाह करून घेण्यास तिला सल्ला दिला.

"माझ्याशी युद्ध करून मला जिंकणाऱ्याशिवाय मी इतर कोणाशीही विवाह करणार नाही, हे मी तुमच्या मालकाला तेव्हांच सांगितले नाही का? मग पुन्हां या निरर्थक गप्पा कशाला? तू शुंभ निशुंभांना माझ्याशी युद्ध करून मला जिंकल्यावर मी त्यांच्याशी विवाह करीन असे जाऊन सांग!" देवी म्हणाली.

रक्तबीज चिडला व देवीशी युद्ध करून त्यात बेशुद्ध झाला व रथात पडला.

परंतु रक्तबीजाचे रक्त जमिनीवर पडतांच प्रत्येक थेंबाबरोबर एकेक रक्तबीज जमिनीवर उत्पन्न झालेले पाहून देवीने त्याचे रक्त जमिनीवर पडू न देता ते पिऊन टाक अशी कालिकेला आज्ञा केली आणि स्वत: त्यापूर्वी जन्मलेल्या अनेक रक्तबीजांचा संहार केला.

अगदी शेवटी शुंभ निशुंभ देवीशी युद्धाला आले आणि देवीने त्यांचा वध केला. ते मेल्यावर देवीने इतर राक्षसांना अभयदान दिले. ते पाताळलोकात निघून गेले.





# चौर्य वृत्ती

एका राज्यात चोऱ्या इतक्या होऊ लागल्या की राजाने हुकूम काढला की पकडलेल्या प्रत्येक चोराला गावाबाहेर उघड्या जागेवर फाशीची शिक्षा देण्यात यावी. त्याप्रमाणे कित्येक चोरांना फाशी झाली.

त्याच राज्यात एका गावी खंडू आणि दगडू नावाचे दोन चोर रहात होते. त्यांच्या काही साथीदार चोरांना फांशीची शिक्षा झाली. ते कळल्यानंतर घाबरून जाऊन खंडू व दगडू दोघांनी चोरीचा धंदा सोडून द्यायचे ठरविले.

"आजपर्यंत पुष्कळ पापे केली उरलेले आयुष्यतरी नीट घालवू या." खंडू म्हणाला.

"आपण करायचेच म्हटले तर किती तरी चांगली कामे आहेत! एखादा चांगला धंदा करू." दगडू म्हणाला.

ते दोघे शेजारच्या एका गावी गेले आणि एका शेतकऱ्याकडे कामाला लागले. खंडूला दररोज बैलांना रानात चरायला न्यावे लागे व दगडूला मळ्यात झाडाला पाणी द्यावे लागे.

पहिल्या दिवसापासून खंडू पहाटे उठे आणि बैलांना रानांत चरायला घेऊन जाई. बैलांनी त्याला अनेक प्रकारे त्रास दिला. ते आपसात झुंजत, पळत कोठेतरी निघून जात किंवा कोणाच्या तरी शेतात शिरून नासधूस करीत. शेताचा मालक ओरडे, असा ते त्रास देत. त्यांना वठणीवर आणणे खंडूला फार त्रासाचे झाले.

तिकडे दगडू बागेत झाडांना पाणी लावण्याचे काम करू लागला. किती घागरी पाणी ओतले तरी झाडांना पाणी पुरेना. निदान अर्ध्या बागेला तरी पाणी घालावे, म्हणून दगडूने प्रयत्न केला, परंतु ते सुद्धा










शक्य झाले नाही. तो दमून गेला. घामाघूम झाला. त्याचे हात दुखू लागले. संध्याकाळ-पर्यंत विहिरीतून पाणीकाढून तो झाडांना घालत राहिला.

एकदां रात्री दोघे मित्र परस्परांशी आपापल्या कामाविषयी बोलू लागले.

खंडू म्हणाला—"माझं काम म्हणशील तर गड्या, अगदी सोपे आहे, बुवा. मी बैलांना चरायला सोडून झाडाखाली खूप झोप काढली. संध्याकाळी बैल स्वतःच चरून माझ्याजवळ येऊन उभे राहाले. त्यांच्या पावलांची चाहूल लागतांच माझी झोप मोडली व मी त्यांना घरी घेऊन आलो."

"[illegible] ओतले असेल नसेल, सर्व बाग पाण्याने भिजून गेली. दिवसभर खाटेवर पडून झोपा काढल्या." दगडूने थाप मारली.

"छान, तरमग उद्यां तू गंमत म्हणून बैलांना चरायला घेऊन जा, व मी बागेतले काम करतो." खंडू म्हणाला.

दगडूला फार आनंद झाला. म्हणाला—"मी तेच तुला म्हणणार होतो!"

"हो पण बरोबर एक खाट न्यायला विसरू नकोस, बरं का?" खंडूने दगडूला बजावून सांगितले.

दुसऱ्या दिवशी दोघांनी परस्परांच्या कामाची अदलाबदल केली. त्यांना पर-स्परांची लबाडी कळली.

परंतु खंडूला आणखी एक विचित्र गोष्ट कळली. बागेत एका आंब्याच्या झाडाला कित्येक घागरी पाणी घालीत राहाला तरी तळी भरत नव्हती. रात्री याचे गुपित काय हे पाहून घ्यायचे त्याने मनाशी ठरविले.

त्या दिवशी रात्री दोघे भेटले, परंतु आपापल्या कामाविषयी मात्र कोणी कोणाशी बोलला नाही. झोपल्यासारखे दोघे सोंग करून पडून राहिले. दोन प्रहर रात्र लोटल्यावर खंडू एक पहार घेऊन आंब्याच्या झाडापर्यंत गेला आणि मुळाजवळ खणू लागला. थोडे खणल्यावर पहार कशाला

[illegible] झाला.

लगेच खंडूने चारीबाजूला कोणी नाहीना, पाहिले. दगडू काळोखात शेजारीच उभा होता. "कायरे इतक्या रात्री खणतो आहेस?" दगडूने विचारले.

"या झाडाला पाणी बरोबर लागत नाही. झोप लागत नव्हती म्हणून आलो तळी ठीक करायला." खंडू म्हणाला.

" 'खणण' असा कसला आवाज झाला रे?" दगडूने हंसू आवरीत विचारले.

"असेल एखादा दगड, आणखी काय? चल, झोपू या, जाऊन!" खंडू म्हणाला.

दोघे परतले आणि झोपले. दगडूला झोप लागली की पुन्हां खणून पाहू असा विचार करून खंडू सुद्धा जमिनीवर पडला. परंतु त्यालाच छान झोप लागली.

खंडू घोरू लागल्यावर दगडू उठला आणि पहार घेऊन त्या आंब्याच्या झाडा-जवळ गेला. त्याने तळी खणून त्यांतून दोन तीन तांबे काढले. ते लौकर कोठे तरी लपवून ठेवायचे ठरवून तो शेजारच्या एका तळ्यात गेला. फार खोल नाही अशी जागा पाहून त्याने ते तांबे आत पुरून ठेवून दिले आणि काहीच घडले नाही असे दाखवून स्वस्थ पडून राहिला. त्याला झोप लागली.

खंडू पहाटे उठला आणि पहार घेऊन आंब्याच्या झाडाजवळ गेला. तेथे एकही तांब्या दिसला नाही. परत येऊन त्याने





दगडूच्या पायांकडे निरखून पाहिले. पायांना चिखल लागलेला होता व थोडेसे शेवाळही होते. आंब्याच्या तळीत सांपडलेल्या वस्तू दगडूने कोठेतरी लपवून ठेवल्या असल्या पाहिजेत हे त्याने ओळखले. तो सरळ त्या तळयाकडे गेला. त्या तळयात एका बाजूला बेडकांचा आवाज येत नव्हता. तेथे चांचपून पाहिल्यावर त्याला तांबे सांपडले. ते उचलून घेऊन तो सरळ आपल्या गावी निघाला.

दगडूची झोप थोडया वेळाने मोडली. शेजारी खंडू नव्हता. तो धावत तळयाकडे गेला आणि त्याने जेथे तांबे पुरून ठेवले होते तेथे चांचपून पाहिले परंतु हाताला

काही ... नाही ... आपल्या गावी गेला असणार असे वाटून तो त्या वाटेने पळत निघाला.

दगडू काही वेळ पळत राहाल्यावर त्याला थोडया अंतरावर खंडू तांबे घेऊन जात असलेला दिसला. तो मधल्या आड वाटेने खंडू जात होता त्याच वाटेवर खंडूच्याही पुढे धावत गेला आणि एका उंचवल्यावर चढून त्याने आपली एक नवी वहाण एका जागी टाकली आणि दुसरी शंभर पावला-वर नेऊन टाकली आणि स्वतः एका झुडपाआड लपून बसला.

थोडयाच वेळाने खंडू तांब्यांचं ओझं वाहून नेणें कठीण होत होते तरी कसाबसा त्या जागी आला. नवीन वहाण त्याच्या नजरेस पडली. परंतु ती एकच होती, म्हणून थोडा निराश झाला आणि पुढे चालू लागला. शंभर पावले चालून गेल्यावर त्या वाहाणेची जोडवहाण दिसली. त्याला मोह झाला. त्याने चारी बाजूला नजर फिरवून पाहिले. माणूस तर काय कीडमुंगीसुद्धा दिसली नाही. म्हणून निश्चित होऊन त्याने ते तांबे उतरून खाली ठेवले व तेथली वहाण उचलून घेऊन जोडवहाण मागे दिसली होती ती आणायला गेला.

त्या अवधीत दगडूने झाडाआडून येऊन तांबे उचलून खांद्यावर घेतले आणि

... पोचला.

खंडू नव्या वाहणांचा जोड घेऊन परतला तोपर्यंत तांबे नाहीसे झाले होते. ते काम दगडूचेच असले पाहिजे असे ठरवून तो झपाझप पावले उचलून दगडूच्या घरी आला.

खंडूने दगडूच्या घरात पाऊल ठेवतांच त्याला रडारड ऐकू आली. त्याने चौकशी केली की रडारड कशासाठी?

तेव्हां दगडूची बायको व मुले रडत दगडू मरण पावल्याचे सांगू लागली.

काही वेळ खंडूसुद्धा त्यांच्याबरोबर रडण्याचे सोंग करून म्हणाला—"दोघांचे परस्परांवर किती प्रेम होते. आतां दगडूची शेवटची इच्छा पूरी करण्या व्यतिरिक्त मी काय करू शकणार? माझ्या आधी तो मेला तर त्याने मला आपली शेवटची इच्छा सांगून ठेवली होती. ती अशी की तुरीची कापणी झाल्यावर जे खुंट उरतात त्यावरून त्याने आपला मृतदेह ओढून न्यावा असे सांगितले होते. त्याची ती शेवटची इच्छा आतां मी पुरी करावी म्हणतो!"

असे म्हणत खंडूने दगडूचा देह उचलून खांद्यावर घेतला व कोणी काही म्हटले तरी तिकडे दुर्लक्ष करून नुकतीच कापणी झालेल्या तुरीच्या शेताजवळ घेऊन गेला.

जमिनीत पुरलेल्या सुऱ्यांसारखे तुरीचे खुंट पाहून दगडूला खरोखरीच जीव गेल्या-सारखे झाले. आपण गप्प राहिलो तर खंडू नक्कीच आपल्याला या खुंटावरून फरफटत नेणार अशी भीती त्याला वाटली.

दगडू चटदिशी धडपडत खांद्यावरून उतरला व खंडूचे पाय धरून म्हणाला—"दादा! मला क्षमा कर! आपण चौर्यवृत्ती सोडून नीतीने पुढील आयुष्य चालवायचे ठरविले होते ना? मग ही चौर्यबुद्धी आणखी किती काळ ठेवायची? दोन हांडे आहेत आपण एकेक वांटून घेऊ आणि सुखाने राहू!"

दोन्ही तांबे दोघांनी वाटून घेतले व खूप श्रीमंत होऊन दोघांनी पुढील आयुष्य सुखाने चालविले.





# प्रश्नोत्तरे

**के. एस. आर. आंजनेयुलु, विजयवाडा**

प्र. : शंकराच्या डोक्यावर सदा सर्वदा अर्धा चंद्र असतो. पूर्णचंद्र कां नसतो?

उ. : शंकराच्या डोक्यावर असतो तो अर्धचंद्र ही नसतो. चवथीचा चंद्र असतो. चवथीचा चंद्र गणपतीचे प्रतीक आहे. शंकर आणि गणपती यांचे परस्परांशी जे नाते आहे ते तर आहेच, परंतु शंकराच्या रूपांत अनेक अराध्य देव असतात–वासुकी नाग, गंगा, गणपती इत्यादी. हे सर्व निराळे आराध्य देव ही आहेत. शंकराची अर्धांगी पार्वती (तो अर्धनारीश्वरही आहेच), आणि शंकराचे वाहन नंदी ही देखील स्वतंत्र दैवते आहेतच.

**अडपाल गोपाल रेड्डी, महम्मदापुरम्**

प्र. : पृथ्वीच्या दक्षिण गोलार्धात राहणाऱ्यांना ध्रुव नक्षत्र दिसते का? दिसत नसेल तर त्यांना रात्रीच्या वेळी दिशा कळायला नैसर्गिक उपाय काय?

उ. : भूमध्यरेषेच्या दक्षिणेकडे निवास करणाऱ्यांना ध्रुव नक्षत्र दिसत नाही. दक्षिणेकडील आकाशात ध्रुव नक्षत्र नसले तरी दक्षिण दिशा कळायला तेजस्वी नक्षत्रे अनेक असतात.

**जी. वीरभद्र राव, राजमंद्री**

प्र. : जादुगार जेजे प्रयोग करून दाखवितात ते सर्व हातचलाखीचे असतात हे माहीत असूनही त्यांचे ते प्रयोग खरे वाटून आपण भ्रमात पडतो. त्याचे कारण काय?

उ. : जादुगार आपल्या प्रयोगात आपल्या हातचलाखीने खोट्या गोष्टींतही खरेपणाने जे प्रत्यक्ष दर्शन घडवू शकतो ते फार आकर्षक असते. नाटके व सिनेमे हे खोटे असतात हे माहीत असूनही आपण पाहतोंच ना?

**जोन्नलगड्डा राजकुमारी, भुवनेश्वर**

प्र. : नागसापाला दुसरा नागसाप चावला तर तो मरतो का?



# अघटित अनपेक्षित

[७९]

सूड उगविणाऱ्या माकडाची गोष्ट ऐकून अत्यंतलोभी म्हणाला–"तू म्हणतोस ते खरे आहे. लोभामोहाला बळी पडणाऱ्याला कष्ट सहन करावेच लागतात, त्याची मान खालीच होते. त्यांतून सुटका नाही. परंतु ही गोष्ट ठेच लागल्याशिवाय त्यांच्या लक्षात येत नाही.

"मित्रा, तसं म्हणू नकोस. मी तुला पूर्वीच सावध केले होते. तरी तू गाणाऱ्या गाढवासारखे मी म्हटले त्या गोष्टीकडे लक्षच दिले नाहीस." असे सांगून अतिलोभी गाणाऱ्या गाढवाची गोष्ट सांगू लागला.

## गाणारे गाढव

कोणे एक काळी उद्धत नावाचे एक गाढव होते. ते दिवसभर त्याचा मालक एक परीट होता त्याचे ओझे वाहण्याचे काम करी आणि रात्रीच्या वेळी स्वेच्छेने त्याला वाटेल तिकडे हिंडे. ते गाढव असे फिरत असतां शेतात शिरले व तेथे त्याची एका कोल्ह्याशी मैत्री झाली. दोघे रात्रीच्या वेळी दररोज एका काकडीच्या मळ्यात शिरत आणि रात्रभर मनसोक्त काकड्या खाऊन उजाडल्यावर आपापल्या घरी जात.

एकदां रात्री गाढवाने खूप काकड्या खाल्या आणि त्यांला त्यांचा मद चढला. त्या धुंदीत ते मोठ्याने ओरडून आपल्या मित्राला बोलवू लागले–"अरे भाच्या! आज चांदणे काय छान पडलं आहे रे! म्हणून मला गावेसे वाटू लागले आहे. सांग बरं मी कोणता राग म्हणू?"

कोल्हा घाबरून म्हणाला–"अरे मामा! आपण करतो आहों ती चोरी आहे रे! चोरी जारी गुप्तपणे करावयाची असते.



गोंगाट करून भागत नाही. पडसं खोकला असणाऱ्यांनी व झोपेत बडबडणाऱ्यांनी चोरी करतांच कामा नये. शिवाय तुझं गाणंही तसं गोड ऐकण्यालायक नसणार. शंखनाद केल्यासारखं दूरवर ऐकू येईल. ते ऐकल्यावर मळेवाल्याची झोप मोडेल व तो दांडकं घेऊन येईल की! म्हणून मी सांगतो ते ऐक व आपलं गाणं या वेळी तरी सुरू करू नकोस व खातां येतील तेवढ्या काकड्या खाऊन घे!"

गाढवाला ते पटले नाही, म्हणाले– "तू आहेस रानटी जातीचा प्राणी! तुला संगीताचा स्वाद काय येणार? तुझ्या बोलण्यावरूनच ही गोष्ट स्पष्ट झाली आहे. आपल्या आप्तबंधूंच्या बरोबर राहून जे संगीत श्रवण करतात तेच खरे भाग्यवान! ही सामान्य गोष्ट सुद्धा तुला कळत नाही."

"मामा! तू म्हणतोस ते खरे असू शकेल. मी 'ना' म्हणत नाही. परंतु तुला संगीत येत नाही! तुला फक्त रेंकता येते. आपलं काम ज्यामुळे बिघडेल ते करण्याची गरजच काय?" कोल्ह्याने शंका केली.

"तू शुद्ध मूर्ख आहेस! मला गाता येत नाही, हे तुला कोणी सांगितलं रे? हे बघ, स्वर सात असतात, स्थायी तीन, मूर्च्छा एकवीस आणि राग छत्तीस असतात. भाव चाळीस असतात. भरत मुनीने जे गायनशास्त्र लिहून ठेवले आहे, त्यात १८५ अध्याय आहेत. त्यांच्या म्हणण्याप्रमाणे वेद सोडून संगीतशास्त्राहून मोठी विद्या नाही. आपले स्नायू शिजवून व त्यांच्या तारा करून संगीतशास्त्राची रावणाने निर्मिती केली आणि शंकराला प्रसन्न केले. म्हणून लाडक्या भाच्या, मला संगीतशास्त्राची माहिती नाही, असं कसं रे म्हणालास? गाणं म्हणूं नकोस, असं सांगून मला निरुत्साहित कां केलेस?" गाढव म्हणाले.

"मामा, तू गाण्याचा हट्टच धरलास तर मी एखाद्या झुडपाआड जाऊन लपतो. तेथून मळ्याचा पाहारेकरी येतो आहे का,

कर." कोल्हा तेथून पाय काढीत म्हणाला.

त्यानंतर गाढवाचे गायन सुरू झाले. गाढवाचे भयंकर रेंकणे ऐकून मळेवाला चिडून दातओठ चावीत एक मोठा सोटा घेऊन आला आणि गाढवाला खूप बडवू लागला. गाढवाचा फक्त जीवच तेवढा गेला नाही, जागच्या जागी बेशुद्ध होऊन पडले.

मळेवाल्याने गाढवाच्या गळ्यात एक मोठा दगड बांधला व काकड्या खायला आणखी कोणकोणती जनावरे येतात का, वाट पहात त्यांना पकडण्याचे ठरवून घेता-तच पडून राहिला आणि झोपी गेला.

गाढवाला लौकरच शुद्ध आली व ते त्या दगडासकट उठले आणि कुंपणावरून उडी मारून पळून गेले.

कोल्हा त्याला पाहून दुरूनच म्हणाला– "मामा! फार चांगलं गाणं म्हटलंस. मी तुला नको म्हटलं होतं, पण तू तेव्हां ऐकलं नाहीस. तुझ्या गाण्याहून तुझ्या गळ्यात जे रत्न आहे, ते मोठे आहे."

गाणाऱ्या गाढवाची गोष्ट ऐकून अत्यंत लोभी म्हणाला–"बरोबर, आतां मला कळले की स्वतः विचार करण्याची शक्ती खुंटल्यावर मित्र सांगेल ते तरी ऐकत जावे. नाही तर कष्टच सोसावे लागतात. परंतु माझ्या सारख्याला तेवढे ज्ञानही नसते.



म्हणून मिळालं तेसुद्धा घालवून बसावे लागते. ही गोष्ट 'हवेतल्या हवेल्या' या गोष्टीवरून आणखी जास्त चांगली कळते." असे सांगून ती गोष्ट सांगू लागला.

## हवेतल्या हवेल्या

एका शहरात स्वभावकृपण नावाचा एक ब्राह्मण रहात असे. एकदा काही कारणावरून त्याला कोणीतरी जेवायला बोलाविले आणि पोटभर जेवायला वाढून एक मडके भरून सातूचे पीठ त्याला दिले. ऐन दुपारी तो ब्राह्मण घरी निघाला. परंतु त्याचे घर दूर होते व त्याला थोडी विश्रांती घ्यावीशी वाटली. म्हणून त्याने सातूच्या पिठाचे मडके हाताला आली

अशा एका फांदीला बांधून ठेवले आणि झाडाच्या सावलीत विश्रांती घेत पडून राहिला. तेवढ्यात गार वारा सुटला आणि तो पेंगू लागला. त्या गुंगीत तो 'हवेतल्या हवेल्या' बांधू लागला.

"दुष्काळ आला तर मी म्हणतो तसं कां होणार नाही? हे मडके भरून जे सातूचे पीठ आहे तें शंभर रुपयाला सहजी जाईल. तेवढ्या पैशात दोन बकऱ्या विकत घेता येतील. दर सहा महिन्यांनी त्या एकेकदां वीत जातील. लौकरच बकऱ्यांचा एक छान कळप तयार होईल. कळपातल्या काही बकऱ्या विकून गाई विकत घेईन. गाई दर वर्षी वितील. काही गाई व काही वासरे विकून म्हशी विकत घेईन. काही दिवसांनी गाईंच्या सारख्या पुष्कळ म्हशी होतील. काही म्हशी विकून काही घोड्या विकत घेईन. त्यांना शिंगरे होऊन काही दिवसांनी घोड्यांचा सुद्धा एक कळपच तयार होईल. घोडे विकून जी सोन्याची नाणी मिळतील ती खर्च करून मी एक सुंदर हवेली बांधीन. त्या घरात चारी बाजूला खोल्या असतील; एक छान चौसोपी वाडा तयार होईल. माझं ते वैभव पाहून कोणीतरी आपली सुंदर मुलगी मला देऊन कन्यादानाचे पुण्य मिळवील. दहा महिन्यांनी मला ती बायको एक पुत्ररत्न देईल. त्याचे नाव मी सोमशर्मा असे ठेवीन. तो रांगू लागला की मी तबेल्याच्या पलीकडच्या बाजूला वाचीत बसेन. मला पाहून माझा मुलगा माझ्या बायकोच्या कडेवरून उतरून माझ्याकडे रांगत येईल. वाटेत तो घोड्याच्या बाजूने येईल. तेव्हां मी ओरडेन—"अग ए, मुलाला उचल." ती कामात निमग्न असल्या कारणाने माझ्या बोलण्याकडे तिचे लक्षच जाणार नाही. मग मी उठून रागाने तिला काठी घेऊन अशी मारीन की......!"

गुंगीत असे म्हणत त्या ब्राह्मणाने आपली काठी उचलून अशी हाणली की मडके फुटले व सातूचे पीठ त्या ब्राह्मणाच्या अंगावर पडले.





# भल्लूक मांत्रिक

[ १९ ]

[राजा जितकेतूने जाहीर केले की मर्कटाचा मंत्रदंड जो कोणी आणून देईल त्याला आपली दत्तक कन्या देऊन वर अर्धे राज्य देईन. मायावी मर्कटाला तटावर आलेला पाहून रानटी शिकाऱ्याने बाण मारला. मर्कटाने रागाने तो बाण मध्येच धरून कालीवर्मा व भल्लूक मांत्रिक होते त्या दिशेने फेकला. पुढे—]

बाण लागण्यापूर्वी मायावी मर्कटाने "माझा मंत्रदंड कोठे आहे," असे ओरडून विचारले होते, ते भल्लूक मांत्रिकाबरोबर इतर सर्वांनी ऐकले. भल्लूक मांत्रिकाला तर फारच आश्चर्य वाटले व त्याने म्हटले—"कालीवर्मा! ऐकलंस का रे तू, त्या मर्कटाचं ओरडणे? तुला त्यावरून काय समजले? त्याने माझ्याकडून चोरून नेलेला मंत्रदंड कोठेतरी टाकून तरी दिला असावा किंवा कोणी त्याच्या जवळून चोरून तरी नेला असावा. होय की नाही?"

कालीवर्मा क्षणभरच थक्क होऊन विचार करीत उभा राहिला. नंतर म्हणाला—गुरुवर्य! बरोबर, तुम्ही म्हणतां तसेच असले पाहिजे. या माकडाकडून मंत्रदंड कोणी नेला असावा, हे कळायचे कसे? शिवाय आपण राजधानीत शिरायचं झालं तर ते कामही तितकं सोपं दिसत नाही. या राजाने



किल्लयाचे दरवाजे लोखंडी केले आहेत. दुर्मुख राजाचे दरवाजे लाकडी असल्यामुळे आपण त्यांना आग लावून आत शिरलो."

भल्लूक मांत्रिक तलवार म्यानेत ठेवीत म्हणाला—"आज रात्रभर आपण किल्लया-बाहेरच तंबू टाकून राहू या. किल्लयाची दारे कशी तोडायची हे उद्यां आपण पाहू या. विचार करायला पुष्कळ वेळ आहे."

ते ऐकून उग्रदंड राक्षसाला फार राग आला. तो दांतओठ चावून म्हणाला—"माझ्या या दगडी गदेनें दार फोडतां आले नाही तर भिंत फोडता येते का पाहीन." असे म्हणत त्याने धावत जाऊन गदेने तटाच्या भिंतीवर आघात केला. त्या

[illegible] एक मोठा दगड फुटला आणि त्याचे दोनतीन तुकडे खाली पडले. लगेच दुसऱ्या क्षणाला तटावरच्या सैनिकांनी उग्रदंडावर बाणांचा वर्षाव केला.

भल्लूक मांत्रिकाने उग्रदंडाला मागे यायला सावध करून बोलाविले आणि कालीवर्माला म्हणाला—"मर्कटाजवळून माझा मंत्रदंड आणखी कोणी मांत्रिकाने तर चोरून नेला नसेल? मला अशी शंका वाटते आहे."

भल्लूक मांत्रिक इकडे असे म्हणत होता त्याच वेळी तिकडे एक गोष्ट घडत होती. राजवाड्यासमोर अस्वलाचा खेळ करणाऱ्याने मर्कटाला पकडले त्या वेळी मर्कटाच्या हातातून निसटून मंत्रदंड खाली पडला, तो चटदिशी उचलून दोघांपैकी एका बैराग्याने तो आपल्या झोळीत लपवून ठेवला आणि दोघे तरुण बैरागी राजधानी बाहेरच्या एका तळ्याच्या काठी एका वडाच्या झाडा-खाली बसून मंत्र जाप करीत बसलेल्या आपल्या गुरूकडे जाऊ लागले होते.

त्या बैरागी तरुणांपैकी मोठ्याने धाकट्याच्या झोळीतून मंत्रदंड घेऊन म्हटले—"काय रे, छोटू हा मंत्रदंड गुरुजींना देण्यापूर्वी या मंत्रदंडाचा प्रताप किती आहे. हे पाहू या का?"

धाकट्या बैराग्याने होकारार्थी मान हलविली. मोठ्या बैराग्याने मंत्रदंड उचलून

[illegible] खज-न्याचे दार उघड!" असे म्हणत जमिनीवर जोराने आपटला.

तेव्हां जो मोठा आवाज झाला तो ऐकून गुरू बैराग्याने डोळे न उघडतां—"काय रे, भैरव बैराग्यासमोर मंत्राचा उच्चार चूक करणारा तो कोण मूर्ख आहे रे? त्याला मी आतांच्या आतां भस्म करून टाकतो!" असे म्हणत त्याने पितळी व चांदीची फुले मढवलेली कुबडी उचलली.

गुरु म्हणाला ते ऐकून भयकंपित झालेले दोघे शिष्य, मंत्रदंड जमिनीवर आदळला होता त्या जागी जमिनीला एक भोक पडले व त्यातून एक झरा 'सुर्र' आवाज करीत बाहेर आला तो थक्क होऊन पाहू लागले, गुरू बैरागी रागाने दांतओठ चावून डोळे उघडणार इतक्यात त्याच्या डोक्यावर पावसाच्या झडीसारखे झऱ्याचे पाणी पडू लागले.

भैरव बैरागी म्हणाला—"गुरू प्रभो!" असे म्हणत दचकून उभा राहिला व म्हणाला—"ढगांचा गडगडाट नाही की विजा चमकल्या नाहीत आणि हा पाऊस कसा काय?"

त्याचवेळी त्याने आपल्या दोघां शिष्यांना पाहिले व म्हणाला—"काय रे जमिनीतून आकाशाकडे हा पाण्याचा झरा उडतो आहे, हे काय विचित्र घडते आहे?"

ते ऐकून दोघां शिष्यांना थोडा धीर आला व म्हणाले—"भैरव गुरुवर्य! आम्ही





आपल्या मंत्रशक्तीने हा पाण्याचा झरा जमिनीतून वर आणला. आता आमचे शिक्षण पूर्ण झालं, नाही का?''

घडलेली गोष्ट न कळल्यामुळे चकित होऊन भैरव बैरागी आपल्या शिष्यांजवळ जाऊ लागला आणि आपल्या थोरल्या शिष्याच्या हातात मंत्रदंड पाहून आणखी आश्चर्यचकित होऊन म्हणाला–''काय रे ते? मंत्रदंडासारखे दिसते आहे!''

''गुरुवर्य, मंत्रदंडासारखे नव्हे, मंत्रदंडच आहे हा! तीन शब्दांचा मंत्र म्हणून खजिन्याचे दार उघड म्हणताच पाताळ गंगेला हा वर घेऊन आला.'' मोठा शिष्य म्हणाला.

रव बैरागी शिष्याच्या हातातून मंत्रदंड घेऊन इकडून तिकडे व तिकडून इकडे हलवून पाहात म्हणाला–''हा कोणत्यातरी मांत्रिकाच्या हातात बरेच दिवस असल्यामुळे गुळगुळीत झाला आहे. हा तुमच्या हातात कसा काय आला रे? चोरून आणलात का? तो मांत्रिक कोठे आहे?'' त्याने विचारले.

मोठ्या शिष्याने मोठ्याने बोलू नकोस असे खुणेने धाकट्या शिष्याला सांगितले आणि चटदिशी गुरुच्या हातातला मंत्रदंड हिसकावून घेऊन म्हणाला–''गुरुवर्य! पहिल्याने हा झरा थांबविला पाहिजे. नाहीतर सर्व राजधानी-भर पाणी होऊन जाईल.'' असे सांगून मंत्रदंड उचलून ''खजिना बंद कर!'' असे म्हणत पाणी येत होते त्या जागेवर मंत्र-दंडाने ठोकले.

या खेपेस मंत्रदंडाचा मार बसताच चिरा पडून जमीन दुभंगली आणि एक माणूस शिरू शकेल एवढे भोक पडले. ते पाहून भैरव बैरागी उड्या मारून म्हणाला–''अरे शिष्योपष्यांनो! कसा का मिळेना, अद्‌भुत शक्ती असलेला हा मंत्रदंड तुम्ही मला एक भेट म्हणून आणलात. तुमच्या या गुरु-भक्तीबद्दल मी तुमची पाठ थोपटतो. झरा बंद होऊन खजिन्याचे दार उघडल्यासारखं दिसते आहे. आत उतरून आत कसला कसला साठा आहे, पहा.''

धाकट्या शिष्याने संशयी नजरेने मंत्रदंडाकडे पाहिले व म्हणाला–''भैरव गुरुवर्य! या मंत्रदंडातल्या अपूर्व शक्तींवर विसंबून आपण स्वतःच कोणत्या तरी धोक्यात सापडणार आहो, असे मला वाटते आहे. मी खजिन्याचे दार उघड म्हटले तर एक झरा जमिनीतून स्फोट होऊन वर आला, हे लक्षात आहे का? यावरून याच्या मदतीने जमिनीतला ठेवा मिळेलसे मला नाही वाटत.''

शिष्याने तसे म्हटल्यावर भैरव बैराग्याला सुद्धा तशीच शंका मंत्रदंडाविषयी वाटली. मंत्र इच्छिलेले सोडून आणखी दुसरेच काहीतरी करतो. तसे करीत गेला तर या मंत्रदंडामुळे अनेक प्रकारच्या धोक्यात सापडण्याची शक्यता आहे.

बैराग्याने असा विचार करीत मोठ्या शिष्याकडून मंत्रदंड हातात घेऊन त्याच्या-कडे आणखी खोल दृष्टीने पाहिले, तेव्हां मोठा शिष्य हसून म्हणाला–''गुरुवर्य, या मंत्रदंडात कोणकोणत्या प्रकारच्या शक्ती आहेत याची आपल्याला काय गरज? परंतु एक काम करू या का? आम्हांला हा मंत्रदंड मांत्रिक शक्ती असलेल्या एका माकडा-कडून मिळाला आहे. ते माकड या वेळी जितकेतू महाराजांचे प्रधान मंत्री होऊन



आणून देईल त्याला अर्धे राज्य देऊन आपल्या मुलीशी लग्न करून देईन, असे जितकेतू महाराजांनी जाहीर केले आहे.''

अर्धराज्य आणि राज्यकन्या ऐकतांच भैरव बैरागी म्हणाला–''गुरुप्रभो!'' आणि मोठ्याने कावून ओरडत पुढे म्हणाला–''अरे शिष्यांनो! ही एवढी महत्वाची गोष्ट मला इतका वेळ न सांगता माझ्या-पासून लपवून ठेवली होतीत, म्हणावयाची? मी अर्धे राज्य घेईन व तुमच्यापैकी एकाला राजकन्या मिळेल, असे समजा. परंतु राजाच्या बोलण्यावर तेवढा विश्वास करावयाचा नसतो. तो जितकेतू आपल्या



डोकी उडविणार नाही कशावरून?" असे म्हणत तो मान वाकवून उभा राहण्याच्या प्रयत्नात वडाच्या झाडाच्या बुंधावर पडला.

गुरूने ते म्हटल्यावर दोघां शिष्यांना वाटले की गुरु म्हणतो आहे ते बरोबर आहे. राजाच्या बोलण्यावर विश्वास करण्यात काही अर्थ नाही. धाकटा जमिनीला जेथे भोंक पडले होते त्यात वाकून पहात मोठ्याचा हात धरून आत उतरला आणि लगेच म्हणाला—"भैरव गुरो! इकडे पहा, पायऱ्या दिसत आहेत आणि आत भुयार दिसते आहे. मंत्रदंडाने आपल्यासाठी खजिन्याचे दारच उघडलं आहे."

भैरव बैरागी उत्साहाने आपल्या दोघा शिष्यांजवळ आला व म्हणाला—"अरे शिष्योपशिष्यांनो! आपल्या अदृष्टवशात ठेवा सापडलाच तर आपण तेवढ्यावर मनाचे समाधान मानून घ्यायचे. हा मंत्रदंड राजाला नेऊन द्यायचा की नाही ते त्यानंतर ठरवू." असे म्हणत तो शिष्याच्या पाठीमागून भुयाराच्या वाटेने उतरू लागला आणि व राहिलेल्या शिष्यालासुद्धा उतरून ये, म्हणाला.

गुरु शिष्य मिळून आणखी काही पायऱ्या उतरून गेल्यावर त्यांना तेथे पाणीच पाणी दिसले. तरी धीर करून ते गुडघाभर पाण्यापर्यंत उतरून गेलेच. त्यांना भुयाराच्या वाटेवर थोडे चालून गेल्यावर थोड्या अंतरावर उजेड दिसला. भैरव बैराग्याला परमानंद झाला व तो शिष्यांना म्हणाला—"अरे, तो उजेड म्हणजे आणखी काही नसून तेथे हिऱ्यामाणकांचा जो साठा आहे, त्याचा लखलखाट आहे. तरी तेथे त्याच्या रक्षणार्थ एखादा यक्ष बसला असल्यास आपण काय करायचे?"

"ते आपण गुरुवर्यांनीच सांगावे!" थोरला शिष्य म्हणाला.

धाकटा शिष्य त्याची थट्टा उडवीत हसून म्हणाला—"अरे थोरल्या शिष्या! तळ्या गुरुवर्यांनी शिकविलेले सर्व मंत्र तोंड-

[illegible] झाले, परंतु [illegible]
तुझ्या डोक्यात शिरले नाही. आपल्याला हा ठेवा ज्या मंत्रदंडाने दाखविला त्याच्यात कित्येक अद्भुत शक्ती भरलेल्या आहेत! या निधीवर पाहारा ठेवणाऱ्या यक्षाच्या अंगाला मंत्रदंडाने नुसता स्पर्श केला की तो फटाक्यासारखा उडून भस्म होऊन जाईल एवढे सुद्धा तुला कळले नाही!"

"काय पण बोललास उपशिष्या! माझ्या मंत्रोपदेशाचा फायदा तुलाच झाला, बघ. आता काही बोलल्याशिवाय पुढे पाऊल उचला." भैरव बैरागी म्हणाला. त्याने तो उजेड दिसत होता त्या बाजूला नेम धरल्यासारखा मंत्रदंड हातात धरला.

इतक्यात त्यांना वरची जमीन हादरल्यासारखी व त्या पाठोपाठ हत्तींच्या 'चीं-' 'कारा' सारखा आवाज ऐकू आला. सर्व भयकंपित होऊन जागच्या जागी थबकले. सर्वात प्रथम भैरव बैरागी म्हणाला—"काय रे, आपल्या वडाच्या झाडाखाली जंगली हत्ती किंवा हत्तींचं सैन्य आल्यासारखं वाटतं आहे. आपल्या या गुप्त भुयारावर त्यांची नजर पडली व ते आत आले तर काय करायचे?"

"काय करायचे, त्याचा गुरुवर्यांनीच विचार करावा! आमच्यासारख्या पामरांना काय कळणार?" थोरला शिष्य म्हणाला.



धाकटा शिष्य खदखदां हसत म्हणाला—"जंगली हत्तींना किंवा हत्तींच्या सैन्याला सरोवराच्या काठावरचे खाचखळगे पाहण्याशिवाय दुसरे काम नसते असे वाटलं का तुम्हांला? समोर दिसणाऱ्या निधीतील रत्नराशींशिवाय आणखी कोणत्याही गोष्टीचा विचार मनात येऊ देऊ नका."

त्याचं बोलणं संपण्यापूर्वीच वरच्या जमिनीचे एक मोठे ढेकूळ त्यांच्या समोर धप्पदिशी खाली पडले. गुरुशिष्य सर्वच दचकून थोडे ओरडले व भुयारात आणखी पुढे थोडे धावतच गेले.

त्या भुयाराच्या मार्गावर वरच्या बाजूला [illegible]

करण्यासाठी चांगल्या जागेच्या शोधार्थ चांडाळ भल्लूक व जंगली शिकारी आपल्या हत्तीवर आले असतां अकस्मात हत्तीचा पाय जमिनीत धसला व तो 'चींकार' करून पुढे पडला. परंतु दोघे चटदिशी हत्तीवरू खाली उडी मारून आले. लगेच हत्ती जमिनीवर सोंड ठेवून तिच्या आधारे उभा राहिला.

चांडाळ भल्लूकाने एकदां चारी बाजूला नजर फिरवून पाहिले व रानटी शिकाऱ्याला म्हणाला–"कालीवर्मा व भल्लूक मांत्रिक दोघांनीही जागा पाहिली तर बरे होईल. येथे भरपूर पाणी आहे. आपण हल्ला करणार आहो तो जितकेतू राजाचा किल्लासुद्धा जवळच आहे. त्या मायावी मर्कटाने किती मंत्र शिकले असले तरी आपल्या स्वभावाप्रमाणे या वडाच्या झाडाकडे ते आले तर त्याला सहजी पकडतां येईल व भल्लूक मांत्रिकाचा मंत्रदंड त्याच्या हातातून काढून घेता येईल."

रानटी शिकाऱ्याला चांडाळ भल्लूक म्हणाला ते जणुंकाही ऐकूच आले नाही. तो हत्तीच्या पायाला दुखापात तर झाली नाही ना, हे कळावे म्हणून हत्तीला पुढेमागे चालवून पहात होता. हत्तीला लंगडल्याशिवाय चालत असलेला पाहून तो ओरडला–"चांडाळ भल्लूक मालक! आपल्या वाहनाच्या पायाला कसली ही दुखापत झालेली नाही. आपलं नशीब बलवतर आहे!"

"त्या पाठोपाठ वडाच्या झाडावरच्या फांदीवरून एक रानटी माणूस खाली उडी मारून म्हणाला–"लबाड बैराग्यांना गिळणाऱ्या भुयाराच्या भोकाच्या बाजूला तुमचा हत्ती गेला नाही. तुमचं नशीब समजा. नाही तर त्या बैराग्यांबरोबर तुम्हांला तुमच्या हत्तीबरोबर त्या भुयाराने गिळले असते."

चांडाळ भल्लूक ओरडला–"शिरीषवन भैरवा!" आणि आपला परशु उचलून ओरडला–"कोण रे तू? मायावी मर्कटाचा शिष्य आहेस का?" आणि त्या रानटी माकसाकडे जाऊ लागला. (क्रमशः)





# असिद्ध आरोप

विक्रमादित्याने आपला हट्ट सोडला नाही. तो झाडाजवळ गेला. प्रेत खांद्यावर काढून घेतले आणि नेहमीप्रमाणे मौन होऊन स्मशानाच्या दिशेने चालू लागला. तेव्हां प्रेतात बसलेला वेताळ त्याला म्हणाला–"राजा, तू कोणत्या नीतिनियमाने स्वतःला बांधून घेऊन इतके कष्ट सहन करतो आहेस हे मला कळत नाही. अरे, या जगात नीती व इमान यांना सदा जयच मिळतो आणि अनीति व बेइमानी यांचा नेहमी पराभवच होतो, असे सांगतां येईल का? याचे एक उदाहरण म्हणून मी तुला गिरिधर नावाच्या माणसाची गोष्ट सांगतो. लक्ष देऊन ऐक." असे सांगून वेताळ गोष्ट सांगू लागला.

फार पूर्वी हरिप्रसाद हा तीन गावांचा एक इनामदार होता. इनामगावांची सर्व



कामे गिरिधर नावाचा एक कर्तबगार माणूस पहात असे. तो देईल त्या प्रत्येक सल्लयाप्रमाणे इनामदार डोळे मिटून वागे.

त्या तिन्ही गावात कोणाला कोणत्याही गोष्टीची गरज असली की गिरिधरला एक नमस्कार करावा लागे व काम होऊन जाई. हळूहळू कामे वाढू लागली व त्याबरोबर नमस्कार करणाऱ्यांची संख्या सुद्धा वाढू लागली. दोघांना एकाच तऱ्हेच्या मदतीची गरज भासली की त्या दोघांमध्ये चढाओढ होई. पूर्वी नमस्कारावर भागे, पण चढाओढच लागल्यावर नमस्काराबरोबर करंड्या पण येऊ लागल्या. अर्थातच फक्त नमस्कार करणाऱ्यांकडे गिरिधर दुर्लक्ष करी व फळांच्या करंड्या आणून देणाऱ्यांच्या कामात जास्त लक्ष घाली.

कामे करवून घेणाऱ्यात चढाओढ वाढतच गेली. फळांच्या करंड्यांवर रुपयांच्या थैल्या बसून येऊ लागल्या. मागितल्याशिवाय लक्ष्मी घरी चालून येत असलेली पाहून तिला पाठमोरी जायला सांगणे गिरिधरला रास्त वाटले नाही. देवळातल्या पुजाऱ्याच्या जागी असो की शाळा मास्तरच्या पदावर असो पैशाची थैली आणणारालाच ती जागा मिळू लागली. हळूहळू गिरिधरच्या बायकोच्या अंगावर दागिन्यांचे ओझे इतके वाढले की, फार कष्टाने तिचे अंग हले. घरभर बहुमूल्य सामानाची गर्दी झाली.

परिणाम असा झाला की हरिप्रसादच्या इनामदारीतल्या गावात केवळ योग्यतेवर किंवा अनुभवावर कोणाला नोकरी मिळणे कठीण झाले. लांच देऊ शकणाऱ्यालाच नोकरी मिळते, हा नियमच झाला.

शेषगिरी नावाच्या एका माणसाला या गोष्टीची स्वानुभवाने खात्री झाली. तो अगदी गरीब होता. वार लावून घेऊन त्याने कसाबसा विद्याभ्यास पुरा केला होता. तो अत्यंत बुद्धिवान होता. त्याने गिरिधरला अनेक नमस्कार केले. परंतु एक करंडीभर फळे मात्र देऊ शकला नाही. [illegible] कोणताच नोकरी [illegible] नाही. त्याच्या नमस्कारांचा एकही बाण गिरिधरच्या अंगाला कोठेही लागला नाही. शेषगिरीच्या अंगाचा जळफळाट उडाला.

तो इनामदाराकडे गेला व म्हणाला— "आपल्या इनामदारीतले सर्व व्यवहार किती बिघडले आहेत, आपल्याला कल्पना नसेल. लांच दिली की कोणत्याही मूर्खाला नोकरी मिळते. सुशिक्षित व बुद्धिमान निरुपयोगी सिद्ध होतात." या शब्दात त्याने इनामदाराकडे गाऱ्हाणे नेले.

इनामदार ते ऐकून थक्कच झाला. गिरिधरवर त्याचा अपार विश्वास होता. कारण त्याने गरिबांची कीव करून इनामदाराकडून त्यांना पडित जमीन फुकट वाटून दिली होती. इतक्या वर्षांत गिरिधरच्या विरुद्ध एकही फिर्याद आली नव्हती.

शेषगिरी म्हणाला ते खरे न वाटल्यामुळे इनामदार म्हणाला—"तू म्हणतोस ते खरे झाले तर मी गिरिधरला कामावरून कमी करीन."

नंतर इनामदाराने एका निरक्षर ब्राह्मणाला बोलावून कोणत्याशा गावात नवीन देऊळ बांधले असल्याचे सांगून त्याला शंभर रुपयाची एक पिशवी दिली व म्हणाला— "ही पिशवी गिरिधरला देऊन त्या देवळात पुजारी नेमायला विनंती कर." तो गेल्यावर पुजेची चांगली माहिती असलेल्या दुसऱ्या एका ब्राह्मणाला बोलावून इनामदार म्हणाला—"तू गिरिधरकडे जाऊन कोण-





त्याशा देवळात नवीन पुजारी नेमणार आहात ना, असे विचारून त्या जागेवर नेमायला विनंती कर." तो ब्राह्मणही गेला.

दोघे जवळ जवळ एकाच वेळी गिरिधरकडे गेले. अशिक्षित ब्राह्मण पैशाची पिशवी धरून बसला होता. दुसरा ब्राह्मण गेला तो गिरिधरचा बालमित्र असल्या कारणाने गिरिधर त्याच्याशी इकडच्या तिकडच्या बऱ्याच गप्पा मारून नंतर येण्याचे कारण कळल्यावर त्याला म्हणाला— "हे देऊळ आपल्या इनामदारसाहेबांनी बांधले आहे. या देवळात तुझ्यासारख्या माहितगाराला पुजारी म्हणून नेमायला त्यांना हरकत असण्याचे कारणच काय?"

नंतर त्या अशिक्षित ब्राह्मणाला येण्याचे कारण विचारून गिरिधर म्हणाला— "तुला लिहितां वाचतांही येत नाही आणि तुला पुजाऱ्याचे काम कोठून मिळणार?"

गिरिधरने आपल्या बालमित्राला पुजाऱ्याच्या पदावर नेमायला शिफारस केल्यावर इनामदार शेषगिरीला बोलावून म्हणाला—"मी गिरिधरची परीक्षा घेतली. तो लांचखाऊ असल्याचे सिद्ध झाले नाही."

शेषगिरी चिडून इनामदाराला म्हणाला— "या एका परीक्षेवरून भागणार नाही. आणखी एका परीक्षेची गरज आहे. त्यांच्या बायकोच्या अंगावरचे दागिने पहा! उत्तमोत्तम सामानाने भरलेले त्यांचे घर पहा. इतके सामान त्यांना कसे विकत घेता, हे तुम्ही प्रत्यक्ष जाऊन पहा."

इनामदाराने इनामी गावांची पाहाणी करण्याचे मिश काढून पूर्वी कळविल्याशिवाय गिरिधरच्या घरी अकस्मात जाऊन पहायचे ठरविले.

परंतु तो जाणार होता त्याच्या दोनच दिवस आधी गिरिधरच्या बायकोचा भाऊ आला व म्हणाला—"अहो, तात्या आमच्या गावात एक चांगले शेत विकायला निघाले आहे. विकत घ्यावे म्हटलं तर माझ्या जवळ पैसे नाहीत. तुम्ही तरी घ्या ना!"

गिरिधर [illegible] बायकोच्या अंगावरचे सर्व दागिने काढून द्यायला तिला सांगून मेहुण्याला म्हणाला— "हे दागिने गहाण ठेवून तू कर्ज घे आणि शेत विकत घे. नंतर शेतात मिळकत होईलच व हळूहळू दागिने सोडवून घेता येतील."

त्याच सुमारास शेजारच्या गावी एकाकडे लग्नकार्य होते. त्यांनी गिरिधरकडे येऊन त्यांना हवे असलेले सर्व सामान गिरिधरकडून मागून नेले.

अशा परिस्थितीत गिरिधरच्या घरी अकस्मात इनामदार आले. इनामदारांना आलेले पाहून गिरिधर गोंधळल्यासारखा होऊन म्हणाला—"अहो, आपण आलात, आपल्याला बसायला द्यायला आमच्या घरी एक खुर्चीसुद्धा नाही." असे म्हणत एक सतरंजी आणून गिरिधरने अंथरली आणि तिच्यावर एक तिपाई इनामदारांना बसायला आणून ठेवली.

गिरिधरची बायको म्हणाली—"आपल्याला पाणी प्यायला द्यायला एकादा चांदीचा ग्लाससुद्धां नाही आमच्याकडे." असे म्हणत एका कांशाच्या पेल्यात दूध घेऊन आली. इनामदाराने तिच्याकडे निरखून पाहिले. मंगळसूत्राशिवाय तिच्या गळयात काहीच नव्हते. हातात फक्त कांचेच्या बांगड्या होत्या. घर साध्या घरासारखेच होते.

"माझ्यासाठी काही करायची गरज नाही. बरं का? असाच पाहाणीला आलो





होतो, हाक मारून जावं, म्हणून आलो होतो." असे म्हणत इनामदार उठले.

गिरिधर संकोच करीत म्हणाला–"काही काम असलं की नोकराकरवी निरोप पाठविला तर सेवक हजर होणार नाही का? मध्यंतरी काही वसूली झाली." असेम्हणत त्याने इनामदारांसमोर पैशाची एक थैली आणून ठेवली.

गिरिधर अगदी गरीबच असल्याची खातरी झाल्यामुळे इनामदार म्हणाला–"तूर्त ठेवून घ्या. हिशोब नंतर सवडीने पाहूं!" असे सांगून पैशाची थैली तेथेच ठेवून इनामदार निघून गेला.

नंतर इनामदार शेषगिरीला बोलावून म्हणाला–"न लावलेला एकही आरोप

सिद्ध झाला नाही. गिरिधरचे घर भटा-भिक्षुकाच्या घरासारखं आहे. त्याच्या बायकोच्या अंगावर मंगळसूत्राच्या सुताशिवाय मला काही दिसलं नाही. तू त्याच्यावर असा खोटा आरोप कां केलास, हे नाही मला कळले. बरं तर आतां तू जा."

इनामदार खोटे बोलणे शक्य नाही. परंतु गिरिधरची अशी स्थिती एकाएकी कां झाली, याची गिरिधरला कल्पनाच होईना. "देवच त्याचे रक्षण करीत असणार. म्हणून त्याच्या सारख्या लांचखाऊवरचा आरोप मी असा सिद्ध करू शकलो नाही!" असे म्हणत शेषगिरीने आपल्या फुटक्या नशिबालाच शिव्या दिल्या.

वेताळ येथवर कथा सांगून म्हणाला–"राजा, अदृष्टवशात् गिरिधर त्याच्यावरचा आरोप सिद्ध न झाल्यामुळे सुटला. परंतु एवढ्यावरून त्याला शिक्षा व्हायला नको होती का? त्याच्यावर असा विश्वास करणारा इनामदारसुद्धा अविवेकी होता असं नाही का? या शंकांचे समाधानकारक उत्तर माहीत असून तू दिले नाहीस तर परिणाम तुला माहीतच आहे. तुझ्या डोक्याची शंभर शकले होऊन तुझ्याच पायांवर लोळू लागतील."

विक्रमादित्य म्हणाला–"नोकरी देण्यासाठी गिरधरने जी पद्धत अवलंबिली होती

... नीति... नव्हता ... नाही. तरी अनीती ही दोन प्रकारची असते. काही लोक स्वार्थासाठी समाजनीतीचा तिरस्कार करून अनीतीचा अवलंब करतात. अशा लोकांना समाजच योग्य ती शिक्षा करतो. परंतु गिरिधरच्या बाबतीत अनीतीचे कारण समाजातच दिसून येते. इनामदाराच्या अधिकाऱ्याने भेटी स्वीकारणे चूक म्हणता येणार नाही. भेटी स्वीकारल्या कारणाने प्रत्युपकार करावाच लागतो. गिरिधरने कोणालाही नोकरी देते वेळी लांच किंवा भेट दिलीच पाहिजे असा नियम ठेवला नव्हता. त्याला भेटी देणारे समजून उमजून देत आले, हे स्पष्टच दिसते आहे. तो स्वत: फार चांगला होता. इतरांना मदत करीत होता. कधी त्याने इतरांना पिळून काढले असे झाले नाही. त्याला स्वत:साठी जमीन विकत घेता आली असती. परंतु तसे न करतां त्याने आपल्या बायकोचे दागिने गहाण ठेवायला आपल्या मेहुण्याला देऊन जमीन विकत घ्यायला सांगितले. आपल्या घरातले सामान त्याने गरजू लोकांना लग्नासाठी म्हणून दिले. तो स्वत: स्वार्थी नव्हता किंवा शिक्षा करण्यायोग्यही नव्हता. आता इनामदारालासुद्धां अविवेकी म्हणता येणार नाही. गिरिधर त्याचा इतका विश्वासपात्र होता. तरी त्याच्या विरुद्ध फिर्याद आल्यावर तिकडे दुर्लक्ष न करतां त्याने त्याची दोन वेळा परीक्षा करून पाहिली. गिरिधरची संपन्नता बाहेर पडली असती तरी त्याला शिक्षा करायला आवश्यक इतके प्रमाण दाखवून शेषगिरी कदाचित हा आरोप सिद्ध करू शकला नसता की गिरिधर लांच घेतल्याशिवाय कोणाला नोकरी देत नाही. तशी संवय गिरिधरला असती तर त्याने शेषगिरीला सरळ सरळ, तो काय द्यायला तयार आहे, हे विचारले असते. या सर्वांवरून इनामदारांचा गिरिधरवर जो विश्वास होता, तो योग्यच होता."

अशा तऱ्हेने राजाचे मौन भंग होताच वेताळ प्रेतासह अदृश्य झाला व झाडाला जाऊन लोंबकळू लागला. (कल्पित)



# खरी स्वप्न

गणुशेट फार चिक्कू व लोभी होता. जीव जात असला तरी एक पैसा खर्च करायला तो तयार नसे. अशा गृहस्थाला एकदां स्वप्न पडलं–"शंभर रुपये दान कर हजार रुपये मिळतील !" ती त्याला देववाणी वाटली. गणुशेटचा त्या स्वप्नावर विश्वास बसला व त्याने शंभर रुपये गरीबांना वाटले. दुसऱ्याच दिवशी त्याच्या कोणी दूरच्या नातेवाइकाने मरण समयी गणुशेटला एक हजार रुपयांची भेट दिली. स्वप्न खरे ठरले

आणखी काही दिवसांनी गणुशेटला पुन्हा स्वप्न पडलं–"हजार रुपयांचं दान कर, तुला दहा हजार मिळतील !" ती देववाणी मानून गणुशेटने या खेपेस एक हजार खर्च करून मोठ्या प्रमाणावर दानधर्म केला. त्याच दिवशी गणुशेटचा कोणी आप्त मरण पावला. त्याच्या इस्टेटीतली दहा हजाराची इस्टेट गणुशेटला मिळाली. स्वप्न खरं ठरलं.

आणखी काही दिवसांनी आणखी एक स्वप्न गणुशेटच्या बायकोला पडलं–"दहा हजार रुपयांचं दान कर, एक लक्ष रुपये मिळतील."

तिने गणुशेटला ती गोष्ट सांगितली. स्वप्नातल्या गोष्टीवर गणुशेटचा चांगला विश्वास बसला होता. त्याने दहा हजार रुपये खर्च करून सर्व गावकऱ्यांना मोठी मेजवानी दिली.

त्याच्या दुसऱ्याच दिवशी गणुशेट आकस्मिकपणे मरण पावला. त्याने आपल्या मृत्युपत्रात एक लाखाची इस्टेट बायकोच्या नावी लिहून ठेवली होती.

या खेपेसही स्वप्न खरेच ठरले !





# गुंडप्पाच्या गर्वभंग

फार पूर्वी जत संस्थानाच्या दरबारात गुंडप्पा नावाचा एक पहेलवान होता. त्याचा आहार पाचसहा जणांना पुरेल एवढा होता. त्याचे पिळदार अंग पाहूनच त्याच्याशी थट्टामस्करी करायलासुद्धा कोणी धजत नसे. कुस्तीत त्याला कोणी जिंकल्याचे पंचक्रोशीत कोणी ऐकले नव्हते. त्याच्याशी कुस्ती खेळायची ज्याने कोणी हिंमत दाखविली त्याला महिना पंधरा दिवस अंथरुणच धरावे लागे.

म्हणून गुंडप्पाला गर्व चढला होता. त्याला कोणाची भयभीती किंवा थोरा-मोठ्यांचा आदर करणे हे माहीतच नव्हते. तो कोठे खरेदीसाठी जाई तर दुकानांतला जो माल त्याला हवा असेल तो स्वतःच्या हाताने उचलून नेई.

एकदां बाजारात एक बाई मोसंबी विकायला बसली होती. गुंडप्पाने तिच्या टोपलीत हात घातला आणि दहाबारा मोसंबी काढून घेऊन टोपली लाथेने उड-विली. रस्ताभर मोसंबी पसरली.

म्हातारी संतापून म्हणाली–"आपला प्रताप या म्हातारीवर तू दाखवितो आहेस, तुझी हिंमत असेल तर आमच्या गावच्या दगडूवर दाखवून पहा एकदा."

"म्हातारे, तुझ्या गावाचे नाव काय ग ?" गुंडप्पाने विचारले.

"बाळेहल्ली !" म्हातारी म्हणाली.

"दाखवितो माझा प्रताप, म्हातारे ! उद्यां संध्याकाळपर्यंत मी त्या दगड्याचे प्रेतच आणून टाकतो या बाजारात." म्हणत गुंडप्पा निघून गेला.

परंतु त्या दगडूला धरून त्याला ठार करीपर्यंत गुंडप्पाला काही सुचत नव्हते, तो लगेच घोड्याच्या गाडीत बसून बाळे-हल्लीला निघाला. गाडी त्या गावी पोचे



पोचेतो संध्याकाळ झाली. गाडीतून उतर-ल्याबरोबर त्याला ज्या ज्या गावकऱ्याने पाहिले तो कोणी भूत तर नाही अशी धास्ती घेऊन दुरूनच निघून गेला. गुंडप्पा मिशा पिळवटीत पुढे निघाला.

त्याला पाहून जे दूर पळून गेले होते त्यांच्यापैकी कोणाला त्याने हाक मारून बोलाविले तर तो आणखी दूर पळून जाऊ लागला. नंतर त्याला एक म्हातारा दिसला. त्याने विचारले–"काय रे ए म्हाताऱ्या, या गावात कोणी दगडू धनगर आहे म्हणे? तो कोठे राहतो तुला माहीत आहे का?"

"माहीत नसायला काय झालं, बाबा! गावाबाहेरच्या मैदानात तो मेंढरं चरा-यला [illegible] म्हातारा म्हणाला.

"बरं, पण मी कोण हे तू ओळखलंस का?" गुंडप्पाने विचारलं.

"तू कोणी असलास म्हणून मला काय करायचं आहे रे, बाबा? तू माझ्यासारखाच एक माणूस तर आहेस! जरा पिळदार अंग दिसतं आहे. माझं उतारवय झालं म्हणून हडकुळा झालो आहे!" म्हातारा म्हणाला.

गुंडप्पाने गाडी तेथेच सोडली आणि गावाबाहेरच्या कुरणाच्या दिशेने निघाला, तो मैदानात पोचला तेव्हां त्याला तेथे एक माणूस चिंचेच्या डाहाळ्या तोडून मेंढरांना खायला टाकीत असलेला दिसला.

गुंडप्पाने त्याला तिरप्या नजरेने पहात विचारले–"तूच का रे दगडू?"

त्याने त्याच्याकडे एकदांच पाहिले व गुंडप्पाच असावा हे ओळखून स्वत:ची ओळख इतक्या सहजी न देण्याचे ठरवून दगडू म्हणाला–"नाही हो, भाऊ! तुम्ही दरबारा-तले पहिलवान साहेब नाही का? माझ्या दादाजवळ आपले काय काम आहे?"

"त्याला आपल्या शक्तीची फार घमेंड आहे, म्हणे. एक दोन हात त्याच्याशी झाले तर पहावे, म्हटलं!" गुंडप्पा म्हणाला आणि दगडू फांदी ओढीत होता ती धरून [illegible] एकदा ओढली. ती '[illegible]' असा आवाज करीत खाली कोसळली.

दगडू आश्चर्य करीत पहात म्हणाला–"तुमच्या बरोबर त्याची काय तुलना? तुमच्या पायाच्या नखाची तरी तो बरोबरी करू शकेल का?"

"पहिल्याने तो आहे कोठे, सांग!" थोड्याशा कडक स्वरात गुंडप्पा म्हणाला.

"शेजारच्या गावी गेला आहे. रात्री परतेल. तुम्हांला तोंपर्यंत माझ्याकडेच रहावे लागेल! मी ही मेंढरें परसांत पोंचवून येतो." दगडू म्हणाला. दगडू गुंडप्पाला आपल्या घरी घेऊन गेला व मोठ्याने हाक मारून म्हणाला–"आपल्याकडे आज एक पाहुणा आला आहे, बरं का!"

"चल रे, तुझी कण्हेरी माझ्या कोठल्या कोपरात जाणार?" गुंडप्पा म्हणाला.

"हे पहा हो, ही मेंढरे आपली नाहीत, आतांच एखादं कापायला. म्हणून गैर न मानून या गरिबाचं आतिथ्य स्वीकारण्याची कृपा करा." दगडू म्हणाला.

आणखी एका तासाभराने दोघे जेवायला बसले. दगडूच्या आईने दोन मोठ्या पत्रा-वळीवर दोघांना जेवायला वाढले.

गुंडप्पाने पहिलाच घास तोंडात घातला आणि म्हणाला–"हे काय है, हा भात आहे का, की खडे उकडले आहेत?"

"दांत नसलेल्या म्हाताऱ्यांसाठी मऊ भात शिजवावा लागतो. दगडगोटे खाऊन पचविणाऱ्या आपल्या सारख्या तरुणांना



कशासाठी ?" या शब्दात दगडूने म्हटल्यावर गुंडप्पा थोडा लाजल्यासारखा झाला. मऊ मऊ मांस खाणाऱ्या गुंडप्पाला अर्धवट शिजलेला फडफडीत भात घशाखाली उतरत नाहीसा झाला. म्हणून प्रत्येक घासाबरोबर पाणी पिऊन त्याला भात कसा तरी संपवावा लागला. खाल्ला नाही तर मान खाली होईल, असे वाटले त्याला.

गुंडप्पाची ती केविलवाणी दशा दगडूला चांगली कळत होती. म्हणून तो मनातल्या मनात हसत होता आणि आईला मोठ्याने हाक मारून म्हणाला–"आई, तेल आण ग, थोडं!"

"वाचलो, बाबा!" गुंडप्पा मनात म्हणाला.

परंतु दगडूची आई घेऊन आली ते तेल नव्हते, तीळ होते.

"अहो, पाहतां काय, तेल घ्या!" असे म्हणत दगडूने आपल्या उजव्या हातावर मूठभर तीळ घेतले व मुठीत दाबून त्याचे तेल भातावर पिळले.

तेल तसं काढता येतं हे गुंडप्पाला माहीतच नव्हते परंतु त्याला वाटलं दगडू करू शकला तर आपणाला ते तर आणखी जास्त सहजी करतां येईल. त्याने सुद्धा मूठभर तीळ घेतले व पिळण्याचा प्रयत्न करू लागला. परंतु त्याचे हात मात्र दुखू लागले आणि तेलाचा एकही थेंब गळला नाही.

"तेल आलं नाही का हो?" असे म्हणत दगडूने आपल्या डाव्या हाताने गुंडप्पाचा हात तिळासह जोराने दाबला. त्या सरशी गुंडप्पाच्या हातातून तेला बरोबर गरम गरम रक्तसुद्धा थोडे गळले. गुंडप्पाला जीव जातो की काय, वाटले. परंतु हात दुखतो आहे, म्हटले तर कमीपणा होतो. म्हणून स्वतःला कसं तरी संभाळून रडक्या आवाजाऐवजी सामान्य आवाजात म्हणाला–"पुरे!"

दगडूने गुंडप्पाचा हात सोडला व जेवू लागला.

"आलोच हं!" असं सांगून गुंडप्पा काळोखात कोठे गेला तो परतलाच नाही.





# उत्तमाची कथा

उत्तानपाद नावाच्या राजाला त्याची राणी सुरुची हिच्या पोटी उत्तम नावाचा मुलगा झाला. हा ध्रुवाचा सावत्रभाऊ. पुढे उत्तमच राजा झाला.

त्याचा विवाह बहुला नावाच्या राजकन्येशी झाला. तिने पतीची कधीच पर्वा केली नाही, ती त्याचा पदोपदी अपमानच करी. म्हणून उत्तमाने शिपायांना तिला जंगलात टाकून यायला आज्ञा केली.

जंगलात पालपोतक नावाचा एक नाग फिरत होता. त्याची नजर बहुलेवर पडली व तो तिला घेऊन आपल्या घरी गेला. त्या नागाला नंदा नावाची एक मुलगी होती. तिने, ही आपल्या आईला ही कोण सवत आली, असा विचार करून बहुलेला एका गुप्तस्थानी लपवून ठेवले.

काही काळ लोटला. सुशर्मा नावाचा एक ब्राह्मण उत्तमाच्या दरबारात आला व म्हणाला–"माझ्या बायकोला कोणीतरी पळवून नेले आहे. तू तिला शोधून आणून दे."

"तुझी बायको कशी आहे, तिचे रूप वर्णन तर कर." उत्तमाने विचारले.

"ती काळी, गिड्डी, म्हातारी व दिसायला कुरूपच आहे." ब्राह्मण म्हणाला.

"अशा बाईसाठी तू एवढी फिकीर करण्याचे कारणच काय? तू दुसऱ्या एखाद्या सुंदर बाईशी लग्न करून मोकळा हो!" उत्तम त्या ब्राह्मणाला म्हणाला.

ब्राह्मण उत्तरला–"बायको कशी का असेना, तिच्या संरक्षणाची जबाबदारी पतीवर असते!"

सुशर्माच्या बायकोच्या शोधार्थ उत्तम रथात बसून निघाला. जंगलात फिरत फिरत तो त्रिकालज्ञ नावाच्या एका मुनीच्या आश्रमात आला. त्रिकालज्ञ मुनींनी आपल्या

शिष्याला राजाचे आतिथ्य करण्यासाठी अर्घ्य वगैरे आणायला सांगितले.

परंतु शिष्य जागचा हालला नाही व म्हणाला–"अर्घ्य आणायचा की नाही विचार करून सांगण्याची कृपा करावी."

पत्नीशिवाय पुरुषाला अर्घ्य आदी देऊन आतिथ्य करण्याची गरज नसते हे आठवून मुनीने राजाला येण्याचे कारण विचारले. राजाने सुशर्माच्या बायकोच्या शोधार्थ हिंडत असल्याचे सांगून अर्घ्य आदी देऊन त्याचा सत्कार न करण्याचे कारण विचारले.

मुनी म्हणाले–"पत्नी विरहित पतीचा अर्घ्यादी देऊन सत्कार करावयाचा नसतो! सुशर्माची बायको, बलाक नावाचा राक्षस पळवून घेऊन गेला आहे."

उत्तम बलाक राक्षसाच्या शोधार्थ गेला. त्याचा शोध लागल्यावर तो सुशर्माच्या बायकोला भेटला. ती म्हणाली–"हा राक्षस मला घेऊन आला खरा, परंतु मला खाण्यासाठी नाही, की माझ्याशी विवाह करून घेण्यासाठीही नाही."

तेव्हां उत्तमने राक्षसाला विचारले– "या गृहिणीला तू कां पळवून आणलेस?"

राक्षस उत्तमचा यथोचित स्वागत सत्कार करून म्हणाला–"हिचा पती राक्षसांचा संहार करण्यासाठी यज्ञ करीत होता. पत्नीशिवाय त्याला यज्ञ करतां येऊ नये म्हणून."

तो तिला परत पाठवायला तयार झाला.

उत्तमने सुशर्माच्या बायकोला त्रिकालज्ञ मुनींकडे पोचवून विचारले–"मुनिवर्य, माझी बायको कोठे आहे?"

"तुझ्या बायकोला पालपोतक नावाचा नाग पळवून घेऊन गेला आहे. त्या नागाच्या मुलीने तुझ्या बायकोला सुरक्षित जागी ठेवले आहे." मुनी म्हणाले.

उत्तमाने बलाक राक्षसाला पाठवून आपल्या बायकोला आणविले.

त्यानंतर बहुला आपल्या पतीच्या आज्ञेत राहून संसार करू लागली. तिच्या पोटी उत्तम नावाचा मुलगा जन्मला. तोच उत्तम नावाचा मनू.



# देवरात

अंबरीष नावाचा राजा कोशल देशावर राज्य करीत असता एकदां भयंकर दुष्काळ पडला. नद्या व विहिरी कोरड्या झाल्या. पिके निघालीच नाहीत.



अश्वमेध यज्ञ केल्यास पाऊस पडेल व दुष्काळ जाऊन सुकाळ येईल, असे मंत्र्यांनी व पुरोहितांनी राजाला सुचविले. तो यज्ञ फार जागरूक राहून करावा लागत असे.





या यज्ञासाठी सर्व सुलक्षणे असलेला घोडा आणून त्याला स्वच्छ धुवावे लागले नंतर त्याला सर्व आभूषणे घालून बली द्यायला सिद्ध करण्यात आले.



अंबरीष राजा इन्द्रपद प्राप्त व्हावे यासाठी यज्ञ करीत आहे, असे वाटून देवांनी यज्ञाला विघ्न आणण्याच्या हेतूने यज्ञाचा घोडा पळवून नेला.

यज्ञाचा घोडा अदृश्य झाल्याचे कळल्यावर राजा व पुरोहित फार काळजीत पडले. त्यांनी घोड्याचा खूप शोध केला. राजाचे सैन्य जंगल, पर्वत व नदीनाले हुडकून परतले. घोडा सांपडला नाही.





घोडा नाहीसा झाल्यामुळे चिंतावस्थेत बसलेल्या राजाला पुरोहित म्हणाले— "अशा परिस्थितीत घोड्याऐवजी एखाद्या ब्राह्मणाच्या मुलाचा बली देणे हा एकच मार्ग आहे."

योग्य लक्षणे असलेला बलीपशूसाठी ब्राह्मणाचा मुलगा मिळविणे सोपे आहे का? शोध करीत असता रुचिक नावाच्या ब्राह्मणाला तीन मुलगे असल्याचे कळल्यावरून राजा त्याच्याकडे गेला.





रुचिक कोणत्याही परिस्थीत आपल्या थोरल्या मुलाला द्यायला तयार झाला नाही. मुलांच्या आईने सर्वांत धाकट्या मुलाला द्यायचे नाकारले. मधला शुनश्शेप स्वतःच बलिपशु व्हायला पुढे आला.

राजा आनंदाने शुनश्शेपला घेऊन आपल्या घरी निघाला. त्यांना वाटेत विश्वामित्र ऋषींचा आश्रम लागला. विश्वामित्रांना शुनश्शेपाकडून तो बली व्हायला जात असल्याचे कळले. त्यांना शुनश्शेपाची कीव आली.





विश्वामित्रांनी शुनश्शेपला एक मंत्र शिकविला. तो मंत्र म्हटला तर संकट टळेल, असेही त्यांनी सांगितले. राजाने शुनश्शेपला घरी आणून बली देण्यासाठी तयार केले.



शुनश्शेपाने त्याला बली देण्यासाठी नेत असतां विश्वामित्रांनी शिकविलेला मंत्र म्हटला. सर्व जागच्या जागी दगडाच्या मूर्तीसारखे उभे राहिले.



अकस्मात अग्निकुंडातून इंद्र प्रगट झाला व त्याने अंबरीषाला यज्ञ फळ दिले आणि शुनश्शेपला वांचविले. देवांनी त्याचे रक्षण केले म्हणून शुनश्शेपला देवरात हे नाव लाभले.



# देवयानी

ऋषीमुनींच्या तपश्चर्येत विघ्ने आणण्यासाठी इंद्राने अनेक प्रयत्न वेळोवेळी केले. त्यांत काही यशस्वी झाले व काही अयशस्वी झाले.

शुक्राचार्य तपश्चर्या करीत असतां विघ्न आणण्याच्या हेतूने इंद्राने आपली मुलगी जयंती हिलाच पाठविले. परंतु ती विघ्न आणू शकली नाही. त्याची तपश्चर्या यशस्वी झाली व ब्रह्मदेवाने दर्शन देऊन त्याला अनेक वर दिले. त्याचबरोबर जयंती आली होती ते कामही व्यर्थ गेले नाही. तिने शुक्राचार्यांशी विवाह करून संसार केला आणि तिला शुक्राचार्यांपासून देवयानी नावाची मुलगी झाली.

देवादानवांचे युद्ध झालं तेव्हां शुक्राचार्यांकडून संजीवनी विद्या शिकून घेण्यासाठी बृहस्पतीचा मुलगा कच आला. कचाने शुक्राचार्यांचे शिष्यत्व ग्रहण केले. देवयानीचे त्याच्यावर प्रेम बसले. राक्षसांनी कचाचा कित्येकदां वध केला तेव्हां वडिलांकडून देवयानीने त्याला जिवंत करविले. एकदां राक्षसांच्या एका चुकीमुळे त्याला संजीवनी विद्यासुद्धा शिकतां आली.

त्याचा हेतू पूर्ण होण्यास देवयानीची मदत झाली असूनही गुरुकन्या ही बहिणीसारखी असते असे सांगून कचाने तिच्याशी विवाहबद्धा होण्यास नकार दिला.

शुक्राचार्य वृषपर्व नावाच्या राक्षसाच्या राजधानीत रहात होता. वृषपर्वाला शर्मिष्ठा नावाची एक मुलगी होती. तिची व देवयानीची फार मैत्री होती.

एकदां शर्मिष्ठा व देवयानी सर्व मैत्रिणी सह एका सरोवरात जलविहार करण्यासाठी गेल्या होत्या. त्यांनी वस्त्रे काठावर सोडून ठेवली होती. स्नान करीत असतां सोसाट्याचा वारा सुटला व त्यांची वस्त्रे

एकात एक गुरफटून गेली. शर्मिष्ठा काठावर आली व जे वस्त्र तिच्या हाती आले ते ती नेसली. ते देवयानीचे होते.

नंतर देवयानी स्नान करून बाहेर आली व शर्मिष्ठेला तिचे वस्त्र नेसलेले पाहून म्हणाली–"मी ब्राह्मणकन्या आहे, माझे वडील तुझ्या वडिलांचे कुलगुरू. तू माझे वस्त्र नेसलीस, तुझे वस्त्र मी नेसावे का?" दोघींचे खूप भांडण झाले.

शर्मिष्ठा म्हणाली–"म्हणजे तू माझ्याहून कोणत्या बाबतीत मोठी झालीस ग? माझ्या बाबांचे तुझे बाबा नोकरच तर आहेत! तुझे डोळे कशामुळे एवढे कपाळावर चढले आहेत ग?" असे म्हणत शर्मिष्ठेने देवयानीला एका विहिरीत ढकलले आणि घरी निघून गेली.

विहिरीत पडून देवयानी रडत असता ययाती राजा त्या बाजूने जात होता. त्याने तिचा आवाज ऐकला व तिला हात धरून बाहेर काढले. त्याच वेळी घूर्णिका नावाची दासी देवयानीला शोधत तेथे आली. परंतु "शर्मिष्ठा राहते त्या गावात मी पाऊलही टाकणार नाही," असे देवयानीने तिला सांगून परत पाठविले. ते कळल्यावर शुक्राचार्यंही वृषपर्वाची राजधानी सोडून जायला तयार झाले.

तेव्हां वृषपर्वने आपल्या मुलीची चूक ओळखून शर्मिष्ठेला देवयानीची दासी म्हणून सेवेला पाठवून दिले.

ययातीने हात धरून उद्धार केला तेच पाणिग्रहण झाले असे सांगून देवयानीने ययातीशीच विवाह करून घेण्याचा हट्ट धरला व त्याच्याशीच विवाह करून घेतला. ती सासरी निघाली त्या वेळी शर्मिष्ठासुद्धा तिची दासी म्हणून बरोबर गेली. ययातीला देवयानीपासून संतती झाली नाही, परंतु शर्मिष्ठेशी गुप्त संबंध असल्याकारणाने त्याला पुत्रसंतती लाभली.

ही गोष्ट देवयानीला कित्येक दिवसांनंतर कळली. तिने वडिलांकडे तक्रार केली आणि शुक्राचार्यांनी त्याला वार्धक्य येण्याचा शाप दिला.



# चोराला पकडणारे चोर

रामपूर नावाच्या गावी दिवसाढवळ्या विचित्रपणे चोऱ्या होऊ लागल्या. परंतु पोलीस शिपायांना चोराचा पत्ताच लागेना. कारण गावातल्या निरनिराळ्या भागात चोर एकाच वेळी चोरी करीत असल्याचे आढळून आले. चोराला केव्हां व कसे धरावयाचे राजाच्या शिपायांना कळेना.

त्याचं खरं कारण असे होते की चोऱ्या करणारे दोघे अट्टल चोर होते. त्यांची नावे अनुक्रमे रंगा व भीमू अशी होती. दोघेही चोरी करण्यात इतके वस्ताद होते की दोघांना परस्परांची मदत करून चोरी करणे बरे वाटले नाही. उलट दोघांना परस्परांची अडचणच वाटे. कारण दोघांमध्ये प्रतिस्पर्धा होती

चोराला पकडणे आपल्याला शक्य नाही असा विचार करून राजाने, चोराला धरून देणाऱ्याला दहा हजार होन इनाम म्हणून दिले जातील, अशी दवंडी पिटविली. दवंडी ऐकून रंगा व भीमा दोघे वेष पालटून राजाला भेटले व परस्परांची लपण्याची जागा राजाला सांगितली. झाले, दोघेही पकडले गेले. इनाम कोणालाच मिळाले नाही.





# वाटमारी

रघुनाथ ज्या गावी रहात असे त्या गावापासून जिल्ह्याचे ठिकाण दहा मैलावर होते. त्याच्या घरी काहीतरी कार्य होते. म्हणून श्रीपती नावाचा त्याचा मित्र सायंकाळी घोड्याची गाडी करून रघुनाथ असे त्या गावी निघाला.

वाटेत एक दाट जंगल होते. त्या जंगलातून काही दिवसांपूर्वी रघुनाथ जात असतां एका चोराने लुटले होते. रघुनाथने ती गोष्ट श्रीपतीला सांगितली होती.

रघुनाथला जिल्ह्याच्या गावी काही काम होते, ते पुरे करून संध्याकाळी लगेच परतावे लागले होते. त्याने घोड्याची गाडी भाड्याने ठरविली होती. गाडी त्या दाट जंगलातून जात असतां एका वळणावर वळली तेव्हां एका झाडाची फांदी वाटेत आडवी पडलेली होती. म्हणून गाडी थांबवावी लागली होती. एका झाडामागून एक माणूस तोंडावर बुरखा घालून आला. त्याच्या हातात सुरा होता. त्याने सुऱ्याचे टोक रघुनाथाच्या गळ्यावर ठेवले व दरडावून म्हणाला–"जवळ असेल ते मुकाट्याने काढ!" असे सांगून रघुनाथजवळ होते नव्हते ते घेतले व गाडीवानाजवळचे पैसेही घेतले आणि झाडाआड पसार झाला होता.

"काळोख्या रात्री त्या जंगलातून नको हो, असे मी किती सांगितले, पण तुम्ही ऐकले नाही आणि पहा, मुलीच्या लग्नासाठी मी पांचशे रुपये जमविले होते, ते सर्व चोर लुबाडून घेऊन गेला." गाडीवान रडू लागला.

रघुनाथाने गावी पोचल्यावर त्या गाडीवानाला पांचशे रुपये देऊन रात्री त्याला आपल्याच घरी ठेवून घेतले. दुसऱ्या दिवशी तो गाडीवान परतला.

श्री सु. ना. सुर्वे

एका वर्षापूर्वी घडलेली ती गोष्ट गाडीत बसून जात असतां श्रीपतीला आठवली.

इतक्यात गाडी जंगलाच्या मधोमध एका वळणावर वळतांच वाटेवर झाडाची एक फांदी आडवी पडलेली दिसली. गाडी थांबली. एका झाडाआडून एक माणूस बुरखा तोंडावर घेऊन समोर आला. त्याच्या हातात सुरा होता. त्याने सुरा श्रीपतीच्या गळ्यावर ठेवून श्रीपतीजवळ होते नव्हते ते सर्व काढून घेतले व गाडीवानाजवळ होते तेही लुबाडले व परत जात असतां म्हणाला–"तुझ्याजवळ ते गाठोडे कसले आहे रे?"

"साखरभात आहे, मुलांना खाऊ म्हणून नेतो आहे." श्रीपती म्हणाला.

"मला भूक लागली आहे. साखरभात मुलांनासुद्धा आवडतोच!" असे सांगून ते गाठोडेसुद्धा घेऊन पळाला.

चोर निघून गेल्यावर गाडीवान म्हणाला–"मी मुलीच्या लग्नासाठी जमविलेले पांचशे रुपये चोराने लटून नेले की हो!" असे म्हणत रडू लागला.

रघुनाथला आला तोच अनुभव हुबेहूब श्रीपतीला आला. गाडीवानसुद्धा चोराचा साथीदार आहे तर!"



गाडीवानाने वाटेवरची फांदी बाजूला सारून गाडी पुढे चालवू लागला तेव्हां श्रीपती म्हणाला–"थोडा थांब."

"आतां थांबा कशाला? आणखी एखादा चोर येणार नाही कशावरून?" गाडीवानाने विचारले.

"येऊ दे, आपल्याजवळ चोरून न्यायला उरलेच काय आहे? परंतु तुझे व माझे पैसे कोठे जात नाहीत, बघ! ते पैसे परत आपल्याकडे चालून येतील. म्हणून तर थांब म्हटले!" श्रीपती म्हणाला.

"ते कसं शक्य होईल हो?" गाडीवानाने विचारले.

श्रीपती खदखदां हसून म्हणाला–"माझ्या मित्राच्या घरी पुष्कळ उंदीर आहेत, म्हणे! त्यांच्यासाठी माझ्या मित्राने चांगले जालिम औषध आणायला सांगितले होते. ते त्या साखरभातात आहे. चोर तो साखरभात खाऊन मरणार. आपण जाऊन आपले पैसे घेऊन येऊ या."

ते ऐकून गाडीवानाचा चेहरा गोरामोरा झाला व मोठ्याने ओरडला–"अरे रंगा, तो साखरभात खाऊ नकोस रे!" आणि गाडीतून खाली उडी मारून आला.

श्रीपतीने चटदिशी उठून त्याची शेंडी पकडली व दरडावून विचारले–"चोरा, लुच्चा! या वाटमारीत तुझा वांटासुद्धा आहे का रे?"

"माझी अक्कल ठिकाणावर नव्हती. माझा मुलगा साखरभात खाऊन कदाचित मरेल हो!" गाडीवान म्हणाला. दोघे शेजारी एक झोपडं होतं, तेथे आले. गाडीवानाने घाईघाईने दार ढकलले आणि आत गेला. त्याच्या पाठीमागून श्रीमतीसुद्धा आत गेला.

आत गाडीवानाच्या मुलाने हावरट-पणाने अर्ध्याहून अधिक साखरभात फस्त केला होता. त्याच्यात उंदराचे विष घातले आहे रे! तू खाल्लास भात?" गाडीवानाने मुलाला रडक्या आवाजात विचारले.

सर्व वृत्त कळल्यावर रंगाला घामसुटला व घेरी आल्यासारखे व पोटात ढवळून आल्यासारखे वाटू लागले.

तिघे गाडीत बसून रघुनाथाच्या घरी आले. श्रीपतीने त्या दोघां बापलेकांना बाहेरच्या खोलीत बसविले व म्हणाला–"येथेच बसून रहा, मी वैद्याला बोलावून आणतो." असे सांगून घरात गेला व रघुपतीला घडलेली गोष्ट सांगितली.

वैद्याची वाट पहात बसलेल्या बापले-कांना पोलीस शिपाई येऊन भेटले व दोघांना मुसक्या बांधून घेऊन गेले, जात असतां श्रीपती त्यांना म्हणाला–"साखर-भातात कसलेच विष नव्हते बरं का. परंतु तुमचा आजार बरा व्हायला हेच वैद्यबुवा चांगले!"



# परीक्षा

रत्नाकर जव्हेऱ्याने आपला सर्व व्यापार कोणत्यातरी मुलावर टाकण्याचे ठरवून कोणाची बुद्धी व्यापारात चालते याची पारख घेण्यासाठी दोघामुलांना एकेक नकली हिरा खरा असल्याचे सांगून दिला आणि विकून यायला सांगितले.

थोरला मुलगा घरी येऊन बापाला म्हणाला–"बाबा, तुम्हांला कोणीतरी फसविलेले दिसते आहे. तो नकली आहे, म्हणे! दहा रुपयेसुद्धा मिळाले नाहीत!"

धाकटा मुलगा म्हणाला–"बाबा, तो नकली हिरा होता. तरी मी तो उत्तम प्रतीचा असल्याची खात्री करून देऊन शंभर रुपयांना विकला.

"तुम्ही विकलेत ते खरे हिरे होते. मी हे नकली हिरे देतो आहे! हे विकून पैसे घेऊन या." असे सांगून रत्नाकर शेटने दोघां मुलांना प्रत्येकी एकेक खरा हिरा दिला.

थोरला परत येऊन म्हणाला–"बाबा तुम्ही पूर्वी दिलेला खरा हिरा घेऊन आतां जो नकली हिरा दिलात तो त्याच्याबद्दल देऊन नुकसान भरपाई करून घेतली." असे सांगून नकली हिरा काढून दिला.

धाकटा परत येऊन म्हणाला–"तुम्ही आतां दिलात तोच खरा होता. तो मी दहा हजाराला विकून. पूर्वीचा नकली हिरा कधी उपयोगी पडेल, असा विचार करून दहा रुपयाला खरेदी करून परत घेऊन आलो." जव्हेऱ्याने दुसऱ्या मुलावर दुकानाची जबाबदारी टाकली.












# पंतोजींचे शिष्य

गोविंद नावाचा एक तरुण मुलगा एका पंतोजींच्या घरी घरकाम करीत असे. त्याच्या मनात विद्याभ्यास करावा अशी फार इच्छा होती. म्हणून तो सामान्यपणे आपले काम विसरून पंतोजी आपल्या शिष्यांना शिकवीत ते ऐकत उभा राही.

एकदा तो संवयीप्रमाणे पंतोजी शिष्यांना काही शिकवीत होते ते ऐकत त्याला करायची होती ती कामे करायला विसरला. ते पाहून पंतोजींची बायको त्याला बरेच काही बोलली.

"हातातले काम सोडून ठोंब्यासारखा काय ऐकत उभा आहेस रे?" पंतोजींनी त्याला विचारले.

"मलासुद्धा शिकायची इच्छा आहे!" गोविंद म्हणाला.

"तुझी इच्छा चांगलीच आहे, परंतु त्यासाठी लागणारी योग्यता तुझ्यात आहे का? मी या वेळी काय शिकवीत होतो, प्रथम सांग बरं. तू सांगू शकलास तर मी तुला आपला शिष्य करून घेईन." पंतोजी त्याला म्हणाले.

पंतोजी तसे म्हणाले त्याला कारण होते. त्या दिवशी ते शिकवीत होते तो विषय फार गहन होता. त्यांच्या शिष्यांपैकी एकालाही तो कळला नव्हता. तेव्हां गोविंदला तो कळणे मुळीच शक्य नाही असे साहजिकच पंतोजींना वाटत होते.

परंतु गोविंदला तो धडा चांगला कळला होता. एक शब्दही न चुकता त्याने तो म्हणून दाखविला.

पंतोजींनी गोविंदच्या ग्रहणशक्तीबद्दल त्याला शाबासकी देऊन त्याला आपला शिष्य करून घेतले. लौकरच गोविंद पंतोजींच्या सर्व शिष्यांत सर्वोत्तम ठरला. शिष्यांना गोविंदचा हेवा वाटू लागला व त्यांनी गुरुजींजवळ तो बोलूनही दाखविला.

पंतोजी म्हणाले—"मी काय करणार, त्याच्या डोक्यावर सरस्वतीचा वरदहस्त आहे! कदाचित तो काही दिवसांनी मलाही मागे टाकील की काय असे वाटते आहे!"

विद्याभ्यास करीत असतां गोविंद कविताही करू लागला. त्याची प्रसिद्धी वाढत गेली. मोठमोठे लोक त्याला आपल्या घरी बोलावून त्याचे काव्यवाचन ठेवू लागले व त्याचा सत्कार करू लागले.

ते पाहून पंतोजींच्या शिष्यांच्या मनात जळफळाट होऊ लागला.

गोविंद कवित्व करून थांबला नाही. त्याने एका नाटयशालेच्या मालकाला एक नाटक लिहून दिले. ते रंगभूमीवर आल्यावर प्रेक्षकांनी "अत्यद्भुत!" या शब्दात त्याची वाखाणणी केली. तेव्हांपासून गोविंदने संस्कृत भाषेत अनेक नाटके लिहिली. त्यामुळे त्याला पुष्कळ कीर्ती व पैसाही लाभला.

तात्पर्य हे की गुरूचे नाव अजरामर करणारा गोविंद हाच एक शिष्य नावारूपास आला. इतर शिष्य निरुपयोगीच ठरले.

सर्व शिष्यांनी ऐक्य करून असे ठरविले की काल परवापर्यंत गुरुजींच्या घरी घरगड्याचे काम करणाऱ्याची मान खाली



व्हावी यासाठी काय वाटेल ते करावे लागले तरी करावयाचे. आपल्याला कविता करतां येत नाही. तो महाकवी होऊन बसला आहे. तेव्हां परप्रांतांतून महाकवींना बोलावून त्याचा सत्कार करावयाचा. म्हणजे गोविंदचा गर्व उतरेल.

असा विचार करून काही शिष्य आंध्र प्रांतात आले. त्या काळात आंध्र प्रांतात नाटकांना फार महत्व होते. तेथील प्रजेला आवडणारी काही नाटके तर फारच लोकप्रिय होती. अशा नाटककर्त्यांमध्ये सर्वात प्रसिद्ध भद्रकवी नावाचा एक नाटककार होता.

पंतोजींचे शिष्य भद्रकवीला भेटले व म्हणाले–"आपल्या नाटकांना आंध्र प्रांतातील प्रजेकडून फार मोठा मान मिळाला आहे. आम्ही स्वतः आपली काही नाटके पाहिली. आम्हांला ती फार आवडली. आपण त्यांचे भाषांतर संस्कृत भाषेत करून दिलेत तर आम्ही त्यांचे प्रयोग आमच्या प्रांतांतील रंगभूमीवर करावे म्हणतो. आपल्याला आमच्या प्रांतातही कीर्ती लाभेल."

भद्रकवीने त्यांचे आभार मानले व म्हणाला–"माझी सर्व नाटके मूळ संस्कृतमध्येच आहेत. मी त्यांचे तेलुगू भाषेत भाषांतर केले आहे!"

"संस्कृत भाषेत त्या नाटकांची रचना करणारे थोर नाटककार कोण हो?" पंतोजींच्या शिष्यांनी विचारले.

"तो नाटककार उज्जैन येथे राहतो. त्याचे नांव गोविंद कवी असे आहे." भद्रकवी म्हणाला.

पंतोजींच्या शिष्यांच्या डोक्यावर थंडगार पाणी पडल्यासारखे झाले. इतर प्रांतांचे लोक गोविंद कवीच्या नाटकांचे भाषांतर आपापल्या भाषांत करून त्याबद्दल अभिमान मानीत असतां आपण मात्र ती नाटके सोडून इतर देशात चांगल्या नाटकांच्या शोधार्थ हिंडतो आहो. स्वतःची चूक लक्षात आल्यावर ते निमूटपणे स्वदेशी परतले.



# पापमुक्ती

एका गावी दगडू नांवाच्या चोराला त्याने फार पापे केली असल्यासारखे वाटले व त्या पापातून मुक्तीचा मार्ग काय या गोष्टीचा तो विचार करू लागला, त्याच सुमारास त्याच्या गावात एक लबाड संन्यासी आला. त्याची प्रवचने ऐकायला येणाऱ्या गावकऱ्यांना तो म्हणाला–"भक्तजन हो! लोक चोरी किंवा लबाडी कां करतात? त्यांना हव्या असलेल्या वस्तू मिळाव्या यासाठी. त्या पापातून मुक्ती मिळण्याचा एकच मार्ग आहे. तो म्हणजे चोरून आणलेल्या वस्तूतला अर्धा भाग धर्मकार्यासाठी दान करणे. अशी पापमुक्ती व्हावी यासाठी ही दानपेटी येथे ठेवली आहे. तुम्ही लबाडी लुच्चेगिरी करून जे काही मिळविले असेल त्यातला अर्धा वाटा या दानपेटीत टाका आणि पापमुक्त व्हा."

कित्येकांनी पापमुक्ती व्हावी यासाठी त्यांनी अन्यायाने मिळविलेल्या मिळकतीतला अर्धावाटा दानपेटीत टाकला.

दुसऱ्या दिवशी लबाड संन्याशयाच्या शिष्यांनी दानपेटी उघडून पाहिली तर त्यांत एक चिट्ठी होती. त्या चिट्ठीतला मजकूर असा.

"स्वामीजी, मी आपल्या दानपेटीतले धन मला हवे होते तेवढे चोरून त्यातले अर्धे पुन्हां दानपेटीत टाकले. ते दानधर्मासाठी खर्च करून मला पापमुक्त करा!" –दगडू





# कर्ज फेडणारे कर्ज

**ल**खुजी हा गावातला सर्वांत मोठा शेतकरी होता. आपल्या मुलीच्या लग्नाकरिता त्याने सोनूशेट नावाच्या एका प्रसिद्ध जव्हेऱ्याकडून पन्नास हजार रुपयांचे दागिने विकत घेतले व त्याला चाळीस हजार रुपये देऊन दहा हजार सवडीने देण्याचे वचन दिले.

सोनूशेट रघुजीला चांगला ओळखत होता. म्हणून त्याने लखुजीला हवे होते ते दागिने देऊन टाकले. परंतु लखुजीकडून दहा हजार रुपये येणे आहे, हे आठवणी-साठी सोनूशेटने कोठे लिहून मात्र ठेवले नाही. व्यापारात त्याला फार मोठे नुकसान झाले आणि लखुजीकडून दहा हजार येणे असल्याची गोष्ट तो पार विसरून गेला.

लखुजी मात्र ती गोष्ट विसरला नव्हता. परंतु नशिबानेच पाठ फिरविल्यामुळे इच्छा असूनही त्याला ते कर्ज फेडता आले नाही. त्याच्यावर निरनिराळी आर्थिक संकटे ओढवली. त्याच बरोबर त्याची प्रकृती बिघडत गेली आणि त्याने अंथरूण धरले. शेवटच्या घटकेला त्याने आपला मुलगा मुरली याला जवळ बोलविले व म्हणाला–"बाबा रे, तुझ्या अक्काच्या लग्नाच्या वेळी सोनूशेटाकडून मी दागिने करविले होते आणि त्यांच्या किमतीपैकी दहा हजाराची रक्कम अद्याप देणे राहिले आहे. ते फेडणे मला आजपर्यंत शक्य झाले नाही. तू ते कर्ज तुला जमेल तेव्हां फेडलेस तरच माझ्या आत्म्याला शांती लाभेल. तर तू तेवढे कर्ज फेडण्याचे वचन दे."

मुरलीनें कर्ज फेडण्याचे शपथ घेऊन वचन दिल्यावर लखूजीने डोळे मिटले.

मुरलीला नव्याने सर्व कामे शिकून शेतकीची कामे करावी लागली. तो भूक तहान विसरून रात्रंदिवस काम करू लागला आणि थोडेथोडे पैसे जमवीत त्याने दहा हजार रुपयांची रक्कम जमविली.

काय वाटेल ते होईना बापाचे कर्ज फेडण्यापुरती रक्कम जमा झाल्याबद्दल त्याच्या मनाला बरे वाटले व तो सोनूशेट जव्हेऱ्याचे घर शोधत निघाला. त्या घरात एक तरुण युवक त्याला भेटला. त्याने मुरलीला विचारले–"कोण पाहिजे आपल्याला?"

"सोनूशेट आहेत का?" मुरलीने त्या तरुणाला विचारले.

तो तरुण म्हणाला–"सोनूशेट वारल्याला बरेच दिवस झाले हो! मरते वेळी त्यांनी आपल्या मुलाला त्यांच्या डोक्यावर मोठे कर्ज असल्याचे सांगितले होते."

"त्यांची मुले कोठे आहेत हो?" मुरलीने त्या तरुणाला विचारले.

"बापाचे कर्ज कसे फेडायचे या भीतीने त्यांचा मुलगा कोठेतरी पळून गेला. तो फरारी आहे." तो तरुण म्हणाला.

ते ऐकून मुरलीला जास्तच आश्चर्य वाटले. त्याने विचारले–"पण काय हो, ते एवढे मोठे जव्हेरी होते आणि त्यांच्या डोक्यावर कर्जाचे एवढे ओझे वाढण्याचे कारण काय झाले, सांगाल का?"

तो तरुण म्हणाला–"काय झालं हे मी आतां काय सांगू? त्या धंद्यात इतके पैसे मिळत होते तरी त्यांच्या मनाचे त्या मिळकतीवर समाधान झाले नाही. त्यांनी समुद्रपार व्यापार सुरू केला. ते गलबतातून



माल नेत असतां गलबत समुद्रात बुडालं. ते गेले व त्यांचे सर्वस्व गेले आणि उरले काय ते कर्जच!"

"बिचारे सोनूशेट! त्यांच्यावर केवढा हा अन्याय झाला? सोनूशेट जव्हेऱ्याचा धंदा करीत असतां आमच्या वडिलांनी त्यांच्याकडून सोन्याचे काही दागिने करवून घेतले होते. त्यांच्या किमतीतले दहा हजार रुपये मागाहून फेडतो म्हणून माझ्या वडिलांनी त्यांना सांगितले होते. परंतु सोनूशेट सारखेच नशिबाने पाठ फिरविल्यामुळे माझे वडील ते कर्ज फेडू शकले नाहीत आणि मरते वेळी त्यांनी ती गोष्ट मला सांगितली व डोळे मिटले. मी दहा हजार रुपये जमवून वडिलांचे कर्ज फेडायला म्हणून आलो होतो. सोनूशेट नाहीत तर नाहीत, त्यांच्या मुलाची भेट झाली असती तरी मला बापाचे कर्ज फेडता आलं असतं. आतां हे पैसे खर्च करून त्यांच्या नावाने मी एक एक धर्मशाळा बांधतो, झालं! माझ्या वडिलांच्या आत्म्याला शांतिलाभ होईल व वडिलांचे कर्ज फेडू शकल्याबद्दल मनाचे समाधान होईल.

लगेच तो मुलगा स्मित करून म्हणाला– "अहो, सोनूशेटचा मुलगा कोठेही गेला नाही. मीच त्यांचा मुलगा. तुम्ही माझ्या वडिलांवरचं कर्ज वसूल करायला आला आहां की काय असं वाटून मी भीतीने ते खोटं बोललो होतो."

मुरली ते ऐकून थोडा रागावल्यासारखा म्हणाला– "अरे, बापाने कर्ज केले तर त्यासाठी एवढं भिण्याचं कारण काय? वाटेल तितके कष्ट सहन करावे लागले तरी ते सहन करून बापाचे कर्ज फेडणे हे मुलाचे कर्तव्य नाही का? वडिलांचे कर्ज फेडायला मला काय कमी कष्ट सहन करावे लागले? तर आतां हे पैसे घे आणि या भांडवलावर धंदा करून बापाचे कर्ज फेड. त्या कर्जाचे ओझं आनंदाने वाहलं पाहिजेस!"

सोनूशेटच्या मुलाने त्याप्रमाणे पुढे मुरलीने दिलेल्या रकमेच्या भांडवलावर धंदा करून बापाचे कर्ज फेडले.






त्या आदिशक्तीचा, आराधना करून वर प्राप्त करणारे कित्येक लोक असतील.

फार पूर्वी सुरथ नावाचा एक राजा होता. त्याचे राज्य फार मोठे होते. त्याने केले नाही असे एकही पुण्यकार्य नव्हते, की त्याने नीतीविरुद्ध केले असे एकही काम नव्हते. सर्व प्रकारे सामर्थ्यवान अशा सुरथ राजाच्या राज्यावर जंगली जातीच्या लोकांनी व यवनांनी अफाट सैन्यानिशी स्वारी केली.

शत्रूचे सैन्य मोठे होते, म्हणून सुरथाचा पराभव झाला. तो आपल्या किल्ल्यात पळून आला. तेथे त्याचे मंत्री शत्रूला सामील झाले असल्याचे कळले. आपल्या देवानेच पाठ फिरविली तर आपण तरी काय करणार असे वाटून तो विचार करु लागला, "मंत्रीच शत्रूला सामील झाले आहेत, आपण वेळेवर त्यांना योग्य मार्गावर आणले नाही, तर ते आपल्याला धरून शत्रूच्या हाती देऊन मोकळे होतील. एकदां दुष्ट बुद्धी डोक्यात शिरली की माणूस काय वाटेल ते करायला तयार होतो. असा माणूस आईबाप, आजा, आजी किंवा इतर आप्तेष्टांचे बरेवाईट करायलासुद्धा मागेपुढे पहात नाहीत."

असा विचार करून तो एका घोड्यावर बसून कोणाला काही कळविल्याशिवाय जंगलात पळून गेला. ते एक भयंकर जंगल होते. दाट झाडी होती. वेलींनी झाडांना



बिळखा घालून जंगलात पुढे जाणे अशक्य केले होते. त्या दाट अरण्याच्या मधोमध एक नदी वहात होती. वाघ, सिंह, हत्ती व हरणे वगैरे रानटी जनावरे निश्चितपणे हिंडत फिरत होती. अशा दाट रानातही दुरून ब्रह्मचारी वेदपाठ करीत असल्याचा आवाज ऐकू येत होता. तो आवाज एका मुनीच्या आश्रमातून येत होता.

सुरथ त्या आश्रमाच्या दिशेने निघाला. तो आश्रमात पोचला तेव्हां मुनी आपल्या शिष्यांना शिकवीत होते. मुनिवर्यांचे शरीर तपश्चर्येमुळे कृश झाले होते. ते मृगचर्मावर बसलेले होते. त्यांचा चेहरा शांत व गंभीर होता. सुरथाने आपला घोडा एका झाडाच्या बुंधाला बांधून ठेवला आणि पुढे जाऊन मुनिवर्यांना साष्टांग नमस्कार केला. त्याच्या डोळ्यातून अश्रुधारा वहात होत्या.

मुनिवर्यांनी त्याचे दोन्ही हात धरून त्याला उभे केले. एका शिष्याकडून मृगचर्म मागवून त्याला त्याच्यावर बसायला सांगितले. नंतर प्रेमाने त्याला म्हणाले—"बाबा रे, तू कोण, कोठून आलास व तुला कोणत्या प्रकारचे दुःख आहे, सविस्तर सांग. माझ्याजवळ आल्यानंतर तुला दुःख करायचे कारणच काय? तुझ्या मनात जे काही असेल ते किती कष्टसाध्य असले तरी ते मी पुरे करण्याचा यत्न करीन."

ते ऐकून सुरथ गद्गद् कंठाने म्हणाला—"माझे नाव सुरथ. मी एका देशाचा राजा होतो. शत्रूच्या हाती पराभव झाल्याने आपल्या चरणांपाशी आश्रय मागायला आलो आहे. मी आपले राज्य, बायको व मुले सर्व सोडून आपल्या आश्रयाला आलो आहे. आपणच मला आई व वडील यांच्या स्थानी आहां. मी आपली सेवा करायला, सांगाल ते काम करायला तयार आहे. मी निःसहाय आहे, शत्रूपासून मला वाचवून माझ्या आप्तेष्टांची पुन्हां भेट होईल असे काही करण्याची कृपा करावी."

मुनिवर्यांनी त्याला अभयदान दिले व म्हणाले—"तू आमच्यासारखाच या वनात



राहून या रानात जे काही मिळेल त्यावरच निर्वाह करण्याचे ठरव. हिंसा करू नकोस आणि आमच्या आश्रमात निश्चितपणे रहा. हळूहळू तुझी सर्व इच्छा पूर्ण होईल."

सुरथाने ते सर्व आनंदाने मान्य केले व मुनिवृत्ती धारण करून आश्रमात राहू लागला.

एके दिवशी तो एका झाडाखाली बसून त्याच्यावर ओढवलेल्या संकटांचा विचार करू लागला. दैवाची अशी अवकृपा कां झाली? राज्य, पुत्रकलत्र सर्व आपण कसे घालवून बसलो. शत्रूच्या हातून आपला कसा पराभव झाला. पुन्हां भाग्य अनुकूल होईल का, इत्यादी गोष्टींचा विचार करीत असतां एक वैश्य तेथे आला. तोदेखील अत्यंत दीनमुद्रा करून येत असलेला दिसला.

सुरथाने त्या वैश्याला जवळ बसायला सांगून विचारले—"कोण रे बाबा, तू? इकडे कोणत्या कामानिमित्त आलास? तुझ्यावर काही संकट ओढवले आहे का?"

ते ऐकून तो वैश्य म्हणाला—"मी एक वैश्य आहे. मला श्रीमंती लाभली होती. मी सत्यव्रती होतो. एक उदार दानी म्हणून नावलौकिक मिळविला. मला पूर्वी दुःख व कष्ट कसे असते हे माहीतही नव्हते. अशा परिस्थितीत मला बायको व



मुलांनी घरातून हाकलून लावले आणि मी या अरण्यात आलो. माझे नाव समाधी. आपली ओळख? आपल्या चेहऱ्यावरून आपण कोणी थोर कुळात जन्मल्यासारखे दिसतां?"

"माझे नाव सुरथ. मी एक राजा आहे. शत्रूच्या हाती पराभव होऊन तुझ्यासारखाच अनाथ होऊन इकडे आलो. मान अपमान सर्व विसरून या अरण्यात तोंड लपवून राहतो आहे. दैववशात आपण परस्परांना भेटलो. म्हणून सर्व दुःख विसर आणि आपण सुखासमाधानाने येथे राहू."

सुरथाने त्याला आपला परिचय देऊन थोडा धीर दिला.



वैश्य म्हणाला–"राजा, माझ्या मनाला शांती कोठून मिळणार? मला संसाराचे सुख लाभले नाही. कुटुंबाचा आधार तुटला. माझी मुले उनाड निघाली. मी अळणी पेज व कण्या खाऊन जे चार पैसे जमविले होते ते सर्व त्यांनी उडविले आणि भिकारी होऊन दारोदारी फिरण्याची पाळी त्यांच्यावर येते की काय ही काळजी मला वाटते आहे. मी जिवंतपणी पुन्हां कधी त्यांना पाहू शकेन की नाही याचीच शंका मला वाटू लागली आहे!" असे म्हणत तो वाणी अश्रू ढाळू लागला.

सुरथाला त्याची कीव आली व म्हणाला–"तुला घरातून हाकलून लावणाऱ्या बायको व पोरासाठी तू कशाला रडतोस. त्यांना भेटून तरी तुला काय सुख मिळणार आहे? राज्य गेले म्हणून मीसुद्धा दुःखी आहे. दुर्दैवाने ज्या संकटांना तोंड द्यावे लागते ती भोगावीच लागतात. तरी इकडे एक मुनी आहेत, त्यांना विचारून आपले दुःख कमी करायला काही उपाय आहे का विचारू या."

दोघे मुनीकडे गेले व दूर उभे राहिले. सुरथ म्हणाला–"हा एक वैश्य आहे. या अरण्यातच याची व माझी ओळख झाली. या धर्मभीरू माणसाला याच्या बायको व पोरांनी घरातून हाकलून लावले. म्हणून हा आपल्या आश्रयाला धावत आला आहे. आपण मला आश्रय दिलात तसाच यालाही आपल्या चरणी आश्रय द्यावा. आपल्या कृपेने माझे दिवस येथे आनंदाने जात आहेत. परंतु मला ज्या कष्टांना तोंड द्यावे लागले ते कष्ट विसरू न शकल्यामुळे मला झोप लागत नाही. मुनिवर्य! आपण आम्हां दोघांवर कृपा करून आमचं दुःख दूर होण्यास एकादा मार्ग सुचवा."

त्यावर मुनी म्हणाले–"ब्रह्मा, विष्णू व महेश या त्रिमूर्तींनासुद्धा मायामोहाला बळी पडल्यामुळे कष्ट सहन करावे लागतात, मग तुमच्या आमच्या मानवांची कथा



काय सांगावी? मी यासंबंधी एक गोष्ट सांगतो." असे सांगून मुनी गोष्ट सांगू लागले.

फार पूर्वी त्रेतायुगात श्वेतद्वीप नावाच्या बेटावर नारायण तपश्चर्या करीत असतां तेथेच ब्रह्मदेव मोहपाशातून सुटका मिळावी यासाठी तपश्चर्या करू लागला. काही काळ लोटल्यावर दोघे आपापल्या जागेवरून उठून जात असता एका जागी अकस्मात भेटले व परस्परांना 'तू कोण' व 'तू कोण' असे विचारू लागले.

"मी चराचर सृष्टीचा कर्ता ब्रह्मदेव आहे!" असे ब्रह्मदेव म्हणाला.

ते ऐकून विष्णू म्हणाला–"सर्व जगताची सृष्टी तू केलीस, हे तू माझ्याजवळ सांगतोस काय? मी कोण आहे, माहीत आहे का तुला? मी आहे, विष्णू! मीच ही सर्व सृष्टी निर्मिली. मी मधुकैटभांचा वध करून तुझे रक्षण केले होते, विसरलास वाटतं? तुला गर्व चढलेला दिसतो आहे, तुझ्यातल्या रजोगुणामुळे! मीच तुला वाढविला, राक्षस तुझ्या अंगावर चालून आले तेव्हां तू पळ काढलास; या सर्व गोष्टी तू विसरलास आणि माझ्यासमोर फुशारक्या मारतो आहेस का?"

"तू राक्षसांशी युद्ध केलेस तेव्हां जगदंबा तुझ्या मदतीला आली होती, ती



गोष्ट तू विसरलास वाटते? म्हणून आपल्या शौर्याच्या फुशारक्या मारतो आहेस!" ब्रह्मदेव म्हणाला.

दोघे परस्परांशी भांडत असतां त्यांना एक शिवलिंग दिसले आणि त्या पाठोपाठ त्यांच्या कानावर हे शब्द पडले.

"अरे नारायणा! अरे ब्रह्मदेवा! तुमचा हा वादविवाद बंद करा पाहू. मी सांगतो ते ऐका. या श्वेतद्वीपावर आतांच जन्मलेले हे जे शिवलिंग आहे त्याचे शिखर कोठे आहे हे एकाने व त्याचे मूळ कोठे आहे दुसऱ्याने पाहून येऊन सांगितले पाहिजे. जो पहिल्याने येऊन सांगेल तो दोघांत मोठा ठरेल."



दोघांनी होकार दिला. शिवलिंगाचे मूळ पाहून येण्यासाठी विष्णू पाताळात गेला आणि त्याचे टोक पाहून यायला ब्रह्मदेव आकाशात गेला.

विष्णू खूप पाताळात गेला तरी त्याला शिवलिंगाचे मूळ लागले नाही. कदाचित मूळ आपल्याला सांपडणारच नाही, या विचाराने विष्णू फार चिंतित झाला.

तसाच ब्रह्मदेव आकाशात खूप वर गेला तरी त्याला शिवलिंगाचे शिखर दिसले नाही. त्याला त्याबद्दल फार दुःख व लाज वाटली. काय करावे हे त्याला सुचत नव्हते. तो विचार करीत एका जागी उभा असतां वरून जमिनीकडे एक केवड्याचे फूल पडत असलेले दिसले. ब्रह्मदेव ते धरून मोठ्या आनंदाने विष्णू होता त्या जागी आला व म्हणाला–"मी शिवलिंगाचे शिखर पाहून त्यावरचे हे केवड्याचे फूलसुद्धा आणले आहे, पहा."

तेव्हां विष्णूने त्या फुलाला विचारले–"काय रे, ब्रह्मदेव खरोखरच शिवलिंगाचे शिखर पाहून आला का? देवांनी तुला शिवलिंगावर वाहले होते का?"

"होय!" असे केवड्याचे फूल खोटे बोलले.

विष्णूला ते फूल म्हणाले ते खरे वाटले नाही, व म्हणाला–"जगात लोक पैशासाठी खोटी साक्ष देतात. या बाबतीत शंकराला सोडून कोणाच्याही बोलण्यावर माझा विश्वास बसणार नाही."

तत्काळ ते शिवलिंग अंतर्धान पावले. शिवप्रगट होऊन विष्णूला म्हणाला–"केवडा खोटे बोलला. केवड्याचे फूल माझ्या डोक्यावरून खाली पडत असतां वाटेत ब्रह्मदेवाने ते धरले व आणून दाखविले. तो माझ्या डोक्यापर्यंत पोहोचू शकलाच नाही."

शंकराने लगेच केवडा त्याच्या पूजेला वर्ज्य असल्याचे जाहीर केले. त्यानंतर ब्रह्मदेव व विष्णू आपापल्या घरी निघून गेले."





मुनी सुरथाला व समाधी नावाच्या वैश्याला ही गोष्ट सांगून म्हणाले–"बाबा रे! मोहाला जिंकणे फार कठीण. क्वचितच कोणाला ते साध्य होते. मोठमोठे नीतिवान व बलवानसुद्धा मोहपाशात सापडतात. मोहाला वश न होणारी एकटी जगदंबाच आहे. तिला ओळखून तिची आराधना करू शकणारालाच मोहपाश तोडता येतात."

"मुनिवर्य! त्या देवीच्या आराधनेच्या स्वरूपाचे वर्णन कराल का?" सुरथाने मुनीला विचारले.

मुनी म्हणाले–"अंबेची पूजा शुभप्रद असते. ती सर्व इच्छा पूर्ण करते. आश्विन महिन्यातल्या शुक्लपक्षात जी नवरात्र असते तेव्हां या देवीचे व्रत असते. चैत्र शुक्ल नवरात्र असते तेव्हांही हे व्रत पाळावे लागते. व्रत घेणाऱ्याने निराहार राहून तिच्या मंत्राचा जप करीत तूप, दूध व साखर मिसळून तयार केलेली जी खीर असते तिची किंवा बकऱ्याच्या मांसाची किंवा बिल्व पत्राची आहुती देऊन होम करावा. ब्राह्मणांना जेवण घालावे. नऊ दिवस अशी आराधना करणाऱ्याने जातिभेद मानू नये. स्त्रीपुरुषभेद मानू नये. प्रजेसाठी षटकोनी वेदिका, त्याच्या शेजारी अष्टकोनी वेदिका तयार करून नवाक्षरी बीजमंत्र म्हणून प्राणप्रतिष्ठा करावी. मंडल करून मधोमध तांब्याचे पात्र ठेवावे आणि त्याची षोडशोपचार पूजा करावी. होम, होमाचा दशांश तर्पण, तर्पणाचा दशांश ब्राह्मण भोजन इत्यादीसाठी खर्च करावा, दहाव्या दिवशी पारण करावे. असे व्रत करणाऱ्याला उत्तम लोकाची प्राप्ती व देवीचे सहाय्य लाभते."

"राजा! देवीच्या आराधनेची बरोबरी करू शकेल अशी दुसरी आराधना किंवा व्रत नाही. देवीची आराधना केल्यास तुझ्या अप्तेष्टांची पुन्हां गाठभेट होईल. हे वैश्यवर्या! तुसुद्धां देवीची आराधना कर. तुझे दुःख दूर होईल व तुला पुन्हां धनप्राप्ती होईल."

मुनी म्हणाले ते ऐकून दोघे आनंदाने म्हणाले–"महात्मन्! आपल्या कृपेने आमची मनोव्यथा दूर झाली, आपण आम्हांला त्या मंत्राचा उपदेश करावा."

मुनीने त्यांना नवाक्षर मंत्राचा बीजसहित उपदेश केला. दोघांनी मुनीचा निरोप घेतला आणि एका नदीच्या काठी निर्जन स्थान पाहून फक्त पालवी किंवा पानांचा आहार घेऊन दोन वर्षे त्या मंत्राचा जप केला. एके दिवशी त्यांना स्वप्नात देवीचा दृष्टांत झाला. ती लाल वस्त्रे धारण करून आली होती. तरी त्यांनी मंत्रजाप चालू ठेवला आणि तिसरे वर्ष फक्त पाणी पिऊन व्रत चालू ठेवले. तरी देवीचा साक्षात्कार झाला नाही. त्यांनी शेवटी आत्माहुती देण्याचे ठरविले. त्यांनी एक कुंड तयार करून अग्नी पेटविला आणि आपले मांस कापून त्याची आहुती देणार इतक्यात देवीने प्रत्यक्ष होऊन दर्शन दिले.

"मी तुमच्या तपश्चर्येवर प्रसन्न झाले आहे, मागून घ्या!" देवी म्हणाली.

सुरथ म्हणाला–"माते, मी शत्रूच्या हाती पराभूत होऊन राज्यभ्रष्ट झालो. आज इतक्या दिवसांनी माझे पुण्य फळास पावले व तुझे दर्शन घडले. मला माझे राज्य परत देववून माझे कष्ट दूर कर."

"तुझ्या हाती शत्रूचा पराभव होईल. तुझे मंत्री तुझी सेवा करण्यास तुझ्याकडे येतील. तू सहस्र वर्षे सुखाने राज्य करशील. तुझे चांगले दिवस जवळ आले आहेत." देव म्हणाली.

सुरथ आपल्या घोड्यावर बसून परतला. त्याने शत्रूला जिंकले आणि राज्योपभोग घेऊन शेवटी त्याला देवीच्या चरणी सायुज्य मुक्ती प्राप्त झाली.

वैश्य म्हणाला–"देवी! मला धनसंपदा नको, मला शाश्वत सुख दे!" देवीने त्याला दिव्यज्ञानाची प्राप्ती करून दिली. तो आजीवन सर्व संगपरित्याग करून तीर्थयात्रा करीत राहिला. त्याला सायुज्यमुक्ती प्राप्त झाली.



# आरोप सिद्ध झाला

एका देशात एक श्रीमंत व्यापारी रहात असे. त्याला तीन मुलगे होते. मरण समयी त्याने आपल्या तिघां मुलांना जवळ बोलाविले व म्हणाला–"बाबांनो! मला यमराजाचे बोलावणं घेऊन यमदूत माझेकडे आले आहेत. मी पुष्कळ मिळवून ठेवले आहे. माझ्या मी तुमच्यासाठी इस्टेटीतले सर्वात जास्त मूल्यवान म्हणजे ही तीन रत्ने आहेत. तुम्ही तिघांनी काही कारणाने वांटेच करायचे ठरविलेत तर तुम्ही ही रत्ने एकेक करून वांटून घ्या. तिन्हींची किंमत सारखीच आहे."

वडील वारल्यावर काही दिवसांनी भावंडांनी निरनिराळे रहावयाचे ठरविले. सर्व इस्टेट वाटून घेऊन तिन्ही रत्ने वांटून घेण्यासाठी तिजोरी उघडून पाहिली तर तिजोरीत दोनच रत्ने होती. तिसरे रत्न कोणीतरी चोरले हाच त्याचा अर्थ होता. चोर तिघां भावंडांपैकीच एक होता. आणखी कोणी असण्याची शक्यताच नव्हती.

सर्वांत थोरल्याने सुचविले–"आपल्या तिघांपैकी कोणीतरी एकाने हे रत्न काढून घेतले आहे. परंतु आपण परस्परांवर आळ ठेवून परस्परांची निंदानालस्ती करणे बरोबर होणार नाही. चोरी करणाराला आपण चोरी केली असल्याचे सांगणे इष्ट नसणार व लाज संकोचही वाटेल. म्हणून कोणाचा ही अपमान होऊ न देता, कोणावर आळ आरोप येऊ न देता चोरी करणाराने उद्याच्या आत चोरलेले रत्न स्वतःच जागच्या जागी नेऊन ठेवावे."

"असे झाले नाहीतर?" दुसऱ्याने विचारले.

"तिघांनी राजाकडे जाऊन फिर्याद करायची. अपराधी कोण हे ठरविण्याचा

२५ वर्षां पूर्वीची चांदोबातली गोष्ट



अधिकार राजाचा आहे, नाही का?" थोरला म्हणाला.

आणखी एक दिवस उलटला. चोरी गेलेले रत्न यथास्थानी पोचले नाही. त्याच दिवशी तिघे भाऊ राजाकडे गेले व घडलेले वृत्त सांगून चोर कोण या गोष्टीचा निवाडा द्यायला त्यांनी विनंती केली.

ती विनंती ऐकून राजा आश्चर्यचकित झाला. कारण राजा तिघांना चांगला ओळखत होता. म्हणाला–

"तुमचे वडील एक धर्मभीरू व्यापारी होते. माझे स्नेही होते. त्यांच्या मुलांनी माझ्याकडे येऊन अशी विनंती करावी ही आनंदाची गोष्ट आहे, तशीच दु:खाचीही गोष्ट आहे. तुम्ही परस्परांमध्ये हा पेच सोडवू न शकल्यामुळेच माझ्याकडे आलात तुमचे हे काम मी थोड्याच दिवसात उरकतो. तोंपर्यंत तुम्ही दुर्गाक्का यांच्या घरी जाऊन रहा. मी तुमच्या राहण्याची व जेवणाखाण्याची सर्व व्यवस्था तिला सांगून करवितो."

तिघे भाऊ दुर्गाक्काच्या घरी जाऊन राहू लागले. दिवसांमागून दिवस लोटले. राजा रात्रंदिवस विचार करीत होता, तरी हा पेच कसा सोडवावा, चौकशी कोठे व कशी करावी हा निर्णय करू शकला नाही. शेवटी राजाने दुर्गाक्काकडे निरोप पाठवून तिला बोलावून घेतले व म्हणाला–

"अक्का, तुम्हांला तुमच्या पाहुण्यांपासून काही त्रास बीस तर नाही ना?"

"नाही महाराज! काही नाही! तिघे भाऊ किती चांगली मुलं आहेत. त्यांच्यापैकी एकाच्याही वागणुकीत मला दोष दाखविण्यासारखे मला काही दिसलं नाही!" दुर्गाक्का म्हणाली.

"म्हणून तर पंचाईत झाली ताई. या तिघांपैकी कोणीतरी धाडसी चोर आहे, एवढेमात्र खरे!" राजा म्हणाला.

दुर्गाक्का चकितच झाली. तिने जास्त माहिती विचारली. राजाने सर्व वृत्त सविस्तर सांगितले.

"तरमग त्यांच्यात कोण चोर आहे, हे मी काढते शोधून, महाराज! आपण मुळीच काळजी करू नये." दुर्गाक्का म्हणाली.

त्या दिवशी रात्री दुर्गाक्काने तिघां भावंडांना जेवायला वाढतांना एक गोष्ट सांगितली. ती गोष्ट अशी:

"कोणे एके काळी सिंहकेतू नावाचा एक राजा होता. त्याला गुणवती नावाची एकुलती एक मुलगी होती. त्या मुलीला वयात येईपर्यंत एका गुरुकरवी शिकविण्याची व्यवस्था करण्यात आली. लग्नाचे वय होताच वरशोधनासाठी चौकशी सुरू झाली. तिचा विद्याभ्यास थांबला. ती एके दिवशी अनेक वस्त्रे व आभूषणे घेऊन व गुरुदक्षिणेसाठी मोठी रक्कम घेऊन गुरुकडे गेली. परंतु गुरू एकाही वस्तूला शिवलादेखील नाही व म्हणाला–'तू गुरुदक्षिणाच देणार असशील तर तू लग्न होऊन सासरी जाण्यापूर्वी एके दिवशी रात्री सुंदर वस्त्रे व दागिने वगैरे घालून एकटी ये!' गुणवती 'बरं!' म्हणून निघून गेली.

"त्यानंतर काही दिवसांनी तिचे लग्न झाले. लग्नाच्या दिवशीच रात्री तिने तिच्या पतीला, गुरूने जशी गुरुदक्षिणा मागितली होती ती सांगितली. नवरा म्हणाला–'बरं तर जा!'

गुणवती सुंदर साडी नेसून व सर्व दागिने घालून गुरूच्या घरी निघाली असतां वाटेत एका चोराने तिला अडविले व सर्व दागिने काढून द्यायला सांगितले. नाहीतर तिला





सुरा भोसकीन, असे ही म्हणाला. गुणवतीने ती गुरूकडे जात असल्याचे सांगितले व परत येते वेळी सर्व दागिने काढून देण्याचे वचन दिले.

चोराने तिला जाऊ दिले.

गुणवती गुरुगृही पोचली, गुरू आपल्या शिष्येच्या खरे बोलण्यावर खूष होऊन म्हणाला–"मुली! मी तुला आजपर्यंत जे शिकविले ते सार्थक झाले. तुझ्यावर कोणते संकट येणार आहे हे माहीत असूनही तू दिलेले वचन पाळलेस! तीच मी गुरुदक्षिणा मानतो. तू आता परत जा व पतिगृही राहून सुखाने संसार कर." या शब्दांत आशीर्वाद देऊन गुरूने तिला निरोप दिला.

गुणवती गुरूला नमस्कार करून परत येत असतां तो चोर वाटच पहात होता. आपले दागिने काढून देत ती म्हणाली– "हे घे बाबा, माझे दागिने!"

ते ऐकून चोराचे मन पालटले. तिने गुणवतीचे पाय धरले व म्हणाला–"माते, क्षमा कर, तुमच्यासारखी नीतिवान माणसे ज्या जगात रहातात त्या जगात चोरी करून आयुष्य घालविणे मला शक्य नाही!" असे म्हणत चोर निघून गेला.

गुणवतीने नवऱ्याकडे परत येऊन घडलेले वृत्त सांगितले. तिच्या पतीला फार आनंद झाला. त्यानंतर दोघांचा संसार दीर्घकाळ सुखाचा झाला.

दुर्गाक्काने सांगितलेली ती गोष्ट ऐकून व्यापाऱ्यांच्या तिघां मुलांना फार आनंद झाला.

दुर्गाक्का म्हणाली–"परंतु मला एका गोष्टीची शंका येते. या गोष्टीतली सर्वच माणसं थोर दिसत आहेत. तरी सर्वांत जास्त थोरपण कोणाचं म्हणावयाचं? ही शंका माझ्या मनात फार दिवसांपासून राहून गेली आहे. तुमच्यापैकी कोणी माझ्या या शंकेचे समाधानकारक उत्तर देऊ शकेल का?"

थोरला काही वेळ विचार करून म्हणाला– "लग्नाच्या दिवशीच रात्री आपल्या बायकोला गुरूकडे पाठविणारा पतीच, माझ्या मते थोर मनाचा होता."

मधला म्हणाला–"त्याच्याहून गुरूचे औदार्यच थोर होय!"

सर्वांत धाकटा म्हणाला–"हातात आलेले दागिने न घेतां राजकन्येला जाऊन देणारा चोरच मोठा उदार म्हणावा लागेल!"

"नवऱ्याचा राग, गुरूकडून होणारा अपमान आणि धाडस यांना निधडचा छातीने तोंड देणारी राजकन्या तुमच्यापैकी एकालाही थोर वाटली नाही का रे, मुलांनो!" म्हणत दुर्गाक्का थोडी हसली.

त्याच दिवशी दुर्गाक्का राजाला भेटून म्हणाली–"महाप्रभो! माझ्या घरी रहात असलेल्या तिघां वैश्य भावंडांत माझ्या मते सगळ्यांत धाकटाच चोर असला पाहिजे! आपण चवकशी करून खात्री करून घ्यावी पाहिजे तर!"

राजाने तिला तिचे तसे मत होण्याचे कारण विचारले. दुर्गाक्काने तिने सांगितलेल्या गोष्टी संबंधी जे घडले होते ते सर्व सांगितले व म्हणाली–"तो मुलगा धनलोभी नसेल तर चोराच्या औदार्याची स्तुती त्याने केली नसती!"

राजाने, दुर्गाक्का म्हणाली त्यात सत्यांश असल्याचे ओळखून तिच्या हुशारीची वाखाणणी केली.

दुसऱ्या दिवशी त्याने तिघां मुलांना बोलविले व म्हणाला–"तुमच्या तिजोरीत उरलेली दोन रत्ने मोठ्या दोघांनी घ्यावीत, माझा हा निवाडा आहे!"

धाकटा आपल्या दोघां भावांकडे मान वर करून पाहू न शकल्यामुळे मान खाली करूनच उभा राहिला व राजाने जो निवाडा दिला त्या विरुद्ध एक चकार शब्दही तोंडावाटे त्याने काढला नाही. त्यानंतर तिघे भाऊ आपापल्या घरी निघून गेले. पित्याने मागे ठेवलेली इतर इस्टेट त्यांनी आपसात समसमान वाटून घेतली.

त्यानंतर कधी रत्न कोणी चोरून नेले, याविषयी कोणी कोणाजवळ बोललादेखील नाही. तिघे परस्पर प्रेमाने राहू लागले.






**लक्ष्मण, हल्लूर (कर्नाटक)**

प्र. : अशोक आणि कनिष्क या राजांनी भारतातील सर्व प्रांतांत व देशांत बौद्ध धर्माचा प्रचार केला. परंतु भारतात बौद्धधर्म का लयास गेला? जैनमत अद्याप कसे काय जीवित आहे?

उ. : बौद्धमत हे चक्रवर्तित्वाला अनुकूल असे मत होते, असे सांगतात. साम्राज्य स्थापित करणाऱ्या मगधाचे राजे, बौद्धमत स्वत: स्वीकारले असो किंवा नसो, बौधमताचा आदर करीत व त्याला प्रोत्साहन देत. बौद्धमत हे हिंसेशिवाय साम्राज्याला बळकट राखू शकते हे अशोकाने आपल्या काळात दाखवून दिले. अहिंसेद्वारे जगात पसरलेल्या एका बौद्धधर्माशिवाय दुसरे एकही मत नाही. साम्राज्य नष्ट होऊन प्रान्तीय राजे स्वतंत्र झाल्यानंतर आपल्या देशातून बौद्धधर्माचे उच्चाटन झाले. वर्णाश्रम धर्माशी सलोखा करू न घेतल्यामुळे बौद्धमत या देशात टिकू शकले नाही, व जैनमत हात मिळवणी करूनही टिकू शकले असे सांगतात. म्हणूनच ते देशाबाहेर व्याप्त होऊ शकले नाही.

**बी. नारायणराव, चीपुरुपल्ली (आंध्र)**

प्र. : सूर्योदयसमयी किंवा सूर्यास्तसमयीच सूर्य आणि पौर्णिमेला उदय किंवा अस्त समयीचा चंद्र लाल असतो, त्याचे काय कारण?

उ. : उदयाच्यावेळी सूर्य व चंद्राच्या किरणांना भूमीपर्यंत पोचायच्या आधी पृथ्वीच्या चारी बाजूला पसरलेल्या हवेच्या थरांतून बरेच दूर जावे लागते. म्हणून सूर्यचंद्रांच्या किरणात जे विविध रंग असतात ते हवेत प्रसरण पावतात. इतर सर्व रंगांपेक्षा फार दूर पसरू शकणारा लाल रंग असतो. तोच उदयास्तसमयीं आपल्याला दिसतो. ध्वनितरंगांचेसुद्धां असेच असते. दुरून येणाऱ्या बँड'पैकी किंवा वाजंत्र्यांपैकी आपल्याला आधी ऐकू येतो तो 'ड्रम' व नगारा ध्वनितरंगांत जास्त दीर्घ तरंग त्याचेच असतात.

अशाच तऱ्हेने सूर्यप्रकाशात सहजी प्रसरण पावणारे व अत्यंत ह्रस्व असे निळ्या रंगाचे कांति तरंग असतात. हवेच्या थरात ते प्रसरण पावून राहून गेल्यामुळे आकाश निळे असल्यासारखे भासते.



# अघटित अनपेक्षित

[८०]

अतिलोभी 'हवेतल्या हवेल्या' ही गोष्ट ऐकून म्हणाला–"तो ब्राह्मणसुद्धा निष्फळ वासनांच्या मागे लागून जवळ होते ते देखील घालवून बसला."

अत्यंतलोभी म्हणाला–"होय, ते खरे आहे. परंतु तो ब्राह्मण जे घालवून बसला आणि सर्व अंगावर त्याने पाडून घेतले ते फक्त सातूचे पीठच होते ना! आणि मी घालवून बसलो ते सोने होते आणि मला रक्तस्नान घडले! किती विचार केला तरी माणसाचे प्रारब्ध ठरते ते विधिलिखित असते त्या प्रमाणेच!"

अतिलोभी उत्तर देत म्हणाला–"मित्रा! हे चक्र तुझ्या डोक्याचे मंथन करीत आहे व तुला रक्तस्नान घालीत आहे, ते पाहून मला वेड्यासारखे झाले आहे आणि माकडाला जे कष्ट सहन करावे लागले ते पाहणेसुद्धा असह्य झाल्यामुळे पळून गेलेल्या राक्षसासारखे पळून जावेसे वाटते आहे."

अत्यंतलोभीने विचारल्यावरून अतिलोभीने ती कथा सांगितली. ती कथा अशी :

**फसलेल्या राक्षसाची गोष्ट**

एका गावी भद्रसेन नावाचा राजा रहात असे. त्याला रत्नवती नावाची एक सर्वगुणसंपन्न सुंदर मुलगी होती. तिचे सौंदर्य पाहून एका राक्षसाने तिला पळवून नेण्याचा प्रयत्न केला. परंतु तिने अनेक युक्त्या केल्यामुळे राक्षसाला तिला पळवून नेणे शक्य झाले नाही.

एकदा तो राक्षस लपून बसला असता राजकन्या एका सखीला म्हणाली–"सखी! प्रदोष राक्षस मला पळवून नेण्यासाठी संधीची वाट पाहातो आहे. त्याला कसे अडवायचे ग?"



राक्षस ते ऐकून विचार करू लागला– "माझ्याच सारख्या दुसऱ्या राक्षसाचे हिच्यावर प्रेम आहे, वाटते. ही आतापर्यंत मला जशी अडवू शकली तशी त्याला अडवू शकली नसावी. तेव्हां हा दुसरा राक्षस कोण व कसा आहे, हे प्रथम पाहिले पाहिजे." असा विचार करून घोड्याचे रूप घेऊन तो राक्षस घोड्यांच्या तबेल्यात गेला.

त्या दिवशी रात्री घोड्यांची चोरी करणारा एक चोर राजाच्या तबेल्यात शिरला आणि सर्व घोड्यांहून चांगला बळकट दिसणारा घोडा आहे असे समजून घोड्याच्या रूपात असलेल्या राक्षसावर चढून पळू लागला.

त्याने चोरून आणलेला घोडा खूप वेगाने धावत असलेला पाहून चोराला पहिल्याने फार आनंद झाला. परंतु त्यानंतर त्याला भीती वाटू लागली आणि त्याने सर्व बळ एकवटून घोड्याचा लगाम ओढला. परंतु घोड्याचा वेग कमी होण्या-ऐवजी वाढला. कारण राक्षसाला वाटले की त्याच्यावर बसलेली व्यक्तीच प्रदोष राक्षस असली पाहिजे.

त्याच प्रमाणे चोरसुद्धा घाबरला. कारण लगाम जितका जास्त जोराने ओढला तितका घोड्याचा वेग वाढत गेला. असा घोडा त्याने जन्मात कधी पाहिला नव्हता. "हा घोडा नसून एखादे भूत असावे!" असा विचार करून चोर वाटेत एका वडाच्या पारंब्या धरून झाडावर चढला.

प्रदोष राक्षसाने आपल्याला सोडले असा वाटून राक्षसालासुद्धा हायसे वाटले.

परंतु त्याच झाडाच्या वरच्या फांदीवर एक माकड होते. त्याने त्याचा मित्र राक्षसच घोड्याच्या रूपात असल्याचे ओळखले व म्हणाला–"अरे, तुझ्यावर स्वारी करून आला होता तो एक सामान्य माणूसच होता. तुला सहजी भक्षण करतां येईल असा! तू त्यात काय फसलास बाबा?"

माकड म्हणाले ते ऐकून चोराने माकडाची शेपटी धरली आणि त्याला ओढले.



माकड फांद्यांच्या सांधीत सापडले आणि चोर शेपटी ओढीत असल्याने घाबरून गेले. चोर माकडाची शेपटी चावू लागला. माकडाला वेदना असह्य झाल्या. राक्षस त्या माकडाच्या रडक्या तोंडाकडे पाहून व त्याची अवस्था ओळखून म्हणाला–"हा प्रदोष राक्षस किती भयंकर आहे, हे तुझी जी दुर्गत झाली आहे, त्यावरूनच कळते. नको रे बाबा, मी पळतो!" असे म्हणत राक्षस पळून गेला.

अतिलोभीने सांगितलेली ती गोष्ट ऐकून अत्यंतलोभी म्हणाला–"विधिलिखित अनुकूल असले की वध करण्याचे प्रयत्न झाले तरी ते कल्याणकारी ठरतात, हे आंधळ्याला, मुक्याला आणि तीन स्तन असलेल्या राजकन्येला आलेल्या अनुभवा-वरून कळते."

"मित्रा, ती गोष्ट सांग की रे!" असे अतिलोभीने विचारल्यावरून अत्यंतलोभी ती कथा सांगू लागला.

### तीन स्तन असलेली राजकन्या

मधुसेन हा मथुरेचा राजा होता. त्याला तीन स्तन असलेली एक मुलगी झाली. अशी एक विलक्षण मुलगी झाल्याचे ऐकून राजा प्रतिहारीला म्हणाला–"त्या मुलीचे तोंडही मला दिसतां कामा नये. तिला उचलून नेऊन कोठे तरी अरण्यात सोडून ये."

प्रतिहारी उत्तरला–"महाराज, तीन स्तनाची मुलगी ही बापाला अशुभ असते,



असे मी ऐकले आहे. तरी आपण कोणांनिदा आणि पापाचं फळ भोगावं लागू नये यासाठी काय करावे, हे माहीतगार लोकांना विचारून घेणे बरोबर होईल. विचार करून काम करणाराची बुद्धी सूर्यकिरणांचा स्पर्श होताच विकास पावणाऱ्या कमळासारखी विकास पावते, म्हणे. म्हणून अज्ञानी व्यक्तीने नेहमी प्रश्न करून व ज्ञान वाढवून पुढे पाऊल टाकावे. मागे एका ब्राह्मणाने प्रश्न करून त्याच्या मानेवर बसलेल्या भुतापासून स्वत:ची सोडवणूक करून घेतली होती, म्हणे."

"ती कथा सांग." राजाने विचारल्यावरून प्रतिहारी गोष्ट सांगू लागला :

एका अरण्यात चंडकर्म नावाचे भूत रहात असे. एकदा ते अरण्यात फिरत फिरत एका ब्राह्मणाला पाहून त्याच्या मानेवर बसले व म्हणाले–"चल!"

ब्राह्मण घाबरून जाऊन चालू लागला. ब्राह्मणाने त्या भुताचे पाय नाजुक व सुकुमार असल्याचे पाहून त्या भुताला विचारले–"काय रे, तुझे पाय किती सुंदर आहेत, त्याचे कारण काय?"

भूत म्हणाले–"मी एका नियमाचे पालन करतो. मी कधी ओल्या पावलांनी जमिनीवर चालत नाही. म्हणून माझे पाय इतके मऊ व सुकुमार आहेत."

ते ऐकल्यावर त्या भुतापासून स्वत:ची सुटका करून घ्यायची युक्ती ब्राह्मणाला सुचली.

थोडया वेळाने तो ब्राह्मण भुताला घेऊन एका तलावाच्या काठी आला. भूत म्हणाले–"मी या तलावात आंघोळ करून पुजा वगैरे आटपून येतो. तोपर्यंत तू येथेच थांब. येथून हालूडोलू नकोस."

तेव्हां ब्राह्मणाने विचार केला–"हे भूत आंघोळ करून व पुजा वगैरे आटोपल्यावर नक्कीच मला स्वाहा करणार. तेव्हां हीच वेळ स्वत:ची सुटका करून घ्यायला उत्तम आहे." आणि तो तत्क्षण तेथून पळाला. ओल्या पायांनी जमिनीवर भूत चालणार नाही. हे माहीत होते ना!





# भल्लूक मांत्रिक

[ २० ]

[ बैरागी शिष्यांनी मंत्रदंडाचा प्रताप पाहण्यासाठी तो जमिनीवर आपटला तेव्हां तेथे एक भुयार निघाले. आत काही तरी ठेवा सापडेल या आशेने बैरागी व त्यांचा गुरु भुयारात शिरले. त्याच सुमारास तलावाच्याजवळ चांडाळ भल्लूक आला. त्याने एका रानटी माणसाला पाहिले. तो हत्तीवर बसून त्या रानटी माणसाकडे धावला. पुढे–]

**चां**डाळ भल्लूकाचे ते भयंकर रूप पाहून व त्याही पेक्षा त्याच्या हातातला तो तळपणारा परशू पाहून पळून जायचा विचार रानटी माणसाच्या मनात आला असूनही व आतां पळालों तर जिवाला धोका आहे हे ओळखून तो जागच्या जागी उभा राहून थरथर कांपत म्हणाला–"मालक, मी गेला सबंध आठवडाभर या अरण्यात विचित्र माणसे व एका राक्षसाला पहात आलो आहे. परंतु मी त्यांच्या पैकी एकाशीही काही बोललो नाही. मी तुम्ही म्हणालात त्या मायावी मर्कटाला पाहिले नाही. एका तांबडे कपडे घातलेल्या व डोक्यावरचे केस उलटे डोक्यावर बांधलेल्या एका व्यक्तीला शंख वाजवीत–'शिष्या, मायावी मर्कटा! अशा हाका मारीत असतांना मी अवश्य ऐकले आहे!"



त्या रानटी माणसाच्या तोंडचे ते बोलणे ऐकून चांडाळ भल्लूकाला कमालीचे आश्चर्य वाटले व त्याने किंकर्तव्य विमूढ स्थितीत आपला परशू जमिनीवर उभा टेकून ठेवून त्या रानटी माणसाला विचारले–"काय रे, तू म्हणतो आहेस ते दुर्लक्ष करण्यासारखं नाही, फार महत्वाची बातमी सांगितली आहेस, असे मला वाटते आहे. या मागचे गुपित माझे मालक कालीवर्मा यांनाच माहीत असणार. तू पळून जाऊ नकोस. तुला भ्यायचे मुळीच कारण नाही."

रानटी शिकारी देखील चकित होऊन म्हणाला–"चांडाळ भल्लूक मालक, हा रानटी माणूस सांगतो आहे, ते सर्व खरं असेलसे वाटते का? एक मांत्रिक व एक राक्षस उग्रदंड आपल्या बरोबरच तर आहेत. अशा परिस्थितीत आणखी एक मांत्रिक आणि एक राक्षस दोघे रानात फिरत आहेत हे कसं काय?"

"तेच मलासुद्धा कळत नाही. आपल्या भल्लूक मांत्रिकाचा प्रतिस्पर्धी म्हणून आणखी एखादा मांत्रिक तर नसेल!" नंतर त्या रानटी माणसाकडे वळून चांडाळ भल्लूकाने विचारले–"बरं पण काय रे, तू म्हणालास ते ढोंगी बैरागी आणि ते भुयार आहे तरी कोठे?"

तो रानटी माणूस चांडाळ भल्लूकाला बैरागी उतरून आत शिरले होते त्या भुयाराच्या तोंडाजवळ घेऊन गेला आणि त्या बैराग्यांनी मंत्रदंडाचा उपयोग करून जे विचित्र अद्भुत करून दाखविले त्या विषयीही सांगितले.

त्या बैराग्यांनी मायावी मर्कटाच्या हातातून तो मंत्रदंड चोरून नेला असावा, असे चांडाळ भल्लूकाला वाटले. तो मंत्रदंड कोणी चोरून नेला होता, हे आतांपर्यंत कळले नव्हते ते आतां सहजी कळले.

मंत्रदंडाविषयीची ही बातमी भल्लूक मांत्रिकाला व कालीवर्माला जाऊन सांगावी या विचाराने चांडाळ भल्लूक निघणार





इतक्यात कालीवर्मा घोड्यावरून तिकडे येऊन म्हणाला–"भल्लूका! आपले तंबू व डेरे घालायला ही जागा बरी दिसते आहे."

चांडाळ भल्लूक कालीवर्माच्या जवळ गेला व म्हणाला–"कालीवर्मा मालक! तंबू वगैरेंची गोष्ट मागाहून पाहू, पहिल्याने या रानटी माणसाला विचारून पहा, आपल्याला आश्चर्यचकित करून सोडणाऱ्या दोन गोष्टी याच्याकडून कळतील."

कालीवर्माने विचारल्यावर त्या रानटी माणसाने पुन्हा एकदां त्याने रानात पाहिलेल्या शंख वाजविणाऱ्या मांत्रिकाविषयी व राक्षसाविषयी आणि बैराग्यांना मंत्रदंड घेऊन भुयारात प्रवेश करीत असतांना त्याने पाहिले त्या विषयी सविस्तर सांगितले.

ते ऐकल्यावर कालीवर्मा भुयाराच्या तोंडाजवळ गेला व त्याने आत डोकावून पाहिले आणि आत सावधपणे उतरला. तो तेथल्या सर्व पायऱ्या उतरून गेला तेव्हा त्याला दूर थोडासा उजेड आणि त्याच्या आड तीन जण आत चालत असलेले दिसले.

कालीवर्मा लगेच भुयारातून बाहेर आला व चांडाळ भल्लूकाला म्हणाला–"भल्लूका, आपल्या शिकारी नोकराला येथे पहाऱ्याला उभा कर व तू स्वतः लगेच येथून नीघ आणि मांत्रिक गुरूला भेटून येथे जे काही ऐकलेस ते सर्व जाऊन सांग. मी भुयाराच्या वाटेने आत जाऊन त्या बैराग्यांच्या जवळचा तो मंत्रदंड परत मिळवितो."

चांडाळ भल्लूक निघाला व चार एक पावलेच गेला असेल, थांबून ओरडला–"कालीवर्मा मालक! आतां मंत्रदंड त्या बैराग्यांजवळ आहे, ही गोष्ट मात्र विसरू नका बरं का?"

कालीवर्मा भुयाराकडे वळला व तलवार उपसून म्हणाला–"भल्लूका! माझ्याजवळची ही सोन्याची मूठ असलेली तलवार आहे तिची महिमा काय आहे मी



सांगत नाही, एवढे मात्र खरे की ही मंत्रदंडाहून कमी मात्र नाही. ही माझ्या वडिलांच्या हातात असताना, हल्लीचा राजा जितकेतू आहे ना, त्याच्या वडिलांच्या सर्व शत्रूंचा शिरच्छेद हिने केला आहे. बहुतेक ही तलवार आता स्वतः जितकेतूचेच रक्त पिणार आहे!"

वडाच्या झाडावरून खाली उडी मारून आलेला रानटी माणूस काय करावे, न सुचल्यामुळे कावरा बावरा होऊन म्हणाला—"मालक, मी आता आपल्या वाटेने जाऊका?"

चांडाळ भल्लूकाचा रानटी शिकारी सेवक जवळ जाऊन त्याला म्हणाला—"काय रे! तू रानात राहणारा व मीही रानात राहणारा. पोटासाठी आपणा दोघांनाही रानोमाळ हिंडावेच लागते. म्हणून तूही कोणत्यातरी शक्तिसामर्थ्य असलेल्याच्या आश्रयाला राहून पुढले आयुष्य कां घालवू नयेस? या चंद्रशिला नगरीचा राजा जितकेतू फार दिवस सिंहासनावर राहणार नाही, असे मला वाटते आहे. तेव्हां जिंकणाऱ्याच्या बाजूने राहणाऱ्या आपल्या सारख्यांना राजदरबारी चांगली नोकरी मिळण्याची शक्यता आहे!"

तो रानटी माणूस रानटी शिकाऱ्याकडे आशेच्या मुद्रेने पहात म्हणाला—"शिकारी दादा, तुम्ही बरेच काही तरी सांगितलेत, ते सर्व बरोबर आहे. या दुष्ट व कुचकामाच्या जितकेतू राजाला सिंहासनावरून उतरवू शकणारा बलदंड आहे का कोणी?"

शिकारी भुयारात उतरून गेलेल्या कालीवर्माकडे बोट दाखवून म्हणाला—"त्यांचे नाव कालीवर्मा आहे. मागे जितकेतू राजाने त्यांचा फक्त अपमानच केला नाही तर शिरीषवनात त्याला नेऊन चांडाळाच्या हाती त्यांचा शिरच्छेद करविण्याची त्याने आज्ञासुद्धा दिली होती. आतां हे त्याच्यावर सूड उगविण्याच्या प्रयत्नात आहेत."

रानटी माणूस म्हणाला—"शिकारी दादा, तरमग मी सुद्धा तुमच्या बरोबरच आहे, समजा!" असे सांगून त्याने आनंदाने एक उडी मारली आणि रानटी शिकाऱ्याला मिठी मारली.

भुयारात उतरल्यावर कालीवर्माने गुढगाभर पाण्यात काही अंतर चालून गेल्यावर पुढे जात असलेल्या तिघां बैराग्यांना हाक मारली—"थांबा रे! मी येईपर्यंत!"

तो आवाज ऐकून तिथे बैरागी दचकले आणि मागे वळून पाहू लागले. बैराग्याचे दोघे शिष्य थरथर कापत म्हणाले—"गुरू! भुयारातल्या ठेव्याची राखण करणारा यक्ष असावा हा. आता आपला जीव घेणार तो!"

गुरु बैरागी सुद्धा क्षणभर बावरला आणि मागे वळून त्याने कालीवर्माकडे लक्षपूर्वक पाहिले व म्हणाला—"अरे ए, शिष्योपष्यांनो! आपण एवढे भिण्यासारखं काही दिसत नाही. ही येणारी व्यक्ती यक्षासारखी दिसत नाही. यक्ष खुजे असतात व त्यांचा आवाज किरटा असतो, असे आमच्या गुरुवर्यांकडून मी ऐकले आहे. हा तर आजानुबाहू बलदंड माणूस दिसतो आहे आणि याचा आवाजही खणखणीत आहे. आपण या मंत्रदंडाच्या सहाय्याने स्वर्ग संपादन करू या."

गुरु बैराग्याचे बोलणे पुरे व्हायच्या आत कालीवर्मा वेगाने त्यांच्याजवळ येऊन



म्हणाला—"तुम्ही कोण काय, हे मला सर्व माहीत आहे. माझ्या हातातली ही तलवार तुमच्या हातातल्या त्या मंत्रदंडापेक्षा जास्त शक्तिशाली आहे, लक्षात असू द्या! पाहतां का जरा?"

तळपत असलेल्या तलवारीकडे पाहूनच शिष्य बैराग्यांचा धीर खचला. म्हणाले—"गुरुवर्य! लौकर मंत्र म्हणून त्याला भस्म करा!"

गुरुबैरागी एक तर स्वतःच भयभीत होऊन थरथर कापत होता तरी मंत्रदंड उचलून काही तरी मंत्र म्हटल्याचे सोंग त्याने केले. त्याचा तो प्रयत्न निरुपयोगीच होता, त्यात कालीवर्मा त्याच्या-



जवळ आला व तलवारीचे टोक त्याच्या छातीला टेकून ठेवीत म्हणाला–"अरे ए, सोंगाड्या! अरे तो मंत्रदंड फक्त माझ्या गुरूची आज्ञाच पाळतो. तर तो मंत्रदंड देतोस की तलवार आरपार जाऊ दे म्हणतोस?"

गुरुबैरागी मंत्रदंड द्यायचा की नाही या विचारात मागेपुढे करीत असलेला पाहून त्याचे दोघे शिष्य ओरडले–"गुरुवर्य! देऊन टाका तो मंत्रदंड! त्याच्यात काही महिमा असती तर त्याने आपले रक्षण केले असते. या थंडीच्या दिवसात शेकोटीत जाळून टाकण्या व्यतिरिक्त त्याचा काही एक उपयोग नाही!"

"काय छान बोललात रे माझ्या शिष्योपशिष्यांनो!" असे म्हणत बैरागीगुरु गंभीरपणे कालीवर्माकडे पहात व मंत्रदंड देत म्हणाला–"वीर तरुण युवका! तुझे साहस व पराक्रम खरोखर वाखाणण्यालायक आहेत! हा मंत्रदंड घेऊन जा आणि जितकेतू राजाला देऊन त्याच्या दत्तक मुलीशी लग्न करून घे व जितकेतू राजाचे राज्य मिळवून शंभर वर्षे राज्य कर."

ते ऐकून हसत कालीवर्माने मंत्रदंड घेतला व पुढे जायचं की मागे वळायचं या विचारात असतां बैरागीगुरु काहीतरी गुपित सांगत असल्यासारखा जवळ येऊन म्हणाला–"शूर तरुणा! या भुयारातल्या ठेव्याचा थोडातरी भाग आम्हांला देणे योग्य होईल की नाही, तूच पहा!"

बैरागी गुरूने ते म्हटल्यावर कालीवर्माच्या मनात विद्युतप्रकाशासारखा एक विचार आला. तो बैराग्यांकडे खोल नजरेने पहात म्हणाला–"अस्सं! तुम्ही या भुयारात एखादा ठेवा सापडेल या आशेने या भुयारात शिरला होतात तर! परंतु मला वाटते आहे की राजा जितकेतूच्या वाड्यातून, शत्रूने राजधानीवर हल्ला केला तर पळून जाण्यासाठी हे भुयार म्हणजे चोरवाट असावी. ही चोरवाट जितकेतू राजाच्या वाडवडिलांनी बांधून काढली



असावी. तरी या भुयारात तुम्हांला सोने चांदी काही सापडले तर घेऊन जायला माझी परवानगी आहे. माझ्याबरोबर भुयाराच्या वाटेने पुढे येता का?" कालीवर्माने विचारले.

बैरागी गुरु म्हणाला–"शूर तरुणा! तू विचारावेस आणि आम्ही नाही म्हणणार? तू पुढे हो, आम्ही येतो!"

सर्व जण दूर दिसत असलेल्या अंधुक प्रकाशाच्या दिशेने चालू लागले. एका जागी भुयाराची वाट संपल्यासारखी झाली. भुयाराच्या तोंडावर शिळा बसविलेली होती. तरी फटीतून आत थोडा उजेड येत होता.

कालीवर्मा बैराग्यांना म्हणाला–"आपण सर्वांनी मिळून भुयाराच्या तोंडावरची शिळा बाजूला सरकविली तर आपण राजाच्या किल्ल्याच्या कोणत्या बाजूला येऊन पोचलो हे कळेल. बरं तर लावा हात एकदम!"

सर्वांनी मिळून ती शिळा बाजूला सरकविली. त्या बरोबर भुयाराच्या मार्गावर खूप लखलखाट झाला. शिळेवर जी फुलझाडे होती ती बाजूला खाली पडली व पडण्याचा हलकासा आवाजही झाला.

सर्वांत प्रथम कालीवर्मा वर बाहेर आला व त्याने एकदां चहूकडे पाहिले. आपण राजाच्या उद्यानवनात शिरलो



असल्याचे त्याच्या लक्षात आले. नंतर त्याने वर यायला खूण करतांच बैरागी गुरुशिष्य बाहेर आले. व म्हणाले–"किती सुंदर बाग आहे! जितकेतू महाराजांचीच असणार!"

कालीवर्माने त्यांना हळू बोलायला खूण केली व म्हणाला–"आपण फार धोक्याच्या जागी आलो आहो. मला आपल्या जिवाची एवढी फिकीर नाही. राजाचे शिपाई धरायला आलेच तर जिवंत असेपर्यंत त्यांना जवळ येऊ देणार नाही. तुमचा काय विचार?"

बैरागी गुरु थरथर कापत म्हणाला–"आम्हांला स्वतःच्या जिवाची भीती

असल्यामुळेच आम्ही मिळेल ते खाऊन मिळेल त्या जागी आश्रय घेत फिरतो आहो! भुयारात 'ठेवा' नाही हे कळले. तुमची परवानगी असेल तर आम्ही आपल्या वाटेने निघून जातो."

कालीवर्मा त्यांना जायला सांगणार इतक्यात भुयाराच्या तोंडाच्या दिशेने झाडांच्या आडून जितकेतू राजा व मायावी मर्कट परस्परांशी बोलत येत असलेले दिसले. कालीवर्मा चटदिशी तेथे असलेल्या फुलझाडांच्या आड लपला बैराग्यांना हळूच म्हणाला–"तुम्हांला भ्यायचे काहीच कारण नाही. शिपायांनी तुम्हांला पाहून विचारलेच तर सांगा की रंगूशेटकडे मंत्रदंड दिसला, ती बातमी सांगायला आलो होतो अशी बतावणी करा. त्यानंतर काय होते ते पाहू या."

कालीवर्मा ते सांगत होता त्याच वेळी दुरून कोठून तरी शंख फुंकल्याचा आवाज आला. तो ऐकताच मायावी मर्कट 'किच किच' म्हणत जवळच्या झाडावर चढले आणि त्याने जयघोष केला–"तांत्रिक गुरूचा जय असो." पुढे असेही ओरडून विचारले–"गुरुवर्य! आपण शंख फुंकला तो किल्लयाच्या आतून की बाहेरून?"

शंखाचा आवाज थांबला. मायावी मर्कट झाडावरून खाली उडी मारीत असता त्याला भयभीत मुद्रेने इकडे तिकडे पहात असलेले तिथे बैरागी दिसले.

मायावी मर्कट मोठ्याने 'किचकिच' करून ओरडत म्हणाला–"काय रे, जितकेतू राजा! हे तुझे उद्यानवन आहे की भटक्या बैराग्यांचा मठ आहे? त्या फुलझाडांजवळ बैरागी आहेत त्यांना कैद करव!"

जितकेतू राजाने टाळी वाजवून शिपायांना बोलावून बैराग्यांजवळ जात विचारले–"कोण रे तुम्ही? कोणाच्या परवानगीने माझ्या उद्यानात पाऊल टाकलेत?"

बैरागी गुरू दोन्ही हात जोडून नमस्कार करीत जोराने ओरडला–"मंत्रदंड! रंगू शेट! मंत्रदंड! रंगू शेट!" असेच जोरजोराने ओरडत राहिला. (क्रमशः)



# पितृआज्ञापालन

विक्रमादित्याने आपला हट्ट सोडला नाही.

तो झाडाजवळ गेला, प्रेत खांद्यावर काढून घेतले आणि नेहमीप्रमाणे मौन होऊन स्मशानाच्या दिशेने निघाला. तेव्हां प्रेतात बसलेला वेताळ त्याला म्हणाला–"राजा, तू कोणत्या तरी थोर सिद्धांतासाठी इतके कष्ट सहन करीत असला पाहिजेस. परंतु सिद्धांताचे पालन करण्यास आवश्यक योग्यताही हवी असते. नाही तर पित्याची आज्ञा पालन न करू शकल्यामुळे शेखरसारखा तू स्वतःच्या पायावरच धोंडा पाडून घेशील. तुला कंटाळा येऊ नये म्हणून मी त्याची गोष्ट सांगतो." असे सांगून वेताळ गोष्ट सांगू लागला.

शेखर हा विदेह राज्यात उच्च पदावर काम करणाऱ्या एका अधिकाऱ्याचा मुलगा होता. त्याच्या पित्याचे नाव वैशाख होते.



वैशाखासारखाच विदेह देशाच्या राजाला सुद्धा विजय नांवाचा एकुलता एक मुलगा होता. विजय व शेखर बालमित्र होते. सख्या भावांसारखेच ते लहानाचे मोठे झाले. विजयच्या राज्याभिषेकाची तयारी चालू होती. तरी तो शेखरला आपल्या बरोबरीचाच मानत असे.

शेखरच्या पित्याने मृत्युसमयी मुलाला जवळ बोलावून घेतले व कोणी जवळ नाही असे पाहून म्हणाला—"बाळा, तू पितृऋणांतून मुक्त व्हायला तयार असशील तर माझी एक इच्छा पूर्ण कर."

"बाबा! तुमच्या आज्ञेचे मी अवश्य पालन करीन. मी वचन देतो. पित्याच्या आज्ञेचे पालन न करणारा मुलगा पुत्रच नाही. बोला, काय करू?"

"विदेह राजवंश नष्ट कर." वैशाख म्हणाला.

ते ऐकून शेखरची अक्कलच गुंग झाली. पित्याच्या मनात ती इच्छा असणे म्हणजे स्वामिद्रोहच नव्हे तर राजद्रोहही आहे! नंतर आपण आपल्या मित्राचा वध करणे म्हणजे मित्रद्रोहही होणार!

शेखर म्हणाला—"बाबा, पण ते कां? अशी इच्छा मनात उद्भवायला तसेच कारणही असले पाहिजे!"

"विदेह राजा माझे प्रभू असले म्हणून काय झाले? त्यांनी भर सभेत एकदां माझा अपमान केला आणि माझ्या विरुद्ध कठोर कारवाईसुद्धा केली. हा राजवंश निर्मूल होईपर्यंत माझ्या आत्म्याला शांतिलाभ होणार नाही. तू वचन दिल्याप्रमाणे माझी इच्छा पूर्ण करीन अशी तू शपथ घेतल्याशिवाय मला निश्चितपणे मरण येणार नाही." वैशाख म्हणाला.

शेखरने पित्याची शेवटची इच्छा पूर्ण करण्याची शपथ घेऊन प्रतिज्ञा केली.

वैशाखाच्या मनाचे समाधान झाले व स्मित वदनाने त्याने डोळे मिटले.

पित्याच्या मृत्यूनंतर शेखरला पित्याच्या जागीच काम मिळाले. त्याच वेळी विदेह राजाने आपला युवराज विजय याचा राज्याभिषेक केला. शेखर राज्याचा एक सामान्य अधिकारी झाला असला तरी विजय त्याला आपल्या मित्रासारखाच मानून शिकारीला असो की वनविहाराला असो शेखरला आपल्याबरोबर घेऊन जात असे. दरबाराबाहेर दोघे स्वामी व सेवक हे नाते विसरून आप्तमित्रासारखेच परस्परांशी वागत.

विजयच्या मनात काही बदल झाला नाही. शेखरच्या मनात मात्र हळूहळू बदल होत गेला. पित्याला दिलेल्या वचनाप्रमाणे आपण राजवंश निर्मूल केला की ते काम पुरे होईल. कारण राजाला दुसरा मुलगाच नव्हता, व होण्याची शक्यताही नव्हती. म्हणून संधी मिळतांच विजयला ठार करण्यासाठी शेखर आपल्या मनाला घट्ट करीत होता.

एकदा विजय शिकारीला निघतांना शेखर बरोबर होता, आणि असं झालं की दोघे मित्र इतर लोकांपासून दूर भटकले. शेखर आपली तलवार उपसून विजयच्या पाठीत खुपसणार इतक्यात बरोबरचे इतर सरदार तेथे आले. शेखरच्या हातची ती संधी निसटली.

आणखी एकदा दोघे मित्र डोंगर चढून फेरफटका करून येण्यासाठी निघाले. तेथील दृश्य अत्यंत मनोहर होते. डोंगराच्या टोकाला कड्या पलीकडे एक सुंदर दरी होती. दरीत उतरून जाणे शक्य नव्हते.





"तू माझ्या पाठीत तलवार खुपसलीस. मी मरतेसमयीं तुझ्याच नावाचा जप करीत तुझ्या डोळयात पाहिले! आपल्यासारख्या गाढ मैत्री असलेल्या मित्रांत अशा तऱ्हेची घटना घडेल या गोष्टीची शंकाच करण्याचे कारण काय?" विजय म्हणाला.

शेखरच्या तोंडातून एक शब्दही उमटला नाही. त्याचे तोंड खटदिशी उतरले. ते पाहून विजय म्हणाला–"तू माझा वध करण्याच्या प्रयत्नात काही दिवसांपासून आहेस. माझ्या हातून तुझं कोणतं अहित झालं, मला सांगशील का? कोणत्याही प्रकारची भयभीती मनात न ठेवतां सांग."

कडयाच्या टोकाला उभे राहून दरीचे दृश्य पाहतां येत होते.

शेखर विजयला त्या बाजूला बोलावून घेऊन गेला. विजय दरीचे दृश्य पाहण्यात गर्क झाला असल्याचे पाहून शेखर त्याला दरीत ढकलण्यासाठी सरसावला.

त्याच वेळी विजय मागे वळून म्हणाला– "ही जागा फार धोक्याची आहे बुवा! चल खाली उतरून जाऊ."

खाली उतरून गेल्यावर दोघे मित्र एका शिळेवर बसले. विजय म्हणाला– "मला रात्री एक फार वाईट स्वप्न पडले."

"काय रे बुवा?" शेखरने विचारले.

निरूपाय होऊन शेखरने वडिलांना मरते समयी दिलेल्या वचनाची गोष्ट सांगितली.

सर्व ऐकून घेतल्यावर विजय म्हणाला– "तू श्रीरामासारखं पित्याच्या आज्ञेचे पालन करायला निघालास याबद्दल तुझी वाखाणणीच करायला हवी. तर मग तू आपली तलवार उपसून माझा शेवट कर."

शेखरने तत्काळ तलवार उपसली व विजयला भोसकणार, त्या पूर्वीच विजय आपली तलवार उपसून शेखरशी द्वंद्व युद्धाला तयार झाला. शेखर विजयसमोर निष्प्रभ झाला.

विजय स्मित करून म्हणाला–"शेखर! तू माझा वध केलास तर तुला माझा वध केल्याचं पाप लागेल व मला कदाचित नरकही मिळेल. परंतु आपण शूरासारखे द्वंद्वयुद्ध करून मेलो तर आपणां दोघांस वीरगती प्राप्त होईल!"

दोघांचे द्वंद्व युद्ध झाले. विजयच्या समोर शेखर टिकाव धरू शकला नाही. त्याच्या हातातली तलवार उडाली. त्याला एक धक्का देऊन खाली पाडून विजय म्हणाला– "तू पित्याच्या आज्ञेचे पालन करू शकला नाहीस. पण आतां वीरगती तुला नक्कीच मिळेल." असे म्हणत त्याने एकच वार करून शेखरचा शिरच्छेद केला.

येथवर गोष्ट सांगून वेताळ म्हणाला– "राजा, विजयने आपल्या एका आप्त-मित्राला ठार केले, हा अन्याय नाही का? शेखर हा एखाद्या खुनी गुन्हेगारासारखा नव्हता. तो एक थोर आदर्श मनात ठेवून विजयचा खून करायला निघाला होता. अशा व्यक्तीला तुरुंगात टाकून भागले असते, किंवा हद्दपारीची शिक्षा करता आली असती. पण विजयने त्याचा वध कां केला? शेखर सूडबुद्धीनेच त्याचा वध करायला निघाला होता ना? की त्याच्यावर त्याचं खरं मित्रप्रेम नव्हते म्हणून? या शंकाचे समाधानकारक उत्तर माहीत असून तू दिले नाहीस तर तुला माहीतच आहे की तुझ्या डोक्याची शंभर शकले होऊन तुझ्याच पायावर लोळू लागतील."

विक्रमादित्य म्हणाला–"पितृआज्ञा-पालनासाठी शेखरने विजयच्या वधाचा



निश्चय केला होता. परंतु विजयने शेखरच्या वधाचा निश्चय केला नव्हता. द्वंद्वयुद्धात शेखरनेच ती संधी विजयला दिली. युद्धात विजयचा वध करण्याची शक्ती शेखरमध्ये नव्हती. पितृआज्ञेचे पालन हेच एकमेव उच्च ध्येय माणसाच्या आयुष्यात कदापि असू शकत नाही. कृतज्ञता, राजभक्ती, मैत्रीधर्म वगैरे अनेक उच्च आदर्श माणसासमोर असू शकतात. दोन उच्च आदर्शांत परस्पर संघर्ष निर्माण झाला की कमी प्रतीचा आदर्श सोडून त्यातल्या त्यात जो उच्च आदर्श असेल, त्याचे पोषण करावयाचे असते. या दृष्टीने पितृआज्ञापालनाचा शेखरने स्वतःसमोर ठेवलेला आदर्श हीन प्रतीचाच म्हणावा लागेल. शेखरच्या पित्याने सूडबुद्धीने राजवंश निर्मूल करायला सांगितला. या उलट राजा उदार होता. त्याने शेखरच्या बापाने किती चुका केल्या तरी त्याला कामावरून काढून टाकले नव्हते. कित्येकदा केलेल्या चुकांबद्दल त्याची फक्त निर्भर्त्सना केली होती. शेखरचा बाप आपली जबाबदारी योग्य तऱ्हेने पार पाडू शकला नव्हता, हेच दिसते. शेखर स्वतः हीनवृत्तीनेच वागला असेच म्हणावे लागेल. त्याच्या पित्याने आपली शेवटची इच्छा म्हणून सांगितली तेव्हां तशी इच्छा पुरी करण्याची गरज नाही असे ठरवून ती गोष्ट पित्याला सांगून टाकायला हवी होती. त्याने तसे केले नाही. विजयने आपल्या स्वप्नाची गोष्ट सांगितली तेव्हां शेखरने आपला हेतू विजयला कळला असावा हे ओळखून त्याचे पाय धरायला हवे होते. तसेही त्याने केले नाही. विजयने त्याचा वध करायला सांगितले तेव्हां शेखरने तलवार उपसली यापेक्षा नीच जास्त नीच कर्म कोणते असू शकेल? म्हणून अशा व्यक्तीचा वध झाला, याबद्दल वाईट वाटून घ्यायचे कारण नाही."

अशा तऱ्हेने राजाचे मौन भंग होताच वेताळ प्रेतासह अदृश्य झाला आणि पुन्हा झाडाला जाऊन लोंबकळू लागला.

(कल्पित)





# नवे भूत व जुने भुते

एका गावी एक शेतकरी रहात असे. नांगर ओढायला किंवा गाडी ओढायला त्याच्याकडे एक बैलांची जोडी होती. त्यातला एक बैल एकाएकी मेला. म्हणून एक बैल विकत आणण्यासाठी शेतकरी आपल्या मुलाबरोबर आठवडयाच्या बाजाराला निघाला. वाटेत खायला काही हवे म्हणून शेतकऱ्याच्या बायकोने बाजरीच्या तीन भाकऱ्या करून बांधून दिल्या होत्या.

बापलेक बाजारात गेले आणि सुदैवाने त्यांना एक चांगला बैल मिळाला. मोल भाव करून शेवटी त्यांनी बैल विकत घेतला आणि त्याला घेऊन घरी निघाले. वाटेत एक पायऱ्या असलेली विहीर लागली. बापलेक दमलेले होते व भूकही लागली होती. दोघे पायऱ्या उतरून विहिरीत गेले व हातपाय धुवून भाकरी खायला बसले. मुलगा ओरडला—"बाबा, तुम्ही दोन खा, मी एक खातो."

त्या विहिरीत तीन भुते रहात होती. मुलगा म्हणाला ते त्यांनी ऐकले व घाबरून गेली. ती भुते बापलेक बसले होते तेथे आली व हात जोडून म्हणाली—"बाबांनो! आम्हांला खाऊ नका. तुम्ही सांगाल ते काम आम्ही करू."

शेतकऱ्याने ती भुते असल्याचे व ती मुलगा म्हणाला ते ऐकून घाबरून गेली असल्याचे ओळखले व म्हणाला—"ठीक आहे, परंतु आमच्या बरोबर आले पाहिजे व आम्ही सांगू ती कामे केली पाहिजेत."

"तुम्ही सांगाल ती कामे आम्ही आनंदाने करू!" भुते म्हणाली.

बापलेक नव्या बैलाला बरोबर घेऊन भुतांसह घरी पोचले. शेतकरी भुतांकडून सर्व कामे करवून घेऊ लागला.

सौ. सरोजिनी सुर्वे

भुते अशा तऱ्हेने शेतकऱ्याच्या घरी कामे करू लागली. त्यांना भेटायला मधून मधून काही भुते त्या विहिरीत येत. एक भूत असेच त्या विहिरीत त्या तिघां भुतांना भेटायला गेले असतां ती भुते शेतकऱ्याबरोबर त्याच्या गावी गेली असल्याचे त्या नव्या भुताला कळले. म्हणून त्या जुन्या भुतांचा शोध काढीत नवे भूत शेतकऱ्याच्या घरी आले. जुनी भुते त्याला शेतकऱ्याच्या गोठ्यात भेटली. नव्या भुताने त्यांना विचारले–"तुम्ही आपलं घर सोडून इकडे कशाला आलात?"

"आमच्यावर आलेला प्रसंग कोणत्या शब्दात सांगू? दोघे जण आम्ही राहतो त्या विहिरीत उतरून आम्हांला खातो म्हणाले. आम्ही त्यांच्या हातापायां पडून व सांगतील ते काम करायचे कबूल करून स्वतःला वाचविले." जुनी भुते म्हणाली.

"काय पण बोलतां आहां! मी त्या दोघांना ठार करतो. तुम्ही मला या कोपऱ्यात लपू द्या." नवे भूत म्हणाले.

इतक्यात शेतकरी बापलेक गोठ्यात आले. बाप नव्या बैलाकडे पाहून मुलाला म्हणाला–"हे बघ रे! या नव्याला वात झालेला दिसतो आहे. याला चटका द्यायला तापत ठेवलेली पळी घेऊन ये!"

लपून बसलेले नवे भूत घाबरून गेले व धावत येऊन शेतकऱ्याचे पाय धरून म्हणाले–"मालक! मला चटका देऊ नका! मी देखील जुन्या भुतांसारखीच तुम्ही सांगाल ती कामे करीन. जुनी भुते शेतात फक्त कापूस पिकवितात. मी तो पिंजून देईन."

"मी तेच काम तुला सांगावे म्हणत होतो. यापुढे मला नुसता कापूस चालणार नाही, पिंजलेला कापूस हवा आहे." शेतकरी म्हणाला.

त्यानंतर जुनी भुते नव्या भुताला चिडून म्हणाली–"कळली तुझी कर्तबगारी! आम्हांला सोडविण्याच्या फुशारक्या मारून शेवटी आम्ही करीत होतो त्या पेक्षा कामाचा बोजा वाढविलास मात्र!"





# मानवांमध्ये दानव

विंध्य पर्वताच्या रानावनात कामरूप नावाचा एक राक्षस रहात असे. त्याला त्याच्या मनाला वाटेल ते रूप धारण करण्याची शक्ती प्राप्त होती. काही काळ लोटल्यावर आपणाला मरण कसे येईल हाच एक विचार त्याच्या मनात उत्पन्न झाला. परंतु मरावे कसे हे त्याला कळेना. कारण डोंगराच्या कड्यावरून त्याला एका पावलात खाली दरीत उतरतां येत होते. समुद्राच्या पाण्यात बुडी मारावी तर ते त्याच्या गुडघ्यापुरतेच जेमतेम येई. दुसरे रूप घेऊन मरण्याचा त्याने यत्न करून पाहिला, परंतु त्यावेळी नेमके त्याला पुन्हां त्याचे मूळ राक्षस रूप प्राप्त होई.

एकदां विंध्य पर्वतावर त्याला एका ऋषीचे दर्शन घडले. तो सामान्य माणसाचे रूप घेऊन त्यांच्यासमोर हात जोडून उभा राहिला आणि आपल्या मनातली इच्छा व्यक्त केली. त्या ऋषीने त्याला समजावून सांगितले की बाबा रे, तसा राक्षसजन्म हा सुखाचा नसतोच. तेव्हां तुझ्या मनात जी इच्छा उत्पन्न झाली आहे, ती खरोखरीच तुझ्या हिताची आहे; परंतु तुला दीर्घ आयुष्य प्राप्त आहे. म्हणून तू आत्महत्या करून आपला शेवट करून घेतलास तर तुला पुनर्जन्म प्राप्त होईल. म्हणून तू प्रथम ठरव की कोणत्या योनीत जन्म घेणे तुला आवडेल. त्याप्रमाणे मी तुला आशीर्वाद देईन.

परंतु कामरूपला कोणती योनी मागावी हे कळेना. म्हणून त्याने त्या ऋषीलाच तेही सांगण्यास विनंती केली. ऋषीने मानवजन्म श्रेष्ठ असल्याचे सांगितले.

ऋषीने सुचविले ते कोठवर खरे आहे, हे पाहून घेण्यासाठी कामरूपने थोड्या

"वसुंधरा"

वेळेपुरते मानव जातीत राहण्याची इच्छा असल्याचे सांगितले.

कामरूप मानव रूप धारण करून एका एका घरी राहून मानव जीवनाचे निरीक्षण करू लागला. तेव्हां त्याला मानव जातीतले लोक नीतिनियमांचे पालन करीत सुखी जीवन घालवीत असल्याचे कळले.

त्या गावचा प्रमुख रक्षक वीरसिंह हा त्या गावच्या लोकांना देवाचा एक अवतारच वाटे. तो असेपर्यंत गावावर कोणतेही संकट येणे शक्य नाही अशी त्यांच्या मनाची खात्री होती. वीरसिंहाच्या पराक्रमाची माहिती मिळावी यासाठी कामरूप त्याला भेटायला गेला.

वीरसिंहाने आपल्या शक्तिसामर्थ्याचे खूप वर्णन केले व म्हणाला—"म्हणे, विक्रमादित्याने अनेक राक्षसांचा वध केला होता. परंतु मला सुद्धा तशी संधी मिळाली तर मी सुद्धा राक्षसाला ठार करून दाखवीन."

ते ऐकल्यावर कामरूपने राक्षस रूप धारण केले व म्हणाला—"तू तीनदां मला प्रदक्षिणा घालून नमस्कार करशील तर तुला मी सोडीन नाही तर..." वीरसिंह थरथर कांपू लागला. त्याने राक्षसाला तीनदां प्रदक्षिणा घालून नमस्कार केला. मानव जातीचा पराक्रम पाहून कामरूप तेथून अदृश्य झाला.

त्याच गावात एक श्रीमंत मनुष्य रहात असे. त्याला हेमांगी नावाची एक सुंदर मुलगी होती. तिचे लग्नाचे वय झाले होते. ते कळल्यावर कामरूपने एका सुंदर तरुण युवकाचे मानव रूप धारण केले आणि त्या श्रीमंताला जाऊन भेटला. त्या श्रीमंत माणसाने कामरूपला निरनिराळे प्रश्न विचारले, परंतु त्याच्या मनाचे समाधान झाले नाही. म्हणून त्याने कामरूपशी आपल्या मुलीचे लग्न करून देण्यास नकार दिला.

तेव्हा कामरूपने आपले राक्षस रूप धारण करून त्याला दरडावून विचारले—"तू माझ्याशी आपल्या मुलीचे लग्न करून द्यायला तयार आहेस की नाहीस?" तो श्रीमंत माणूस थरथर कापू लागला आणि त्याने आपल्या मुलीचे लग्न त्या राक्षसाशी करून देण्याचे मान्य केले.

तेव्हा राक्षस खदखदां हसू लागला. तेव्हां त्याला मानव जातीत प्रेम व वात्सल्य किती उथळ आहे हे कळले.

त्याच गावात शिवानंद नावाचा एक थोर शिवभक्त रहात असे. त्याच्या घरी नित्य भजनपूजा वगैरे चालू असे.

एकदा मध्यरात्र उलटल्यावर कामरूप शिवानंदच्या घरी गेला आणि आपले राक्षस रूप धारण करून म्हणाला—"तू ज्या देवाचे स्तवन करतो आहेस त्याची माझ्यासमोर निंदा करशील की नाही?"

शिवानंदने तत्काळ राक्षसाचे पाय धरले व म्हणाला—"बाबा रे, ते पापकर्म करा-





यला आग्रह करू नकोस." परंतु राक्षसाने ते अमान्य केले. शेवटी शिवानंदने राक्षसाच्या म्हणण्याप्रमाणे देवाची निंदानालस्ती केली. तेव्हां त्याला मानव जातीच्या मनातील भक्तीचे ढोंग कळले.

त्यानंतर राक्षस विंध्यपर्वतावर परतला आणि ऋषीचे दर्शन करून म्हणाला—"मुनिवर्य! आपण मानवजन्म श्रेष्ठ असल्याचे म्हणाला होतां, परंतु मी प्रत्यक्ष पाहून आलो की मानव हा भयंकर स्वार्थी आहे. मानवाने पृथ्वीवरच्या प्राणिमात्रावर आपला अधिकार स्थापन केला आहे, हे मी पाहिले. हेदेखील मी पाहिले की तो सभ्यतेने राहतो आणि सुखी आहे. परंतु त्याच्या आयुष्यात ढोंग जास्त आहे. त्याचे सर्व जीवित कृत्रिम आहे. तो एक नाटक करीत असतो. चांगले काम समजून मानव जे काम करतो त्यावरही त्याच्या मनात श्रद्धा किंवा विश्वास नसतो.

"तरमग तुला कोणत्या प्रकारचा जन्म हवा आहे?" ऋषीने कामरूपला विचारले.

"मला मानवजन्मच पाहिजे!" कामरूप म्हणाला.

ऋषीने आश्चर्यचकित होऊन त्याचे कारण विचारले. तेव्हां कामरूप उत्तरला—"मानवजन्म किती कृत्रिम असला तरी हे युग मानवांचेच आहे. सर्व तऱ्हेच्या शक्ती मला प्राप्त असूनही मला हे जीवित नकोसे वाटू लागले आहे. परंतु मानवाला त्याच्या जीवनात आशा व विश्वास वाटतो. तो मृत्यूला भितो. मृत्यूच्या हातातून सुटका करून घेण्यासाठी मानव आपला प्रेम व विश्वास सर्व सोडायला तयार असतो. यावरून हे सिद्ध होते की माणसाला जीवनात व जगण्यात आनंद वाटतो. त्याला त्याचं आकर्षण आहे. म्हणून आजन्म जगण्याची इच्छा असणारा मानवजन्म मला हवासा वाटतो."

ते ऐकून ऋषीने राक्षसाच्या अंगावर कमंडलातले मंत्रवलेले पाणी शिंपडले. तत्काळ तो राक्षस मरण पावला आणि मानवयोनीत जन्माला आला.





# परशुराम

ऋचिक ऋषींचा मुलगा व विश्वामित्राचा भाचा जमदग्नी याने प्रसेनजितची मुलगी रेणुका हिच्याशी विवाह केला. या दंपतीला रुमण्वंत, सुषेण, वसू, विश्वासू आणि राम असे अनुक्रमे पांच मुलगे झाले.

रेणुका एकदा पाणी आणायला नदीवर गेली असतां तेथे चित्ररथ नावाचा राजा जलविहार करीत होता. त्याचे रूप लावण्य पाहून रेणुका जागच्याजागी उभी राहली व घरी जायला विसरली. तिला घरी यायला उशीर झाला. नंतर पती काय म्हणेल ही काळजी तिला वाटली, म्हणून घाईघाईने परतली.

जमदग्नीने रेणुकेला आणि चित्ररथाला त्या निंदास्पद व्यवहाराबद्दल दोषी ठरवून आपल्या मुलांना आज्ञा केली की त्यांनी रेणुकेचा वध करावा. परंतु थोरल्या चौघांनी पित्याची ती आज्ञा, मातृवध होतो म्हणून, मान्य केली नाही. परंतु रामाने पित्याच्या आज्ञेप्रमाणे मातेला नेऊन तिचा वध केला व तिचा वध केला असल्याचे येऊन सांगितले.

रामाने आपल्या आज्ञेचे पालन केल्याबद्दल जमदग्नी आपल्या सर्वात धाकट्या मुलावर खूष झाला व त्याने वाटेल तो वर मागून घ्यायला त्याला सांगितले.

रामाने मातेला पुनर्जीवित करावे असा वर मागितला. जमदग्नीने 'तथास्तु!' म्हणून रेणुकेला पुनर्जीवित केले. त्याने त्याला तू अजिंक्य होशील असाही आणखी एक वर स्वखुशीने दिला.

हाच राम परशुराम होय. कारण त्याचे आयुध परशु म्हणजे कुऱ्हाड होते.

एकदां परशुराम आपल्या आजोबांना भेटण्याच्या हेतूने ऋचिक ऋषींच्या आश्रमात गेला. तो तेथे काही दिवस राहिला

मार्कंडेय पुराणातील गोष्ट

आणि और्व ऋषींच्या आश्रमात गेला. और्व हे भृगुवंशी च्यवन यांचे चिरंजीव होते. तेथे काही दिवस राहून और्व ऋषींचा निरोप घेऊन परशुराम त्याचे पणजोबा म्हणजे जमदग्नीचे आजोबा भृगु ऋषीच्या आश्रमात परतला. असे सांगतात की परशुराम भृगूच्या आश्रमात प्रवेश करीत असतां त्यांचे तेजस्वी मुख पाहू न शकल्यामुळे भृगू ऋषींच्या सर्व शिष्यांनी डोळे घट्ट मिटले म्हणे.

भृगू ऋषींनी आपल्या नातवाच्या मुलाचे प्रेमाने स्वागत केले व त्याला सल्ला दिला–"बाळा, तुझे, माझे व जगाचे हित होईल असा एक उपाय मी तुला सांगतो. तू हिमालय पर्वतावर जाऊन शंकराचे स्मरण करीत तपश्चर्या कर. तुझ्या सर्व इच्छा पूर्ण होतील."

त्या प्रमाणे परशुरामाने हिमालय पर्वतात तपश्चर्या सुरू केली. परशुरामाची श्रद्धा व आत्मविश्वास पाहून हिमालय पर्वतात राहणारे ऋषी व मुनी चकित झाले.

शंकराने परशुरामाची परीक्षा घ्यायचे ठरविले. म्हणून एका शिकाऱ्याचे रूप घेऊन शंकराने परशुरामाला दरडावून विचारले–"कोण रे तू? येथे काय काम आहे तुझे?"

परशुरामाने डोळे उघडून पाहिले व नम्रपणे दोन्ही प्रश्नांची उत्तरे दिली.

तरीसुद्धा शिकारी जागचा हलला नाही. तेव्हां परशुराम म्हणाला–"बाबा रे, तू येथे उभा राहून माझ्या तपश्चर्येत विघ्न आणू नकोस. पाहिजे तर तूसुद्धां माझ्या बरोबर तपश्चर्येला बस."

त्यानंतर दोघांमध्ये काही वेळ वादविवाद झाला. तेव्हां परशुरामाला कळले की हा शिकारी सामान्य माणूस नसून कोणी थोर पुरुष आहे. तेव्हां परशुरामाने त्याचे पाय धरले.

शंकराने प्रसन्न होऊन परशुरामाला उठविले व म्हणाला–"मुला, तू अजून वयाने फार लहान आहेस. तुला रौद्रास्त्र धारण करण्याची शक्ती प्राप्त झालेली नाही. म्हणून तू काही दिवस तीर्थयात्रा करून परत ये." असे सांगून शंकर अंतर्धान पावला.

त्यानंतर परशुरामाने काही काळ तपश्चर्या थांबविली. तीर्थयात्रा करून परतल्यावर पुन्हां तपश्चर्या सुरू केली.

त्याच सुमारास इंद्र इतर देवांबरोबर शंकराकडे आला व निवेदन केले–"देवाधिदेवा, महादेवा! दानव अमरावतीवर स्वारी करून तिचा ध्वंस करू लागले आहेत. आपण येऊन आमचे रक्षण करावे."

शंकराने महोदर नावाच्या गणाला हांक मारून परशुरामाला घेऊन येण्यास आज्ञा केली. शंकराची आज्ञा येताच परशुराम आला. शंकराने परशुरामाला आज्ञा केली–"परशुरामा! दानव देवपुरी अमरावतीचा ध्वंस करीत आहेत. तू त्यांचे पारिपत्य कर!"





"महादेवा! तुला मी सांगण्याची गरज आहे का की दानव अत्यंत शक्तिशाली आहेत. मी त्यांचे पारिपत्य कसे करू, म्हणतोस?" परशुरामाने विचारले.

तेव्हां शंकराने एक परशु रामाच्या हातात देऊन त्यात आपले तेज भरले.

तेव्हांपासून राम परशुराम झाला. त्याने इंद्रपुरीला जाऊन दानवांचा संहार केला व अमरावतीचे रक्षण केले. नंतर अमरावती इंद्राच्या स्वाधीन करून परशुराम पुन्हां हिमालय पर्वतात येऊन तपश्चर्या करू लागला.

शंकराला परशुरामाचा पराक्रम पाहून व त्याची तपश्चर्या पाहून परमानंद झाला व त्याला शंकराने भार्गवास्त्र दिले.

त्यानंतर परशुराम हिमालय पर्वतावरून परत आपल्या मातापित्यांकडे आला. वाटेत त्याला एक वाघ एका ब्राह्मण बालकावर उडी टाकायला जात असलेला दिसला. त्या बालकाचे रक्षण करण्यासाठी परशुरामाने वाघावर ब्रह्मास्त्राचा प्रयोग केला. वाघ तत्काळ मरण पावला आणि त्याच्या जागी एक गंधर्व प्रगट झाला. त्याने परशुरामाला नमस्कार केला व म्हणाला—"मी शापवश वाघ झालो होतो. आता आपण मला शापमुक्त केले आहे." त्यानंतर तो गंधर्व गंधर्वलोकात निघून गेला.

वाघाच्या जबड्यातून परशुरामाने ज्या ब्राह्मण बालकाचे रक्षण केले होते त्या मुलाचे नाव अकृतव्रण असे होते. तो शांत नावाच्या मुनीचा मुलगा होता. तो तीर्थयात्रा करीत जात असतां त्याच्यावर वाघाची दृष्टी पडली. परशुरामाने रक्षण केले म्हणून तो बालक परशुरामाची सेवा करीत त्याचा मित्र व शिष्य रूपे जन्मभर परशुरामाबरोबरच राहू लागला.

त्यानंतर परशुराम अकृतव्रणला बरोबर घेऊन भृगु, और्व, ऋचिक मुनी आदिकांच्या आश्रमात जाऊन शेवटी आपल्या वडिलांना भेटायला गेला. तेथे त्याने सर्व वृत्तांत पित्याला सांगितला.





## दान महात्म्य

पांडवांचा पणतू जनमेजय याच्या मुलाचे नाव शतानीक. त्याने अनेक देश जिंकून आपले राज्य वाढविले व अपार संपत्तीसुद्धा संपादन केली.

शतानीकने त्या संपत्तीचे दान करून ब्राह्मणांचा आशीर्वाद मिळविला. ब्राह्मण सर्वदा शतानीकची स्तुती करीत. त्यामुळे त्याचा नावलौकिक वाढला.





शतानीक वारल्यावर त्याचा मुलगा सहस्रानीक गादीवर बसला. तो सुद्धा पराक्रमी होता. परंतु त्याने आपल्या पित्याप्रमाणे दिग्विजय करून साम्राज्य वाढविण्याचा यत्न केला नाही.



शतानीककडून नित्य दान मिळत होते परंतु सहस्रानीककडून ते मिळत नाहीसे झाले. म्हणून ब्राह्मण असंतुष्ट झाले. त्यांनी सहस्रानीकला वडिलांची परंपरा चालू ठेवण्यास विनंती केली.

सहस्रानीक त्यांना म्हणाला–"जुन्या परंपरेमुळे माझ्या पित्याचे हित झाले असेल तर मीसुद्धा ती परंपरा चालू ठेवीन." त्यानंतर त्याने भार्गव महर्षींना शतानीकने केलेल्या दानधर्माचा लाभ शतानीकला कितपत झाला याची माहिती काढून सांगायला निवेदन केले.





भार्गव समाधि धारण करून बसला. त्याचा आत्मा शतानीकचा शोध काढीत स्वर्गापर्यंत गेला. परंतु स्वर्गलोकात शतानिकचा शोध लागला नाही.

नंतर भार्गव नरकलोकात शोध काढीत गेला. तेथे शतानीकची भेट झाली. तो भार्गवला म्हणाला–"मी जी पापकर्मे केली होती त्यांतले पहिले पाप म्हणजे मी अन्यायाने धन संपादन केले होते आणि दुसरे पाप हे की मी ते धन सुखोपभोग घेणाऱ्या ब्राह्मणांना दान केले."





भार्गवने परत येऊन सहस्रानीकला त्याच्या पित्याने सांगितले ते निवेदन केले. म्हणाला–"महाराज, न्यायाने मिळविलेल्या धनाचेच दान करावे. तसे केल्यास आपले पिता शतानीक यांना उत्तम लोकाची प्राप्ती होईल."

दुसऱ्याच दिवशी सहस्रानीक राजत्याग करून निघून गेला आणि एका मजुराप्रमाणे आयुष्य घालवीत त्याने एक वर्ष काढले. अशातऱ्हेने त्याने जे धन संपादन केले ते घेऊन तो आपल्या राजवाड्यात परतला.





आपल्या त्या अल्प संपत्तीचे दान करीत सहस्त्रानीक ब्राह्मणांना म्हणाला– "हे दान अगदी अल्पच आहे, परंतु न्यायाने संपादन केलेले आहे. म्हणून आपण हे स्वीकारावे आणि आशीर्वाद द्यावा की माझ्या पित्याला उत्तम लोकाची प्राप्ती होईल." ब्राह्मणांनी ते मान्य केले.

त्यानंतर सहस्त्रानीकने आपला खजिना उघडवून पित्याने संपादन केलेले सर्व धन गोरगरीब व अनाथांना वाटून टाकले. नंतर त्याने पुन्हा भार्गव ऋषींना बोलावून पिता कोणत्या लोकात वास करीत आहेत, हे पाहून येण्यास विनंती केली.







भार्गव पुन्हां नरकलोकांत गेला. तोंपर्यंत शतानीक पापमुक्त झाला होता. त्याला सुवर्ण रथात बसवून स्वर्गलोकाकडे नेत असल्याचे पाहून भार्गवला परमानंद झाला.

# राज्याभिषेक

एका राजाला तीन मुलगे होते. आपल्या मागे कोणाला राज्य द्यावे, हे ठरविलेले बरे, असा विचार करून राजाने प्रत्येक मुलाला एक एक लाख सोन्याच्या मोहरा दिल्या व म्हणाला–"मी या सुवर्णमुद्रा तुम्हांला देतो आहे. जो कोणी यांचा सदुपयोग करून दाखवील त्याला गादी मिळेल. तुम्हांला यासाठी मी सहा महिन्यांचा अवधी देतो."

सहा महिन्यांनंतर राजाने दरबार भरवून तिघां मुलांना हजर राहण्यास कळविले.

थोरला मुलगा म्हणाला–"महाराज, मी आपण दिलेले धन खर्च करून धर्म व शास्त्रविषयांवर ग्रंथ लिहवून घेत आहे. हे ग्रंथ प्रजेला फुकट वाटण्यात येतील."

मधला मुलगा म्हणाला–"महाराज, मी एक नवीन तंत्र शिकून आलो आहे. या तंत्राचा वापर करून राज्यात पाहिजे तेव्हां आणि हवा असेल तेथे पाऊस पाडता येईल. पावसाअभावी होणारे नुकसान कधी होणार नाही. दुष्काळ कायमचा नाहीसा होईल."

सर्वांत धाकटा म्हणाला–"महाराज! मी हे धन खर्च करून सैन्य व सेनापती दोघांना वश करून घेतले आहे. या वेळी माझ्या आज्ञेप्रमाणे आपण बसलो आहो ती जागा माझ्या शिपायांच्या स्वाधीन झाली आहे. म्हणून तुम्ही तावडतोब, माझा राज्याभिषेक करून द्यावा." राजा लगेच आपल्या तिसऱ्या मुलाचा राज्याभिषेक करून मोकळा झाला.





# लोभाचे फल

गणूशेटचे किराण्या मालाचे दुकान होते. त्याचबरोबर तो बकऱ्या पाळीत असे. त्याच्या बायकोला सुंदर जरीकाठी साड्या व दागिन्यांशिवाय दुसरे काही सुचत नसे. बकऱ्या विकून जो फायदा होई तो खर्च करून गणूशेट बायकोसाठी साड्या व दागिने खरेदी करीत असे. एकदां कोणता तरी सण आला आणि गणूशेटला बायकोसाठी एक साडी विकत घ्यावी लागली.

तो एक बकरी घेऊन बाजारात गेला.

नेमका बाजाराच्या दिवशीच खूप पाऊस पडला. म्हणून बाजाराला फार थोडे लोक आले होते. गणूशेटच्या बकरीला वीस रुपयापेक्षा जास्त किमत द्यायला कोणी तयार नव्हता. तो संध्याकाळपर्यंत चांगली किमत येईल या आशेने बसून राहिला. शेवटी निराश होऊन बकरीला घेऊन घरी निघाला. वाट डोंगराळ होती. गावाजवळ एका वळणावर एक गुहा होती. लोक म्हणत की त्या गुहेत भुते असतात. गुहेजवळ पोचतांच गणूशेटच्या छातीत 'धक धक' होऊ लागली.

गणूशेट झपाझप पावले उचलीत त्या वळणावरून पुढे जाण्याच्या प्रयत्नात होता. त्याच वेळी त्याला ऐकू आले,—"कोण तो? काळोख पडू लागल्यावरही इकडे पाऊल टाकायची तुझी एवढी हिंमत?"

गणूशेट थर थर कांपत म्हणाला—"मी गणूशेट रे, बाबा! माझी बकरी बाजारात विकली गेली नाही. म्हणून तिला परत घरी घेऊन जातो आहे. पुन्हा असा अवेळी या बाजूला येणार नाही, कान धरतो!"

"बकरी माझ्या गुहेत सोडून तू जा आल्या वाटेने. सकाळी येऊन तिची किमत घेऊन जा." हे शब्द गुहेतून गणूशेटला ऐकू आले.

श्री सुधाकर

"वांचलो!" असे मनात म्हणत गणूशेटने बकरीला गुहेत ढकलले आणि तेथून पाय काढला. परंतु घरी जाण्याची गणूशेटमध्ये हिंमत नव्हती. बायकोला काय उत्तर द्यायचे? हा प्रश्न समोर उभा होता. भुताकडून जे मिळेल ते घेऊन गेलो तरच बायको घरात पाऊल टाकू देईल अशी त्याला धास्ती होती.

म्हणून गणूशेट उजाडेपर्यंत कोणच्या तरी ओसरीवर पडून राहिला आणि उजाडल्यावर साहस करून गुहेकडे निघाला.

"बकरीचं मांस फार स्वादिष्ट होतं. ही घेऊन जा तिची किमत!" त्या आवाजापाठोपाठ एक पोटली गुहेतून बाहेर आली व गणूशेटच्या पायांजवळ आदळली. ती घेऊन गणूशेट झपाझप पावले उचलीत घरी निघाला. घरी पोचतांच गणूशेटने दार बंद करून घेतले आणि पोटली जमिनीवर ओतून पैसे मोजू लागला. पन्नास रुपये होते.

"ह्या भिकारड्या बकरीला इतके रुपये देणारा कोण मूर्ख होता हो तो?" गणूशेटच्या बायकोने विचारले.

"हे पहा, मी सांगतो आहे ते या कानाचे त्या कानाला कळतां कामा नये, बरं का?" या शब्दांत बायकोला सावध करून गणूशेटने घडलेली गोष्ट सांगितली.



गणूशेटची बायको म्हणाली—"बरं झालं की, पण तुम्ही सुद्धा ही गोष्ट या कानाची त्या कानाला कळू देतां कामा नये." पण ती स्वतःच गप्प राहू शकली नाही. इतकी महत्वाची गोष्ट पोटात कशी राहणार? तिने शेजारणीला सांगितले. शेजारणीने नवऱ्याला सांगितले. झालं गांवभर ती गोष्ट पसरली.

जे लोक बकऱ्या पाळीत त्यांना परमानंद झाला. ज्यांच्या जवळ बकऱ्या नव्हत्या त्यांनी बकऱ्या विकत आणल्या. सर्व लोक दुसऱ्याची नजर चुकवून आपापल्या बकऱ्या गुहेत पोचवून आले. गणूशेटसुद्धा बायकोच्या आग्रहामुळे आणखी दहा बकऱ्या गुहेत

पोचवून आला. पहाटे गुहेसमोर पंचवीस जण उभे होते. परंतु एकालाही बकरीची किंमत मिळाली नाही. भुताचा आवाजही ऐकू आला नाही.

चांगले उजाडल्यावर सर्व लोक हिंमत करून गुहेत शिरले. परंतु गुहेत एकही बकरी नव्हती. फक्त एक चिठ्ठी एका शिळेवर पडलेली दिसली. चिठ्ठीत असा मजकूर होता.

"हे पत्र लिहिणारा प्राणी कोणी भूत नसून तुमच्या सारखाच एक मनुष्य आहे. कामासाठी तुमच्या घरी खेटं घालून शेवटी काम न मिळाल्यामुळे निराश झालेला मी रंगा आहे. माझे वडील वारले. माझ्या घरात त्या वेळी फक्त शंभर रुपये होते. ती रक्कम घेऊन मी तुमच्या गावी आलो. तुम्हां लोकांजवळ कामाची भीक मागितली. पण तुम्ही म्हणालात–"तू नवा माणूस आहेस, तुझा विश्वास कसा करणार आणि काम काय देणार?" माझ्याजवळचे अर्धे-अधिक पैसे खर्च झाले होते. दुसऱ्या गावी जाण्याचा विचार करून संध्याकाळी गावा-बाहेरच्या या गुहेजवळ आलो व गुहेतच झोपलो. बकरीला घेऊन गणूशेटला घरी परत जातांना पाहून मला एक युक्ती सुचली. तुम्ही माणसावर विश्वास केला नाही, पण एका भुताच्या बोलण्यावर केलात. पण जे भूत मुळातच नसते त्या भुताच्या नावावरच माझे काम झाले. काम करण्याची तयारी दाखवून आलेल्याला एक पैसादेखील देण्याची तयारी न दाखविणाऱ्या तुम्ही लोकांनी एका भुतावर विश्वास केलात तो पैशाच्या आशेने. तुम्ही बकऱ्यांचे कळप आणून दिलेत. तुम्ही दिलेल्या बकऱ्या विकून मी कोणत्या तरी गावी जाऊन व्यापार धंदा करीन आणि तुमचे सर्वांचे पैसे एका वर्षाच्या आत फेडीन. तोंपर्यंत तुम्ही सर्व मला क्षमा करून थोडा धीर धराल, अशी आशा बाळगून मी हे पत्र पुरे करतो."

ते पत्र वाचून व ऐकून सर्व गावकरी थक्क झाले.



# सही

सूर्यगड आणि चंद्रगिरी या दोन राज्यांच्या मधल्या जंगलात रंगा नावाचा एक डाकू रहात असे. त्याची दहशत दोन्ही राज्यात होती. त्याचे हेर दोन्ही राज्यांच्या दरबारात होते.

एकदा चंद्रगिरीच्या राजाने सूर्यगडच्या राजाकडे एक लाख मोहोरा कर्जाऊ मागितल्या. सूर्यगडच्या राजाने मान्य केले. दुसऱ्याच दिवशी चंद्रगिरीचा खजिनदार सूर्यगडला कर्जाची रक्कम आणायला निघणार असल्याचे रंगाला कळले. ती बातमी कळतांच रंगा चंद्रगिरीच्या एका विद्वान कुलगुरूकडे गेला आणि खजिनदाराची सही शिकवून द्यायला सांगितले. सुरा दाखवून शेवटी कुलगुरूने रंगाला खजिनदाराची सही करायला शिकविले.

दुसऱ्या दिवशी ठरल्याप्रमाणे चंद्रगिरीचा खजिनदार काही सैनिकांबरोबर जंगलाच्या वाटेने सूरजगडला निघाला आणि रंगाच्या हाती कैद झाला. खजिनदाराजवळ राजाची मुद्रा असलेला लखोटा होता. त्यात राजाने कर्जरोखा लिहून सही केली होती. रंगाने खजिनदाराला व त्याच्या सैनिकाला कैद केले होतेच. त्याने स्वतः खजिनदाराची वस्त्रे धारण केली आणि शिपायांचा पोशाख आपल्या साथीदारांना घालायला सांगून सूर्यगडला गेला. सूर्यगडच्या राजाने चंद्रगिरीच्या राजाचे पत्र वाचून रंगाला एक लाख मोहरा मोजून दिल्या आणि पावती लिहून घेतली.

रंगाने सही करून मोहोरा घेतल्या, परंतु सूर्यगडच्या राजाने त्याला कैद केले.

कारण रंगाने खजिनदाराच्या सहीच्या जागी स्वतःचेच नाव लिहिले. कारण कुलगुरूने रंगाला खजिनदाराची म्हणून सांगून त्याच्याच नावाची सही शिकविली होती.






एका राजधानीच्या शहरात एक सुशिक्षित तरुण रहात असे. तो अत्यंत गरीब होता. त्याने राजदरबारात नोकरीसाठी खूप खटपट केली. परंतु त्याला राजाचे दर्शन सुद्धा मिळाले नाही.

माणसाला जगण्यासाठी उदरनिर्वाहाचे एखादे साधन पाहिजेच! जगात ज्या अनेक विद्या व कला आहेत त्यांचा उपयोग मुख्यत: उदरनिर्वाहासाठीच जास्त असतो. असा विचार करून तरुणाने काही ठरविले.

एके दिवशी राजधानी बाहेर एका झाडीच्या जवळ त्याला दोन तीन समाधी दिसल्या. त्यांच्या चारी बाजूला वारुळे होती आणि रानटी झाडे उगवली होती. ते दृश्य पाहून त्या माणसाच्या मनात एक विचार आला. त्याने त्या समाधींच्या चारी बाजूचे रान गवत काढून तिथली जागा साफ केली, शेणाने ती जागा सारवून रांगोळी काढली, समाधीवर तुळशीची झाडे लावली आणि समाधीवर फुले वाहून त्यांची दररोज पूजा करू लागला.

गावातले लोक देवळात जातां येतां किंवा परगावी कोठे जातांना त्या समाधीं-कडे आश्चर्यचकित होऊन पहात. काही लोक तेथे काही वेळ थांबत व समाधींच्या शेजारीच एक माणसाला कुटीर बांधून रहात असलेला पाहून विचारीत की कोणाची समाधी आहे? ती व्यक्ती उत्तर देई.

"या समाधी आपल्या महाराजांच्या पूर्वजांच्या आहेत. कोणी पहात सुद्धा नाही, इकडे. माझ्या मनात महाराजांच्या पूर्वजां-विषयी अपार आदर आहे. म्हणून मी या समाधींचा जीर्णोद्धार करून ह्यांची पूजा करतो आहे!"

त्या सुशिक्षित माणसाच्या तोंडचे ते शब्द ऐकून लोकांना ते खरे वाटू लागले कारण त्याने समाधीवर चुना लावून त्या स्वच्छ पांढऱ्या करून ठेवल्या होत्या. त्यांच्यावर तुळशीची झाडे होती व दररोज दिवा लागत होता. या खरोखरीच राजवंशीयांच्या समाधी नसतील तर हा माणूस इतक्या श्रद्धा भक्तिपूर्वक पूजा का करीत राहिला असता?

हळूहळू गावातल्या लोकांची श्रद्धा व भक्ती त्या समाधीवर बसू लागली व दिवसेंदिवस वाढू लागली. देवाच्या दर्शनाला लोक जातात तसे लोक या समाधीच्या दर्शनास नित्यनियमित जाऊ लागले. ते समाधीवर दिवा लावायला तेल व पैसे देऊ लागले. काही जण तर समाधींना प्रदक्षिणा घालून नवस करू लागले.



त्या सुशिक्षित व्यक्तीने सांगायला सुरुवात केली की जे लोक नवस करतात त्यांना नवसाचे फळही मिळत असल्याचे दिसून आले आहे. त्या समाधींची जागा हळूहळू तीर्थस्थान झाली. परगांवचे लोकही नवस करायला येऊ लागले.

राजाच्या कानावर ही गोष्ट गेली. राजाने आपल्या प्रधानाला आज्ञा केली की तज्ज्ञांना नेमून चौकशी करावी की या समाधी खरोखरच राजवंशाच्याच आहेत की आणखी कोणाच्या. जर राज-वंशाच्याच आहेत तर इतके दिवस त्यांच्या-कडे दुर्लक्ष कसे काय झाले?

प्रधानाने समाधींविषयी बारकाईने चौकशी करण्यासाठी काही हुशार व्यक्तींना नेमले. त्या तज्ज्ञांनी सर्व चौकशी करून समाधींची पाहणी केली. समाधी स्वच्छ धुवून पुसून पाहाल्यावर समाधींवर दोन नावे व राजमुद्रा अंकित असल्याचे आढळून आले.

राजाने आपला वंशवृक्ष काढून शोध करायला आज्ञा केली आणि आश्चर्य म्हणजे असे आढळून आले की जी दोन नावे समाधींवर दिसली त्या दोन्ही व्यक्ती महाराजांच्या वरच्या चौदाव्या पिढीतल्या होत्या. ती पतीपत्नीची नावे होती. त्या'

श्री ग. शं. सुलाखे

जोडप्याने त्या देशावर राज्य केले होते व त्यांची राजमुद्रा समाधीवरच्या राजमुद्रेसारखीच होती.

राजाच्या मनांत त्या शिक्षित तरुणाविषयी आदर वाढला. या तरुणाने केवढे मोठे ऐतिहासिक कार्य केले असे वाटून राजाने त्याचा सत्कार करायचे ठरविले. त्याला बोलावून विचारले—"या समाधी राजवंशाच्या आहेत हे तुम्हांला कसे कळले?"

त्या तरुणाने खरे तेच सांगितले. म्हणाला—"उदरनिर्वाहाला एक मार्ग काढण्याच्या प्रयत्नात असतां सरकारी नोकरी मिळणे अशक्य आहे, हे लक्षात आल्यावर फिरत-फिरत या समाधींजवळ आलो व लोकांच्या मनांत भक्ती उत्पन्न होण्यासाठी सर्व प्रयत्न केले. माझ्या प्रयत्नास यश आले. आपण समाधींच्या पूर्व इतिहासाची चौकशी करविलीत. योगायोगाने ह्या समाधी राजवंशाच्याच ठरल्या. मला ते पूर्वी मुळीच माहीत नव्हते. मी इतके शिक्षण घेतले, पण उदरनिर्वाहाला त्या शिक्षणाचा मुळीच उपयोग झाला नाही. परंतु माझ्या या युक्तीचा परिणाम लोकांच्या मनावर झाला व उदरनिर्वाहाचा मार्ग निघाला."

राजा म्हणाला—"तुझे सर्व अपराध क्षम्य आहेत. तू उदरनिर्वाहासाठी लोकांना या रूपे धोका दिलास हे खरे असले तरी लोकांच्या मनात आमच्या राजवंशाबद्दल भक्तिभावना निर्माण करू शकलास. शिवाय कोणाला माहीत नसलेले एक ऐतिहासिक सत्य जगाच्या नजरेसमोर आले. आमचे पूर्वज इतके थोर होते याची माहिती मिळविण्यासाठी जे शोधकार्य झाले त्याला निमित्त तूच झालास म्हणून तुझे सर्व अपराध माफ करून तुला मी आपला दरबारी म्हणून नेमीत आहे व तुला व तुझ्या कुटुंबाला पिढ्यान्‌पिढ्या पुरेल एवढी जहागीर ही लिहून देत आहे."

याला म्हणतात योगायोग. अनपेक्षितपणे माणसाचे भाग्य कसे उदयास येते त्याचे हे एक सुंदर उदाहरण आहे.



# अर्धा बांटा

एकदा एक व्यापारी आठवड्याच्या बाजाराला निघाला. वाटेत त्याला एक मजूर भेटला. त्याचे नाव सदू. त्यादिवशी व्यापाऱ्याला पुष्कळ फायदा झाला. व्यापाऱ्याला वाटले की उजाडताच सदू गडी भेटला म्हणून इतका फायदा झाला. म्हणून त्याने स्वखुशीने सदू गड्याला थोडे बक्षिस दिले. ती गोष्ट सदू गड्याच्या मनात हांव उत्पन्न करण्यास कारण झाली. तो दररोज त्या व्यापाऱ्यासमोरून जाऊ लागला आणि आश्चर्य म्हणजे व्यापाऱ्याला फायदा होई व सदूला बक्षिस मिळे.

सदूला वाटू लागले की त्याच्या मुळेच व्यापाऱ्याला फायदा होतो आहे. एके दिवशी तो व्यापाऱ्याच्यासमोर आला नाही. त्यादिवशी व्यापाऱ्याला फायदा झाला नाही

एके दिवशी सदूने व्यापाऱ्याला भेटून म्हणाला—"माझ्यामुळे तुम्हांला पुष्कळ फायदा होतो आहे. आपण पाटलासमोर मान्य करावे की मी तुमच्यासमोर आल्यावर जो फायदा होईल त्यातल्या अर्ध्या बांटयावर माझा हक्क राहील. व्यापाऱ्याने पाटलासमोर ते मान्य केले.

एके दिवशी अचानक पाऊस पडला आणि व्यापाऱ्याचे फार नुकसान झाले. व्यापाऱ्याने ती गोष्ट पाटलाला कळविली व सदूकडून नुकसान भरपाई मिळाली पाहिजे असे निवेदन केले. पाटलाने ती मागणी न्याय्य मानून सदूकडून तोट्याचा अर्धा बांटा सदूकडून देवविला.





# जावे त्याच्या वंशा

रामजी पाटलाच्या घरी गाड्या भरभरून भाताची पोती येत असलेली पाहून रामजीच्या मुलाला शेजारचा गोपू पोटात गोळा आल्यासारखा हेवा करीत म्हणाला– "अरे लखू, तुम्ही म्हणजे काय, बादशहा आहां बादशहा! तुम्हांला कोणत्या गोष्टीची कमतरता व उणीव? घरात धान्याची कोठारं भरलेली, दुधादह्याची नदी वाहते आहे आणि वर रहायला एक राजवाडा!"

रामजीचा मुलगा लखू हसत म्हणाला– "अरे गोपू, तू तरी घरात रिकामटेकडा बसलेला असतोस, आमच्या बरोबर कां नाही येत शेतावर काम करायला? दररोज तीन रुपये मजुरीचे मिळतील."

दररोज तीन रुपये मिळण्याची गोष्ट ऐकून गोपूच्या तोंडाला पाणी सुटले. उन्हाळा संपत आला होता व मृग नक्षत्र तोंडावर होते. शेतात पालापाचोळा व शेणखताच्या गाड्या पोचवायची वेळ होती. गोपूला दोन दिवस ते काम करावे लागले.

छत्री घेऊन उन्हात तो काम करवून घेऊ लागला. दोन दिवसांची मजुरी सहा रुपये लखूने गोपूला दिली. त्याच बरोबर दुपारी शेताच्या बांधावर त्याला नोकराने एका शहाळ्याचे पाणी पाजले. म्हणून गोपूला शेतावरचे काम फार सोपे वाटले.

दोन तीन आठवड्यांनी पावसाच्या पाण्याने व पाटाच्या पाण्याने शेते तुडुंब भरण्यात आली आणि शेत नांगरण्याची वेळ आली. रामजी पाटलांनी गोपूला बोलवून ते काम करवून घ्यायला नेमले. गोपू शेतात निघाला तेव्हां मुसळधार पाऊस पडू लागला. बांधावरून शेतावर जातांना दोन तीनदा पाय सरकून गोपू चिखलात पडला. दुसऱ्या दिवशी तो छत्री व काठी घेऊन मुश्किलीने शेतात पोचला. पावसाळ्याचे दिवस होते, केव्हां पाऊस पडेल, सांगणे शक्य नव्हते. ते काही असो, एक आठवडाभर चिखलात व पावसात काम करून शेवटी शेत नांगरण्याचे काम कसे–बसे पुरे झाले.

त्यानंतर काही दिवसांनी तीन दिवस दररोज शंभर मजुरांकरवी त्याला वेणणीची कामे करवून घ्यावी लागली. त्याला सकाळी नऊ वाजतां शेतावर जावे लागे आणि दिवे लागणीलाच घरी परतणे शक्य होई. रामजी पाटलांनी गोपूला एकूण दहा दिवसाची मजुरी तीस रुपये दिली.

पाण्यात व चिखलात काम करावे लागल्यामुळे गोपूच्या पायाला चिखल्या झाल्या. बोटांच्या बेचकांना खाज सुटली. पडसें झाले व खोकल्याबरोबर त्याला तापही आला.

रामजी पाटलाने नवीन तऱ्हेचे बियाणे वापरून रोपांची लावणी केली होती. म्हणून नव्वदाव्या दिवशीच कापणी करावी लागली. कापणीच्या वेळी पुन्हां गोपूला रामजी पाटलांनी कामाला बोलविले. रात्री खळ्यातून भाताची चोरी होऊ नये म्हणून शेतावर झोपडे बांधून त्यात पाहारा द्यावा लागे.

हिंवाळा सुरू झाला होता. आंग फाटू लागले होते. शिवाय झोपडीत धुके व गार वारे येत. हातापायांची बोटे आखडून जात. पोटऱ्यात गोळा येई. लागोपाठ आठ

श्री न. र. नखाते



दिवस कापणीचे काम चालू होते. गोपूला चोवीस रुपये मजुरीचे मिळाले.

गोपूला आता कळू लागले की गाड्या भरभरून येणाऱ्या धान्याच्या पोत्यांच्या मागे किती मेहनत व काबाडकष्ट आहेत. नुसते पाहाणी करणाऱ्या त्याच्यासारख्यांना इतके कष्ट सोसावे लागत आहेत तर प्रत्यक्ष काम करणाऱ्या मजुरांना व शेतकऱ्यांना किती कष्ट करावे लागत असतील!

एके दिवशी रात्री एक चोर शेतात शिरला व शेतात कापणी झाल्यावर पडून असलेले पीक पळवून नेऊ लागला. त्याने त्या पूर्वी चार भाताची पोतीच चोरून दूर नेऊन ठेवली होती. परंतु ते कळल्यावर रामजी पाटलाने व मजुरांनी चोराचा पाठलाग केला. चोर पोती टाकून पळून गेला.

खरोखरी तो चोर नव्हताच. गोपूला कळावे म्हणून लखूने काही जणांना नेमले होते.

शेवटी भाताची पोती घरी आली. भात कोठारात व कणग्यांत भरून ठेवण्यात आले. लखूने गोपूला विचारले—"काय रे गोपू! कशी वाटली शेतकीची कामे? गेल्या वर्षी तू काय म्हणाला होतास आठवते का?"

गोपू म्हणाला—"पोती भरभरून गाड्या तुझ्या दारासमोर येतांना पाहून मला त्यावेळी हे नाही कळले की या पिकाच्या मागे इतकी मेहनत आहे. तुझ्या कृपेने माझे डोळे उघडले व मला कामाची संवय लागली. कष्टाचे फळ किती गोड असते हेही कळले."

लखू स्मित करून म्हणाला—"बाबारे, दुरून डोंगर साजरे दिसतात. आतां कळले ना की 'जावे त्याच्या वंशा तेव्हां कळे' ही जुनी म्हण कशी खरी आहे ती!"

त्यानंतर गोपू गावातल्या श्रीमंत शेतकऱ्यांची शेते खंडाने घेऊन शेतकीची कामे करू लागला. आणि आपल्या पायावर उभा राहून एक सधन शेतकरी झाला.






**फा**र प्राचीन काळी त्वष्ट्र प्रजापती नावाचा देवामध्ये एक श्रेष्ठ तपस्वी होऊन गेला. तो इंद्राचा द्वेष करी. त्याने त्रिशिर, म्हणजे तीन डोकी असलेल्या विश्वरूप नावाच्या एका राक्षसाची सृष्टी केली. विश्वरूप जसजसा वाढत गेला तसतसा आपल्या तिन्ही तोंडाचा निरनिराळ्या प्रकारे उपयोग करू लागला. त्याच्या त्या अद्भुत शक्तीची ऋषिमुनीही वाखाणणी करू लागले. तो एका तोंडाने वेदपठन करी. दुसऱ्या तोंडाने सोमरस पिई आणि तिसऱ्या तोंडाने जगात जे काही घडत होते ते शिकून घेई.

या विश्वरूपाने पंचाग्नि तपश्चर्याही केली. हिवाळ्यात थंडगार पाण्यात एका पायावर व उन्हाळ्यात पंचाग्नींच्या मध्ये उभा राहून निराहार तपश्चर्या करीत असलेल्या विश्वरूपाला पाहून इंद्रासन डोलू लागले. इंद्राने त्याची तपश्चर्या भंग करण्याचे ठरवून रंभा, ऊर्वशी व मेनकेला बोलावून आज्ञा केली—"अप्सरा—हो, तो तीन डोकी असलेला विश्वरूप माझे आसन बळकावण्यासाठी तपश्चर्या करीत आहे. तेव्हां तुम्ही त्याची तपश्चर्या भंग करा. मला तुम्ही एवढी मदत केलीच पाहिजे. आपल्या नृत्य, गायनादि कलांचा उपयोग करून त्या विश्वरूपाला कामदेवाच्या जाळ्यात फसवा."

स्वतः इंद्राला दीन शब्दात वाणीने बोलत असलेला पाहून अप्सरा त्याला म्हणाल्या—

१७. वृत्रासुराचा उदय



"आम्ही लगेच जातो आणि आपल्या सौंदर्याने व विविध कलांचा उपयोग करून त्या विरूपाक्षाला वश करून घेतो." त्या सांगून त्या विश्वरूपाच्या आपल्या दिशेने निघाल्या. अप्सरा नाचतगात व चित्र विचित्र अभिनय करीत येत असलेल्या पाहूनही विश्वरूपाने मुक्या, बहिऱ्या व आंधळ्या-सारखा अभिनय केला. त्याचे मन विचलित झाले नाही.

अप्सरा काही दिवस गात नाचत राहिल्या. परंतु विश्वरूपाचे मन विचलित करू शकल्या नाहीत. त्या आश्चर्य चकित होऊन इंद्राकडे परत जाऊन म्हणाल्या— "आमचे सर्व प्रयत्न त्या मुनीसमोर फुकट गेले. आम्ही त्याला वश करण्यासाठी अनेक उपाय केले, पण त्याचे मन थोडेसुद्धा ढळले नाही. बरं तर बरं, त्याचा शाप लागल्या-शिवाय आम्ही सुखरूप परतलो."

इंद्राने त्या थोर विश्वरूपाचा वध करण्याचे ठरविले. परंतु ते केवढे घोर पातक आहे याचा त्याने विचारही केला नाही. तो ऐरावतावर बसून विश्वरूप तपश्चर्या करीत तेथे आला आणि समाधिस्थ स्थितीतच विश्वरूपावर वज्रायुधाचा प्रयोग केला आणि त्याला ठार केले.

देवेंद्राचा हा अत्याचार ज्या मुनींनी प्रत्यक्ष डोळ्यांनी पाहिला ते म्हणू लागले— "देवेंद्राची बुद्धी फिरली आहे की काय? इतक्या थोर पुण्यवान पुरुषाचा त्याने असा क्रूरपणाने वध करावा! याचा परिणाम याला नक्कीच भोगावा लागेल."

विश्वरूपाचा वध करून इंद्र घरी निघून गेला. परंतु त्याच्या मनात एक शंका राहून गेली. मेलेला विश्वरूप पुन्हा जिवंत तर होणार नाही ना? कारण वज्रायुधाचा प्रहार होऊन तो मेला होता, तरी त्याच्या चेहऱ्यावर तेज झळकत होते.

ती शंका मनात होती म्हणून इंद्राने विश्वकर्म्याला सुताराला (बोलाविले?) व म्हणाला—"विश्वरूप मेला असला तरी जिवंत असल्यासारखे त्याच्या चेहऱ्यावर तेज झळकत आहे. म्हणून तू जाऊन त्याचे डोके कापून टाक."

ते ऐकून सुतार (विश्वकर्मा?) म्हणाला— "हे काय म्हणतां? अहो, तो वज्रायुधाच्या प्रहारामुळे मेला आहे. मेलेल्याला पुन्हां मार-ण्याचं पाप करू म्हणतां? आपण निष्कारण इतक्या थोर पुरुषाचा कां वध केलात, हे नाही मला कळले. तो मेल्यावर त्याचा शिरच्छेद करण्याची गरजच काय? शिवाय तुम्हांला याची एवढी भीती वाटण्याचे कारणच काय?"

"हा फक्त एक मुनीच नाही, माझ्या शत्रूसुद्धा आहे. शत्रूचा वध करावा अशी नीती आहे, म्हणून मी त्याचा वध केला. मेलेला असूनही तो जिवंत असल्यासारखा दिसतो आहे. अग्नी, ऋण आणि शत्रू यांचा अंशही राहू देता कामा नये अशी नीती आहे ना?" इंद्र म्हणाला.

"हा निरपराधी व ब्रह्मतेज असलेला असतां त्याचा तू वध केलास याबद्दल तुला ब्रह्महत्येचे पाप लागणार नाही का?" विश्वकर्म्याने विचारले.

"मला शत्रू जिवंत राहिला तर त्याची भीती वाटते, ब्रह्महत्येच्या पापाची भीती तेवढी वाटत नाही. त्या पापातून काहीतरी करून मुक्ती मिळेल: परंतु शत्रू जिवंत राहिला तर मात्र सुटका नाही! म्हणून शत्रूचा नाश करण्यासाठी कोणतेही पाप करावे लागले तरी ते करणे भाग आहे!" इंद्र म्हणाला.



"असले पापकर्म करण्यास तू लोभाला बळी पडलास असे वाटते. मला तसा लोभ नाही, मग मी हे असले कृत्य कशासाठी करायचे?" विश्वकर्म्याने विचारले.

"यापुढे तुला मी यज्ञभाग देत जाईन. यज्ञात पशुबली दिल्यावर त्याचे डोके तुला मिळेल." इंद्र म्हणाला.

"ते ऐकल्यावर सुताराने आपल्या कुऱ्हाडीने विश्वरूपाची तिन्ही डोकी कापली. विचित्र गोष्ट अशी की ती डोकी जमिनीवर पडली तेव्हा प्रत्येक डोक्याच्या तोंडातून



असंख्य पक्षी बाहेर येऊन उडून गेले. वेदपाठ करणाऱ्या तोंडातून कपिजल नावाचे पक्षी, चतुर्दशलोकांचे निरीक्षण करणाऱ्या डोक्यातून तित्तर पक्षी व सोमरस पिणाऱ्या तोंडातून चिमण्या बाहेर पडल्या.

आपले काम आता संपले असे मनाचे समाधान करून येऊन इंद्र ब्रह्महत्त्येच्या पातकाचे प्रायश्चित करण्याच्या प्रयत्नाला लागला.

आपल्या मुलाचा इंद्राने वध केला असल्याचे त्वष्ट्र प्रजापतीला कळल्यावर तो देवांना म्हणाला–"ऐकलंत का रे, माझ्या मुलानें कोणतेही पाप आयुष्यभरात कधी केले नाही. असे असून या इंद्राने त्याचा वध केला. तर मग मी या इंद्राचा सर्वनाश करण्यासाठी एका अति बलिष्ठ मुलाची सृष्टी करीत आहे!" असे सांगून त्वष्ट्र प्रजापतीनें अथर्वण मंत्रांचा जप करून अग्नी पेटविला आणि अग्नीलाही निष्प्रभ करणाऱ्या एका मुलाची सृष्टी केली.

त्वष्ट्र त्याला म्हणाला–"फक्त जन्माला येऊन भागणार नाही, तू तत्काळ वाढून मोठा हो आणि त्या इंद्राचा वध कर." त्याने आपल्या मुलाला अशी आज्ञा केली.

पाहतां पाहतां तो मुलगा पर्वताएवढा वाढला आणि प्रत्यक्ष मृत्यूचा अवतारच वाटू लागला. तो देवांना धडकी बसेल अशा आवाजात गरजला–"माझे नाव काय? माझी सृष्टी कशासाठी केलीस? तुला कसले दुःख व त्रास आहे? तुझ्या मनात जी इच्छा असेल ती सांग, मी ती पूर्ण करीन. जो पित्याची इच्छा पूर्ण करीत नाही त्या मुलाहून नीच आणखी कोणी नाही!" त्याने या शब्दात पित्याला विचारले.

तेव्हा त्वष्ट्र म्हणाला–"तुझे नाव वृत्र आहे. वेदवेत्ता आणि तीन तोंडे असलेला असा विश्वरूप नावाचा तुझा थोरला भाऊ होता. इंद्राने त्याचा वध केला. त्या इंद्राचा वध करण्यासाठी तुझा जन्म झाला आहे. ते काम तू कर!" असे आपल्या मुलाला





सांगून त्वष्ट्राने निरनिराळ्या आयुधांची निर्मिती करून त्याला दिली आणि एक रथ दिला आणि एका सुमुहूर्तावर ब्राह्मणांकडून त्याला आशीर्वाद देववून इंद्राचा वध करण्यासाठी पाठविले.

ते वृत्त इंद्राला लगेच कळले. "त्वष्ट्र प्रजापतीने आपला वध करण्यासाठी पर्वताकार वृत्राची सृष्टी केली आहे. तो महाबलशाली राक्षसांचे सैन्य घेऊन स्वर्गावर स्वारी करायला येत आहे." ही बातमी दूतांनी इंद्राला येऊन कळविली. परंतु ज्या देवांनी स्वतः वृत्राला पाहिले होते आणि घाबरून पळून आले होते ते इंद्राला म्हणाले–"देवेंद्रा! अत्यंत भयंकर असे अपशकुन आपल्या राजधानीत दिसत आहेत: घुबडे व गिधाडे ओरडू लागली आहेत घरांवर राक्षसांचा ओरडा ऐकू येतो आहे. बायकांना दुःस्वप्ने पडू लागली आहेत."

त्या अपशकुनाची गोष्ट ऐकून इंद्राने बृहस्पतीला विचारले–"या अपशकुनांना दूर करायला शांत वगैरे काही आहे का?"

"एका अत्यंत पुण्यवान व निरपराधी श्रेष्ठ मुनीचा वध केल्यावर शुभ असे काय होणार? त्या पापाची फळे भोगल्याशिवाय तुला मुक्तता मिळेल असे वाटले का तुला? काही काम करावयाचे झाल्यास प्रथम साधक-बाधक गोष्टींचा विचार करून मग करावयाचे असते, नाही तर आयुष्यभर कष्टच सहन करावे लागतात तू लोभा मोहाला वश होऊन ब्रह्महत्येचे पाप केलेस. मोठमोठ्या पापपुण्याची फळे तत्काळ भोगावी लागतात. इतरांना त्रास देणाऱ्याला कधी सुख मिळत नाही. तुझ्यावर संकट येऊन कोसळले आहे. हा वृत्र महापराक्रमी आहे. सहजी मरणार नाही. त्वष्ट्राने त्याला अनेक आयुधेही दिली आहेत. त्यांपैकी एकाचीही बरोबरी तुझे वज्रायुध करू शकणार नाही." बृहस्पती म्हणाला.

देवेंद्राचा वध करण्यासाठी वृत्र येत असल्याचे ऐकून मुनी, यक्ष व देव पळून गेले. त्या सर्वांना पळून जात असलेले



पाहून इंद्राला फार वाईट वाटले. तो आपल्या सेवकांना बोलावून म्हणाला– "रुद्रांना, आदित्यांना, वसूंना आणि दिक्पालकांना विमानातून युद्धासाठी तयार होऊन यायला बोलवा."

असे सांगून इंद्राने आपल्या ऐरावतावर बृहस्पतीला बसवून घेतले आणि युद्धाला निघाला. त्याच्या पाठोपाठ देव आपापल्या शस्त्रास्त्रासह निघाले. वृत्रासुरही दानवांचं सैन्य घेऊन युद्धाला आला. दोन्ही सैन्ये मानस सरोवराच्या उत्तरेकडील पर्वतांवर समोरासमोर येऊन उभी राहिली.

शंभर वर्षे युद्ध चालू होते. त्यामुळे त्रिलोकाला त्रास सोसावा लागला. सर्वात प्रथम वरुण पळाला. त्यानंतर क्रमाने वायुगण, यम आणि तेजोहीन झालेला अग्नी निघून गेले. इंद्राला सुद्धा पळून जाण्याशिवाय मार्ग उरला नाही. स्वर्गलोक जिंकून वृत्रासुर आपल्या वडिलांकडे जाऊन नमस्कार करून म्हणाला–"सर्व देव व देवराज इंद्र रणांगणावरून भयभीत होऊन पळून गेले. भित्रे म्हणून मी त्यांचा वध केला नाही. इंद्र कापुरुषासारखा रणांगणावरून पळून गेला, परंतु मी त्याच्या ऐरावताला घेऊन आलो आहे. तुम्हांला ही माझ्या तर्फे एक भेट म्हणून मी देतो. आतां काय करायचे, सांगा. किती कष्टाचे काम असले तरी ते मी करीन."

त्वष्टा आपल्या मुलाला भेटून आनंदाने म्हणाला–"बाळा रे, तुझा हा पराक्रम अद्वितीयच होय. आतां मी वर मान करून चार लोकांत हिंडू फिरू शकेन. माझ्या मनातले दुःख नाहीसे झाले. मनाचे समाधान झाले. आता पुढे तू काय करावयाचे आहे ते मी सांगतो. इंद्राचा विश्वास नाही. तो अनेक डावपेच टाकील, इंद्रजाल करील. पण तू तिकडे लक्ष देऊ नकोस व ब्रह्मदेवाचे स्मरण करून तपश्चर्या कर आणि अमरत्वाचा वर घेऊन इंद्राची घमेंड उतरव. तपश्चर्येने प्राप्त न होणारी एकही वस्तू नाही. त्या दुष्टाने निष्कारण माझ्या मोठ्या

मुलाचा वध केला त्याचे दुःख मनात कायमचे राहून गेले आहे. त्या इंद्राचा शेवट झाला पाहिजे."

वृत्रासुर पित्याचे आशीर्वाद घेऊन गंधमादन पर्वतावर गेला व नित्यनियमितपणे गंगास्नान करून दर्भासनावर बसून कोणत्याही प्रकारचा आहार न घेता योग करू लागला. गंधमादन पर्वतावरच्या ऋषीमुनींनाही आश्चर्यचकित करून घोर तपश्चर्या करू लागला.

इंद्र जास्तच घाबरून गेला. वृत्रासुराचा तपोभंग करण्याचे ठरविणे एवढेच काय ते त्याला शक्य होते. त्याने अप्सरांना पाठविले. परंतु त्यांचे सर्व प्रयत्न वृथा गेले. त्या इंद्राकडे परतल्या व वृत्रासुराचा तपोभंग करणे त्यांना शक्य नसल्याचे त्यांनी सांगितले.

ब्रह्मदेव वृत्रासुराच्या तपश्चर्येवर प्रसन्न होऊन प्रगट झाला व म्हणाला–"वृत्रा! आपली तपश्चर्या पुरी कर आणि तुला काय हवे ते मागून घे!"

वृत्रासुर दोन्ही हात जोडून इंद्रासमोर उभा राहिला व म्हणाला–"देवाधिदेवा! मी इंद्रपद मिळविले व त्याचा मला फार आनंद झाला. त्याहून जास्त आनंद आज तुझ्या दर्शनाने प्राप्त झाला. मी धन्य झालो! तू मी मागेन तो वर देणार असशील तर मला हा वर दे की कोणत्या धातूच्या लाकडाच्या किंवा बांबूच्या अगर वेताच्या आणि इतर शस्त्रांनी मला मरण येणार नाही असा वर दे. त्याच बरोबर युद्ध वाढत जाईल तसतसे माझे बळही वाढत जाईल, असा वर दे."

ब्रह्मदेवाने त्याने मागितले तसे वर दिले आणि निघून गेला.

वृत्रासुर आनंदाने आपल्या पित्याकडे निघून गेला आणि घडलेले वृत्त सांगितले.

"बाबारे! शुभं अस्तु! तुझे शुभच होईल. तुझा मोठा भाऊ विश्वरूप याचा निष्कारण वध करून इंद्राने ब्रह्महत्येचे पाप केले आहे. तेव्हां आतां तू निर्भय होऊन त्याचा वध कर." त्वष्ट्रा म्हणाला.



# सासुबाईंची खोली

रामजीने रामपूर गावच्या पाटीलाचे शेत खंडाने करीत हळूहळू बरेच पैसे जमविले व एक वाडा बांधायचे ठरविले. त्यावेळी घरात कोठेकोठे कशा खोल्या असाव्या याविषयी रामजी व त्याची बायको सुशीला बोलत असतां तिने सासुबाईंसाठी एक निराळी खोली असावी असे सुचविले व वाड्याच्या एका कोपऱ्याच्या बाजूची एक जागा दाखविली. ते आवडले नसूनही बायकोचे मन राखण्यासाठी रामजीने होकार देऊन तशी एक खोली बांधली.

परंतु घर बांधून व्हायच्या आधीच रामजीची आई वारली. तिच्यासाठी बांधलेली खोली तशीच पडून राहिली. पाटलाने, शेत खंडाने करून रामजीने एवढा मोठा वाडा बांधला तर शेत खंडाने न देतां स्वतःच पीक काढायचे ठरविले. लहानलहान शेते खंडाने करणे पसंत नव्हते म्हणून रामजी वाडा भाड्याने देऊन परगावी निघून लागला.

काही काळ लोटल्यावर रामजीने एकाएकी डोळे मिटले. त्याचा मुलगा मोठा झाला व त्याचे लग्नही झाले. सुशीला मुलाला व सुनेला बरोबर घेऊन रामपूरला स्वतःच्या घरी येऊन राहू लागली. सुशीला व सून दोघींनी सर्व घर पाहिले. सुनेने विचारले–"सासुबाई, मामंजींनी घर किती चांगलं बांधलं आहे हो! परंतु त्यांना तुम्ही त्या खोलीत एकट्या राहणार हे कसं काय कळलं हो?"

सुशीलेच्या तोंडावाटे एकही शब्द निघाला नाही.





# चौथा चोर

कोण्या एका देशात तीन अट्टल चोर रहात असत. ते दररोज एक नवी चोरी करीत. कित्येक महिने लोटले तरी कोणी त्यांना पकडू शकला नाही. त्यांच्या नावाचा फक्त उल्लेख केला की मोठमोठे श्रीमंत थरथर कापत. काय वाटेल ते झाले तरी त्यांना पकडायचेच असे ठरवून त्या देशाचा राजा स्वतः दररोज रात्री चोरासारखा वेष पालटून राजधानीत सर्व बाजूला हिंडू लागला.

अशातऱ्हेने काही रात्री फिरत राहल्यावर राजाला एका काळोख्या रात्री चोर रहात असत ती जागा सापडली. राजा त्या जागी पोचला तेव्हां चोर त्या रात्री कोठे चोरी करावी याविषयी विचार करीत होते.

नव्या चोराला पाहतांच त्या तिघांही अट्टल चोरांस थोडी शंका आली व त्यांनी त्याला विचारले–"कोण रे तू? आणि इकडे कशासाठी आला आहेस?"

"मीसुद्धां चोरच आहे. या भागात तुम्ही थोर निष्णात चोर असल्याचे ऐकून आलो आणि आपले कौशल्य तुम्हांला दाखवून तुमची शाबासकी मिळावी होईल तितकी तुम्हांला मदत करावी या हेतूने आलो आहे." राजा म्हणाला. चोर हसून म्हणाले–"तुला आमच्या कौशल्याची थोडी तरी माहिती आहे का रे?"

"मला नाही माहीत. सांगा, ऐकतो मी!" राजा म्हणाला.

एक चोर म्हणाला–"कुलूप किती बळकट व मोठे असले तरी ते मी एखाद्या खिळयाने सहज उघडू शकतो."

दुसरा चोर म्हणाला–"मी जमिनीला कान लावून पुरून ठेवलेला धनाचा सांठा कोठे आहे सांगू शकतो."

तिसरा म्हणाला–"मी कोणाला फक्त एकदा पाहिले असले तरी त्यानंतर त्याला कोठे ही कोणत्याही रूपात ओळखू शकतो."

"तुझ्यात आमच्यासारखी एखादी विशेष कला किंवा शक्ती आहे का?" चोरांनी विचारले.

काय बोलावे, राजाला सुचले नाही. म्हणून तो म्हणाला–"मी अंगठा वळवून उलटा खाली धरला की कोणालाही यमलोकी पाठवू शकतो. तर्जनी म्हणजे दाखवायचे बोट वर केले की मरायला तयार असतात तेसुद्धा मृत्यूच्या दाढेतून सहजी वाचतात."

ते ऐकून तिघां चोरांना आनंद झाला. इतके शक्तिसामर्थ्य असलेला चोर आपल्या टोळीत सामील झाल्याचा त्यांना अपार आनंद झाला.

"बरं मग, आज रात्री कोठे बरं चोरी करू या?" राजाने विचारले.

"तूच सांग! तू सुचविशील तेथेच जाऊन चोरी करू या. आमच्या शक्तिसामर्थ्याची तूच परीक्षा करून पहा, पाहिजे तर!" चोर म्हणाले.

"तरमग आपण सर्व मिळून महाराजांच्या खजिन्यातच आज दरवडा घालू या." राजा म्हणाला.

चौघे चोर राजवाडयाच्या दिशेने निघाले आणि पाहरेकऱ्यांची नजर चुकवून राजवाडयात शिरले. दुसऱ्या चोराने जमिनीला कान लावून पाहिला व म्हणाला–



"या बाजूला चला, खजिना या बाजूला आहे."

चौघे त्या दिशेने चालू लागले. खजिन्याला एक मोठे कुलूप लावलेले होते. परंतु पहिल्या चोराने ते एका क्षणार्धात उघडले. चोर आत शिरले.

त्या वेळी राजा इतर चोरांची नजर चुकवून निघून गेला व त्याने शिपायांना पाठविले. तिथे चोर मुद्देमालासह कैद झाले.

दुसऱ्या दिवशी त्यांना चवकशीसाठी दरबारात हजर करण्यात आले. सिंहासनावर बसलेल्या राजाला पाहताच तिसरा चोर आपल्या दोघां साथीदारांना म्हणाला– "हाच तो आपल्याबरोबर चोरी करायला आलेला माणूस!"

सर्व चवकशी संपल्यावर राजाने आपल्या उजव्या हाताचा अंगठा वळवून उलटा खाली केला. अट्टल चोरांना मृत्युदंडाची शिक्षा देण्याचा निकाल जाहीर झाला.

दुसऱ्या दिवशी तिघांना वधस्तंभाजवळ नेण्यात आले.

एका अधिकाऱ्याने येऊन त्यांना विचारले–"तुम्हांला तुमची शेवटची एखादी इच्छा असेल तर सांगा!"

"महाराजांना एकच एक प्रश्न विचारावयाचा आहे. एवढीच आमची शेवटची इच्छा आहे!"

राजा समोर येऊन उभा राहिला. "मला कोणता प्रश्न विचारावयाचा आहे तुम्हांला?" त्याने विचारले.

"आणखी काही नाही, महाराज! आम्ही आपल्या शक्तींचे प्रदर्शन केले. आपण आपल्या दोन शक्तींचा उल्लेख केला होता. परंतु एकाच शक्तीचे प्रदर्शन आपण केलेत. दुसरी शक्तीसुद्धा पहायला मिळाली तर मनाचे समाधान होईल!" चौथा चोर म्हणाला. राजाने स्मित करून आपले तर्जनी बोट वर केले. लगेच शिपायांनी येऊन चोरांना वधस्तंभापासून बंधनमुक्त केले.

त्यानंतर त्या अट्टल चोरांनी चोरीचा धंदा सोडला व राजभक्तीचा परिचय देऊन आयुष्यभर राजाची सेवा केली.



# अक्कल ठिकाणावर आली!

बळवंतरावांनी दहा हजार रुपये हुंडा घेऊन आपल्या मुलाशी सदाशिवरावांच्या थोरल्या मुलीने लग्न करून घेतले. त्यानंतर दहा वर्षांनी सदाशिवरावांनी आपल्या दुसऱ्या मुलीचे लग्न पंधरा हजार हुंडा देऊन करून टाकले.

ते कळल्यावर बळवंतराव सदाशिवरावांना म्हणाले–"माझ्या मुलानेच तुमचं कोणतं घोडं मारलं होतं हो? आणखी पांच हजार रुपये मुकाट्याने आणून द्या, नाहीतर आपल्या माहेरी घेऊन जा."

सदाशिवरावांना काय करावे, सुचेना. ते गावच्या पाटलांचा सल्ला घ्यायला गेले.

पाटलाने बळवंतरावांना बोलाविले व म्हणाला–"सदाशिवरावांनी आणखी पांच हजार द्यावेत असं तुम्ही म्हणालात म्हणे? तुमच्या मुलाला त्यांनी दहा वर्षांपूर्वी दहा हजार रुपये दिले होते ते आज मितीला व्याजासकट बावीस हजार झाले. तुम्हीच सात हजार रुपये सदाशिवरावांना दिले पाहिजेत."

ते ऐकून बळवंतरावांची अक्कल ठिकाणावर आली.





# प्रश्नोत्तरे

**एस. वेणुगोपाल, मछिलीपट्टणम्**

**प्र. पृथ्वीच्या गुरुत्वाकर्षणाचे क्षेत्र पार करून गेल्यावर कोणतीही वस्तू अंतरिक्षातच राहून जाते म्हणतात. तरमग 'स्कायलॅब' या आकर्षण क्षेत्रात पुन्हा कां आले?**

उ. : पृथ्वीच्या गुरुत्वाकर्षणाबाहेर पूर्णपणे गेलेली वस्तू चंद्राच्या आकर्षण क्षेत्रात जातांच ती चंद्राच्या गुरुत्वाकर्षण शक्तीमुळे प्राप्त होणाऱ्या वेगाने चंद्राच्या चारी बाजूला फिरत चंद्राचा एक उपग्रह होऊन जाते. वेग आणखी जास्त असेल तर सूर्याच्या आकर्षणामुळे सूर्याच्या चारी बाजूला फिरू लागते.

कोणतीही वस्तु भूमीच्या गुरुत्वाकर्षणाबाहेर जावयाची झाल्यास ती भूमीपासुन कित्येक हजार मैल गेली पाहिजे. 'स्कायलॅब' गुरुत्वाकर्षणाच्या परिधीतच होती. परंतु तिचा वेग भूमीच्या आकर्षण शक्तीला रद्द करून जाण्याइतका असल्याकारणाने ती पृथ्वीच्या चारी बाजूला फिरत राहिली, तशी ती राहली नाही आणि पृथ्वीकडे येऊ लागली म्हणजे तिचा वेग क्षीण झाला म्हणावयाचा. दुसरे कारण असायला जागाच नाही. पृथ्वीच्या चारी बाजूला (रॅकेटच्या मदतीशिवाय) फिरणाऱ्या वस्तूचा वेग कमी व्हायला कारण ती फिरत असलेल्या कक्षेत हवा विरळ असण्याचीही शक्यता आहे; नाहीतर आकाशात फिरणाऱ्या एखाद्या उल्काचा स्पर्श झाल्याने वेग कमी झाला असेल.

**प्र.: डार्विनच्या विकास सिद्धांताप्रमाणे माकडापासून मानव झाला हे आपल्याला कळते. परंतु अद्यापी वानर जाती अस्तित्वात आहे. तशीच पूर्वी कधी राक्षस जातीतला थोडातरी भाग असायला होता नाही का? तरमग आहे का कोठे?**

उ. : माकडापासून मानवाचा जन्म झाला हे मत तर आपल्या आज्यांचेही आहे. कोणत्यातरी मूळ जातीतून माकडे, वानर व मानव निरनिराळे विकास पावले. त्या मूळ जातीत काही वानरांची लक्षणे तर काही मानवांची लक्षणे होती. ती लक्षणे निरनिराळी विकसित होऊन त्यांपासून माकडे, वानर, वनमाणूस या रूपात विकसित झाले असे शास्त्रज्ञांचे मत आहे. (वानर म्हणजे apes; त्यांना शेपूट नसते. मागच्या पायांवर ते उभे राहाते व पुढच्या पायांचा हातासारखा उपयोग करू शकते.)

राक्षस जाती मानवाच्या विकासातील एक स्थिती असल्यास ती नष्ट झाली असल्यास नवल नाही. विकास पावत असताना माकडांच्या व वानरांच्या जाती नष्ट झाल्या तशा!



# अघटित अनपेक्षित

[८१]

भुताची गोष्ट ऐकून राजाने ब्राह्मणांना बोलावून विचारले—"गुरुजी! मला तीन स्तने असलेली मुलगी झाली आहे. त्यापासून काही अशुभ होणार असेल तर त्यापासून वांचविण्यासाठी मी काय करावे असे आपले मत आहे?"

"राजा, कोणतेही व्यंग असलेली स्त्री नीतिनियम उल्लंघन करणारी असते व ती पतीच्या मरणाला कारण होते. तीन स्तने असलेल्या मुलीचे तोंड पाहिल्यास पित्याला मरण येते. म्हणून महाराजांनी त्या मुलीचे तोंडही पाहू नये. ती दृष्टीआड राहील याची काळजी बाळगावी. तिचे लग्नाचे वय झालं की तिचे लग्न करून त्या जोडप्याला राज्याबाहेर पाठवून द्यावे. असे केल्यास आपल्याला इहलोकात अपकीर्ती आणि परलोकात दुःख सोसावे लागणार नाही." ब्राह्मणांनी भविष्य वर्तवले.

त्यानी सांगितल्याप्रमाणे केले. मुलगी वयात आल्यावर राजाने दवंडी पिटवली—"महाराजांच्या तीन स्तनें असलेल्या मुलीशी जो कोणी लग्न करील त्याला एक लक्ष सुवर्णमुद्रा दिल्या जातील. लग्न होताच दोघांना राज्याबाहेर पाठविण्यात येईल."

ती दवंडी ऐकून कोणीही राजकन्येशी विवाह करण्यास पुढे आला नाही. तिच्याशी विवाह केल्यास मरण चुकणार नाही, हे प्रत्येकाला माहीत होते. म्हणून सर्व भीत. पिढ्यान्‌पिढ्या दारिद्र्य भोगणारासुद्धा कोणी तिच्याशी लग्न करायला धजला नाही. राजकन्या वाढत गेली तसतसे तिचे सौंदर्य वाढत गेले. परंतु तिला मोकळेपणे



हिंडतां फिरतां येत नव्हते. दररोज राजधानीत दवंडी पिटविलीजात होती.

एके दिवशी राजधानीत एक आंधळा भिकारी भिक्षा मागायला रस्त्यात हिंडू लागला. त्याला वाट दाखवायला त्याच्याच गावचा एक कुबडाही बरोबर होता.

ती दवंडी ऐकून आंधळा कुबडचाला म्हणाला—"मला त्या दवंडी वाजविणाऱ्याकडे घेऊन चल. मी त्या राजकन्येशी लग्न करतो. बायको कशी का असेना, मला एक लक्ष सोन्याची नाणी मिळतील आयुष्य सुखाने घालविता येईल! त्यानंतर मरण आले तरी हरकत नाही. माझ्यासारख्या आजन्मभिकाऱ्याला मरण सुद्धा मोक्षासारखे सुखाचे आहे. चार दिवस जिवंत राहीन ते दिवस तरी सुखाने राहतां येईल!"

मंथरक नावाचा कुबडा आंधळचाला दवंडी वाजविणाऱ्या जवळ घेऊन गेला.

आंधळा दवंडी वाजविणाऱ्याला म्हणाला—"महाराज आपल्या राजकन्येचा विवाह माझ्याशी करून द्यायला तयार असतील तर मी तिच्याशी लग्नाला तयार आहे."

दवंडी वाजवणारा नोकर आंधळचाला महाराजांकडे बोलावून घेऊन गेला.

"मी सांगितल्याप्रमाणे अटी मान्य करून लग्नाला जो कोणी तयार असेल तो आंधळा, पांगळा, अस्पृश्य कोणीही असो त्याने माझ्या मुलीशी लग्न करून राज्याबाहेर निघून गेले पाहिजे. त्याला मी मुलीबरोबर एक लक्ष सुवर्ण मुद्रा भेट म्हणून देईन." राजा म्हणाला.

राजाच्या आज्ञेप्रमाणे नोकरांनी आंधळचाला नदीवर नेऊन त्याला आंघोळ घातली व त्याला उत्तम वस्त्रे घालायला दिली आणि शास्त्रोक्त विधीने राजकन्येशी त्याचा विवाह करून देऊन त्याच्या हातात एक लक्ष मोहोरा दिल्या. नंतर त्याला व त्याच्या बायकोला नावेत बसवून यमुना नदीपार पोचते केले. त्याच्याबरोबर कुबडचाला सुद्धा नदीपार पोचविण्यात आले. नाववाला त्यांना नदीपार राज्याच्या हद्दीबाहेर पोचवून परतला.

ते एका मोठ्या नगरात पोचले. तेथे त्यांनी एक मोठी हवेली स्वतःच्या राहण्यासाठी ठरवून घेतली आणि त्यात आनंदाने राहू लागले. आंधळा दोन वेळ खाणे आणि झोपणे याशिवाय काही करीत नसे. कुबडाच घरातली सर्व कामे करी. हळूहळू कुबडा आणि राजकन्या या दोघांमध्ये संबंध वाढू लागला.

ती एकदां आपल्या प्रियकराला म्हणाली—"आपण या आंधळचाला वाटेला लावले तर आपल्याला सुखाने आयुष्य घालविता येईल. म्हणून तू काहीतरी जालिम विष घेऊन ये. ते मी आंधळचाच्या खाद्यपदार्थांत घालीन."

कुबडा विषाच्या शोधार्थ हिंडत असतां त्याला एक मेलेला नागसाप दिसला. तो त्याला उचलून घेऊन घरी गेला आणि राजकन्येला देऊन म्हणाला—"तू हा साप तुकडे तुकडे करून शिजव. खूप मसाला घाल व मासळी शिजवली असल्याचे सांगून आंधळचाला वाढ. त्याला मासळी फार आवडते. तो खूप खाईल व गार होऊन जाईल." असे सांगून तो दुसऱ्या कामाला निघून गेला.

राजकन्येने कुबडचाने सांगितल्याप्रमाणे साप शिजविला व पळी घेऊन आंधळचाकडे जाऊन म्हणाली—"प्रियकरा, आज मी आपल्याला आवडणारी मासळी शिजविली आहे. मी नदीवर जाऊन पाणी घेऊन येते. तुम्ही येथे बसून ही सागुती ढवळीत बसा."



आंधळा ओठ चाटीत चमचा घेऊन आनंदाने चुलीजवळ बसला आणि सागुती ढवळू लागला. नागसापाच्या अंगातून विषारी वाफारे बाहेर येत होते. त्यामुळे डोळयांच्या मोतिबिंदूचे आवरण विरघळू लागले आणि त्याला हळूहळू चांगले दिसू लागले.

त्याने सागुती पाहिली. ती मास्यांची नसून सापाचे तुकडे असल्याचे त्याला कळले. तो चकित झाला–"हे मी काय पाहातो आहे? हा साप शिजवीत होती ती आणि मासे शिजवते म्हणाली होती की! असे खोटे का बोलली बरे? सर्व कळते आहे आता! या तीन तीन स्तनं असलेल्या स्त्रीमध्ये पातिव्रत्य कोठून असणार? ती त्या कुबड्याच्या किंवा आणखी कोणाच्या तरी नादी लागली असणार आणि माझा काटा काढून टाकण्यासाठी त्यांचा हा डाव असणार! तर मग आपण आंधळयाचे सोंग करून खरं काय ते पाहून तिची चूक तिच्या गळयात बांधली पाहिजे." असा विचार करून तो आंधळाच असल्याचे सोंग करायचे ठरवून भाजी ढवळीत राहिला.

नंतर काही वेळाने कुबडा व राजकन्या घरी परतली. आंधळयाला दिसत नाही असे मानून त्यांच्या प्रेमलीला चालू झाल्या. ते पाहून जवळ कोणतेही आयुध नाहीसे पाहून सवयीप्रमाणे चाचपडून पाहू लागला. तरी तिकडे त्यांचे लक्ष गेले नाही.

आंधळयाने चटदिशी उठून कुबड्याला उचलून गरगर फिरविले व राजकन्येच्या उरावर जोराने आपटले आणि दोघांना एक जोराचा ठोसा देऊन ठार करण्याचे ठरविले. परंतु गंमत अशी की राजकन्येचा तिसरा स्तन दाबला जाऊन अदृश्य झाला आणि कुबड्याचे कुबड जाऊन पाठ सरळ झाली.

अशा तऱ्हेने दैव अनुकूल असल्या कारणाने राजकन्या, कुबडा व आंधळा परस्परांना ठार करण्याच्या प्रयत्नात परस्परांचे हित करण्याला अनायास कारण झाले.





# अद्भुत मांत्रिक

[ २१ ]

[ कालीवर्माने भुयाराच्या वाटेने जाऊन बैराग्यांच्या हातातून मंत्रदंड घेतला. त्यानंतर ते सर्व जितकेतू राजाच्या उद्यानात पोचले. त्यावेळी तेथे राजा व मायावी मर्कट आले. राजाने बैराग्यांना तेथे येण्याचे कारण विचारले. परंतु गुरु बैरागी फक्त "मंत्रदंड" आणि "रंगुब्रेट" एवढेच बडबडत ओरडू लागला. पुढे–]

गुरुबैरागी म्हणाला ते राजाला कळले नाही. त्याने संतापून विचारले–"अरे मूर्ख संन्याशा! तू ही काय बडबड चालविली आहेस? मंत्रदंड कोठे आहे? आणि हा रंगुब्रेट कोण?"

गुरुबैरागी थोडा थांबून म्हणाला–"महाराज, मी बैरागी आहे. मला संन्यासी म्हणून माझा अपमान करू नका. संन्यासी निराळा असतो आणि बैरागी निराळा. त्यांच्यातला फरकसुद्धा आपल्याला माहीत नाही का?"

ते उत्तर ऐकून राजा जास्तच चिडला. तो काही बोलणार इतक्यात मध्येच मायावी मर्कट संतापून दात किचकिच करीत म्हणाले–"काय रे कपटी बैराग्या! फुकटच्या गप्पा सोड आणि मुद्याची गोष्ट काय ती बोल! माझ्या हातातून मंत्रदंड चोरून नेणाराला तू पाहिले आहेस का?"



गुरुबैराग्याने मायावी मर्कटाकडे चकित होऊन पाहिले व नंतर आपल्या शिष्यांकडे वळून म्हणाला–"हाच का रे तो चंद्रशिला नगराची प्रधानकी बळकावून बसणारा?"

"होय, गुरुवर्य! हेच ते मर्कट अमात्य!" दोघां शिष्यांनी एकाच स्वरात उत्तर दिले. तेव्हां मायावी मर्कट बैराग्यावर तलवार उपसून धावले. परंतु स्वतःला सावरून त्याने तलवारीचा वार करण्याऐवजी आपल्या शेपटीचा चाबूक बैराग्याच्या पाठीवर इतक्या जोराने मारला की बैरागी जमिनीवर पडला. नंतर दरडावून म्हणाला–"अरे ए, जोगाड्या! बोल लौकर काय ते, नाहीतर तलवारीचाच प्रयोग करीन."

शेपटीचा फटका बसल्याने जमिनीवर पडलेला गुरुबैरागी उठून स्वतःला सावरीत शिष्यांकडे पाहू लागला. मोठ्या शिष्याने फार घाबरल्याचे दर्शवीत सल्ला दिला–"गुरुवर्य! खरे काय ते सांगून टाका ना? आपल्याला इनाम मिळेल. राजधानीच्या उत्तरेकडे जी धर्मशाळा आहे तिच्या समोरच्या वाड्याचा मालक रंगूशेट याच्याकडेच नाही का आपण तो मंत्रदंड पाहिला?"

गुरुबैरागी काही उत्तर देणार तेवढ्यात 'किचकिच' करीत मायावी मर्कट थोडे हसले व म्हणाले–"मूर्खा! तूच सर्व सांगितलेस, गुरूला काही सांगायला ठेवलेसच कोठे? तरमग ए राजा! लगेच शिपायांना पाठवून रंगूशेटकडून तो मंत्रदंड मागव!"

राजाने जोराने टाळी वाजवली. लगेच एक शिपाई धावत पुढे आला. राजाने त्या बैराग्याकडे बोट दाखवून त्याला आज्ञा केली–"तू याच्याबरोबर जा आणि राजधानीतल्या रंगूशेटकडे मंत्रदंड आहे तो घेऊन ये."

शिपाई बैराग्यांबरोबर तेथून निघणार किल्ल्याच्या भिंतीच्या पलीकडे शंखनाद ऐकू आला. तत्काळ मायावी मर्कट उडी मारून म्हणाले–"अरे राजा! तो शंखनाद ऐकू आला का? तो वाजविणारेच तर माझे गुरुवर्य मिथ्यामिश्र आहेत. आता आपल्यावरची सर्व संकटे संपलीच समज! माझे गुरु, आपले शत्रू भल्लूक मांत्रिक व त्याच्याबरोबरचा तो राजा दुर्मुख, कालीवर्मा आणि राक्षस उग्रदंड सर्वांचा सर्वनाश करतील. आतां तू चक्रवर्ती राजा होणार!" असे म्हणत मायावी मर्कट किल्ल्याच्या भिंतीकडे निघाले.





जितकेतू राजाने मायावी मर्कटाचा खांदा धरून त्याला थांबविले व म्हणाला–"ऐक रे, अमात्या! माझे सैनिक, सामंत सूर्यभूपती, राक्षस उग्रदंड आणि भल्लूक मांत्रिक व त्याचे साथीदार यांच्या पासून आपण या किल्ल्याचे संरक्षण कसे काय करणार? तूसुद्धा जवळ राहिला नाहीस तर मला याप्रसंगी सल्ला द्यायला कोण मिळणार? आपण मंत्री जीवगुप्ताचा अपमान करून त्याला हाकलून लावले ही मोठी चूक झाली."

"राजा, तुला स्वतःची भीती असण्याचे कारणच नाही. तू अगदी निश्चिंत रहा?" असे म्हणत मायावी मर्कट तेथून पळालेच.

झुडपाआडून कालीवर्मा हे सर्व पहात व ऐकत होता. बाहेर यायला हीच संधी उत्तम आहे असा विचार करून तो झुडपाबाहेर येणार तेवढ्यात सामंत सूर्यभूपती धापा टाकीत धावत येऊन म्हणाला–"महाराज! मला आत्तांच आपल्या किल्ल्याकडे निघाले पाहिजे. कारण मला आत्तांच कळले की, एक राक्षस आणि शंखनाद करीत एक मांत्रिक किल्ल्याचा तट फोडून किल्ल्यात प्रवेश करण्याचा प्रयत्नात आहे म्हणे. किल्ल्यात माझी बायको, मुलगी व थोडे सैनिक फक्त आहेत."

राजा जितकेतू आश्चर्य चकित होऊन म्हणाला–"मला ही सर्व काहीतरी फार मोठी भानगड दिसते आहे. एक राक्षस आणि भल्लूक मांत्रिक माझ्या किल्ल्यावर हल्ला करायला येऊन पोचले आहेत आणि हा दुसरा मांत्रिक आणि दुसरा राक्षस ही काय भानगड आहे?"



सामंत सूर्यभूपतीही गोंधळला. तो चारीबाजूला त्याच स्थितीत पाहू लागला. तितक्यात झुडपाआडून कालीवर्मा बाहेर येऊन म्हणाला—"महाराज! मी यावेळी आपला शत्रू नाही. आपण तलवार उपसू नका. यावेळी आपण केवढ्या मोठ्या संकटांत सापडलां आहां, आपल्या मला त्याची पूर्ण कल्पना आहे. कदाचित आपल्याला कळलेही नसेल की ते मायावी मर्कट किल्ल्याच्या भिंतीवरून उडी मारून बाहेर निघून गेले आहे!"

जितकेतू राजा आश्चर्यचकित होऊन कालीवर्मा म्हणाला ते ऐकत व त्याच्याकडे पहात नुसता उभा राहिला. नंतर त्याने विचारले—"तू कालीवर्माच नाही का? मी पूर्वी तुलाच नाही का शिरच्छेदाची शिक्षा फर्मावली होती?"

तो प्रश्न ऐकून कालीवर्मा थोडा हसला, पण नंतर म्हणाला—"महाराज, ती गोष्ट आता फार जुनी झाली आहे. त्यावेळी आपल्या मनात आपण राजे असल्याचा गर्व होता आणि यावेळी आपण संकटात सापडल्याने गांगरून गेला आहां!"

जितकेतूने सामंत भूपतीकडे संशयी मुद्रेने पहात विचारले—"कालीवर्मा! तरमग दोन राक्षस आणि दोन मांत्रिक ही काय भानगड आहे?"

"महाराज, या सर्व गडबडीच्या मुळाशी दोन मांत्रिकांचे परस्परांशी वैर आहे. ते परस्परांवर सूड घ्यायच्या प्रयत्नात आहेत. ते दोघे ब्रह्मपुत्र नदीच्या उगमाजवळच्या भल्लुकेश्वरीचे भक्त आहेत. त्यांच्यापैकी एकाचे नाव भल्लूकपाद आहे. त्याचाच शिष्य भल्लूक मांत्रिक इकडे आला आहे. दुसरा मिथ्यामिश्र नावाचा एक तांत्रिक आहे. मायावी मर्कट त्याच्या शिष्यांपैकी एक आहे. आतां राहिले राक्षस. ते दोघे सख्खे भाऊ आहेत. त्यांच्यापैकी एक उग्रदंड आमच्याबरोबर आहे. त्याचा भाऊ कालदंड याला मिथ्यामिश्र तांत्रिकाने बंदी करून ठेवले आहे." कालीवर्माने म्हणाला.





कालीवर्मा अजून बोलतच होता, मध्येच सूर्यभूपती म्हणाला—"महाराज, तोच तांत्रिक त्या दुसऱ्या राक्षसाला बरोबर घेऊन माझ्या किल्ल्यावर हल्ला करायला गेला असणार. म्हणून मला निरोप द्या." असे सांगून सूर्यभूपती निघून गेला.

राजा जितकेतू काळजीत पडल्यासारखा कालीवर्माला म्हणाला—"वर्मा! तुला काय वाटते? तू पुढे काय करणार? आणि काय रे, तुझ्या एका हातात मंत्रदंड आहे आणि तू दुसऱ्या हाताने तलवार उपसशील. मी राज्यकारभार पाहण्यात किती कमकुवत असलो तरी खड्ग-युद्धात कोणासमोर मान तुकवणार नाही. तू माझ्यावर कशाचा प्रयोग करणार आहेस?"

कालीवर्माने मंत्रदंड जमिनीवर फेकला व तलवार उपसून तीही दूर फेकली. नंतर म्हणाला—"महाराज! मी यांपैकी एकाचा-ही प्रयोग आपल्यावर करणार नाही. आपल्या राज्यात जे अन्याय व अत्याचार होत आहेत त्यांची जबाबदारी आपल्याला सल्ला देणाऱ्या सर्व मंत्र्यांवर आहे. परंतु यावेळी आपल्या राज्यावर मांत्रिकांचे आणि राक्षसांचे जे संकट आले आहे, त्यांच्यापासून आपले व राज्याचे रक्षण करण्याची जबाबदारी माझ्यावरही आहे."

ते ऐकून जितकेतू राजा खूष झाला. खाली पडलेली तलवार कालीवर्माच्या हातात देऊ लागला, त्याच वेळी भुयाराच्या वाटेने समोरून राजा दुर्मुख आणि त्याच्या पाठीमागून भल्लूक मांत्रिक बाहेर आले.

दुर्मुख गर्जत तलवार उपसून म्हणाला—"कालीवर्मा, आम्हांला वाटत होते की तू कोणत्यातरी भयंकर संकटात सापडला असा-वास. परंतु तू या जितकेतू राजाला इतका वेळ जिवंत कसा काय सोडलास? तरमग मी ते काम आत्तां पुरे करतो." असे म्हणत दुर्मुख राजा जितकेतूच्या अंगावर धावला.

कालीवर्माने विद्युत्वेगाने आपल्या तल-वारीने दुर्मुख राजाची तलवार अडवीत



दुर्मुख राजाला समजावून सांगितले–" राजा दुर्मुखा! घाई करून कसें चालेल? याच जितकेतू महाराजांची सेवा करीत माझ्या वडिलांना वीरगती प्राप्त झाली होती. ते विसरून मी जर आपल्या मालकाचा वध केला तर तो स्वामिद्रोह होईल. ते फार मोठे पाप आहे!"

दुर्मुख संतापून काही म्हणणार इतक्यात भल्लूक मांत्रिक जमिनीवर पडलेला मंत्रदंड उचलून म्हणाला–" कालीवर्मा! शाबास, तू माझा मंत्रदंड परत मिळविलास! माझे गुरु भल्लूकपाद यांचा हाडवैरी तांत्रिक मिथ्यामिश्र कालदंड राक्षस व त्याचा शिष्य जंबुकेश्वर यांना बरोबर घेऊन या प्रदेशात आला आहे. म्हणून मला शंका आहे की तो माझ्या गुरुवर्यांचे काहीतरी बरे वाईट करूनच इकडे आला असणार. म्हणून आपण तत्काल भल्लूक पर्वताच्या दिशेने प्रयाण करणे आवश्यक आहे."

"आपण तिकडे निघून गेला तर त्या तांत्रिकाला इकडचे सर्व रान मोकळेच मिळणार! त्याला आपण आळा घातला पाहिजे. तांत्रिक सूर्यभूपतीच्या किल्लयावर हल्ला करायला गेला असल्याचे मी ऐकतो. त्या किल्लयात तसे मोठे सैन्यही नाही!" कालीवर्मा म्हणाला.

भल्लूक मांत्रिक चिडून म्हणाला–"हे सर्व मी भुयाराच्या तोंडावर भुयारात पाऊल टाकण्यापूर्वीच आपल्या किल्लयाकडे भरधांव पळणाऱ्या सूर्यभूपतीच्या तोंडून ऐकले आहे. मी एकच विचारतो, या राजा व सामंतांच्या भांडणात आपण सर्वांनी पडायचेच कारण काय?"

कालीवर्मा रागाने मांत्रिकाकडे पहात म्हणाला–" मी याच राज्यात जन्मलो आणि लहानाचा मोठा झालो. सर्वात आधी या राज्याचे व येथील शासकांचे हित पाहणे माझे आद्यकर्तव्य आहे. तिकडे दुर्लक्ष करून दूर कोठे डोंगराच्या कोपरात राहणाऱ्या मांत्रिकांच्या मदतीला धावणे कोणत्याही तऱ्हेने नीतिसंगत होणार नाही."





ते उत्तर ऐकून भल्लूक मांत्रिक चकितच झाला. म्हणाला–" माझ्या शिष्या काली-वर्मा! तू इतक्या लौकर इतका कसा काय बदललास? जितकेतू राजा म्हणाला ते ऐकून तू फसू नकोस की हा राजा मंत्रदंड आणून देणाराला आपली दत्तक राजकन्या देऊन तुला आपला वारस करील."

"मी जे म्हणालो त्याच्याशी मी वारस होण्याचा किंवा दत्तक राजकन्येशी माझा विवाह होण्याचा काही एक संबंध नाही. मी मंत्रदंड महाराजांना दिला नाही. आपल्याला दिला, हे लक्षात असू द्या." असे म्हणत कालीवर्माने राजा जितकेतूकडे हेतुपूर्वक पाहिले.

राजा जितकेतू मान हालवून म्हणाला–"येथे हजर असलेला राजा दुर्मुख आपल्या समोर..." पुढे तो काही म्हणणार इतक्यात उग्रदंड राक्षस आपली दगडी गदा घेऊन गर्जना करीत भुयारातून बाहेर आला आणि मोठ्याने म्हणाला–"येथे एकटे दुर्मुख महाराजच नाहीत, मीसुद्धा आहे आणि हा पहा चांडाळ भल्लूकही येतो आहे. आपल्याला जे काही म्हणायचे आहे या सर्वांच्या समोर बोला."

जितकेतू राजा उग्रदंडाला पाहून प्रथम दचकला व थोडा भ्यालाही, परंतु थोडे धाडस करून म्हणाला–"मला मूलबाळ नाही. म्हणून मी माझ्या मागे कोणाला आपला वारस करायचे याचा विचार करतो आहे. आज अनायास चांगली संधी चालून आली आहे. सूर्यभूपतीची मुलगी माझी दत्तक मुलगी आहे. मी तिचे कालीवर्माशी लग्न करून देणार आहे आणि माझ्या मागे तोच चंद्रशिला नगराचा राजा होईल."

ते ऐकून भल्लूक मांत्रिकाने जयघोष केला–" भल्लूकपाद गुरू की जय!" नंतर म्हणाला–" तुम्ही सर्व वस्तुस्थिती न ओळ-खता हवेतल्या हवेल्या बांधतां आहां. तो दुष्ट तांत्रिक मिथ्यामिश्र आतापर्यंत सूर्य-भूपतीच्या एकुलत्या एका मुलीला कैद

करून आपल्या डोंगराळ प्रदेशाकडे निघाला असेल. तो भल्लुकेश्वरींच्या पुजेसाठी एका पुजारिणीच्या शोधार्थ आहे."

"मी जिवंत असेपर्यंत त्या तांत्रिकाला ते साध्य होणार नाही." असे म्हणत कालीवर्माने म्यानेतून आपली तलवार उपसली.

"कालीवर्मा, मीसुद्धा तीच प्रतिज्ञा करतो." असे म्हणत उग्रदंड राक्षसाने आपली गदा हात उंच करून धरली.

भल्लूक मांत्रिक स्मित करून म्हणाला—"उग्रदंड, तुम्हां दोघांची प्रतिज्ञापूर्ण होवो, हीच माझी पण इच्छा आहे. या प्रयत्नात तू आपला भाऊ कालदंड याला त्या दुष्ट मिथ्यामिश्रच्या तावडीतून सोडव. काही तरी विषारी औषधी वनस्पती खायला घालून त्याने त्याला मुका करविला आणि त्याला आपला विश्वासपात्र दास करून घेतला आहे. तरमग ठीक, मी निघालो." असे म्हणत तो भुयाराच्या तोंडाकडे निघाला.

भल्लूक मांत्रिक भुयाराच्या तोंडासमोर पोचण्यापूर्वी एका झाडाच्या आडून चांडाळ भल्लूक 'शिरीष वन भैरव की जय' म्हणत बाहेर आला. त्याच्या हातात परशू होता. तो म्हणाला—"भल्लूक मांत्रिका! तुझ्या मंत्राने अर्धा भल्लूक आणि अर्धा माणूस झालेल्या या चांडाळाविषयी तू काय ठरविले आहेस? तू, तुझे गुरु आणि मी नावात भल्लूक शब्द असल्याने गैरसमज व घोटाळा होणार आहे. तरमग तू मला प्रथम एक सामान्य माणूस करणार की मी तुझे डोके उडवू?"

भल्लूक मांत्रिक थरथर कांपू लागला. म्हणाला—"तू चांडाळ भल्लूक नाहीस, तू या नगराचा चांडाळ प्रमुख आहेस. तू आतां जाऊन शिरीष वनात जाऊन ज्यांना शिरच्छेदाची शिक्षा सांगण्यात आली आहे त्यांची डोकी उडव!" असे म्हणत भल्लूक मांत्रिकाने आपला मंत्रदंड चांडाळ भल्लूकाच्या डोक्याला तीनदा लावला आणि विद्युत्वेगाने भुयारात उतरला.

(पुढल्या अंकात संपूर्ण)



# राक्षसाची भीती की राजनीती

विक्रमादित्याने आपला हट्ट सोडला नाही.

तो झाडाजवळ गेला, प्रेत खांद्यावर काढून घेतले आणि नेहमीप्रमाणे मौन होऊन स्मशानाच्या दिशेने चालू लागला. तेव्हां प्रेतात बसलेला वेताळ त्याला म्हणाला—"राजा, मी म्हणतो आहे ते रास्त होणार नाही, परंतु तू जे करतो आहेस ते राजधर्माला अनुसरून नाही. तुझ्याच प्रमाणे राजा निरंकुशने राजनीतीविरुद्ध काम केले होते. मी ती गोष्ट सांगतो, लक्ष देऊन ऐक—" असे सांगून वेताळ गोष्ट सांगू लागला.

पूर्वी कधी निकुंज देशाच्या गादीवर निरंकुश नावाचा राजा राज्य करीत होता. त्या देशाच्या हद्दीला लागून असलेल्या जंगलात एक राक्षस आल्याची बातमी त्या जंगलात राहणाऱ्या रानटी लोकांनी राजाला कळविली.



त्या बातमीवर राजाचा विश्वासच बसेना. तरी राजाने जास्त चवकशी केली तेव्हां त्याला कळले की त्या राक्षसाने जंगली जातीच्या लोकांना कोणत्याही प्रकारे त्रास दिला नव्हता. परंतु ते लोक घाबरून मात्र गेले होते.

नंतर राजाने त्यांना विचारले—"तो राक्षस आहे, हे कशावरून तुम्ही ओळखलेत? तो ताडामाडा एवढा आहे का?"

रानटी लोक म्हणाले—"महाराज, तो तेवढा मोठा नाही, हे खरे असले तरी तो रानटी रेड्या सारखा नक्कीच आहे!"

"परंतु तो राक्षस आहे, हे तुम्ही कसे म्हणता?" राजाने पुन्हां विचारले.

"महाराज, आम्ही स्वत:च्या डोळ्यांनी पाहिले, तो एका झाडाखाली बसून कंदमुळे व फळे खात होता. त्यावेळी जवळच्या झाडीतून एक वाघ त्याच्या अंगावर धावून आला. त्या राक्षसाने वाघाचे मागचे पाय धरून त्याला एका झाडाच्या बुंधावर खूप आपटले आणि ठार केले. तो राक्षस नसेल तर हे राक्षसी काम कोणी माणूस करू शकेल का? त्याच्या हातात धनुष्यबाण किंवा भालाबरछी काहीच नव्हते. तरी तो हरण वगैरे जनावरांना धरून भाजून खातो." रानटी लोक म्हणाले.

राजाने थोडा वेळ विचार केला व म्हणाला—"मला वाटते की तुम्ही विना-कारण भितां आहां! तरी मी त्याच्या विषयी जास्त माहिती काढीन. तो कधी तुमच्या वाटेला गेला तर तुम्ही ताबडतोब मला कळवा. मी तुमचे रक्षण करीन. एवढी हमी दिल्यानंतरही तुमच्या मनाचे समाधान होत नसेल तर तुम्ही राजधानीच्या हद्दीवरच्या भागात येऊन राहा. तुमच्या रहण्याची व्यवस्था करून देतो."

रानटी लोक निघून गेले. परंतु मंत्र्याच्या मनाचे समाधान झाले नाही. त्याने राजाला विचारले—"महाराज! त्या राक्षसाचा कांटा न काढण्याचे ठरले आहे का?"



"तसं काही नाही. पण शंका कसली?" राजाने विचारले.

"जी व्यक्ति नि:शस्त्र असूनही हिंस्र श्वापदांचा चेंदामेंदा करू शकते ती सामान्य मानवजातीला सुखाने राहू देईल का? त्या व्यक्तीकडे असे दुर्लक्ष करणे राज्याच्या हिताचे ठरेल का?" प्रधानाने शंका केली.

"हिंस्र पशू प्रजेला त्रास देऊ लागल्याचे कळतांच आपण त्यांची शिकार करून त्यांचा कांटा काढतो. परंतु हा राक्षस तर निरुपद्रवी दिसतो आहे. त्याची शिकार करणे योग्य नाही!" राजा म्हणाला.

"महाराज, आपण म्हणालात, ते मला तरी बरोबर वाटत नाही! तो जनावरांशी क्रूरपणे व्यवहार करतो आहे. तो राक्षस आहे आणि मानवजातीचा शत्रू आहे. तेव्हां त्याचा वध करण्यात दोष किंवा हरकत कां असावी?" मंत्र्याने पुन्हां साहस करून आपली बाजू मांडली.

त्यानंतर राजा पुन्हां काही वेळ विचार करीत राहिला व नंतर म्हणाला—"तुम्हांला तसे वाटत असेल तर तुम्ही त्या राक्षसाचा वध करण्यासाठी आवश्यक तो प्रयत्न करा."

मंत्र्याने लगेच उपसेनापतीकडे निरोप पाठवून आज्ञा केली—"सशस्त्र सैनिकांना बरोबर घेऊन जाऊन जंगलातल्या राक्षसाचा शोध काढा आणि त्याला ठार करून त्याचे प्रेत हजर करा!"





त्या उपसेनापतीला भीती नावाची वस्तूच माहीत नव्हती. त्याने हत्तींच्या सैन्यावरही पूर्वी हल्ला करून हत्तींचा संहार केला होता. तो वीस निवडक सैनिकांना बरोबर घेऊन जंगलात गेला. थोड्या वेळाने त्यांना राक्षस कोठे आहे हे कळले. पहिल्याने वाघाची डरकाळी ऐकू आली. तेव्हां ते त्या दिशेने चालू लागले. एक व्यक्ती जी दिसायला राक्षसासारखी होती एका वाघाचे मागचे पाय धरून त्याच्या पोटावर, छातीवर व मानेवर लत्ताप्रहार करीत होती. वाघ किंकाळ्या फोडीत रक्त ओकत होता.

राक्षसाने मान वर करून उपसेनापतीकडे व त्याच्या बरोबरच्या सैनिकांकडे पाहिले सर्व सैनिक ओरडत पळून गेले, परंतु एकटा उपसेनापती तलवार उपसून राक्षसाच्या अंगावर धावला. तो राक्षस मानवजातीतल्या मोठ्यात मोठ्या उंच माणसाहून एक वीतभर तरी जास्त उंच होता.

राक्षसाने वाघ मेल्याची खात्री झाल्यावर त्या वाघाचे मागचे पाय धरून त्याला उचलले आणि त्याला दूर झाडापलीकडे फेकून दिले. नंतर हात धुवून सेनापती होता त्या बाजूला येत मानवजातीच्या भाषेत म्हणाला–"तू इकडे कशाला आला आहेस?" सेनापती चकित झाला. म्हणजे हा राक्षस नसून आपल्यासारखाच एक माणूसच आहे तर, असा विचार करून म्हणाला–"मी तुला ठार करायला आलो आहे, तशीच महाराजांची आज्ञा आहे."

"नाही, तू मरण्यासाठी आला आहेस!" असे म्हणत राक्षसाने सेनापतीचा उजवा हात धरून दाबला. सेनापतीची तलवार हातातून गळून पडली. पायाने तिचे तुकडे करीत राक्षस म्हणाला–"आता तू खुशाल परत जा!"

उपसेनापतीने परतल्यावर प्रधानाला घडलेले वृत्त सांगितले. त्याने ते राजाला कळविले व विचारले–"महाराज, पुढे?"

राजा म्हणाला–"आपण काही एक करण्याची गरज नाही. तुम्ही आपापली कामे करा." त्याच्या मते काळजी करण्याचे कारण काहीच नव्हते.

येथवर गोष्ट सांगून वेताळ म्हणाला–"राजा, राक्षसाच्या बाबतीत राजा निरंकुश इतका बेफिकीर कां होता? की तिकडे त्याला ध्यान द्यायचे नव्हते? राक्षसाशी वैर करणे हे स्वतःच्या पायावर धोंड ओढून घेण्यासारखे त्याला वाटले म्हणून का? तसं पाहिले तर राक्षस हे मानव जातीचे शत्रूच नाही का? कदाचित राजाला रानटी लोक म्हणाले ते खरे वाटले नसावे. परंतु त्याच्या सैनिकांनी राक्षसाला स्वतः डोळ्यांनी पाहिले व त्याच्या अंगात किती शक्ती आहे हे देखील पाहिले तेव्हां तरी राजाने आपले सर्व सैन्य पाठवून राक्षसाचा वध करायला नको होता का? परंतु त्याने तसे कां केले नाही? या शंकेचे समाधानकारक उत्तर माहीत असून तू दिले नाहीस तर तुला परिणाम माहीतच आहे, तुझ्या डोक्याची शंभर शकले होऊन तुझ्याच पायांवर लोळू लागतील."

विक्रमादित्य म्हणाला–"राजाने योग्य तेच केले. राक्षस हे सुद्धा मानवांच्या जातीतले एका जातीचे लोक आहेत. प्रजेत अनेक जातीचे लोक असतात. तेव्हां पुराव्याशिवाय कोणत्याही जाती जमातीला अपराध नसूनही दंड करणे राजनीती विरुद्ध होईल. आपणां सर्वांनाच माहीत आहे की पौराणिक काळात मानवजातीला त्रास देणाऱ्या राक्षसांचा संहार विष्णूने मानवरूप घेऊन केला होता. अपराध करणाऱ्यालाच दंड द्यावा, हा राजधर्म आहे. राक्षस सुद्धा त्या राजाची एक प्रजाच तर होता. त्याला ठार करण्याकरिता आलेल्या एका सेनापतीला सुद्धा त्या राक्षसाने सोडून दिला. अशा परिस्थितीत तो मानव प्रजेला त्रास द्यायला कां येईल? प्रधानाने एका विशिष्ट जातीबद्दल जो द्वेष दर्शविला तोच राजनीती विरुद्ध होता.

अशा तऱ्हेने राजाचे मौन भंग होताच वेताळ प्रेतासह नाहीसा झाला आणि झाडाला जाऊन लोंबकळू लागला. (कल्पित)










# प्रेमाचा वृथा पुळका

एकदा गणपतराव कसल्यातरी स्पर्शजन्य आजाराने आजारी पडले. त्यांची सेवाशुश्रूषा करायला एकटी सिंधू घरी होती. थोरली वत्सला लग्न झाल्यावर सासरी नांदू लागली होती. अर्थातच सर्व जबाबदारी सिंधूवर होती.

वैद्यबुवांनी गणपतराव वापरतात ती प्रत्येक वस्तू बाजूला ठेवावी, असा सल्ला दिला होता. म्हणून सिंधू डोळे मिटून त्या सल्ल्याप्रमाणे करू लागली. परंतु सिंधू करी ते गणपतरावांना मुळीच खपले नाही. कारण गणपतरावांची ताटवाटी निराळी बाजूला ठेवली जात होती व पथ्य म्हणून त्यांना काही पदार्थ खायला परवानगी नव्हती. म्हणून गणपतरावांना सिंधूचा राग आला. त्यांनी वत्सलेला बोलावून आणण्यासाठी निरोप पाठविला.

वत्सलेला वडिलांची स्थिती कीव येण्यासारखी वाटली. ती त्यांना हवे ते खायला देई. सिंधूने तिला अपथ्य होईल म्हणून सावध केले, परंतु तिच्या बोलण्याकडे थोरल्या बहिणीने दुर्लक्ष केले. वर सिंधूला वत्सलेच्या सासरच्या गावी पाठवून देण्यात आले.

परंतु वत्सला आल्यानंतर गणपतरावांची तब्येत जास्त जास्त बिघडत गेली. वैद्यबुवा घाबरले. गणपतराव पथ्य पाळीत नसावे असा संशय त्यांना वाटू लागला.

मध्यंतरी वत्सलेलाच तो स्पर्शजन्य रोग झाला. तिच्या नवऱ्याला सिंधूकडून सासऱ्याच्या आजाराची पूर्ण माहिती मिळाली होती. तो बायकोला रागावला. त्यानंतर गणपतराव आणि वत्सलेचा वैद्यबुवाच्या सल्ल्याप्रमाणे इलाज झाला. दोघं त्या आजारातून बचावली.





# मदिरावतीची गोष्ट

कित्येक शतकांपूर्वी घडलेली ही गोष्ट आहे. उज्जयिनी नगरीत यशस्कर नावाचा एक ब्राह्मण रहात असे. त्याला शशिभूषण नावाचा मुलगा होता. तो स्वभावाने सुशील आणि दिसायलाही सुंदर होता. गुरुकुलात विद्याभ्यास करीत असतां विजयसेन नावाच्या एका क्षत्रिय मुलाशी त्याची मैत्री झाली.

एके दिवशी विजयसेनाबरोबर त्याची बहीण मदिरावती आचार्यांच्या घरी आली. ती दिसायला अप्सरेसारखी सुंदर होती. तिने प्रथम दर्शनीच शशिभूषणचे मन हिरावून घेतले.

मदिरावतीने घरी गेल्यावर आईजवळ तिच्या भावाच्या मित्राच्या, म्हणजे शशिभूषणच्या सौंदर्याचे बरेच वर्णन केले. म्हणून शशिभूषणला एकदा घरी बोलावून आणायला आईने विजयसेनला सांगितले.

दुसऱ्याच दिवशी विजयसेन आपला मित्र शशिभूषणला आपल्या घरी बोलावून घेऊन आला. विजयसेन वडिलांजवळ बोलत असतां मदिरावतीची धात्रेयी नावाची सखी संधी पाहून एक मोगऱ्याचा हार घेऊन शशिभूषणकडे गेली व म्हणाली—"हा हार माझी मैत्रिण मदिरावतीने खास तुमच्यासाठी ओवून पाठविला आहे!"

शशिभूषणने तो हार घेऊन परत निरोप पाठविला—"तू आपल्या मैत्रिणीला सांग की मी तिच्यासाठी आपला प्राणही अर्पण करायला तयार आहे."

त्या दिवसापासून शशिभूषण व मदिरावती, दोघांमध्ये प्रेम वाढतच गेले.

एके दिवशी एक क्षत्रिय तरुण मदिरावतीच्या घरी आला. त्याने मदिरावतीच्या वडिलांना भेटून मदिरावतीला मागणी घातली. मदिरावतीच्या वडिलांना मदिरा-



वतीचे प्रेम आणखी कोणावर आहे, हे माहीत नव्हते. म्हणून त्यांनी त्या तरुणाला होकार दिला आणि लग्न मुहूर्तही ठरविला.

मदिरावतीचे लग्न ठरल्याचे ऐकल्यावर शशिभूषण आजारी पडला. तो आजार मानसिक होता. एकदा तरी मदिरावतीला भेटता आले तरी पुरे, असे त्याला वाटले. परंतु तशी संधीच मिळाली नाही.

लग्नचा दिवस येऊन ठेपला. मदिरावतीला नहायला घालून तिला वधूची वस्त्रे नेसविण्यात आली. वाजंत्री वाजू लागली व वर मांडवात आला.

अगदी शेवटच्या घटकेपर्यंत शशिभूषणला वाटत होते की हे लग्न टळेल. परंतु ती आशाही फोल ठरली. तेव्हां त्याने आत्महत्या करून घेऊन मोकळे व्हायचे ठरविले.

रीतीप्रमाणे बोहोल्यावर पाऊल ठेवण्यापूर्वी मदिरावती आपल्या सखींबरोबर नगराबाहेर देवीच्या देवळाच्या आवारात कामदेवाचे देऊळ होते तेथे पूजेला निघाली. त्या देवळाजवळ जाणाऱ्या वाटेवर एक वडाचे झाड होते. शशिभूषणने त्या झाडाच्या फांदीला फांशी लावून आत्महत्या करून घ्यायचे ठरविले, म्हणजे मदिरावतीला आपले प्रेत तरी दिसेल. असा विचार करून तो त्या वडाच्या झाडाकडे निघाला.

मध्यंतरी मदिरावतीची सखी धात्रेयी त्याच दिवशी उजाडतांच शंखहृद नावाच्या सरोवरावर स्नानाला गेली. त्या सरोवराच्या काठी ती फुले निवडीत होती तेव्हां तिला सोमदत्त नावाचा एक ब्राह्मण तरुण भेटला. तो तिच्याचकडे टकलावून पहात उभा होता. त्याला पाहून धात्रेयी थोडी लाजली.

त्याच वेळी दुरून कसला तरी गलका ऐकू आला. साखळदंड तोडून एक मदोन्मत्त हत्ती ती दोघं उभी होती त्या दिशेने येत असलेला दिसला. काय करावे धात्रेयीला कळेना. त्याच वेळी अनोळखी परदेशी सोमदत्तने धात्रेयीला उचलले आणि पळत



पळत दूर लोकांची गर्दी दिसली तिकडे धावला.

एवढे धाडस करून आपला जीव वांचविणारा तो परदेशी तरुण कोण त्याची ओळख करून घ्यावीसे धात्रेयीला वाटले. परंतु त्याच वेळी तो मदोन्मत्त हत्ती लोकांच्या गर्दीवर चालून आला. लोक सैरावैरा पळू लागले आणि सोमदत्तपण पळून गेला, थोड्या वेळाने तो धात्रेयीची ओळख करून घ्यायला परतला, परंतु ती त्याला तेथे दिसली नाही. कारण तिच्या मैत्रिणीच्या लग्नाचा मुहूर्त होत आला होता. म्हणून धात्रेयी व सोमदत्त परस्परांना भेटण्याची इच्छा असून परस्परांना भेटू शकली नाहीत.

त्याने ज्या तरुणीचे रक्षण केले ती कोण व कोठे राहाते हे कळायला सोमदत्तला मार्ग सुचला नाही. तरी, काय वाटेल ते करून तिचा शोध काढायचे त्याने मनाशी पक्के ठरविले आणि तो तिच्या शोधार्थ निघाला. बराच वेळ चालत राहल्यावर तो गौरीच्या देवळानजिक आला. तेव्हां त्याला रस्त्याच्या बाजूला एका वडाच्या झाडाला एका तरुणाचा देह लोंबत असलेला दिसला. धाडस करून त्याने झाडावर चढून त्या माणसाला जमिनीवर उतरविले. तो शशिभूषणच होता. त्याने फाशी लावून घेतली होती, परंतु तो मेला नव्हता. बेशुद्ध अवस्थेत होता. सोमदत्त त्याला शुद्धीवर आणण्याचा प्रयत्न करू लागला.





थोड्या वेळाने शशिभूषण शुद्धीवर आला. तो उठून बसला व सोमदत्तला म्हणाला–"कोण हो तुम्ही, मला वांचविण्यासाठी एवढी खटपट केलीत, म्हणून विचारतो? माझे पुढील आयुष्य अंधकारमय आहे." असे सांगून त्याने आपली दुःखकथा त्याला सांगितली.

सर्व वृत्त शांतपणे ऐकून घेतल्यावर सोमदत्त म्हणाला–"वेड्या माणसा, हा काय रे पुरुषार्थ झाला का? माझेसुद्धा तुझ्याचसारखे एका मुलीवर प्रेम आहे. ती कोण हेसुद्धा मला माहीत नाही. तरी मी तिचा शोधकाढीत सर्व जग पालथे घालणार आहे." एवढे सांगून त्याने आपली प्रेमकथा सांगितली.

दोघांचे संभाषण चालू असतां दुरून एक मिरवणूक वाजंत्र्यांबरोबर येत असलेली दिसली.

"ती पहा, मदिरावती कामदेवाच्या पुजेसाठी वाजत गाजत येत आहे." शशिभूषण म्हणाला.

"तर मग आपण देवळात गर्भगृहात जाऊन लपून बसू या." सोमदत्ताने सल्ला दिला.

दोघे तरुण कामदेवाच्या मूर्तीमागे लपून बसले. त्यानंतर मदिरावती आपल्या सखींबरोबर देवळात आली. तिने आपल्या मैत्रिणींना बाहेरच रहायला सांगून गर्भगृहात प्रवेश केला. दार आतून बंद करून बारीक आवाजात कामदेवाला म्हणाली–"कामदेवा! माझे एका तरुणावर प्रेम आहे, मग तू माझे लग्न आणखी कोणाशी कां लावून देत आहेस? या जन्मी माझ्या मनाची इच्छापूर्ण झाली नाही तर निदान पुढल्या जन्मी तरी शशिभूषणशीच माझा विवाह करून देण्याचा माझ्यावर अनुग्रह कर." अशी प्रार्थना करून ती आपल्या पदराच्या फांस करून स्वतःच्या गळयाला लावू लागली.

तत्काळ मूर्तीच्या पाठीमागून पुढे येऊन शशिभूषणने तिच्या गळयातला फांस काढून टाकला.

सोमदत्तसुद्धा मूर्तीच्या पाठीमागून आला. तो म्हणाला–"आतां आपल्याजवळ बोलत बसायला वेळ नाही. काळोख पडू लागला. शशिभूषण तू आपल्या प्रेमिकेला माझा पुरुषवेष घालायला दे आणि तिला आपल्या गावी बोलावून घेऊन पळून जा. मी तिचे पातळ नेसून बाहेर निघून जाईन."

त्यानंतर सोमदत्त मदिरावतीचे पातळ नेसून आणि तोंडावर भले मोठे घूंघट ओढून गर्भगृहाचे दार उघडून बाहेर आला. सखींना वाटले की मदिरावतीच बाहेर आली. सखींना वाटले की मदिरावतीच बाहेर आली आहे. त्या मंगलगीत म्हणत वाजतगाजत परत आल्या. त्या निघून गेल्यानंतर शशिभूषण व पुरुष वेषात मदिरावती दोघं गाभाऱ्यातून बाहेर आली रात्रभर रानावनातून मार्ग काढीत अचलपूर नावाच्या गावी येऊन पोचली. तेथे एका ब्राह्मणाच्या घरी दोघं उतरली. त्याच गावी एका देवळात त्यांचा शास्त्रोक्त विवाह झाला.

तिकडे मदिरावतीचे सोंग करून सोमदत्त सखींबरोबर परतला तोंपर्यंत धात्रेयीसुद्धा शंखहृद सरोवरावरून परतली होती. आपलं मन मोकळं करायला व सखीजवळ बोलायला तिला फार वेळ नव्हता. म्हणून ती मदिरावतीचे सोंग केलेल्या सोमदत्ताचा हात धरून म्हणाली–"चल, लौकर. तुला एक गुपित सांगावयाचे आहे." असे म्हणत ती त्याला एकांत असलेल्या खोलीत घेऊन गेली. परंतु सोमदत्तने घुंघटाच्या आतूनच










धात्रेयीला ओळखले व विचार करू लागला—"मी हे स्वप्न तर पहात नाही ना? की काही जादू आहे? हा देवाचाच अनुग्रह म्हणावयाचा का?"

"सखी, आज तुझ्याशी लग्न करणार तो तुझा प्रियकर नाही. तुझं दुःख तुला अनिवार वाटू लागलं तर तू माझा विचार कर. कारण मी दुर्दैवी स्त्री आहे. तुझ्यासारखेच माझं एका तरुणावर प्रेम आहे. परंतु तो कोण आहे हे मला माहीत नाही. त्याचे नावही मला माहीत नाही. तुला तुझा प्रियकर पुन्हां कधी भेटेल ही, परंतु मला ती अशा करणेही वृथा आहे." या शब्दात धात्रेयीने सोमदत्तला मदिरावती समजून हे सर्व वृत्त सांगितले.

ते सर्व ऐकल्यामुळे सोमदत्तला परमानंद झाला. त्याने आपल्या तोंडावरचे घुंघट बाजूला सारले. त्याचे तोंड पाहून धात्रेयीला कल्पनेबाहेर आनंद झाला व आश्चर्यही वाटले. परंतु सोमदत्तने मदिरावती व शशिभूषण देवळातून कसे पळून गेले हे सांगितल्यावरच तिचा स्वतःच्या डोळ्यांवर विश्वास बसला.

सोमदत्त धात्रेयीला सावध करीत म्हणाला—"आपण फार वेळ गप्पा मारीत येथे थांबणे धोक्याचे आहे. आपण येथून लौकरच पाय काढला पाहिजे. नाहीतर आपल्याला लोक ओळखतील व आपल्या सर्व कल्पना कल्पनाच राहून जातील. आपले गुपित कळले तर धोका आहे. म्हणून येथून पळून जायचा काहीतरी मार्ग काढला पाहिजे!"

त्यानंतर धात्रेयीने आपले सर्व दागिने काढून एका फडक्यांत बांधून घेतले आणि सोमदत्तला घेऊन मागच्या दाराने बाहेर आली व काळोखांत उद्यानाच्या वाटेने गावाबाहेर निघून गेली.

तेथून काही दिवस पायी प्रवास करीत दोघं एका ब्राह्मणांच्या गावी येऊन पोचली आणि तेथे त्यांनी विधिवत विवाह करून घेतला. त्याच गावी त्यांनी रहायचे ठरवून आपला संसार थाटला.





# परशुराम

[ २ ]

कार्तवीर्यार्जुन नावाचा एक हैहय वंशी राजा होता. तो कृतवीराचा मुलगा होता म्हणून त्याला कार्तवीर्य हे नावही मिळाले. त्याचे स्वतःचे नाव अर्जुनच होते. त्याचे मुलगे दुष्ट व अत्याचारी होते. जमदग्नी ऋषी व त्यांचे मुलगे आश्रमात नाहीत अशी संधी पाहून ते आश्रमात शिरले व त्यांनी जमदग्नीची यज्ञाची गाय तिच्या वासरासह पळवून नेण्याचा प्रयत्न केला. परंतु अनेक यत्न करूनही ती गाय त्यांच्या काबूत आली नाही.

नंतर कार्तवीर्य स्वतः जमदग्नी ऋषींच्या आश्रमात आला. तेथे त्याचा अतिथी-सत्कार राजसी थाटाने झाला. तो सर्व सत्कार कामधेनूच्या प्रभावाने होऊ शकला हे कळल्यावर कार्तवीर्याने जमदग्नी मुनींजवळ ती कामधेनूच मागितली. अर्थातच मुनींनी नकार दिला. कार्तवीर्याने जमदग्नींचा वध केला. तरी कामधेनूला घेऊन जाणे त्याला साध्य झाले नाही.

तेव्हां परशुराम आश्रमाबाहेर अरण्यात गेला होता. त्याला तेथे एकाएकी छातीत धक्का बसल्यासारखे वाटले. काही तरी अशुभ घडले असावे, अशी शंका वाटल्याने तो आश्रमात परतला. तेव्हां त्याला पित्याच्या मृत देहावर पडून आई रडत असलेली दिसली. हैहय राजाने तुझ्या वडिलांचा असा अमानुषपणे वध केला असे म्हणत तिने एकवीस वेळा आपली छाती बडविली, म्हणे!

परशुरामाने मातेचे सांत्वन केले व एकवीस वेळा क्षत्रिय जातीचा संहार करण्याची प्रतिज्ञा केली आणि त्यानंतर वडिलांच्या प्रेताला अंत्य संस्कार देण्याच्या तयारीला लागला. इतक्यात भृगु ऋषी

तेथे आले. त्यांनी मंत्रवलेले पाणी शिंपडून जमदग्नीला पुनर्जीवित केले.

परशुरामाने पुनर्जीवित झालेल्या वडिलांना क्षत्रियांनी जो अत्याचार केला त्याची प्रतिक्रिया म्हणून क्षत्रिय जातीला एकवीस वेळा निर्मूल करण्याची प्रतिज्ञा केली असल्याचे सांगितले.

जमदग्नी ऋषींनी परशुरामाचा राग शांत करण्याचा यत्न करून पाहिला, परंतु परशुरामाने त्यांना सांगितले की अत्याचारी लोकांच्या अत्याचाराकडे दुर्लक्ष करणे म्हणजे त्यांच्या अत्याचाराला प्रोत्साहन दिल्यासारखे होते. म्हणून निष्कारण कोणाचा वध करणाऱ्या दुष्टांना उगाच सोडून देता कामा नये.

आपला मुलगा आपली प्रतिज्ञा पूर्ण करण्यासाठी सव करणार हे ओळखून जमदग्नीने त्याला ब्रह्मदेवाकडे जाऊन तो सल्ला देईल तसे करण्यास सांगितले.

परशुराम ब्रह्मदेवाकडे गेला आणि क्षत्रिय जातीला निर्मूल करण्याची केलेल्या प्रतिज्ञेविषयी निवेदन केले. ब्रह्मदेवालासुद्धा ती प्रतिज्ञा आवडली नाही. परंतु तसे स्पष्ट सांगणे गैर वाटून तो परशुरामाला म्हणाला—"शंकराचा अनुग्रह असल्याशिवाय तुझी प्रतिज्ञा पूर्ण होणार नाही. म्हणून तू प्रथम शंकराला जाऊन भेट!"

परशुराम शंकराकडे गेला तेव्हां शंकराबरोबर पार्वतीसुद्धा होती. परशुरामाने आपल्या प्रतिज्ञेविषयी सांगितल्यावर ती म्हणाली—"शंकराच्या कृपेनें काय वाटेल ते साध्य होईल. तरी तुझ्या जवळ अस्त्रे नाहीत वाटते?"

ते ऐकून शंकराने परशुरामाला अस्त्रे आणि कवच दिले.

परशुराम अस्त्रे व कवच घेऊन परत जाताना एका सरोवराच्या काठी ती अस्त्रे वगैरे ठेवून जप करायला बसला. इतक्यात एक हरणाचे जोडपे शिकारी त्यांचा पाठलाग करीत असल्याच्या भीतीने धावत येऊन त्या सरोवरात पाणी पिऊ लागले.

त्यांचा पाठलाग करणारा शिकारी परशुरामाला दिसला नाही. परंतु हरिणीला हरण म्हणाला—"आतां आपण भ्यायचे कारण नाही. हा येथे जप करतो आहे ना, तोच परशुराम. तो अगस्त्यांच्या आश्रमात जाऊन कृष्णामृत स्तोत्र ऐकील तर याला कृष्णकवच लाभेल." ते परशुरामाला स्पष्टपणे ऐकू आले.

परशुराम त्याप्रमाणे अगस्त्याश्रमाकडे निघाला. वाटेत त्याला हरणांच्या जोडप्याचा पाठलाग करणारा शिकारी भेटला. त्याला ठार करून परशुराम अगस्त्याश्रमात पोचला. तेथे त्याने कृष्णामृतस्तोत्र ऐकले. त्यानंतर त्याला कृष्णाची प्रार्थना केल्यावर कृष्णाने दर्शन दिले आणि आपले तेज दिले.

त्यानंतर परशुराम नर्मदेत स्नान करून कार्तवीर्याच्या राजधानीत गेला आणि तो कार्तवीर्याचा वध करायला आला असल्याचे कार्तवीर्यार्जुनाला कळविले.





कार्तवीर्याने परशुरामाकडे उत्तर पाठविले की ब्राह्मणाने काही मागितले तरी मी नकार देणार नाही. त्याला युद्धच हवे असेल तर तेही मान्य! त्यानंतर त्याने आपल्या सैन्याला परशुरामावर चालून जायला आज्ञा केली. परशुरामाने आपल्या परशूने त्या सैन्याचा संहार केला.

परशुरामावर इतर अनेक क्षत्रियवीर चालून गेले. परशुरामाने त्यांचाही संहार केला. त्यात मत्स्यराज, मगधराज, निषादराज, विदर्भाचा राजा सोमदत्त आणि मिथिलेचा राजा बृहत्बल हे प्रमुख होत.

त्याच प्रमाणे कन्याकुब्जचा राजा, सौराष्ट्राचा राजा, अवंतीचे शूर क्षत्रिय वीर परशुरामावर एकदम चालून आले आणि त्यांनी परशुरामावर शरवृष्टी केली. परंतु परशुरामाने त्यांचे सर्व बाण तोडून फेंकून देऊन त्या सर्वांचा वध केला.

सुचंद्र नांवाचा एक राजा परशुरामाशी युद्धाला आला व त्याने शंकराचे त्रिशूल परशुरामावर टाकले. परंतु ते एका फुलांच्या हाराच्या रूपे परशुरामाच्या गळयात येऊन पडले. त्याच वेळी परशुरामाला कालीचे दर्शन घडले. तिने आग्नेयास्त्र टाकल्यास सुचंद्राचा वध होईल असे सांगितले. त्याप्रमाणे सुचंद्र आग्नेयास्त्राने मरण पावल्यावर त्याचा मुलगा पुष्कराक्ष परशुरामाशी युद्धाला आला. तो सुद्धा परशुरामाशी युद्ध करून मरण पावला.

इतक्या शूर पराक्रमी वीरांचा वध झाल्यावर कार्तवीर्य स्वतः युद्धाला आला. त्याने परशुरामावर त्रिशूल टाकले व परशुराम बेशुद्ध होऊन पडला. सर्व देवांबरोबर शंकरही आला. त्याने संजीवनी मंत्र टाकून परशुरामाला पुनर्जीवित केले.

परशुराम उठून उभा राहिला आणि त्याने शिवकवच मंत्राचा पाठ केला आणि कार्तवीर्यावर बाण सोडला त्या सरशी कार्तवीर्याचे डोके उडाले. कार्तवीर्याचे मुलगे सुद्धा परशुरामाच्या हाती मरण पावले. (क्रमशः)



# महाप्रस्थान



महाभारत युद्धात जय मिळविल्यानंतर पांडवांनी दीर्घकाळ सुखाने राज्य केले. शेवटी धर्मराजाने राज्य सोडून देऊन महाप्रस्थान करण्याचे ठरविले.

राज्यत्याग करण्यापूर्वी धर्मराजाने त्याचा नातू परीक्षित याचा राज्याभिषेक मोठ्या थाटामाटाने केला. ऋषीमुनी व सामंत राजांनी परीक्षिताला आशीर्वाद दिले.





त्यानंतर पांडव हिमालय पर्वताच्या दिशेने निघाले. त्यांच्याबरोबर द्रौपदी सुद्धा निघाली. सर्वांनी अगदी साधी वस्त्रे धारण केली. राज्यवैभव सोडल्याचे दुःख त्यांना वाटले नाही.



ते हिमालय पर्वत चढू लागले. पर्वताची चढण फार कष्टाची होती व लांबही होती. वाटेत त्यांना अनेक तीर्थक्षेत्रे, ऋषींचे आश्रम आणि देवांची वासस्थाने लागली. वाटेतसर्वात प्रथम द्रौपदी मरण पावली. त्यानंतर पांडव एकामागून एक मरून पडू लागले. शेवटी एकटा धर्मराज काय तो उरला.

धर्मराज एकटा जात असता त्याला त्याच्याबरोबर एक कुत्रा येत असलेला दिसला. रस्ता इतका कष्टाचा असूनही तो कुत्रा धर्मराजाला सोडायला तयार नव्हता.





धर्मराज हिमालयाच्या शिखरावर पोचताच त्याला इंद्र भेटला आणि त्याने स्वर्गात प्रवेश करण्यास त्याला विनंती केली. तेव्हा धर्मराज म्हणाला— "माझ्याबरोबर आलेल्या या कुत्र्याला सुद्धा येऊ दिल्यास मी स्वर्गात येईन."

त्या गोष्टीस इंद्राने नकार दिल्यावर धर्मराज इंद्राच्या रथात बसला नाही. त्यावेळी कुत्र्याने यमधर्मराजाचे रूप धारण केले. यमधर्मराजाने युधिष्ठिराची ती परीक्षाच घेतली होती.





ते हिमालय पर्वत चढू लागले. पर्वताची चढण फार कष्टाची होती व लांबही होती. वाटेत त्यांना अनेक तीर्थक्षेत्रे, ऋषींचे आश्रम आणि देवांची वासस्थाने लागली. वाटेतसर्वात प्रथम द्रौपदी मरण पावली. त्यानंतर पांडव एकामागून एक मरून पडू लागले. शेवटी एकटा धर्मराज काय तो उरला.

धर्मराज एकटा जात असता त्याला त्याच्याबरोबर एक कुत्रा येत असलेला दिसला. रस्ता इतका कष्टाचा असूनही तो कुत्रा धर्मराजाला सोडायला तयार नव्हता.





धर्मराज हिमालयाच्या शिखरावर पोचताच त्याला इंद्र भेटला आणि त्याने स्वर्गात प्रवेश करण्यास त्याला विनंती केली. तेव्हा धर्मराज म्हणाला— "माझ्याबरोबर आलेल्या या कुत्र्याला सुद्धा येऊ दिल्यास मी स्वर्गात येईन."

त्या गोष्टीस इंद्राने नकार दिल्यावर धर्मराज इंद्राच्या रथात बसला नाही. त्यावेळी कुत्र्याने यमधर्मराजाचे रूप धारण केले. यमधर्मराजाने युधिष्ठिराची ती परीक्षाच घेतली होती.





स्वर्गात प्रवेश केल्यावर धर्मराजाचे देवांनी स्वागत केले. त्याने तेथे जाऊन आपल्या धाकट्या भावांचा व द्रौपदीचा शोध केला तेव्हां त्याला ते नरकात असल्याचे कळले. म्हणून त्याने स्वर्गात राहण्याचे नाकारून नरकात जाण्याची इच्छा व्यक्त केली.

नरकद्वारातूनच धर्मराजाला नरकाचे दर्शन झाले परंतु त्याचे भाऊ व द्रौपदी काही काळ नरकात राहून स्वर्गात गेल्याचे व त्याने स्वतः जे थोडे पाप केले होते त्यामुळे त्याला नरकाचे दर्शन घडले असल्याचे त्याला कळले.





त्यानंतर धर्मराज सर्वदा स्वर्गातच राहिला. या जगात राहूनही माणसाने सत्यव्रताचे पालन करणे शक्य आहे, याचे उदाहरण म्हणजे धर्मराज युधिष्ठिराचे जीवित होय !



# खरा हिरा

फार प्राचीन काळातील गोष्ट आहे. एकदा सिद्धपूर येथे राहणारे नागनाथ व एकनाथ नावाचे दोघे मित्र तीर्थयात्रेला निघाले. ते घोड्यावर बसून, कित्येक दिवस प्रवास करीत काशीला आले. काशी विश्वेश्वराचे दर्शन करून ते प्रयागक्षेत्री आले. त्यांनी त्रिवेणीत स्नान केले आणि बरोबर आणलेल्या पात्रात गंगेचे पाणी भरून घेतले आणि परत निघाले. वाटेत त्यांना एका झाडाच्या सावलीत बसलेले एक वृद्ध जोडपे दिसले. म्हातारीने दोघां यात्रेकरूंना थांबायला सांगून तिच्या नवऱ्याला थोडे पाणी प्यायला देता का, विचारले.

नागनाथ म्हणाला—"आम्ही दूर जाणार आहो व आमच्या जवळचे पाणी घरी न्यायचे आहे. तुम्हांला कसे देता येईल ?"

परंतु एकनाथाने गंगाजलाचे पात्र त्या म्हातारीच्या हातात दिले व म्हणाला—"आजी, हे गंगेचे पवित्र पाणी आहे, प्या पाहिजे तितके !"

म्हातारीने ते पात्र म्हाताऱ्याच्या हातात दिले. त्याने थोडे पाणी एका पेल्यात ओतून घेतले व प्याला. नंतर एकाएकी जिवात जीव आल्यासारखा उठून उभा राहिला. त्याने एकनाथाला नमस्कार केला व म्हणाला—"अहो, आज आमच्या घरी जेवायला थांबा. माझे नाव विशालगुप्त आहे. मी घरी गेल्यावर बोलेन सर्व." नंतर नागनाथाकडे वळून म्हणाला—"आपणसुद्धा यांच्याबरोबर येऊन आमचे आतिथ्य स्वीकारावे."

म्हाताऱ्याच्या विनंतीला मान देऊन दोघे मित्र विशालगुप्ताच्या सुंदर वाड्यात गेले. तेथे खूप नोकरचाकर होते. तेथे गेल्यावर दोघांना कळले की विशालगुप्ताची बायको म्हणविणारी बाई त्याची एक मोलकरीण होती. विशालगुप्त एकनाथाला



म्हणाला—"माझे वडील धनगुप्त यांनी व्यापारधंदा करून अपार संपत्ती आणि रत्नजवाहीर संपादन केले. त्यांनी मृत्युसमयी मला दर चैत्र पौर्णिमेला एका सज्जनाला एक हिरा दान करायला सांगितला. या वर्षी माझ्या भाग्याने तुमचे दर्शन घडले. उद्यां आपण जाल तेव्हां मी एक हिरा आपल्याला दान करीन. तो स्वीकारून मला कृतार्थ करा."

अनपेक्षितपणे चालून आलेले हे भाग्य पाहून एकनाथ चकित झाला. मात्र नागनाथला त्याचा हेवा वाटू लागला.

दुसऱ्या दिवशी विशालगुप्त एक हिरा एकनाथाच्या हातात देत म्हणाला—"आपण सिद्धपूर जात आहां ना? वाटेत नागपूर येथे पुखराज नावाचे एक जव्हेरी आहेत. ते आपल्याला या हिऱ्याची बरोबर किंमत देतील."

त्यानंतर दोघे मित्र विशालगुप्ताचा निरोप घेऊन निघाले. वाटेत नागनाथच्या मनात तो हिरा पळविण्याचा दुष्ट विचार आला. दोघे एका गावी एका धर्मशाळेत उतरले होते तेथे नागनाथने संधी पाहून तो हिरा एकनाथाला कळू न देता चोरला.

एकनाथाने हिरा हरवल्याचे नागनाथाला सांगितले. तेव्हां त्याला जणुंकाही काहीच माहीत नसल्याची त्याने बतावणी केली आणि तो हिरा परत मिळेपर्यंत ते गांव सोडून न जाण्याचा सल्ला दिला.

तेव्हां एकनाथ म्हणाला—"या गावात आपल्याला मदत कोण करणार रे? तो हिरा जसा आला तसा गेला."

त्यानंतर काही काळ लोटल्यावर ते नागपूरला आले. एकनाथाने पुखराज यांना भेटायची गोष्ट काढली. परंतु नागनाथ म्हणाला—"हिरा तर तू घालवून बसला आहेस, मग त्यांना भेटायचे कशाला?"

"तसे नव्हे रे! विशालगुप्त यांच्याशी आपली ओळख झाली, त्यांच्या मित्राशी ओळख करून घेऊन ती मित्रता कायम होईल की नाही? त्यांच्याकडे फक्त हिरा





विकण्यासाठीच गेले पाहिजे असे थोडेच आहे?" एकनाथाने समजावून सांगितले.

"तरमग तू जाऊन ये, मी गाव पहायला जातो." नागनाथ म्हणाला.

एकनाथ निघून गेल्यावर नागनाथ एका जव्हेऱ्याच्या दुकानात गेला आणि हिरा दाखवून त्याने त्याला विचारले—"हा हिरा घेतां का? काय किंमत द्याल?"

जव्हेऱ्याने हिरा पाहतांच विचारले—"तुम्हांला हा कसा काय मिळाला?"

"माझ्या वडिलांनी हा विकत घेतला. मला तूर्त पैशाची गरज आहे, म्हणून मी हा विकायला काढला." नागनाथाने थाप मारली.

जव्हेरी हंसत म्हणाला—"तुमच्या वडिलांना कोणीतरी खूप फसविलेले दिसते आहे. हा तर काचेचा एक तुकडा आहे. हा कवडीमोलाचा सुद्धा नाही!"

ते उत्तर ऐकून नागनाथाच्या मनाचे समाधान झाल्यासारखे झाले, कारण विशालगुप्तने एकनाथाला फसविले. आपण चोरी केली खरी, परंतु विशालगुप्तने एकनाथाला जें फसविले ते मात्र विचित्रच म्हणायला हवे!

एकनाथने पुखराजाला भेटून विशालगुप्ताकडून त्याची ओळख कशी कळली हे देखील त्याने थोडक्यात सांगितले.

तेव्हां पुखराज म्हणाला—"तुम्हांला विशालगुप्ताने जो हिरा दिला होता तो द्या आणि त्याची किंमत घेऊन जा."

"अहो, तो हिरा चोरीला गेला, मी तो विकायला तुमच्याकडे आलो नव्हतो. आपण विशालगुप्तांचे मित्र व स्नेही. म्हणून फक्त ओळख करून घ्यायला आलो होतो." एकनाथ म्हणाला.

परंतु त्याला या गोष्टीचे आश्चर्य वाटले की त्याला विशालगुप्तने हिरा दिला ती गोष्ट या गृहस्थाला कशी काय कळली?

मग पुखराजने एकाएकी विचारले—"तुमच्याबरोबर आणखी एक गृहस्थ होते ना? ते कोठे दिसत नाहीत?"

"ते गांव पहायला गेले आहेत." एकनाथ म्हणाला.

ते ऐकून पुखराजने आपल्या दोघां नोकरांना बोलावून त्यांना काही समजावून सांगितले. ते दोघे लगेच निघाले आणि थोड्या वेळाने नागनाथाला बरोबर घेऊन परतले. पुखराजने आपल्या नोकरांकरवी नागनाथाची झडती घेवविली. त्याच्याजवळ तो हिरा सापडला.

"तुम्ही जो हिरा हरवला होता, तो हाच का? तसं काळजी करण्यासारखं काही नाही, कारण हा तर एक कांचेचा मणी आहे. आपले हे मित्र असेच एक आहेत. खरा हिरा समजून यांनी हा चोरला आणि गावातल्या एका जव्हेऱ्याकडे विकायला गेले होते. म्हणून ते माझ्या नोकरांच्या हाती पकडले गेले. आपल्याला विशालगुप्त जो हिरा देणार होता तो पहिल्यानेच माझ्याकडे पोचला आहे. त्याची किंमत आतांच मी देणार नाही. आपल्या गावी पोचती करीन. परंतु आपल्या या मित्राला न्यायालयात पोचविणे हे माझे एक मुख्य कर्तव्य मी मानतो."

"अहो, पण हे बरोबर नाही. कारण हा मित्र या तीर्थयात्रेत माझ्या सर्व सुखदु:खाचा वाटेकरी होता. शिवाय आपण म्हणालात की याने चोरलेला हिरा खरा नसून कांचेचा मणी होता. या व्यतिरिक्त तुम्ही माझ्या हिऱ्याची म्हणून जी किंमत माझ्या घरी पाठविणार आहात त्यातली अर्धी रक्कम मी यांना देणार आहे. म्हणून आपण माझ्यावर कृपा करून माझ्या मित्रावर चोरीचा आरोप लावू नये." एकनाथने विनविले.

त्यानंतर सिद्धपूरला पोचल्यावर एकनाथाला हिऱ्याची किंमत मिळाली. तिच्यातली अर्धी रक्कम एकनाथ नागनाथाला देऊ लागला. परंतु नागनाथ नम्रपणे एकनाथाची माफी मागून म्हणाला—"मित्रा! तू मला तुरुंगवासातून वांचवून माझ्यावर अपार उपकार केले आहेस. हे उपकारांचे ओझे वाहणेच मला कठीण जाणार आहे. आणखी हे ओझें मी घ्यायला तयार नाही."





# ठेव्याचा शोध

लखू एक घोड्याचा एक्का चालवी व त्यावर त्याच्या कुटुंबाचा उदरनिर्वाह चाले. एके दिवशी संध्याकाळी तो घरी परत येत असतां रस्त्याच्या बाजूला उभा असलेला एक म्हातारा त्याला विचारू लागला, "गावापासून सहा मैलावर जी धर्मशाळा आहे तेथपर्यंत एक्का घेऊन येतोस का? सकाळी परत यायचे आहे." लखू जायला तयार झाला.

तो म्हातारा एक हंडा झांकणावर दादरा बांधून, दोन कुदळी आणि एक फावडे एक्कयात ठेवून मग बसला. लखूला वाटले की त्या उजाड पडक्या धर्मशाळेत म्हातारा एखादा ठेवा शोधायला निघाला असावा.

एक्का धर्मशाळेपर्यंत पोचे पोचतो संध्याकाळ झाली. एक्कयात बसलेला म्हातारा तो हंडा उतरवू लागला तेव्हा तो हातातून निसटून खाली पडला आणि 'खण' 'खण' असा आवाज झाला. हंडा कलंडला व त्याच्यातून काही खापरांचे तुकडे बाहेर येऊन पडले.

लखूने म्हाताऱ्याला विचारले—"या मध्यरात्रीच्या वेळी हा खापरे भरलेला हंडा कशासाठी आणलात हो, येथे?"

"मी सर्व तुला शांतपणे सांगतो. मला तुझ्या मदतीची गरज आहे." असे सांगून म्हातारा सांगू लागला:

"माझे नाव गणूशेट. माझ्या आजोबांनी दर्यापार व्यापार करून पुष्कळ पैसे मिळविले. एकदां ते पुष्कळ पैसे घेऊन आपल्या गांवी परत येत होते. या जागी पोचेपोचे—तो मध्यरात्र उलटली. ते त्या दिवशी रात्री याच जागी उतरले. त्या दिवशी रात्री चोरांनी धर्मशाळेवर हल्ला केला. चोरांनी समोर येईल त्याला मारहाण



केली आणि हाताला आले ते लुटून नेले. काही लोक जागच्या जागी ठार झाले. त्यात माझे आजोबा पण होते.

"माझ्या वडिलांनी किराण्या मालाचे दुकान काढले. फार कष्टाने चार पैसे मिळवून मला वाढविले. ते नुकतेच वारले. त्यांनी मागे माझ्यासाठी एक घर काय ते ठेवले आहे. ते घर विकून टाकण्याचे ठरवून मी माळयावर ठेवलेले सामान काढू लागलो. तेव्हां मला माझ्या आजोबांच्या वेळचे एक बाड मिळाले. मी त्याची पाने चाळू लागलो. एका जागी माझ्या आजोबांनी लिहून ठेवले होते– "धर्मशाळेला दरोडेखोरांनी घेरले. माझ्याजवळ जे काही होते नव्हते ते एका पेटीत घालून, झाडे लावायला काही अळीं केलेली होती त्यात ती पेटी पुरून ठेवली."

हे वृत्त सांगून गणूशेट म्हणाला–"धर्मशाळेच्या मागच्या बाजूला जी झाडे आहेत त्यांच्या बुंधाच्या आजूबाजूची जमीन खणायाची आहे. तू मला मदत केलीस तर जो ठेवा मिळेल त्याचा एक तृतीयांश वाटा मी तुला देईन."

लखू आनंदाने कबूल झाला. परंतु त्याने विचारले–"पण मग ही खापरे भरलेला हंडा कशासाठी हो?"

"आपण एकाएकी हा हंडा भरून धन नेले तर कोणाला तरी शंका येईल. म्हणून दररोज हा हंडा बरोबर नेत येत राहालो तर कोणी आपल्या हंडयाकडे संशयी मुद्रेने पाहणार नाही. पेटीत ठेवलेले धन या हंडयात ठेवून आपल्याला निश्चितपणे नेता येईल." गणूशेट म्हणाले.

त्यानंतर लखूने घोडा एका झाडाला बांधून ठेवला आणि दोघे कुदळ फावडे घेऊन धर्मशाळेच्या मागे गेले. झाडांच्या बुंधात निरनिराळी अळी दोघे खणू लागले.

उजाडण्याची वेळ झाली म्हणून दोघे थांबले आणि दुसऱ्या दिवशी रात्री पुन्हा यायचे ठरवून निघाले. त्या दिवशी केलेली मेहनत फुकटच गेली होती. घरी पर-

# अर्धा राजा!

राजा जयसिंह याच्या दरबारात एक गरीब माणूस आला. त्याने आपली दयनीय स्थिती वर्णन करून सांगितली आणि पोटापाण्याची काहीतरी व्यवस्था करायला विनंती केली. राजाने त्याला थोडीशी पडीक जमीन देवविली.

त्यानंतर काही दिवसांनी राजा व त्याचा प्रधान वेष पालटून त्या गरीब माणसाच्या घरी गेले. घरासमोर ठेवलेल्या खाटेवर बसलेल्या त्या गरीब माणसाबरोबर ते बोलू लागले. त्या गरीब माणसाने दोघांना खाटेवर प्रेमाने बसायला सांगितले.

प्रधानाने त्याला विचारले–"आम्ही या देशाच्या राजाकडे मदतीकरितां जावे म्हणतो!"

त्या गरीब माणसाने राजाकडून त्याला जी जमीन मिळाली होती ते सांगून म्हटले– "आमच्या देशाचा राजा अर्धा राजा आहे!"

"ज्या राजाने तुझ्या पोटापाण्याची व्यवस्था करून दिली त्याच्या विषयी तू असे कां बोलतोस रे?" प्रधानाने विचारले.

"अहो, मी धाडस करून दरबारात गेलो आणि आपल्या गरीबीचे वर्णन केले तेव्हा राजाला कळले की मी गरीब आहे व तेव्हां त्याने जमीन दिली. परंतु या देशात माझ्यासारखे गरीब थोडे थोडके का आहेत? त्यांच्यापैकी दरबारात पाऊल टाकण्याचे धाडस आणि आपले दुःख निवेदन करण्याचे सामर्थ्य किती जणात आहे? राजाला प्रजेचे दुःख सांगितल्याशिवाय कळत नसेल तर तो काय राजा झाला? तो अर्धाच तर राजा झाला?" तो गरीब म्हणाला.

त्यानंतर एका आठवडयाच्या आत त्या राजाने आपली सर्व पडीक जमीन स्वतः होऊन गरीब प्रजेला वाटून दिली.











होतेच. शेजारच्या घरी ओटीवर बसलेल्या एका म्हाताऱ्याला लखूने गणूशेट विषयी विचारले. तो म्हणाला—"त्याला लागलेले वेड फार वाढले, म्हणून त्याला इलाज करण्यासाठी शहरात घेऊन गेले आहेत."

लखूने चकित होऊन विचारले—"म्हणजे गणूशेटला वेड लागले आहे का?"

"होय ना, नाहीतर आजोबांनी ठेव-लेला ठेवा शोधण्यासाठी त्याने सर्व घर खणून कां काढले असते? या वेडेपणात त्याने व्यापारसुद्धा बंद केला होता. शेवटी त्याच्या हाती एक हंडा आला खरा, परंतु त्यात खापरांशिवाय काही नव्हते. नंतर त्याचे वेड वाढतच गेले. म्हणून त्याची बायको त्याला इलाज करण्यासाठी शहरात घेऊन गेली." म्हातारा म्हणाला.

तेव्हां कोठे लखूच्या डोक्यात प्रकाश पडला. त्या मूर्खाच्या नादी लागून तो स्वतः खड्डयात पडला. त्याचे वेड आपण आपल्याला लावून घेतले. पैशाचे वेड थोरांमोठ्यांनाही लागते.

आता लखूचे मन थोडे हलके झाले. तो पाय रखडीत घरी गेला.

तोपर्यंत एका खांबाआड लपून बसलेली लक्ष्मीबाहेर आली आणि म्हाताऱ्याला म्हणाली—"आजोबा! मला माफ करा, मी तुम्हांला खोटे बोलायला लावले."

"होय मुली! गणूशेटला तर त्याचा ठेवा सापडला होता. तो आपले सर्व कर्ज वगैरे फेडून शहरात रहायला गेला आहे. पण तू त्याला वेडा म्हणायला मला कां सांगितलेस?" म्हाताऱ्याने विचारले.

लक्ष्मीने सर्व वृत्त थोडक्यात सांगितले व म्हणाली—"मी तसे केले नसते तर माझ्या पतीला खरोखरच वेड लागले असते. कारण ह्या ठेव्याची गोष्ट निघण्या-पूर्वी त्यांना जे चार पैसे मिळत त्यावर आमचा सर्वांचा उदरनिर्वाह होत होता. आम्ही सुखी होतो; परंतु ठेव्याचे वेड डोक्यात शिरल्यानंतर आमचे सर्व सुख हरपले." असे सांगून लक्ष्मी दुसऱ्या वाटेने आपल्या घरी निघून गेली.



# अर्धा राजा!

राजा जयसिंह याच्या दरबारात एक गरीब माणूस आला. त्याने आपली दयनीय स्थिती वर्णन करून सांगितली आणि पोटापाण्याची काहीतरी व्यवस्था करायला विनंती केली. राजाने त्याला थोडीशी पडीक जमीन देवविली.

त्यानंतर काही दिवसांनी राजा व त्याचा प्रधान वेष पालटून त्या गरीब माणसाच्या घरी गेले. घरासमोर ठेवलेल्या खाटेवर बसलेल्या त्या गरीब माणसाबरोबर ते बोलू लागले. त्या गरीब माणसाने दोघांना खाटेवर प्रेमाने बसायला सांगितले.

प्रधानाने त्याला विचारले—"आम्ही या देशाच्या राजाकडे मदतीकरितां जावे म्हणतो!"

त्या गरीब माणसाने राजाकडून त्याला जी जमीन मिळाली होती ते सांगून म्हटले—"आमच्या देशाचा राजा अर्धा राजा आहे!"

"ज्या राजाने तुझ्या पोटापाण्याची व्यवस्था करून दिली त्याच्या विषयी तू असे कां बोलतोस रे?" प्रधानाने विचारले.

"अहो, मी धाडस करून दरबारात गेलो आणि आपल्या गरीबीचे वर्णन केले तेव्हा राजाला कळले की मी गरीब आहे व तेव्हां त्याने जमीन दिली. परंतु या देशात माझ्यासारखे गरीब थोडे थोडके का आहेत? त्यांच्यापैकी दरबारात पाऊल टाकण्याचे धाडस आणि आपले दुःख निवेदन करण्याचे सामर्थ्य किती जणात आहे? राजाला प्रजेचे दुःख सांगितल्याशिवाय कळत नसेल तर तो काय राजा झाला? तो अर्धाच तर राजा झाला?" तो गरीब म्हणाला.

त्यानंतर एका आठवड्याच्या आत त्या राजाने आपली सर्व पडीक जमीन स्वतः होऊन गरीब प्रजेला वाटून दिली.





# लबाड व्यापारी

महादेवपूर नावाच्या गावी शंकरशेट नावाचा एक मोठा व्यापारी होता. तो लबाडीच्या व्यापार करी. वजनामापात लबाडी करी व मिसळ पदार्थविकी. परंतु बोलण्यात इतका हुशार होता की त्याच्यावर गिऱ्हाईकाचा विश्वास बसे. अशा तऱ्हेने तो खूप पैसे मिळवी. कोणी शंका केलीच तर तो आपले वाक्चातुर्य वापरून गिऱ्हाईकाच्या मनात अशी भावना उत्पन्न करी की त्यांना आपलंच काहीतरी चुकल्यासारखे वाटे.

त्या गावच्या पाटलाच्या कानावर त्या वाण्याच्या लबाडीच्या कागाळ्या येत. सुरवातीला त्याने त्यांच्याकडे दुर्लक्ष केले. परंतु काही दिवसांनी त्यालाच संशय येऊ लागला की शंकरशेट धान्यात व तुपातेलात काहीतरी मिसळतो. परंतु ते सिद्ध कसे करायचे हा प्रश्नच होता. म्हणून त्याने एकदां ठरविले की सरळ जाऊन तपासणी करायची.

एके दिवशी पाटील तूप विकत घ्यायचे ठरवून त्या वाण्याच्या दुकानात गेला. शंकरशेट दुकानाच्या आतल्या बाजूला गेला आणि थोड्या वेळाने तुपात बुडविलेली हाताची तीन बोटे घेऊन बाहेर आला. पाटलाला एकेक बोट दाखवून म्हणाला– "पाटील, पहा तरी, गाईचे शुद्ध तूप आहे! हे अगदी उत्तम प्रतीचे! हे दुसऱ्या प्रतीचे. हे पहिल्या तुपा इतके उत्तम नसले तरी इतर दुकानात उत्तम प्रतीचे म्हणून जे तूप आहे त्याच्याहून नक्कीच चांगले आहे. आता हे तिसरे तूप. याच्याविषयी मी जास्त काय सांगू? हे तूप जे लोक कमी दराने उत्तम तूप मागतात ना, त्यांच्यासाठी आहे! आतां तुम्हीच सांगा, पाटील, तुम्हांला यातले कोठले देऊ?"

तिन्ही तऱ्हेची तुपे पाटलांनी दोनदां तीनदां वास घेऊन पाहिली, परंतु त्यांना काही फरक वाटला नाही. किंमत इतर दुकानाच्या मानाने जास्त होती. पाटलांनी ते बोलून दाखविले.

तेव्हा वाणी म्हणाला–"पाटील साहेब, असे कसे होईल हो? मी तीन तऱ्हेचे तूप तीन निरनिराळ्या डब्यात ठेवले आहे! तुमचा विश्वास बसत नसेल तर आत येऊन पहात कां नाही?"

त्याला वाटत होते, खचाखच भरलेल्या मालाच्या काळोख्या कोठारात पाटील साहेब कदापि पाऊल टाकणार नाहीत. तेच झाले.

"अहो, तुम्ही कित्येक वर्षे या गावी व्यापार करतां आहां, तुमच्यावर शंका करण्याची गरजच काय?" असे म्हणत पाटील तिसऱ्या तऱ्हेचे थोडे तूप विकत घेऊन निघून गेला.

त्या वाण्याकडे खरोखरी एकाच तऱ्हेचे तूप होते. तेच तूप तो निरनिराळ्या तऱ्हेने दाखवून गिऱ्हाइकाला फसवी. गिऱ्हाइकाने कोणतेही तूप घेतले तरी आपले नुकसान होणार नाही असा भाव सांगे. त्या पाठीमागे जी लबाडी असे ती न कळल्यामुळे वाण्याच्या प्रामाणिकपणाची खात्री गिऱ्हाइकाला वाटे.

दुसऱ्या दिवशी शंकरशेट पाटलाकडे धांवत आला आणि म्हणाला–"पाटील साहेब, कहर झाला हो, माझ्या दुकानात काल मोठी चोरी झाली. मेहरबानी



करून चोराला पकडा आणि गरिबाला वांचवा!"

पाटील म्हणाला–"चोर जातो कोठे गुलाम! त्याला पकडल्याशिवाय राहीन का? परंतु चोरीला काय गेले हे तुम्ही सांगितले नाही!"

"अहो, एक पोते तांदूळ, तुपाचा एक डबा आणि वजनांपैकी काही! मेहरबानी करून हा माल परत मिळेल असे काही तरी करा!" शंकरशेट विनवण्या करीत म्हणाला.

बाकी माल सुरक्षित आहे ना, जागच्या जागी? नीट पाहून आलात का? पाहून खात्री करून घ्या अगोदर!" पाटील म्हणाला. परंतु शंकरशेट म्हणाला–"तुम्हीच येऊन पहा ना, बाकी सर्व माल जागच्या जागी आहे!" असे सांगून शंकरशेटने आग्रह करून पाटलाला दुकानात बोलाविले.

पाटील त्याच गोष्टीची वाट पहात होता तो दुकानात गेला. सर्व मालाची पाहणी करून म्हणाला–"कालच तुम्ही म्हणालात तुमच्या दुकानात तुपाचे तीन डबे निरनिराळे आहेत! एक डबा चोरीला गेला तर बाकी दोन डबे कोठे आहेत? ते दोन्ही डबे दिसत नाहीत की येथे?"

शंकरशेटची वाचाच बंद झाली. तो बोलण्याचा यत्न करू लागला. परंतु पाटील त्याला मध्येच थांबवून म्हणाला–"शंकरशेट! तुम्ही गावातल्या लोकांशी किती दिवस अशी लबाडी करणार? मला तुमचा संशय आला. काल रात्री मीच तुमच्या दुकानातला माल गाव पाटील या नात्याने काढवून पंचायतीच्या कोठारात ठेवविला. तुम्ही तांदुळात, तुरीच्या डाळीत व तुपात मिसळ करून विकतां. वजनात व मापातही फसवेगिरी करतां, हे सिद्ध झाले आहे. तुम्ही आतापर्यंत जी लबाडी केलीत त्याबद्दल मी बाराशे रुपये दंड करतो तुम्हांला. यापुढे मी तुम्हांला गावात व्यापार करू देणार नाही!" असे बजावून पाटील निघून गेला.






त्वष्टाने वृत्रासुराला आज्ञा केली की त्याने काय वाटेल ते करून इंद्राचा वध करावा. तेव्हां वृत्रासुर एक मोठे सैन्य घेऊन रथात बसून अमरावतीवर स्वारीला निघाला. इंद्र पुन्हां वृत्राशी युद्ध करण्यास सिद्ध झाला.

दोघाचे घोर युद्ध झाले. या युद्धात वृत्रासुराच्या हाती इंद्र कैद झाला. त्याने इंद्राला तोंडाच्या आत धरून कोंडून ठेवले.

ते पाहून सर्व देव हाःहाकार करू लागले आणि सल्ला घ्यायला बृहस्पतीकडे धावले. इंद्राला सोडविण्याची युक्ती त्यांनी त्याला विचारली.

बृहस्पती शांतपणे म्हणाला–"देवांनो! या बाबतीत मी तरी काय करणार? परंतु एवढे सांगतो की इंद्र मेलेला नाही. वृत्राच्या तोंडात तो जिवंत आहे.

तेव्हां देवांनी परस्परांशी सल्ला करून जृंभिका नामक एका शक्तीची सृष्टी केली. ती शक्ती वृत्राच्या अंगात शिरली व वृत्राला जांभई आली. वृत्राने तोंड उघडतांच इंद्र चटदिशी बाहेर आला. अशा तऱ्हेने इंद्र वांचला. त्यानंतर बरेच दिवस युद्ध चालू राहले. त्या युद्धात इंद्राचा पूर्ण पराभव झाला आणि तो असहाय्य झाला. वृत्राने इंद्राची राजधानी अमरावती काबीज करून इंद्राचे वैभव बळकावले.

आपला मुलगा स्वर्गाचा राजा झालेला पाहून त्वष्टाला परमानंद झाला. देवांना यज्ञाचा अंश मिळेनासा झाला व त्यांना







रानावनांत भटकत फिरावे लागले. अशा तऱ्हेने देवांची राजधानी राक्षसनगरी झाली.

त्यानंतर देवांनी शंकराकडे जाऊन त्यांच्यावर आलेला दुःखद प्रसंग निवेदन करून सांगितला. ते म्हणाले–"महादेवा, आम्ही तुझ्या पायांशी शरण मागायला आलो आहो. तूच रक्षण कर!"

शंकराने त्यांचे सांत्वन केले व म्हणाला–"आपण ब्रह्मदेवाला बरोबर घेऊन विष्णूकडे वैकुंठलोकी जाऊ या. तोच वृत्राचा वध करील."

म्हणून सर्व वैकुंठलोकी गेले. विष्णूने त्यांना दर्शन देऊन विचारले–"तुम्ही सर्व आलां आहां, पण कशासाठी?"

परंतु कोणीच काही बोलला नाही. सर्वांची उतरलेली तोंडें पाहून विष्णूने विचारले–"बोला तरी, तुमच्यावर असे कोणते संकट आले आहे. त्यांतून तुम्हांला वांचविण्याचा प्रयत्न करीन."

देवांनी त्यांच्यावर आलेल्या प्रसंगाचे वर्णन केले. तेव्हां विष्णू म्हणाला–"तुमच्यावर हे जे संकट आले आहे, हे मला माही आहे. मी वृत्राचा वध करण्यासाठी आवश्यक उपाय योजून तुम्हांला कळवीन. ब्रह्मदेवाकडून वर मागून घेऊन वृत्र स्वतःला अमर समजत आहे. तर आतां तुम्ही वृत्र आणि इंद्र दोघांमध्ये मैत्री वाढविण्याचा उपाय योजला पाहिजे. मी अदृश्य रूपें वज्रायुधात राहून तुम्हांला सर्व मदत करीन. काय वाटेल ते कपट करावे लागले तरी ते करून वृत्रासुराशी इंद्राने मैत्री केली पाहिजे. त्याच्या मनात इंद्रावर विश्वास उत्पन्न झाला पाहिजे. त्यानंतर चतुराईने इंद्राच्या हातून वृत्राचा वध होईल. यापूर्वी मी अनेक वेळां कपट चतुराई करून कामे साधली नाहीत का? वामनाचे रूप घेऊन बलीला मी फसविले नाही का? मोहिनीचे रूप घेऊन समुद्रमंथनानंतर अमृत वाटताना दानवांची लबाडी केली नाही का? तरी तुम्ही एक काम करा. तुम्ही सर्व कामना पूर्ण करणाऱ्या जगन्मातेची प्रार्थना करून तिला प्रसन्न करा. ती आपली योगमाया पसरवून तुमचे काम साध्य करून देईल. तिच्या मायेने वृत्रासुर इंद्राच्या हाती मरेल. तेव्हा तुम्ही जगन्मातेची मदत घेऊन वृत्रासुराचा काटा काढा."

त्याप्रमाणे देव मेरु पर्वतावर गेले. त्या पर्वतावरच कल्पवृक्ष होता. तेथे त्यांनी जगन्मातेचे स्मरण केले. देवीने दर्शन दिल्यावर देवांनी निवेदन केले–"देवी, तू महिषासुर, शुंभ व निशुंभ व इतर राक्षसांचा वध करून देवांना मदत केली होतीस. आता हा वृत्रासुर तुझ्या भक्तांना त्रास देत आहे. त्याचे पारिपत्य कर."

देवीने त्यांना सर्व प्रकारे मदत देण्याचे वचन दिले व अंतर्धान पावली. देवीचे त्या वेळचे रूप अपूर्व होते. ती रक्तचंदनी रंगाचे वस्त्र व सर्व आभूषणे धारण करून आली होती. तिच्या चारही हातात दिव्य आयुधे होती. तिला तीन डोळे होते.

देव आनंदाने परतले. इंद्राची वृत्रासुराशी मैत्री करून देण्यासाठी प्रयत्न करायला त्यांनी ऋषी मुनींना वृत्रासुराकडे पाठविले.

मुनी वृत्रासुराकडे जाऊन म्हणाले–"वृत्रासुरा, तू महापराक्रमी आणि थोर मनाचा आहेस इंद्रही एक थोर मनाचा देव आहे. अशा परिस्थीत दोघांनी परस्परांशी



वैर करण्याचे सोडून मैत्रीने राहणे त्रिलोकाच्या हिताचे होईल. इंद्र तुझ्यासमोर मैत्रीची शपथ घेईल. तूसुद्धा मैत्रीचा हात पुढे करून त्याला वचन दे. सर्व मुनी या मैत्रीला साक्षीदार राहतील."

मुनी म्हणाले ते ऐकून वृत्र म्हणाला–"तुम्हां सर्व ऋषी मुनींच्या विषयीं माझ्या मनात अत्यंत आदरभाव आहे. तुम्ही केलेल्या सूचनांचा तिरस्कार मी करणार नाही. ज्या इंद्राने ब्रह्महत्येचे पाप केले आहे त्याच्यावर विश्वास कसा काय करून चालेल?"

तेव्हा मुनी म्हणाले–"जो पाप करतो त्यालाच त्याचे फळ भोगावे लागते. ब्रह्म-



हत्या व मद्यपान या पापांना प्रायःश्चित्तच नाही. तो आपल्या पापाची फळे चाखील तेव्हां तुम्ही आणि इंद्र दोघांनी शपथ घेऊन मैत्री करायला हरकत नाही."

"ओल्या अगर वाळलेल्या दगडाने किंवा काष्ठाने किंवा कठोर वज्राने दिवसा किंवा रात्री देवांनी किंवा त्यांचा राजा इंद्र याने माझा वध होता कामा नये. हे त्यांना सर्वांना मान्य असेल तर तुम्ही म्हणालात तसे करायला मी तयार आहे." वृत्र म्हणाला.

मुनींनी ते इंद्राला जाऊन कळविले आणि अग्नीला साक्षी ठेवून त्या सर्व अटी कबूल केल्या. तेव्हां वृत्राने त्यांच्या बोलण्यावर विश्वास केला आणि इंद्राशी मैत्रीने राहण्याचे मान्य केले.

त्यानंतर दोघे हातात हात घालून समुद्रकाठी किंवा नंदनवनात हिंडू फिरू लागले. इंद्राशी मैत्री झाल्याचा वृत्राला आनंद झाला. परंतु इंद्र वृत्रासुराचा वध करण्यासाठी संधी पाहू लागला.

तिकडे त्वष्टाला वृत्राने इंद्राशी मैत्री केल्याचे ऐकून आश्चर्य वाटले. तो आपल्या मुलाकडे जाऊन म्हणाला—"वृत्रा, तू त्या लबाड इंद्राचा कसा काय विश्वास केलास? सर्वांना आपल्यासारखे प्रामाणिक व विश्वासपात्र मानणे फार मोठी चूक आहे. वेडा सुद्धा शत्रूच्या म्हणण्यात येऊन त्याच्यावर विश्वास करणार नाही. त्यात संधी मिळताच विश्वासघात करणाऱ्या व्यक्तीशी मैत्रीधर्म कसा काय निभावणार?"

अशा तऱ्हेने त्वष्टाने अनेक प्रकारे वृत्राला समजावून पाहिले, परंतु वृत्राच्या मनाला त्यातली एकही गोष्ट पटली नाही.

एकदां संध्याकाळी इंद्र आणि वृत्र समुद्रकाठी फिरत होते. ती अशी वेळ होती की दिवस म्हणावा तर दिवस नव्हता व रात्र म्हणावी तर रात्रही नव्हती. शिवाय वृत्र एकटा होता. म्हणून इंद्राने विचार केला कि वृत्रासुराचा वध करायला हीच उत्तम वेळ आहे. त्याने विष्णूचे स्मरण केले आणि विष्णूने अदृश्यपणे वज्रायुधात प्रवेश केला. इंद्राला समुद्राच्या लाटांवरचा फेस काय तो दिसला. तो ओला नव्हता की वाळलेलाही नव्हता आणि फेस म्हणजे आयुधही नव्हते. इंद्राने महादेवीचे स्मरण केले. महादेवीने आपला अंश फेसात टाकला. इंद्राने आपले वज्रायुध त्या फेसात बुडवून व सर्व शक्ती एकवटून ते वृत्रावर टाकले. अशा तऱ्हेने वृत्रासुराचा देह पर्वताचे शिखर कोसळावे असा कोसळून जमिनीवर पडला आणि त्याने प्राण सोडले.

शत्रूची भीती नाहीशी होताच इंद्र अमरावतीला परत आला. मुनींनी त्याचे स्तोत्रगान केले व जगन्मातेचा उत्सव केला. इंद्राने नंदनवनात जगन्मातेच्या मूर्तीची प्रतिष्ठा करून तिचे एक देऊळ बांधले. त्यानंतर सर्व देवांसह त्याला मदत करणाऱ्या विष्णूची पूजा केली. अशा प्रकारे जगन्मातेच्या कृपेने व विष्णूच्या सहाय्याने इंद्राने वृत्रासुराचा वध केला. परंतु त्याचे यश मिळाले ते इंद्रालाच. त्यानंतर विष्णू वैकुंठलोकी निघून गेला.

परंतु इंद्राला मित्रद्रोह मनातल्या मनात डाचत राहिला. त्या पापाचे वाटेकरी विष्णू व मुनी दोघेही होते. म्हणून मुनी सुद्धा भीत होते. आपल्या त्या पापाचा



विचार करून पश्चात्ताप करीत मुनी आपापल्या आश्रमात परतले.

आपल्या आणखी एका मुलाचा वध झाल्यामुळे त्वष्टा अत्यंत दुःखी झाला. त्याने मुलाची अन्त्येष्टी वगैरे उरकली. लबाडी करून इंद्राने वृत्राचा वध केला या अपराधाबद्दल त्वष्टाने इंद्राला शाप केला की त्याला फार दुःख भोगावे लागेल.

पापाचे फळ भोगावे लागते. वृत्रासुराचा वध केल्यानंतर इंद्राचे तेज नष्ट झाले. देव इंद्र कृतघ्न असल्याचे सांगून त्याची निंदा करू लागले. शपथ मोडून मित्राचा घात केल्यावर इंद्रासारखा मित्रघातकी त्रिलोकात कोणी नसल्याचे सांगून सर्वत्र इंद्राची निंदा



होऊ लागली. मुनींच्या मध्येही इंद्राचा आदर कमी होत गेला.

या सर्व कारणांमुळे इंद्र आपल्या सभेत जाऊन इंद्रासनावर बसत नव्हता. तो सर्वदा दु:खी असे आणि घरातच बसून राही. ते पाहून त्याची बायको शची त्याला म्हणाली—"तुमचे शत्रूचं भय नाहीसे झालं, तरी तुम्ही सुखी कां नाही? आणखी कोणी तुमचे शत्रू उरले तर नाहीत?"

इंद्र म्हणाला—"मला तूर्त कोणत्याही शत्रूचे भय नाही. परंतु ब्रह्महत्येचे पातक घडले आहे माझ्या हातून. म्हणून मला हे नंदनवन, अमृत, गंधर्वांचे संगीत, अप्सरांचं नृत्य, तू, कामधेनु, कल्पवृक्ष, यांपैकी एकाचे ही सुख प्राप्त होत नाही." असे सांगून इंद्र मानस सरोवरावर गेला. कोणालाही कळू न देतां एका कमळाच्या लांब देठात शिरून पाणसापासारखा राहू लागला.

त्यामुळे सर्व जगात अराजक पसरले. ते दूर व्हावे यासाठी इंद्रासन रिकामे ठेवणे इष्ट नसल्याने देव व ऋषीमुनींनी विचार करून इंद्रपद नहुष राजाला दिले. नहुष राजाने अनेक यज्ञ करून इंद्रासन प्राप्त करण्यात योग्यता प्राप्त केली होती. परंतु इंद्रपद मिळतांच तो सुखोपभोगात आपले कर्तव्यच विसरला. शचीच्या सौंदर्याचे वर्णन ऐकून ऋषीमुनींना बोलावून नहुष म्हणाला—"मी इंद्र झालो असतां माझ्या सेवेला शची कां नाही आली? तिला बोलवा."

ते ऐकून मुनी चकित झाले. त्यांनी शचीला तसे कळविले. ती बृहस्पतीकडे धावली आणि स्वत:चे पातिव्रत्य रक्षण करायला मार्ग सुचवायला विनंती केली. बृहस्पतीने तिला अभयवचन दिले. परंतु ऋषींनी शचीला नहुष राजाकडे घेऊन जाण्याचा आग्रह दर्शविला. कारण त्यांना नहुषाची भीती वाटत होती. तेव्हां बृहस्पतीने एक युक्ती सुचवून शचीला ऋषी-बरोबर नहुष राजाकडे पाठविले.

शची नहुषाला म्हणाली—"पती कोठे आहे हे कळल्यावरच मी आपली पत्नी म्हणून रहायला येईन. त्यांची खुशाली कळेपर्यंत तुम्ही थांबावे."

नहुष त्या गोष्टीस कबूल झाला. शचीच्या वतीने देवांनी विष्णूला भेटून इंद्राविषयी चवकशी केली. विष्णू म्हणाला—"तुम्ही अश्वमेध यज्ञ करा व जगदंबेला प्रसन्न करून इंद्राला परत इंद्रपद मिळवून द्या. अशा तऱ्हेने शचीला तिच्या पतीची प्राप्ती पुन्हा होईल."

देवांनी इंद्राचा शोध काढून त्याच्याकरवी अश्वमेध यज्ञ करविला. तरी तो परतला नाही. तेव्हां शचीने अत्यंत दुःखी होऊन बृहस्पतीला त्याचे कारण विचारले. बृहस्पतीने तिला महादेवीची आराधना करण्याचा सल्ला दिला. शचीने तसे केले. जगन्मातेने दर्शन देऊन तिला सांगितले की नहुष तिच्या मायेने मरणार आहे आणि शचीला इंद्राजवळ जाण्यासाठी तिने आवश्यक व्यवस्था पण करून दिली.

शचीने इंद्राला भेटून तिच्यावर आलेला प्रसंग वर्णन करून सांगितला व नहुष तिच्यावर अत्याचार करण्यास सिद्ध असल्याचे तिने सांगितले. इंद्राने तिला सल्ला दिला—"तू नहुष राजाकडे निरोप पाठव की त्याने ऋषींना पालखी वहायला सांगून तुझ्याकडे पालखीत बसून यावे. तो पापी ऋषींचा शाप लागल्याने तत्काळ इंद्रासनावरून च्युत होईल."

त्याचा तो डाव यशस्वी झाला. शचीला आपली बायको करून घेण्यासाठी नहुषाने ऋषींना पालखी घेऊन यायला सांगितले. त्यांनीच पालखी वाहली पाहिजे असेही सांगितले. ऋषींनी ते मान्य केले. परंतु ते सावकाश चालत होते. म्हणून नहुष अगस्त्य ऋषींना लाथ मारून 'सर्प' 'सर्प' म्हणजे लवकर चल, असे म्हणू लागला.

अगस्त्य ऋषींनी संतापून नहुषाला शाप दिला—"तू सर्प हो!" तत्काळ नहुष साप होऊन पृथ्वीवर आदळला.

अशातऱ्हेने इंद्राला पुन्हां इंद्रपद प्राप्त झालें.





## जशास तसे

सदोबा एकाएकी वारल्यामुळे त्यांची बायको आणि दहावर्षांचा मुलगा अनाथ झाले. त्यांनी मागे राहाते घर आणि एक एकर जमीन ठेवली होती.

सदोबाचे शेत धनंजय नावाच्या एका सधन शेतकऱ्याच्या शेताला लागून होते. परंतु सदोबा जिवंत असेपर्यंत त्यांनी ते शेत विकायचे नाकबूल केले. आतां सदोबाची बायको व मुलगा असहाय्य स्थितीत होते. सदोबा वारल्यावर धनंजयने त्या शेताला चांगली किंमत द्यायचे कबूल करून ते शेत आपल्या शेताला जोडून टाकले.

धनंजयने सदोबांचा मुलगा गोपाळ याला व त्याच्या आईला समजावून सांगितले की तुमच्या शेताची जी किंमत आहे ती मी व्याजाने लावतो व तुम्हांला रकमेची गरज लागली म्हणजे लगेच परत करीन. तोपर्यंत गोपाळही थोडा मोठा होईल. हे पैसे तुमच्या जवळच राहले तर कोणी हे तुमच्याकडून घेऊन तुम्हांला फसवील.

सदोबांच्या बायकोने धनंजयच्या गोड-गोड बोलण्यावर विश्वास करून ते पैसे त्याच्याकडे राहू दिले आणि स्वतः काम करून चार पैसे मिळवू लागली. त्या प्राप्तीवर मुलाचा विद्याभ्यास होऊ लागला. गोपाळने शाळेचे शिक्षण संपल्यावर मोठ्या शहरात राहून उच्च शिक्षण घेण्याचे ठरविले. म्हणून त्याच्या आईने धनंजयकडे जाऊन आपले पैसे परत मागितले.

धनंजयने आश्चर्य प्रगट करीत विचारले—"तुम्ही केव्हां हो पैसे माझ्याकडे ठेवलेत?"

ते उत्तर ऐकून सदोबाची बायको चकित झाली. कोणी दुसरा फसवील असे म्हणणारी व्यक्ती लबाडी करीत आहे!

श्री. श्री. सं. नखाते



तिने अनेक वेळा विनवण्या करून पाहिल्या, पण तिला अपमानही सहन करावा लागला.

ते कळल्यावर गोपाळ चिडला. तो आईला म्हणाला–"या दुष्ट माणसाच्या बोलण्यावर विश्वास करून त्याच्याकडे आपण पैसे ठेवले ही आपलीच चूक आहे. तरमग याला याबद्दल चांगला धडा शिकविला पाहिजे."

गोपाळचा अनंत नावाचा एक मित्र होता. त्याचा बाप सोनार होता. गोपाळने आपल्याशी धनंजयने केलेल्या लबाडीची गोष्ट जाऊन बापाला सांगितली आणि त्याच्याकडून काही जुने दागिने घेतले.

दररोज संध्याकाळी धनंजयच्या घरी प्रमुख गावकरी जमत अशाच एका प्रसंगी गोपाळ दागिने घेऊन धनंजयच्या घरी आला. गोपाळला येत असलेला पाहून धनंजय घाबरला की हा आपली बेअब्रू करणार. परंतु गोपाळ त्याच्या त्याविषयी काही एक बोलला नाही. बरोबर आणलेले सर्व जुने दागिने गावकऱ्यांसमोर धनंजयच्या हातात देत म्हणाला–"काका, हे माझ्या आईचे जुने दागिने आहेत. मला या वेळी शिक्षणाकरिता पैशाची गरज आहे. हे दागिने गहाण ठेवून मला पैसे द्याल का?"

"असं होय! तुला शिक्षणासाठी पैसे हवे आहेत ना? पाहिजे तितके घेऊन जा." या शब्दांत गावकऱ्यांसमोर धनंजयने आपल्या औदार्याचे प्रदर्शन केले.

"मला फक्त पांचशे रुपये हवे आहेत!" गोपाळ म्हणाला.

तेव्हां धनंजयने पांचशे रुपये देऊन त्याला निरोप दिला.

दुसऱ्या दिवशी धनंजयने अनंतच्या बापाला बोलावून त्या दागिन्यांची किंमत जोडून सांगायला सांगितले. सोनाराने सर्व दागिने नीट तपासून पाहिले व म्हणाला–"हे तर सर्व आपल्या गावच्या जमिनदार साहेबांच्या दागिन्यांसारखे आहेत. होय हो, संशयाला जागाच नाही. तेच हे दागिने आहेत. फार दिवसांपूर्वी मीच करून दिले होते. त्यांच्या घरी चार दिवसांपूर्वीच चोरी झाल्याचे ऐकले. कदाचित् हेच ते दागिने असावेत."

ते ऐकून धनंजयचा थरकांप उडाला. लगेच सोनार म्हणाला–"चोरीचा माल तुमच्यासारख्या वडील धाऱ्यांकडे ठेवणे बरोबर नाही. ज्याने आपल्याला हे आणून दिले त्यालाच हे परत देऊन मोकळे व्हा!"

सोनार निघून गेल्यावर धनंजयने गोपाळला बोलवून घेतले व म्हणाला–"मला पैशांची गरज आहे, रुपये आणून दे आणि हे दागिने घेऊन जा! व्याज वगैरे देण्याची गरज नाही!" गोपाळने दागिने घेतले व हातात म्हणाला–"मी सर्व पैसे खर्च केले हो! चार दिवस थांबा, मी नक्की देतो!"

धनंजयने विचार केला पहिल्याने हा चोरीचा माल काढून टाकावा. म्हणून गोपाळ म्हणाला ते त्याने मान्य केले.

एक आठवडा गेला, धनंजय सवयीप्रमाणे वडीलधाऱ्या गावकऱ्यांबरोबर बसून बोलत होता तेव्हां गोपाळने येऊन विचारले–"मी तुमचे रुपये घेऊन आलो आहे, मी दिलेले दागिने देतां का?"

धनंजय क्षणभर बुचकळ्यात पडला. पण स्वतःला सावरून म्हणाला–"मी तुझे दागिने परत नाही का केले?"

गोपाळने आश्चर्याचे सोंग करून विचारले–"मी, आपले दागिने परत घेतले?





मी तुमच्याकडून पैसे घेतले त्याच दिवशी शहरात गेलो, आजच परतलो. दागिने पांच हजार रुपयांचे होते. ते घशाखाली उतरवायचा विचार आहे की काय? याहून जास्त अन्याय व लबाडी आणखी काय असू शकेल हो?" त्याने सर्व वडीलधाऱ्या गांवकऱ्यांकडे पहात विचारले.

तीच गावकरी मंडळी गोपाळची साक्षीदार मंडळी होती. धनंजय विचार करू लागला, गोपाळला रुपये दिले तेव्हां ही मंडळी हजर होती. म्हणून वाटले की मी रुपये दिले ते या सर्वांनी पाहिले असल्यामुळे पैसे वसूल करणे जड जाणार नाही. परंतु झाले उलटेच. ही मंडळी दागिने ठेवले त्या गोष्टीलाही साक्षीदार होतीच!

सर्व गावकऱ्यांनी धनंजयकडे "काय हो, हा म्हणतो, ते तर खरे दिसते" या अर्थी पाहिले. एकजण तर म्हणालाही–"तुम्ही तरी कसे हो वृद्ध असून असे बोलता? या मुलाने आपल्या आईचे दागिने तुमच्याकडे गहाण ठेवले होते. आम्ही सर्व होतो त्या वेळी. त्याने कर्ज फेडले नाही आणि तुम्ही म्हणतां त्या पूर्वीच तुम्ही सर्व दागिने त्याला परत दिलेत? तुमच्या बोलण्यावर कसा कोण विश्वास करील?"

धनंजय संतापला तो चिडून ओरडला–"अहो, हे सर्व दागिने चोरलेले आहेत, जमिनदार साहेबांचे आहेत. या लबाडाने चोरून आणून माझ्या घरी गहाण ठेवले. ते कळतांच मी त्याला ते बोलावून परत केले."

सर्वांनी संशयी नजरेने गोपाळकडे पाहिले. त्याच वेळी अनंतच्या वडिलांनी विचारले–"काय हो, दागिन्यांची मजुरी देणार का?"

धनंजयने चिडून जाऊन विचारले–"मी तुझ्याकडून केव्हां करवून घेतले रे?"

"अहो, रागावण्याची गरजच काय? तुम्ही दिलेले जुने दागिने नवे करून नाही का दिले? त्यांची मजुरी घरी येऊन घेऊन जा, म्हणाला होता ना? इतक्या लवकर विसरलात?" अनंतच्या बापाने विचारले.

ते ऐकून धनंजयला चक्कर आल्यासारखे झाले, त्याच बरोबर जी लबाडी झाली ती त्याच्या लक्षात आली. हे सांगावे की याच सोनाराने ते दागिने चोरलेले असल्याचे सांगून मला घाबरवून सोडले होते व म्हणून गोपाळला ते परत केले होते तर त्या गोष्टीवर कोणी विश्वास करणार नाही. लोकांना वाटेल की सोनाराची मजुरी गिळण्यासाठी मी उलटा आरोप लावीत आहे.

थोडक्यात सांगायचे म्हणजे तेथे जमलेल्या प्रत्येकाच्या मनात ही शंका घट्ट घर करून बसली की गोपाळने सर्वांसमोर जे दागिने आणून गहाण म्हणून ठेवले होते ते या गृहस्थाने सोनाराकडून वितळवून नवीन दागिने करवून घेतले आहेत. म्हणून सर्व धनंजयला म्हणाले–"आजपर्यंत आम्ही तुम्हाला एक इमानदार शेतकरी व गावातले एक प्रमुख म्हणून मानीत आलो. परंतु आम्हांला हे कधी स्वप्नातही वाटले नाही की तुम्ही लोकांशी अशी लबाडीसुद्धा करतां! तुम्ही या मुलाचे दागिने मुकाट्याने देऊन टाका कसे! ते वितळवून नवे करून देणारा सोनारसुद्धा येथेच आहे."

धनंजयला कल्पनासुद्धा नव्हती की पैशाच्या मोहाला बळी पडण्याचा परिणाम असा भयंकर होईल आणि सर्वांसमक्ष अशी मान खाली होईल! ते दागिने तरी आतां कोठून आणून देणार?

गोपाळलाच धनंजयच्या त्या करुण स्थितीची कीव आली. तो त्या वडीलधाऱ्या गांवकऱ्यांना म्हणाला–"अहो, धनंजय काकांनी इतक्याप्रेमाने जे दागिने सोनाराकडून करवून घेतले आहेत, त्यांची मला गरज नाही. मला फक्त तेवढ्या सोन्याची किंमत त्यांनी द्यावी. दागिने करणारे सोनार काका येथेच आहेत. त्यांना विचारा किती रुपयांचे सोने होते ते!".

त्यानंतर धनंजयने गोपाळला पांच हजार रुपये देऊन स्वतःला ऋणमुक्त करून घेतले.





# प्रश्नोत्तरे

**श्रीकंठ माधवराव, अल्लीपुरम्**

प्र. : वीज कां पडते ? तिची आकृती कशी असते ? तिचे परिमाण किती असता ?

उ. : आकाशातून पडणाऱ्या विजेविषयी सर्व देशांत गैरसमज होते. आपल्या पूर्वजांना वाटे की इंद्र वज्रायुधाचा प्रहार करतो तेव्हां या पृथ्वीवर विध्वंस होतो. लोकांना वाटे की वज्रायुधाचा, विजेचा व ढगाचा परस्पर काही संबंध असतो. ढग गडगडू लागले की लोकांवर वीज पडू नये यासाठी व तिच्यापासून रक्षण व्हावे यासाठी लोक आजही अर्जुनाच्या नामे असलेल्या श्लोकांचा पाठ करतात. अर्जुन हा इंद्राचा मुलगा होता ना ? तो इंद्राच्या वज्रासुरापासून रक्षण करील ! याविषयी एक दंतकथा सुद्धा सांगतात. पांडव एकचक्रपूर येथे ते ब्राह्मण मुले असल्याचे सांगून भिक्षाटन करीत त्यावेळी एकाएकी एक वीज पडली. तेव्हां अर्जुनाने चटदिशी ती आपल्या झोळीत टाकली आणि सर्वांना वांचविले होते म्हणे !

वस्तुत: ढगांचे गडगडणे व वीज चमकणे या दोन्हींचा संबंध असलेली 'वज्र' नावाची वस्तु कोणतीही नाही. ढगांमध्ये वीज चमकली तर त्यामुळे आपले काहीही नुकसान होत नाही. विजेचे चमकणे म्हणजे एक शक्तिशाली विद्युतप्रसार असतो. तो प्रसार जर पृथ्वी व ढग यांच्या मध्ये झाला तर मात्र फार मोठे नुकसान होते. या विद्युत्पातापासून रक्षण व्हावे यासाठी मोठ्या इमारतींवर "लाइटनिंग कंडक्टर्स" (विद्युत्वाहक)ची व्यवस्था करण्यात येते सामान्यपणे वीज पडते ती उंच इमारतींवर व झाडांवर पडते.

तरमग अर्जुनाच्या झोळीतली वीज ही एक कपोलकल्पित कथाच आहे का ? नाही ! आपल्याला निरभ्र आकाशात जे तारे पडतांना दिसतात ते हवेतच भस्म होऊन जाणाऱ्या उल्का आहेत. परंतु त्यात काही मोठ्या असतात त्या हवेत भस्म होऊन न जाता जमिनीवर येऊन आदळतात. त्यांच्यात प्रामुख्याने लोखंड व कोळसा असतो. त्यांचे परिमाण काही ग्रॅमपासुन तर काही टनांपर्यंत असू शकते. पृथ्वीवर कोठेकोठे 'केटर' सरोवर आहेत. ती कित्येक टन वजनाचे 'केटर' कोसळल्याने निर्मित झाले आहेत. अचानक काही भयंकर बातमी इंग्रजीत देतांना 'बोल्ट फ्रॉम दि ब्लू' (निरभ्र आकाशातून वज्रपात) अशी देण्याची रीत आहे. ते वज्र म्हणजे उल्का होय !



# अघटित अनपेक्षित

[८२]

अतिलोभी अत्यंत लोभीला म्हणाला–

"भाग्य अनुकूल असेल तर अयोग्य व्यक्तीला सुद्धा पुष्कळ फायदा होतो ही गोष्ट खरी आहे. परंतु मनुष्य पारब्धावरच विसंबून राहिला तर नशीब पाठ दाखविते. तेव्हां मात्र अपरंपार दुःख सहन करावे लागते. तुझी स्थिती पाहून मला तुझी फार कीव येते. परंतु मला आता आपल्या घरी जाणे आवश्यक आहे. मला निरोप दे."

अत्यंत लोभी म्हणाला–"असें सांगतात की माणसाचे वाईट दिवस आले की मित्र व धन त्याच्या मदतीला येतात. असे असतांना तू मला कां सोडून जातो आहेस ? लोक म्हणतात ना की आपद् ग्रस्त मित्राला निर्दयपणाने जो सोडून जातो तो कृतघ्न असतो आणि त्याला नरकवास भोगावा लागतो."

"मित्रावरचे संकट दूर करण्याची शक्ती असणाऱ्या विषयी ही गोष्ट लागू होऊ शकेल. परंतु तुला या कष्टातून सोडविणे मलाच काय, कोणत्याही माणसाला शक्य नाही. तुला सोडविण्याची शक्ती माझ्या अंगात नाही. समज, मी तुझ्याबरोबर रहायचे ठरविलेच तर कोणत्याही प्रकारे मी तुला उपकारक ठरेल असे काही करू शकणार नाही. उलट तुला दुःखी कष्टी पाहून मला दुःखी कष्टी व्हावे लागेल. तुझ्या तोंडावर दुःखाची सावली पाहून माझ्या मनाची काय स्थिती होईल, कोण जाणे ? म्हणून कृपा करून मला लवकर जायला परवानगी दे !"

तेव्हां नाइलाजाने अत्यंतलोभी म्हणाला– "बरे तर, जा घरी आणि सुखाने रहा. माझ्यावर आलेल्या आपत्तीची कल्पना



घरच्या लोकांना दे!" त्यानंतर अतिलोभी तो पर्वत प्रदेश सोडून पुन्हां मनुष्य वस्तीत रहायला निघून गेला.

### म्हाताऱ्या वाघाची गोष्ट

दक्षिणेकडील जंगलात एक म्हातारा वाघ रहात असे. एके दिवशी त्याने एका सरोवरात आंघोळ केली आणि एका हातात दर्भ व दुसऱ्या हातात एक सोन्याचे कांकण घेऊन बसला. तो त्या बाजूने जाणाऱ्या वाटसरूंना सांगू लागला–"हे सोन्याचे कांकण भेट म्हणून मी देतो, घेऊन चला."

परंतु कोणी त्याच्या बोलण्याकडे लक्ष दिले नाही व सर्व आपल्या वाटेने पुढे निघून गेले.

परंतु एका लोभी ब्राह्मणाला वाटलं की आपलं भाग्य उदयास आले. तरी त्यात थोडा धोका आहे, तेव्हां सावधपणेच राहिलं पाहिजे. *कोणत्याही वस्तूची मनात इच्छा* असेल तर मिळवितांना थोडा धोका असतोच. विष मिसळलेले अमृत सुद्धा माणसाचा जीव घेतेच. तसेच धन सहजी मिळत नाही. धोका किंवा कष्ट सहन केले तरच मिळते. धोका असूनही धाडस केल्याशिवाय धनलाभ होतो का? तो वाघ आपल्यावर उपकार करायच्या गोष्टी करतो आहे तर थोडा गंभीरपणे विचार करूनच पाऊल टाकले पाहिजे. असा विचार करून त्याने वाघाला विचारलं–"कोठे आहे रे ते कांकण?"

वाघाने आपला पंजा पुढे करून दाखवीत म्हटले–"हे पहा!"

"तुझ्यासारख्या क्रूर जनावराचा विश्वास कसा करावयाचा?" ब्राह्मणाने विचारले.

"अहो, मी आपली रडकथा सांगतो, म्हणजे तुम्हांला, मी म्हणतो ते खरे असल्याचे पटेल. ऐन तारुण्यात मी अनेक पापे केली. मी कित्येक निरुपद्रवी प्राण्यांना खाल्ले व माणसांनाही खाल्ले. परिणाम असा झाला की माझी बायको व मुले अल्पवयी मरण पावली. मी एकटा उरलो आहे. तेव्हा एका साधूने मला दानधर्म करून पुण्य संपादन करायला उपदेश केला. त्या साधूच्या सल्ल्याप्रमाणे मी दररोज स्नान करून दान करतो. मी म्हातारा झालो आहे. माझा दातांनखांतले बळ संपुष्टात आले आहे. म्हणून शंका करण्याचे तुम्हांला कारणच नाही. पुराणात लिहिलेच आहे की यज्ञ, दान, तप, वेदाध्ययन, सत्यव्रत, क्षमा, सहिष्णुता आणि त्याग या अष्टांग मार्गाने पुण्यप्राप्ती होते. यापैकी पहिले चार यांचे ओढवर फार असते. परंतु उरलेले चार थोरपुरुषांनाच साध्य असतात. माझी स्वार्थबुद्धी आता नष्ट झाली आहे. म्हणून मी आपलं सर्वस्व दान करून पुण्य संपादन करीत आहे. लोकांच्या मनांत नेहमी ही शंका असतेच की वाघ संधी साधून केव्हां खाईल हे सांगता येत नाही. मी सर्व धर्मशास्त्रांचा अभ्यास केला आहे. गरिबाला केलेले दान हे वाळवंटात राहणाऱ्यांना पावसामुळे होणाऱ्या सुखासारखे असते, उपाशी माणसाला अन्नदान केल्यासारखे! प्रत्येकाला आपला जीव प्रिय असतो. "आपणांसारिखे करिती तात्काळ" हे साधूंचे ब्रीद असते. मानवाला अनुभवानेच कळू लागते की कोणती गोष्ट ग्राह्य, कोणती चांगली व कोणती वाईट. तुम्ही तर फार गरीब दिसतां आहां. म्हणून मी हे कांकण तुम्हांला द्यावे म्हणतो. धनाचे दान निर्धनाला करावयाचे असते, सधनाला नाही. ऋषीमुनींचे असे म्हणणे आहे की निष्काम बुद्धीने केलेले दानच सर्व-



श्रेष्ठ होय! म्हणून तुम्ही स्नान करून या आणि हे दान ग्रहण करा!" वाघ म्हणाला.

त्या प्रवासी ब्राह्मणाला वाघ म्हणाला ते सर्व खरे वाटले आणि कांकण घेण्याच्या लोभाला बळी पडून स्नान करायला तलावात पाऊल टाकले. तत्क्षण तो कमरेपर्यंत चिखलांत असा रुतला की त्याला तेथून बाहेर येणे अशक्य झाले.

त्या ब्राह्मणाला चिखलात रुतलेला पाहून वाघ म्हणाला–"अरे रे रे! तू चिखलात रुतलास वाटते? भिऊ नकोस. मी तुला बाहेर काढतो थांब!" असे म्हणत वाघ जवळ गेला.

त्याला पाहून गरीब ब्राह्मण म्हणाला–"धर्मशास्त्र आणि वेदाध्ययन केले, एवढ्यावरून कोणाचा विश्वास करणे चूकच. गाईला वाटेल ते खायला घातले तरी तिचे दूध अमृतासारखे असते. तसेच कोणतेही काम करतांना त्याचा अंतरीचा भाव ओळखणे आवश्यक असते. ज्या माणसाची इंद्रिये आणि बुद्धी काबूत नसतात त्याची चांगली कामेसुद्धा हत्तीच्या गंगास्नानासारखी निरुपयोगीच असतात. आचरण न करतां केलेला परोपदेश एका अयोग्य स्त्रीच्या अंगावरच्या दागिन्यासारखा भारभूतच असतो. या क्रूर जनावरावर मी विश्वास केला, ही माझी केवढी चूक! असे सांगतात की नद्या, सशस्त्र व्यक्ती, शिंगे आणि नखे असलेली जनावरे, स्त्रीजात व राजा यांच्यावर विश्वास करू नये. कारण शेवटी ते आपल्या जातीवरच जातात. आकाशात विहार करीत, अंधःकार व पाप नष्ट करीत नक्षत्रासंगे आपल्या सहस्र किरणांनी भ्रमण करणारा चंद्रसुद्धा दुर्दैवाने राहूकेतूंचा ग्रास होतो. तेव्हां प्रारब्धात जे लिहिलेले असते, त्याच्यातून कोणाला सुटका नाही." ब्राह्मण असा विचार करीत असतां वाघाने जवळ येऊन त्याला ठार केले व खाऊन टाकले.

'विनाशकाले विपरीतबुद्धि' ही म्हण सार्थक झाली.





# भल्लूक मांत्रिक

[ २२ ]

[सामंत सूर्यभूपती किल्ल्याच्या रक्षणासाठी निघून गेला. मायावी मर्कट तटावरून उडी मारून निघून गेले. भल्लूक मांत्रिक गुरूला संकटात सापडलेला पाहून भुयाराच्या वाटेकडे निघाला. तेव्हां चांडाळ भल्लूकाने त्याला थांबविले. मांत्रिकाने चांडाळ भल्लूकाला पुन्हां चांडाळ करण्यासाठी मंत्रदंड त्याच्या डोक्याला लावला व भुयारात प्रवेश केला. पुढे–]

भल्लूक मांत्रिक निघून गेल्यावर जितकेतू कालीवर्माकडे पाहून म्हणाला–"बरं तर, या वेळी आपण काय केले पाहिजे? मी सर्वांसमक्ष सूर्यभूपतीच्या मुलीला दत्तक घेतल्याचे जाहीर केले आहे. आतां मायावी मर्कटाचा गुरू मिथ्या मिश्रच्या हातातून तिचे रक्षण करायला हवें ना? आपण ससैन्य जंगलाच्या दिशेने निघायचे का?"

"महाराज, आपण ससैन्य गेलो तर जो ओरडा होईल त्यामुळे शत्रू सावध होईल." असे सांगून कालीवर्मा तेथून निघाला.

कालीवर्माच्या पाठोपाठ राक्षस उग्रदंड आणि चांडाळ निघाला. तोपर्यंत ते सर्व बोलणे शांतपणे ऐकत बसलेला बैरागी गुरु व त्याचा शिष्य भुयाराच्या वाटेकडे बोट दाखवीत जितकेतू राजाला म्हणाला–"महाराज, आम्ही तलावाच्या बांधावरच्या



वडाशेजारी भुयाराच्या तोंडाजवळ पाहारा देत राहू. आम्हांला आज्ञा द्यावी." असे म्हणत दोघे भुयारात उतरले.

या खेपेस कालीवर्मा, चांडाळ व राक्षस उग्रदंड सुद्धा पायीच चालत जंगलात पोचले, तेव्हां त्यांना एका जागी एक मोठे अस्वल दिसले. तो थोडीशी कंदमुळे व फळे जंगली वेलांनी बांधून खांद्यावर घेऊन चालला होता.

कालीवर्मा त्याला पाहून उग्रदंडाला म्हणाला–"उग्रदंडा, काय पण विचित्र दृश्य आहे?"

"त्यात आश्चर्य करण्यासारखे काय आहे? ते अस्वल त्या दुष्ट मिथ्या मिश्र तांत्रिकाचे पाळलेले जनावर असेल. आपण गुपचुप त्याच्या पाठोपाठ गेलो तर आपल्याला त्या तांत्रिकाचा शोध लागेल." राक्षस उग्रदंड म्हणाला.

त्यानंतर तिघे त्या अस्वलाच्या पाठोपाठ काही अंतर चालत गेले, तेव्हां त्यांना एका झाडाखाली भल्लूक मांत्रिक व पांढरी दाढी असलेला एक अशक्त म्हातारा दिसला. त्याच्या गळ्यात रुद्राक्षमाळा होती. सूर्यभूपती सामंत त्यांच्याशी बोलत होता.

दुरूनच कालीवर्माला येत असलेला पाहून भल्लूक मांत्रिक उठून उभा राहिला आणि म्हणाला–"अरे माझ्या शिष्या, कालीवर्मा, हेच माझे गुरू भल्लूकपाद. सूर्यभूपतीची मुलगी कांचनलता हिला तांत्रिक मिथ्या मिश्र अपहरण करून घेऊन गेला आहे."

अस्वलावर परशूने वार करण्याच्या बेतात असलेला. शहराचा चांडाळ परशु चटदिशी आपल्या खांद्यावर ठेवून म्हणाला– "म्हणजे, हे भल्लूकपादाचे पाळलेले जनावर आहे. वाचले!"

तेव्हां भल्लूक मांत्रिक जवळ येऊन म्हणाला–"होय, आतां मला कळले की माझ्या गुरुवर्यांचे हे पाळलेले अस्वल तुम्हांला येथवर घेऊन आले. तो तांत्रिक





माझ्या गुरुवर्यांना भल्लुकेश्वरीच्या देवळा-समोरच्या झाडाला बांधून ठेवून त्यांना उपाशी मारणार होता: परंतु स्वामिभक्त अस्वलाने आपल्या धन्याला सोडवून त्याला वांचविले.

ते ऐकून वृद्ध भल्लूकपादकडे क्रुद्ध मुद्रेने पहात उग्रदंड राक्षसाने विचारले–"तर मग माझा थोरला भाऊ कालदंड कोठे आहे?"

भल्लूकपादने निर्भयपणे आपल्या गळ्या-तल्या रुद्राक्षमाळेकडे एकदा पाहिले व स्मित करून म्हणाला–"हा प्रश्न तू मला विचारण्याऐवजी त्या तांत्रिक मिथ्या मिश्रला विचार. त्याने कालदंडाला औषधी वनस्पती खायला घालून मुका केला आहे आणि मी जसा या अस्वलाचा वाहन म्हणून उपयोग करतो तसा मिथ्या मिश्र तुझ्या भावाचा उपयोग करीत आहे. जर तू त्याला या जंगलात पकडू शकलास तर तुझा भाऊ कालदंड व त्याच्या बरोबर राजकन्या कांचनलता सुद्धा तुला मिळेल. इतके साहस करणारा कोणी आहे का?"

ते ऐकताच कालीवर्माचा हात तल-वारीच्या मुठीवर गेला. तो म्हणाला– "ते साहस मी करीन. त्याच बरोबर कांचनलतेला तर मी वांचवीनच आणि त्या पाठोपाठ त्या तांत्रिकाचे आणि तुझे रक्त या तलवारीला पाजीन. मंत्रतंत्र करणाऱ्या एकाही व्यक्तीला मी या प्रदेशात जिवंत राहू देणार नाही."

तेव्हां भल्लूक मांत्रिकाने आपला मंत्रदंड उचलला आणि कालीवर्मावर वार करणार इतक्यात सामंत सूर्यभूपती म्हणाला– "कालीवर्मा, हे भल्लूकपाद व त्यांचे भल्लूक मांत्रिक आपले शत्रू नसून मित्र आहेत. ज्या सेवकाने शंख वाजवून मायावी मर्कटाला तांत्रिक गुरूकडे येण्यासाठी सूचना केली होती त्याला धरण्याच्या कामी यांनीच आम्हांला मदत केली होती. हा पहा, तो शंख आणि तो सेवक. याला मी खूप मारले



व त्रास दिला. परंतु याने आपल्या मालकाचा पत्ता सांगितला नाही. तेव्हां मी त्याला तलवारीने ठार केले."

कालीवर्माने तो शंख उचलून दूर फेंकला व म्हणाला—"राजा सूर्यभूपती! सर्वांत आधी तुमच्या मुलीचे अपहरण करणाऱ्या मिथ्या मिश्रचा वध तुम्ही करायला हवा होता. त्याच्या नोकराला मारून काय मिळाले? बरं तर असू द्या, आपण निरनिराळ्या दिशांना जाऊन त्या दुष्टाचा शोध काढला पाहिजे." असे म्हणत कालीवर्मा तेथून निघाला.

भल्लूकपाद अत्यंत प्रेमाने मान हलवीत भल्लूक मांत्रिकाला म्हणाला—"शिष्या! तू आपणां सर्वांसाठी एका योग्य साहसी तरुणाची निवड केली आहेस. येथील परिस्थिती अनुकूल नव्हती, म्हणून तो तांत्रिक आपल्या हातातून निसटला. आतां आपण सर्वांनी मिळून त्या तांत्रिकाला वाटेला लावू या. तोंपर्यंत आपल्या मनाला चैन पडणार नाही. तर मग चला."

त्यानंतर भल्लूकपाद अस्वलावर बसला. त्याच्या एकाबाजूला भल्लूक मांत्रिक आणि दुसऱ्या बाजूला राक्षस उग्रदंड, चांडाळ व सामंत सूर्यभूपती पायी चालू लागले आणि जंगलाच्या रोखाने निघाले.

कालीवर्मा पावलांच्या खुणा कोठे दिसतात का, पहात चालला होता. एका जागी त्याला माणसाच्या पावलांच्या खुणेबरोबर त्याच्या दुप्पट तिप्पट पावलांच्या खुणासुद्धा दिसल्या. तत्क्षण त्याला तांत्रिक मिथ्या मिश्र बरोबरच्या कालदंड राक्षसाची आठवण झाली.

कालीवर्मा झाडांच्या आडून त्या पावलांच्या खुणांचा मागोवा घेत निघाला. थोडे अंतर चालून गेल्यावर त्याला एक फार मोठे सरोवर आणि त्यात मिळणारा एक ओढा दिसला. त्या ओढ्याच्या काठावर एक त्रिशूल जमिनीत पुरून ठेवलेले होते. ते पाहून चकित झालेला कालीवर्मा न थांबतां पुढे निघाला. सरोवरात हृष्टपुष्ट शरीर असलेली व्यक्ती उभी राहून व डोळे मिटून मंत्राचा जप करीत होती.

तोच तांत्रिक मिथ्या मिश्र होता. ती गोष्ट कळायला कालीवर्माला वेळ लागला नाही. तो क्रुद्ध मुद्रेने त्याच्याकडे पहात म्हणाला—"काय रे, ए! तूच नाहीका तांत्रिक मिथ्या मिश्र? तांत्रिकाला मंत्रांची गरज काय? तू सूर्यभूपतीच्या मुलीला पळवून आणलेस ती कोठे आहे?"

मंत्र जपत असलेल्या मिथ्या मिश्रने चटदिशी डोळे उघडले आणि कालीवर्माकडे निरखून पहात म्हणाला—"तुला माझे नाव कसे कळले रे? तू नक्कीच हुशार असला पाहिजेस. माझा शिष्य भ्रांतिमती मला सांगत होता की माझा शंख वाजवीत नेणाऱ्या सेवकाला जंगलात कोणीतरी ठार केले. ती व्यक्ती तू तर नाहीस?"

"ते मी मागाहून सांगेन. प्रथम तू हे सांग की कांचनलतेला तू कोठे ठेवली आहेस?" असे म्हणत कालीवर्मा तलवारीचा वार करणार इतक्यात झाडाच्या फांदीवर बसलेले मायावी मर्कट 'किच किच' करीत ओरडले—"तांत्रिक गुरुवर्य! हाच तो कालीवर्मा! हा असामान्य पराक्रमी आहे. तत्क्षण याला ठार करण्यात आपले



हित आहे!" असे म्हणत ते कालीवर्मा होता तेथे उडी मारणार होते. कालीवर्माला तलवार उपसायला वेळ नव्हता. परंतु समोरच त्रिशूल होते ते घेऊन मायावी मर्कटावर वार करण्यासाठी त्याने धरले.

मायावी मर्कट त्याच वेळी फांदी वरून उडी मारून खाली येत असतां त्रिशूलावर आदळले त्यामुळे कालीवर्माच्या हातातले त्रिशूल निसटून जमिनीत रुतले गेले. त्याच बरोबर मायावी मर्कटाला ते लागले असल्या कारणाने मायावी मर्कट तडफडत ओरडले—"तांत्रिक गुरूचा जय असो! गुरुवर्यांची सेवा करण्याची



संधी मला पुन्हां पुढल्याजन्मीच मिळणार!"

त्यानंतर कालीवर्माने सावधपणे आपली तलवार उपसली व निश्चेष्ट होऊन पहात असलेल्या तांत्रिकाकडे वळून म्हणाला– "अरे फुटक्या नशिबाच्या तांत्रिका! तू ज्या भल्लुकेश्वरीची पूजा करतो आहेस तिच्या नांवानेच मी तुझा बळी देऊन तुला तिच्या चरणी मुक्ती देणार आहे. परंतु त्या पूर्वी तू कांचनलतेला कोठे लपवून ठेवले आहेस ते सांग."

ते ऐकून तांत्रिक क्रूर हास्य करून आपले दोन्ही हात पसरून व मुठी उघडीत व बंद करीत मान आजूबाजूला हलवू लागला. त्याचा तो विचित्र व्यवहार पाहून कालीवर्मा चकित झाला. त्याने सरोवरात शिरण्याचे ठरविले व सरोवरात पाऊल टाकणार इतक्यात त्याला एक किरटा आवाज ऐकू आला–"तरुणा! सावध हो! तो तांत्रिक खुणा करतो आहे, एका मुक्या राक्षसाला मदतीसाठी बोलावीत आहे!"

तो आवाज ऐकून कालीवर्माने विद्युत् वेगाने मागे वळून पाहिले. तेव्हां त्याला उग्रदंडासारखाच एक राक्षस एका तरुणीला खाली उतरवून जंगली हत्तीसारखा हुंकार करीत व आपली दगडी गदा घेऊन कालीवर्माच्या अंगावर धावला. कालीवर्मा चटदिशी त्याच्या वाटेसमोरून बाजूला सरकला. म्हणून राक्षस सरोवराच्या काठच्या चिखलात पाय घसरून तोंडघशी पाण्यात पडला. त्याच्या हातातली दगडी गदा किनाऱ्यावरच निसटून पडली.

राक्षस या वेळी आणखी जोराने गरजला. आपल्या कोपरांच्या आधारे तो उठण्याचा प्रयत्न करीत असतां कालीवर्माने त्याची दगडी गदा चटदिशी उचलली आणि त्याच्यावर प्रहार केला. राक्षस किंकाळी फोडून काठावर बेशुद्ध होऊन पडला.

मध्यंतरी मिथ्यामिश्र कोठे पळायला वाट आहे का, पाहू लागला. कालीवर्माची



त्याच्यावर दृष्टी होतीच. राक्षसाच्या खांद्यावरून उतरलेल्या तरुणीला त्याने विचारले–"तूच नाही का कांचनलता?"

त्या तरुणीने होकारार्थी मान हलविली व म्हणाली–"तांत्रिकाचे दोघे सेवक मेल्यासारखे दिसते आहे. परंतु त्याला जिवंत सोडता कामा नये. माझ्या जवळ कोणतेच हत्यार नाही. तू आपली तलवार मला दे आणि मुक्या राक्षसाची दगडी गदा तू घे. आपण दोघांनी मिळून त्या दुष्ट तांत्रिकाची शिकार करू या."

ते ऐकून कालीवर्माला आनंद झाला. त्याने आपली तलवार कांचनलतेच्या हातात दिली व राक्षसाची गदा आपल्या हातात घेऊन त्या तांत्रिकावर वार करण्यासाठी निघाला. त्याच वेळी राजा जितकेतू आपल्या दोघां सैनिकांबरोबर तेथे आला व मोठ्याने ओरडून म्हणाला–"कालीवर्मा! अरे, ह्या तलावात मगरी आहेत! तू सरोवरातून लगेच बाहेर ये. या तांत्रिकाचा वध करायला माझे सैनिक, चांडाळ आणि राक्षस उग्रदंड पाठीमागून येत आहेत. नंतर चकित होऊन चहूकडे पहात असलेल्या कांचनलतेजवळ जाऊन म्हणाला–"मुली, तूच माझी दत्तक घेतलेली मुलगी. म्हणून तुझा विवाह आपल्याला पसंत पडलेल्या



तरुणाशी करून देण्याचा अधिकार मला आहे. बरोबर म्हटले ना मी?"

ते ऐकून कांचनलता लाजेने मान खाली करून उभी राहिली. त्याच वेळी तेथे सामंत भूपतीबरोबर हत्तीवर बसून भल्लूक पाद, भल्लूक मांत्रिक, चांडाळ व राक्षस उग्रदंड आले.

सूर्यभूपती आपल्या मुलीजवळ जाऊन म्हणाला–"मुली, पुन्हा आपली भेट होईल असे मला वाटले नव्हते." नंतर कालीवर्माकडे वळून म्हणाला–"कालीवर्मा! तू एक अद्वितीय शूर व पराक्रमी आहेस! यात मला आतां मुळीच शंका उरली नाही."

त्यानंतर राजा जितकेतू हंसत कालीवर्माचा हात धरून त्याला कांचनलतेजवळ नेत म्हणाला—"मी आपली दत्तकपुत्री कांचनलतेचा विवाह या क्षत्रिय तरुणाशी करीत आहे. माझ्या मागे हाच तरुणवीर चंद्रशिला नगरीच्या गादीवर बसेल."

ते ऐकून सर्वांनी आनंदाने कालीवर्माचा जयजयकार केला. त्याच वेळी सरोवरातून एक किंकाळी ऐकू आली. एका मगरीने तांत्रिक मिथ्या मिश्रला धरलें होते आणि मिथ्या मिश्र स्वतःला सोडविण्यासाठी धडपड करीत होता. त्याला पाहून भल्लूक मांत्रिक आपला मंत्रदंड आकाशात हलवीत आनंदाने ओरडला—"भल्लूकपाद गुरुवर्य! यापुढे आपणच भल्लूकेश्वरीचे मुख्य पुजारी झालात! आपला शत्रू मगरीच्या दाढेत सापडला आहे!"

त्यानंतर ती मगर मिथ्यामिश्रला धरून पाण्यात ओढून घेऊन गेली. राक्षस उग्रदंड किनाऱ्यावर पडलेल्या आपल्या भावाकडे धावत गेला व त्याला धरून बसवीत म्हणाला—"दादा! आजपर्यंत तुला छळणारा तो तांत्रिक मगरीचा आहार झाला आहे. आतां तू ऊठ!"

राक्षस कालदंड उठून उभा राहिला. आपल्या दोन्ही हातांनी आपल्या भावाचे खांदे धरून सरोवराकडे पहात म्हणाला—"उग्रदंडा! तो तांत्रिक मेला का रे, खरोखरच? त्याने मला विषारी औषधी वनस्पती खायला घातल्या होत्या त्यामुळे मी त्याच्या नांवानेच भीत होतो आणि मुक्याचे सोंग करीत होतो. माझ्यासारख्या राक्षसाला वेशुद्ध करणारा तो शूर तरुण कोठे आहे?" असे विचारीत तो कालीवर्मा उभा होता तिकडे निघाला. जवळ जाऊन त्याने कांचनलता व कालीवर्माला उचलून आपल्या खांद्यावर बसविले.

भल्लूक मांत्रिकाबरोबर सर्वांनी आनंदाने टाळ्या वाजवून त्यांचे अभिनंदन केले.

(संपूर्ण)



# मनातले गुपित

विक्रमादित्याने आपला हट्ट सोडला नाही, तो झाडाजवळ गेला, प्रेत खांद्यावर काढून घेतले आणि नेहमीप्रमाणे मौन होऊन स्मशानाच्या दिशेने निघाला. तेव्हां प्रेतात बसलेला वेताळ त्याला म्हणाला—"राजा, तू एखादी अपूर्व शक्ती मिळावी यासाठी जर प्रयत्न करीत असशील तर मी तुझे अभिनंदनच करीन. कारण माणसाने सरळ मार्गावर चालावे यासाठी साम, दाम, दंड व भेद या चारही उपायांचा प्रयोग करावा लागतो. त्यापेक्षा अद्भुत-शक्तीचाच जास्त उपयोग होतो. त्याचे एक उदाहरण म्हणून मी तुला भीमूची गोष्ट सांगणार आहे, लक्ष देऊन ऐक." असे सांगून वेताळ गोष्ट सांगू लागला.

भीमू एक शेतकरी होता. त्याचा बाप वारल्यावर तो शेतावरची सर्व कामे करू लागला. एकदां तो एक पडीक जमीन





नांगरीत असता त्याचा नांगर एका दगडाला लागला आणि 'खणण्' असा आवाज झाला. त्याने नांगर सोडला आणि फावड्याने जमीन खणून पाहिली. तेव्हां त्याला कळले की नांगराला लागली ती लहानशी दगडी डोण होती. त्या डोणीवर एक दगडी झांकण होते. त्याने ती शिळा काढून पाहिली तर त्याला आत एक उपडे मडके ठेवलेले दिसले. त्या मडक्याच्या खाली एक विचित्र हार व त्या हारासंबंधी माहितीचा एक ताडपत्री ग्रंथ होता.

भीमूने खड्डा बुजविला आणि हार व तो ताडपत्री ग्रंथ घेऊन घरी गेला. तो ग्रंथ वाचून पाहिला त्यात त्या हारासंबंधी सविस्तर वर्णन होते. ते असे–" हा हार जो कोणी धारण करील त्याला त्याच्याशी बोलणाऱ्याच्या मनात चालू असलेले विचार कळतात. कित्येक शतकांपूर्वी दयानिधी नावाच्या एका माणसाला हा हार एका योग्याकडून मिळाला. त्या हाराचा महिमा कळल्यानंतर दयानिधीने त्याचा दुरुपयोग केला. तो काही कारण काढून श्रीमंतांकडे जाई व त्यांच्या मनातली एखाद्या दुष्ट कामाची माहिती कळतांच ती इतरांना कळवून त्या कामात विघ्न आणण्याची धमकी देई व खूप पैसे उकळी. तोच त्याचा धंदा झाला. पुढे त्याला त्याच्या बायकोवरच संशय आला व तिचे प्रेम परपुरुषावर असल्याचे कळले. त्याने तिचा खून केला आणि ताडपत्रात त्याने ताडपत्राचा कोणकोणत्या तऱ्हेने दुरुपयोग केला होता ते सर्व लिहून त्याने दुसऱ्यांना कसा त्रास दिला हे देखील लिहून ठेवले. नंतर तो हार आणि ताड पत्रांचा तो ग्रंथ त्याने त्या मडक्याखाली ठेवून देऊन खड्डा बुजवून टाकला.

भीमूला त्या हारात अशी काही अद्भुत शक्ती असेल याची कल्पना नव्हती. परंतु ते कळल्यावर त्याने विचार केला की त्या हारात अशी अद्भुत शक्ती असेल तर त्याचा सदुपयोग करून इतरांवर उपकार करणेही शक्य आहे. त्या हारातल्या शक्तीची परीक्षा



करण्याचे ठरवून त्याने तो आपल्या गळयात घातला व कृष्णराव यांच्या घरी गेला. भीमूने कृष्णरावकडून थोडे कर्ज घेतले होते. ते कर्जही फेडण्याचे त्याने त्यावेळी ठरविले होते.

कृष्णराव हे त्या गावचे जमिनदार रामराव यांचे धाकटे भाऊ. भीमू कृष्णराव यांच्या घरी पोचला तेव्हां तो आपल्या मोठ्या भावाचा खून करण्याच्या विचारात होता. ती गोष्ट भीमूला त्या हाराच्या प्रभावाने कळली. त्याने कृष्णरावांना समजावून सांगितले–" हे पहा. तुमचे वडील बंधू खरोखरच एक थोर पुरुष आहेत. त्यांचा वध करण्याचा दुष्ट विचार तुम्ही मनातून काढून टाका."

ते ऐकून कृष्णराव थक्क झाले. नंतर स्वतःला सावरून म्हणाले–"मी दादाचा खून करीन? कोणी सांगितले तुला हे?"

" कोणी सांगो किंवा न सांगो, तुम्ही तो विचार मनातून काढून टाकावा एवढेच मी सांगू शकेन. हे घ्या तुमचे रुपये!" असे म्हणत त्याने कर्जाचे पैसे व त्याचे व्याज कृष्णरावांना दिले.

त्यानंतर भीमूला कळले की कृष्णरावांनी दोन मारेकरी भावाचा खून करण्यासाठी नेमले आहेत. म्हणून त्या मारेकऱ्यांच्या वाटेवर भीमू एका झाडीत लपून बसला.



त्या मारेकऱ्यांनी भीमूला झाडीत शिरतांना पाहिले होते. म्हणून ते त्या बाजूला गेले. परंतु भीमूने एका झाडाआडून त्यांच्यावर लाठीचा हल्ला केला व त्यांना जमिनीवर पाडले. नंतर त्यांचे हातपाय बांधून ठेवून जमिनदाराला ती बातमी कळविली.

जमिनदाराच्या शिपायांनी मारेकऱ्यांना खूप बडवून काढले, तेव्हां त्यांनी कृष्णरावांनीच जमिनदाराविरुद्ध नेमल्याचे सांगितले. कृष्णराव पळून गेला. त्यानंतर भीमूने केलेल्या उपकाराची फेड म्हणून जमिनदाराने भीमूला बोलवून त्याला अत्यंत प्रेमादराने मोठे इनाम दिले.



त्यानंतर भीमूच्या त्या हाराने अनेक चांगली कामे केली. थोड्या दिवसांनी भीमूला जयलक्ष्मी नावाच्या एका तरुण मुलीच्या मनात त्याच्याशी लग्न करण्याची इच्छा असल्याचे कळले. तो तिच्या वडिलांना जाऊन भेटला व त्यांनी आनंदाने आपल्या मुलीचे लग्न भीमूशी करून दिले.

हळूहळू गावकऱ्यांना इतरांच्या मनातले गुपित ओळखण्याची शक्ती भीमूत असल्याचे कळले. त्याला दरोडेखोरांच्या मनातले गुपित एकदां कळले व त्याने राजाला ती बातमी देऊन ज्या जागी चोरी होणार होती त्या जागी शिपाई नेमविले आणि चोर पकडले गेले.

त्यानंतर भीमूचे नाव ऐकताच लोक भिऊ लागले. आपल्या मनात काही दुष्ट विचार आला तर भीमू ओळखील ही भीती प्रत्येकाला वाटू लागली. चोर, दरोडेखोर व इतर गुन्हेगार कोणी त्याच्या समोर जायला भिऊ लागले. त्याचा खून करून टाकण्याचा विचार करावा तर तो आधीच ओळखून त्यांना राजाकडून योग्य शिक्षा करवील ही भीती त्यांना वाटे.

भीमूत ही अद्‌भुत शक्ती एका हारामुळे आली आहे, ही गोष्ट कोणालाही माहीत नव्हती. भीमूच्या या अद्‌भुत गुणाची माहिती मोठमोठ्या श्रीमंतांना व अधिकाऱ्यांना सुद्धा कळली. ते त्याला बोलवून त्यांचे शत्रू कोण व मित्र कोण हे विचारू लागले.

त्याने विचार केला की आपण आपल्या शक्तीच्या सहाय्याने लोकांवर जसे उपकार करू शकतो तसाच या कामात कधी कधी भयंकर धोका येण्याचीही शक्यता आहे. उच्च पदावर राहणारे लोक आपसात चढाओढ लावून राज्यव्यवस्थेत विघ्न आणतील. तेव्हां कोणाच्या मनातली गोष्ट कोणाला सांगणेच चुकीचे होईल.

तेव्हांपासून भीमू कोणाच्या मनातले गुपित त्याला कळले तरी ते मनातच ठेवी व खोटे काहीतरी सांगून वेळ मारून नेई. मंत्री, सामंत, सेनापती, दरबारी विद्वान,







पुरोहित व वैद्य सर्वांनी आग्रह करून राजाकडे शिफारस केली व भीमूला दरबारी करवून घेतले. प्रत्येकजण त्यांच्या विषयी राजाच्या मनात काय आहे विचारू लागला. राजाला भीमूच्या अद्‌भुत शक्तीची ओळख झालीच होती.

एकदां राजाने भीमूला विचारले– "काय रे, सांग पाहू, या वेळी माझ्या मनात काय आहे?"

तो म्हणाला–"महाराज, आपण यावेळी असा विचार करीत आहां की आपल्या मनात जे काही चालू आहे, ते मला कळणे शक्य नाही."

त्यानंतर आणखी काही दिवसांनी राजाने भीमूला बोलवून विचारले–"मी तुला आतां कशाला बोलाविले, हेच सांग पाहू!"

"महाराज, आपल्या मनात, राणी सरकारांच्या विषयी काही विचारावयाचे आहे!" भीमू उत्तरला.

"शाबास, तर मग, मी देतो ते पत्र राणीसरकारांना नेऊन दे आणि त्यांच्या मनात माझ्या पत्राचा काय परिणाम झाला तो ओळखून गुप्तपणे एकांतात मला येऊन सांग." राजाने त्याला आज्ञा केली.

भीमूने ते पत्र राणीसरकारांना नेऊन दिले. राणी म्हणाली–"महाराजांना जाऊन सांग की आपली सूचना मला मान्य आहे."

त्या पत्रात महाराजांनी त्या दिवशी संध्याकाळी गायन वादनाची बैठक ठेवायची का विचारले होते.

भीमूला राणीच्या मनातले आणखी एक गुपित कळले. तिचे राजावर खरे प्रेम नसून एका परपुरुषावर आहे.

तरी भीमूने खोटे सांगितले. म्हणाला– "राणी सरकार पतिव्रता आहेत. त्यांच्याविषयी आपल्या मनांत जो संशय आहे तो योग्य नाही." ते ऐकून राजाला परमानंद झाला. त्याने आपला कंठहार काढून भीमूला बक्षिस दिला.

त्याच दिवशी रात्री भीमूने त्याचा अद्‌भुत शक्ती असलेला हार जाळून

टाकला. तो हार विचित्र तऱ्हेने जळून धुराबरोबर नाहीसा झाला. त्याची राखसुद्धा राहिली नाही.

त्याच दिवशी रात्री भीमू सकुटुंब परदेशात निघून गेला. त्याला थोरा मोठ्यांकडून जे धन मिळाले होते त्याच्या कुटुंबाच्या उदरनिर्वाहाला पुरेसे होते.

येथवर गोष्ट सांगून वेताळाने विचारले—"राजा, इतकी अद्भुत शक्ती असलेला हार भीमूने जाळून कां टाकला? त्याच्या सहाय्याने त्याला स्वतःला तर फायदा झालाच, इतरांना सुद्धा फायदा झाला होता! त्याचे गुपित त्याच्याशिवाय इतर कोणालाही माहीत नव्हते. अशा स्थितीत सर्वकाळ हार गळ्यात घालून तो राहिला असता तर त्यात काय बिघडणार होते? या शंकाचे समाधानकारक उत्तर माहीत असून तू दिले नाहीस, तर परिणाम तुला माहीतच आहे, तुझ्या डोक्याची शंभर शकले होऊन तुझ्याच पायावर लोळू लागतील."

तेव्हां विक्रमादित्य म्हणाला—"कोणत्याही अद्भुत शक्तीचा दुरुपयोग बलवान व्यक्तीलाच करता येतो, दुर्बळी व्यक्ती त्या शक्तीच्या भीतीने अपराध करणे सोडून देईल कदाचित्, परंतु मनातला दुष्टपणा मात्र सोडीत नाही. भीमूजवळच्या शक्तीमुळे दुर्बळ लोक भीत होते आणि असे वाटू लागले होते की तिच्यामुळे लोकांचा फायदाच होतो आहे. परंतु त्या शक्तीमुळे बलवानांच्या बाबतीत भीमूला त्रासच झाला. तो मनाचा दुर्बळ होता, म्हणून तो आपल्या अद्भुत शक्तीचा प्रयोग इतरांचे हित करून देण्यासाठी करू शकला नाही. तो स्वतः चांगला सत्शीलच होता. अशा व्यक्तीला वाईट मार्गाने जाणे कठीण असते. म्हणून त्याने हार नष्ट करून त्याच्यामुळे होणाऱ्या त्रासापासून स्वतःची सोडवणूक करून घेतली."

अशातऱ्हेने मौनभंग होताच वेताळ प्रेतासह नाहीसा झाला आणि झाडाला जाऊन लोंबकळू लागला. (कल्पित)





# वाटण्या

मीनाक्षी आपल्या दोघां भावांच्या पाठीवर जन्मली. म्हणून दोघे भाऊ तिचे सर्व लाड पुरवीत. तिचे लग्नाचे वय झाले तेव्हां दोघां भावांनी योग्य स्थळाचा शोध सुरू केला. सुदैवाने त्यांना रामपूरच्या विश्वनाथरावांचे स्थळ योग्य वाटले. तिचे लग्न करून दोघां भावांनी आपापली लग्ने करून घेतली व संसार थाटला.

विश्वनाथराव स्वभावाने फार सुशील व्यक्ती होते. त्यांच्यात काही दोष दाखविण्यासारखे नव्हतेच. ते मुख्य करून व्यापार करीत. जमीन जुमलापण त्यांच्याकडे खूप होता. सासरी मीनाक्षीला कोणत्याही गोष्टीची उणीव नव्हती. परंतु तिच्या मोठ्या जावेच्या हातात घरातले सर्व व्यवहार होते. ते तिला सहन होत नव्हते. तिची जाऊ तिच्याशी चांगलीच वागे, परंतु मीनाक्षीला घरातला व्यवहार तिच्या अधिकारात हवा होता.

मीनाक्षीने ती गोष्ट कधी पतीजवळ उघडपणे सांगितली नाही. विश्वनाथरावांना सर्व कळत होते, परंतु ते त्यांना काही माहीत नसल्यासारखेच दर्शवीत. शेवटी मीनाक्षीला बोलावेच लागले. म्हणाली—"ऐकलं का, आपण निराळं राहू लागलो तर बरं होईल, नाही का?"

विश्वनाथरावांना ऐकून थोडे आश्चर्य वाटले. नंतर म्हणाले—"मला थोडा विचार करू दे."

त्यानंतर विश्वनाथरावांनी त्या विषयावर मौनच धारण केले. मीनाक्षीमात्र कित्येक दिवस वाट पहात राहिली.

मध्यंतरी विश्वनाथरावांना धंद्यांच्या कामाने सोनपूरला जावे लागले. पतीला मीनाक्षी म्हणाली—"म्हटलं, सोनपूरच्या

कु. सुशीला स नाईक

वाटेवर अण्णाला आणि तात्याला भेटून याल का ?"

विश्वनाथरावांनी होकार दिला. परतल्यावर मीनाक्षीने विचारले–"जाऊन आलात का अण्णाकडे ?" तेव्हां विश्वनाथराव म्हणाले–"हो गेलो होतो तर! तुझे दोघे भाऊ मजेत आहेत. परंतु तुझ्या दोघी वहिनी, त्या मात्र भांडत असलेल्या दिसल्या !"

"ते कां ?" मीनाक्षीने विचारले.

"दोघी तुझ्या भावांना वांटण्या करून घ्यायला सांगत आहेत. तुझ्या दोघां भावांना ते नको आहे. त्यांनी मलाच त्याविषयी सल्ला विचारला." विश्वनाथराव म्हणाले.

"तुम्ही काय सल्ला दिला ?" मीनाक्षीने विचारले.

"त्यांचे दोघींचे पटत नसेल तर वांटण्या करून घेणेच बरं नव्हे का? असेच मी सांगितले. आणखी काय सांगणार ?" विश्वनाथराव म्हणाले.

"वा रे वा! हा सल्ला दिलात? हा काही सल्ला झाला ?" मीनाक्षी बोलून गेली. कारण भावांनी वांटण्या करून घेणे तिला मुळीच मान्य नव्हते. आपला राग दर्शविण्यासाठी ती उठून निघून गेली.

त्यानंतर आणखी काही दिवसांनी मीनाक्षीने पतीला वांटण्या करून घ्यायची आठवण करून देत विचारले–"मग तुम्ही काय ठरविलेत ?"

"ठरवायचे काय? तुझ्या सल्लाप्रमाणे मला करावयाचे नाही." विश्वनाथराव म्हणाले.

"कां ?" मीनाक्षीने विचारले.

"कारण, तुझा विचार काय विचार झाला ?" विश्वनाथराव म्हणाले.

"माझा विचार तुम्हांला अविचार वाटला वाटतं ?" मीनाक्षीने विचारले.

"जर मी तुझ्या भावांना दिलेला सल्ला तुला अविचार वाटला, तर तू तोच अविचार करू लागली आहेस, असं नाही का झालं ?" विश्वनाथरावांनी उलट प्रश्न केला.

मीनाक्षीला तोंडात बसल्यासारखं झालं. तिने पुन्हां तो विषय कधी काढलाच नाही.





# पळालेला चोर

बाहेरच्या दाराची कडी वाजलेली ऐकताच रमाने सैपाकघरातून धावत येऊन दार उघडले. तोंपर्यंत चांगला काळोख पडला होता.

बाहेरचा माणूस तिला ढकलून आत शिरला आणि त्याने चटदिशी दार बंद करून घेतले व करड्या आवाजात म्हणाला–"ओरडलीस तर गळा दाबून टाकीन! खबरदार! मी तुरुंगातून पळून आलो आहे."

रस्त्यावर कोणी चारजण पळत असल्याचा आवाज ऐकू आला. ते चोराला पकडण्यासाठी त्याच्या पाठीमागून धावत पळत येत होते.

त्यांना दूर जाऊन दिल्यावर रमाने हसत त्याला विचारले–"तुरुंगात आनंदाने रहायचे सोडून तू कोणते सुख मिळेल म्हणून बाहेर पळून आलास रे ?"

"ते तू विचारायची गरज नाही. घरात आणखी कोण आहे ?" चोराने विचारले रागावूनच.

"तुला भ्यायचे मुळीच कारण नाही. मी एकटीच आहे. सैपाक अर्धा झाला आहे. सैपाकघरात येतोस का ?" असे म्हणत ती पुढे निघाली.

चोर तिच्या पाठोपाठ सैपाकघरात गेला. तिने पाट मांडला त्यावर बसला.

रमा वांगी चिरीत डोळ्यांतून पाणी काढीत होती. पदराने तिने डोळे पुसले.

"मी तुला काही केले नाही आणि तू, मग हे डोळ्यातून पाणी कां काढते आहेस?" चोराने तिला विचारले.

रमा म्हणाली–"तुला पाहून मला माझा दादा आठवला. रागाच्या भरात त्याने कोणाला तरी मारले आणि तुरुंगात जाऊन पडला आहे. परंतु तुझ्याच सारखा एकदां



रात्री पळून आला. परंतु आला त्या क्षणापासून त्याच्या मनाला शांति अशी कधीच मिळाली नाही. घरातून बाहेर निघायची छाती नाही, बाहेर रस्त्यावर चालण्याचा आवाज झाला की त्याला वाटे पोलीस शिपाई आले की काय? वेड लागल्यासारखा करू लागला. जर तो पूर्ण शिक्षा भोगून आला असता तर त्याला ही धास्ती वाटली नसती. निर्भयपणे त्याला नवीन जीवन जगता आले असते.

"मी तसे त्याला सांगितले सुद्धा. परंतु त्याने माझे ऐकले नाही. दहा दिवस घरातच अज्ञातवास भोगला. दहाव्या दिवशी अचानक पोलीस शिपाई आले. घाबरून जाऊन तो गच्चीवर गेला आणि उडी मारून पळून जायच्या प्रयत्नात हातपाय मोडून घेतले आणि दोन दिवसात कायमचे डोळे मिटले."

"सैपाक तयार आहे. जेवून घेतास का?" रमाने विचारले. चोराला जेवून घ्यावेसे वाटले, परंतु त्याच्या मनात नाना तऱ्हेच्या शंका येऊ लागल्या.

"यात काही विषबीश असेलसे वाटते आहे का तुला? तुझ्याच समोर तर सैपाक केला मी." असे म्हणत रमाने समोर पत्रावळ ठेवली आणि चोराला वाढले.

चोर जेऊ लागला. रमाने विचारले—"तू दिसायला बऱ्या घराण्यातला दिसतो आहेस, मग तुरुंगात कसा काय गेलास?"

चोर बोलू लागला—"मला माझ्या आईवडिलांविषयी काहीच माहीत नाही. एका म्हाताऱ्या बाईने मला वाढवून लहानाचे मोठे केले. माझे लाड पुरविण्यासाठी तिने अनेक त्रास सहन केले. ती वारल्यावरच माझ्या नशिबाने पाठ फिरविली. मी शिकलेला नाही. आमच्या गावात काम करून मिळविण्यालायक काम नव्हते. म्हणून शहरात आलो. मला कोणी काम द्यायला तयार होईना. चार दिवस उपाशीच होतो. शेवटी असह्य झाले. तेव्हा एका व्यापाऱ्याची पैशाची पिशवी घेऊन पसार झालो.





परंतु मला शिपायांनी पकडले आणि दोन महिन्यांची शिक्षा झाली."

"पण तू आतां तुरुंगातून पळून कां आलास?" रमाने विचारले.

"तुरुंगात वाटेल ती कामे करावी लागतात. कपडे धुवा, चटई विणा, मागावर बसा, शिवण काम करा, वगैरे वगैरे. ही सर्व कामे मला नाही आवडत." चोर म्हणाला.

रमाने हंसत विचारले—"तुला तुरुंगाबाहेर काम मिळत नव्हतं, म्हणून तू चोरी करून तुरुंगात गेलास. तेथे कामे फार म्हणून बाहेर पळून आलास! तरमग आतां काय करण्याचा विचार आहे?"

चोर काय उत्तर देणार? तो मान खाली करून गप्प बसून राहिला. तेव्हां रमाने पुन्हां विचारले—"या घटकेपासून तुला ज्या यातना भोगाव्या लागतील, त्या नरकयातने सारख्याच असतील. तुला जेवायला सुचायचे नाही की झोप लागायची नाही. पोलीस शिपायांची धास्ती तुझा पिच्छा पुरवील. तू खाणार काय आणि जगणार कसा? तुला कोण काय देणार? तुरुंगात तुला निश्चितपणे दोन वेळ खायला तरी मिळत होते. तुरुंगातून पळून आल्यामुळे दोन महिन्यांऐवजी आयुष्यभर शिक्षा भोगत राहिल्यासारखे होईल तुला! तुरुंगात राहून कपडे शिवायला, बागेत काम करायला किंवा आणखी असेच एखादे काम शिकून घेतले असतेच तर तुरुंगातून सुटल्यावर तुला पोटापाण्याची तरी काळजी राहिली नसती. तुरुंगात तुला खायला घालून कामधंदा शिकवीत होते. परंतु तू तर आता पळून आला आहेस, ही फार मोठी चूक केलीस."

ते सर्व ऐकल्यावर चोरालासुद्धा त्याची चूक झाल्यासारखेच वाटले. तो शांतपणे म्हणाला—"चूक तर झालीच, पण ही चूक सुधारायची कशी?"

"अजून फार उशीर झालेला नाही. तुला चुकीची दुरुस्ती करता येईल. तू

स्वतःच तुरुंगाच्या दारासमोर जाऊन उभा रहा. कदाचित तुला जास्त शिक्षा किंवा दंड होणार नाही. थोडी झालीच तर शिक्षा भोगलीच पाहिजे. परंतु काम शिकून घ्यायला संधी मिळेल." रमाने त्याला समजावून सांगितले.

चोराला तो सल्ला ऐकून हलकेसे वाटले. म्हणाला—"तू सख्ख्या बहिणीसारखा मला सल्ला दिला आहेस. तुझे हे ऋण मी केव्हां फेडू शकेन नकळे. तर मग मी निघालो." असे म्हणत चोर निघाला.

चोर निघून गेल्यावर पुन्हां दरवाज्याची कडी वाजली. परंतु या खेपेस आलेली व्यक्ती म्हणजे रमाचे वडीलच होते.

रमाने चकित होऊन विचारले—"बाबा, आज तुम्हांला घरी यायला इतका उशीर कां झाला? आतापर्यंत इतका उशीर कधीच झाला नव्हता."

"तुरुंगातून एक चोर पळून गेला आहे, म्हणून थोडा उशीर झाला." वडील म्हणाले. ते जेलरच होते.

रमा म्हणाली—"बाबा, तुरुंगात कैद्यांना जशी विचित्र वागणूक मिळते, त्यामुळे हे सर्व होते. तुरुंग म्हणजे गुन्हेगाराला फक्त शिक्षा भोगण्यासाठी कोंडवाडा नाही. त्यांच्या मनात बदल झाला पाहिजे व गुन्हा करण्याची इच्छा किंवा गरज त्यांना राहतां कामा नये. तुमच्या तुरुंगातून पळालेला चोर आपल्या घरी आला होता. मी त्याच्या मनांत बसलेल्या चोराला पळविले. त्यासाठी मी एका भावाची कल्पना केली होती." असे सांगून रमाने घडलेले वृत्त वडिलांना थोडक्यात सांगितले.

"शाबास मुली! तू एका तुरुंगाच्या अधिकाऱ्याची मुलगीच तर आहेस! मी जाऊन पाहून येतो, तो परत आला की नाही!" असे म्हणत रमाचे वडील निघालेच.

"बाबा, मी सांगितले ना, की तुम्ही काळजी करण्याचे कारण नाही! त्याच्या मनातला चोर पळून गेला आहे. तुम्ही जेवून खाऊन स्वस्थपणे जा." असे सांगून रमाने वडिलांना जेवायला वाढले.





# परशुराम

[ २ ]

परशुरामाने कार्तवीर्य वगैरे क्षत्रियांचा वध करून नर्मदा नदीत स्नान केले. नंतर कैलास पर्वतावर जाऊन शंकराचे दर्शन करण्याच्या हेतूने गेला तेव्हां तेथे गणपती पाहारा देत होता. त्याने परशुरामाला पुढे जाऊ दिले नाही. काही वेळ दोघांमध्ये वादविवाद झाला आणि शेवटी दोघांमध्ये मुष्टियुद्ध सुरू झाले. गणपतीने आपल्या सोंडेने परशुरामाला उचलतांच परशुरामाला स्वर्गातले सप्तलोक दिसू लागले. परशुरामाने आपल्या परशूने गणपतीचा एक दांत तोडला.

दारात ही मारामारी चालू असतां त्याचा आवाज ऐकून शंकरपार्वती बाहेर आली. गणपतीचा एक दांत भंग झालेला त्यांना दिसला. पार्वतीला भयंकर राग आला. ती म्हणाली—"आपण अनुग्रह करून ज्याच्यावर इतके उपकार केले तो आपल्याच विरुद्ध उलटला काय?"

शंकराला काय करावे सुचले नाही. त्याला कृष्णाचे स्मरण झाले. कृष्णाने येऊन पार्वतीला समजावून सांगितले. म्हणाला—"परशुराम सुद्धा तुला मुलासारखाच तर आहे! त्याला क्षमा कर!"

परशुरामाने पार्वतीची क्षमा मागितली.

नंतर परशुराम तेथून आपल्या घरी परत आला. त्याने क्षत्रियांचा जो संहार केला होता, तो वडिलांजवळ निवेदन केला. ते ऐकून जमदग्नीने परशुरामाला त्या पापाचे प्रायःश्चित्त करण्यासाठी महेंद्र-पर्वतावर तपश्चर्या करायला सांगितले.

परशुरामाने पित्याच्या सांगण्याप्रमाणे काही काळ तपश्चर्या केली. परंतु त्याला एक शोकवार्ता कळली. ती अशी की

कार्तवीर्याच्या एका मुलाने जमदग्नीचा वध केला आणि त्याच्या आईने पतीबरोबर सहगमन केले.

परशुरामाला भयंकर राग आला. त्याने जगातल्या सर्व क्षत्रियांचा वध करून त्याच्या रक्ताने पित्याला तर्पण करीन, अशी घोर प्रतिज्ञा केली. त्याने कार्तवीर्याच्या उरलेल्या मुलांना ठार केले आणि जो क्षत्रिय दिसला त्याचा वध केला. तो तेवढ्यावर थांबला नाही. त्याने कार्तवीर्याची राजधानी जाळून भस्म केली. तेव्हां त्याच्या मनाचे थोडे समाधान झाले.

सर्व हैहय वंशाचा सर्वनाश केल्यावर व क्षत्रियांचा संहार केल्यानंतर परशुरामात थोडा बदल झाला. तो तपोवनात जाऊन तपश्चर्या करू लागला. तेथे विश्वामित्राचा नातू परावसू त्याला येऊन भेटला व परशुरामाची थट्टा करीत म्हणाला–"कायरे, क्षत्रियांना भिऊन येथे दडून बसला आहेस वाटते?"

परशुरामाला अशा तऱ्हेने चिथवून तो थांबला नाही. त्याने परशुरामाच्या क्षत्रियसंहाराच्या वेळी जे वृद्ध व मुले वगळले गेले होते त्यांना त्याने परशुरामाशी युद्ध करायला प्रोत्साहन दिले. म्हणून परशुराम पुन्हा क्षत्रिय संहार करण्याचे ठरवून युद्ध करायला आला व त्याने एकवीस वेळा क्षत्रिय संहार केला.

तरी सर्व क्षत्रियांचा वध झाला नाही. काही क्षत्रिय बायकांमध्ये किंवा गुरांच्या कळपात लपून राहिले. त्यांना मुले झाली व ती वाढली. परशुरामाने त्यांना ओळखून त्यांचा देखील वध केला. आणि एकवीस वेळा क्षत्रिय संहार करीन अशी जी प्रतिज्ञा केली होती ती पूर्ण केली.

त्याने क्षत्रियांचा संहार करून त्यांच्या रक्ताने कुरुक्षेत्र येथे पांच तलाव भरले. त्या सरोवरांनाच स्यमंतक पंचक असे नाव पडले.

परशुराम पितरांचे स्मरण करून तर्पण करीत असता पितर त्याला म्हणाले–"बाळा रे, तुला अद्याप शापमुक्ती पूर्णपणे लाभली नाही. म्हणून यज्ञ कर." तो महेंद्रनगरी परतला व मुनींच्या सल्ल्याप्रमाणे त्याने अश्वमेध यज्ञ आरंभिला. त्यावेळी यज्ञ पहायला आलेले मुनी त्याला म्हणाले–"अरे, गोकर्णक्षेत्र समुद्रात बुडू लागले आहे. त्याचे रक्षण करणे आवश्यक आहे."

"मी पित्याच्या आज्ञेप्रमाणे यज्ञ सुरू केला आहे व त्यासाठी यज्ञदीक्षा घेतली आहे. तेव्हां मला शस्त्र कसे धरतां येईल?"

"आयुध धारण करायला काही हरकत नाही." असे शुष्क नावाचे मुनी म्हणाले.

तेव्हां परशुराम मुनींची इच्छा पूर्ण करण्यासाठी गोकर्ण क्षेत्रानजीक समुद्र किनाऱ्यावर आला व त्याने समुद्र मागे सरकावा यासाठी वरुणाला आह्वान केले. परंतु वरुण आला नाही. परशुरामाने पुन्हां एकदां आवाहन करून पाहिले व तो न





आलेला पाहून आग्नेयास्त्र धनुष्यावर चढविले. त्या बरोबर अग्निज्वाळा दिसू लागल्या.

समुद्र घाबरून गेला व परशुरामाला हात जोडून शरण जात म्हणाला–"मी किती मागे जाऊ, हे सांगावे!"

परशुरामाने हातातली आचमन करण्याची पळी दूर फेंकली ती दोन योजने जाऊन पडली. समुद्र तितका दूर मागे सरकला.

परशुराम महेंद्र नगरी रहात असतां एकदां कर्ण तो ब्राह्मण असल्याचे सांगून परशुरामाकडे आला व ब्रह्मास्त्र देण्यास विनंती केली. परशुरामाने तो ब्राह्मण असल्याचे समजून त्याला ब्रह्मास्त्राचा मंत्रोपदेश केला.

एकदां परशुराम कर्णाच्या मांडीवर डोके ठेवून झोपला असतां एक किडा कर्णाची मांडी कुरतडू लागला. त्यामुळे जखम झाली व रक्त वाहू लागले. तरी मांडी हलविली तर परशुरामाची झोप मोडेल व त्याला राग येईल असे समजून कर्ण मांडीची जखम असह्य झाली होती तरी सहन करून तसाच मांडी घालून बसून राहिला.

परंतु रक्त वाहू लागले व परशुरामाची झोप मोडलीच.

परशुरामाने उठून कर्णाला विचारले–"काय रे, इतकी मोठी जखम झाली तरी ती सहन करून तू बसून राहिलास, म्हणजे तू नक्कीच ब्राह्मण नाहीस, हेच सिद्ध होते. तू मंत्र घेण्यासाठी माझ्या जवळ खोटे बोललास." असे म्हणत परशुरामाने कर्णाला शाप केला की मी तुला दिलेल्या अस्त्रांचा तुला वापर करतां येणार नाही."

क्षत्रियांचा संहार करून आणि त्यांची राज्ये अपहरण केल्यानंतर परशुरामाने जिंकलेली सर्व राज्ये कश्यपाला दान करून टाकली. कश्यपाने परशुरामाला आपल्या राज्यातून निघून जायला आज्ञा केली.

परशुराम दक्षिणेकडील सागर पार करून निघून गेला. (संपूर्ण)





## प्राचीन काळापासून इतिहासाकडे

भारतीय सभ्यता केव्हां सुरु झाली? या प्राचीन भूमीवर निवास करणारे प्रारंभीचे मानव कोण होते? या प्रश्नांची निश्चित अशी उत्तरे मिळणे शक्य नाही. अनेक सभ्यता प्रळयात गडप झाल्या याची प्रतीती मिळते.

फार प्राचीन काळी ऋषीमुनींनी रचलेल्या वेदांवरून आपली एक प्राचीन सभ्यता व संस्कृती होती; देव, ज्ञान, जन्ममरण, अमरत्व यासारख्या प्रश्नांवर शोध व अन्वेषण चालू होते हे कळते.





हरप्पा व मोहेंजोदारोसारख्या प्रदेशात मोठमोठया नगरांचे अवशेष व मनुष्य-वस्तीची घरेदारे यांचे अवशिष्ट यांचा शोध लागला आहे. ते पांच हजार वर्षांपूर्वीचे आहेत हे कळते. जगात कोठेही त्या काळातल्या नगरांचे अवशेष प्राप्त झालेले नाहीत.



एके काळी भारतीयांनी धाडसी वृत्तीने दर्यापार प्रवास केला होता. त्यांनी दूर-दूरच्या देशापर्यंत आपला व्यापार वाढविला होता व संस्कृती पोचविली होती. सभ्यतेच्या प्रारंभ काळी भारतीयांनी दक्षिण अमेरिकेपर्यंत प्रयाण केले होते असे काही विद्वानांचे मत आहे.

अत्यंत प्राचीन सभ्य प्रदेशांपैकी मेसापोटेमिया या प्रदेशात भारताची नाणी आणि मोहेंजोदारोत मेसापोटेमियातील नाणी उपलब्ध झाली आहेत. त्यावरून दोन्ही देशांमध्ये आयात निर्यात होत होता हे स्पष्ट होते.





भारतीय वैज्ञानिक अनेक देशांत जाऊन तेथील वैज्ञानिकांत सामील झाले एक भारतीय इ स. पूर्वी पांचव्या शतकात. थोर ग्रीक तत्ववेत्ते साक्रेटीस याला भेटल्याचे आपल्याला कळते.



भारतात अनेक आध्यात्मिक व धार्मिक पंथ निघाले. वेद व उपनिषदांची रचना करणाऱ्या ऋषी मुनींनंतर इ. स. पूर्वी सहाव्या शतकात जैनमताचा संस्थापक महावीर याचा अवतार झाला.

गौतमबुद्धसुद्धा सहाव्या शतकातच अवतरला. मोक्षमार्गाचे अन्वेषण करण्यासाठी त्याने सर्व राज्यसुखाचा त्याग केला व तपश्चर्या करून सत्याचा शोध लावला.





पुराणात आपल्या अनेक राजांची माहिती मिळते. इतिहासकाळात नंदवंशाची स्थापना करणारा महापद्म नंद इ. स. पूर्वी चवथ्या शतकात कलिंग देशापासून पंजाबपर्यंतच्या एका विस्तीर्ण प्रदेशावर राज्य करीत होता, हे आपल्याला कळते

राजांच्या राज्याऐवजी प्रजेने निवडून दिलेल्या समितींच्या द्वारा राज्य-व्यवस्था असलेली राज्येसुद्धा होती, त्यांना गणतंत्र राज्ये म्हणत. प्राचीन भारतात अनेक निरनिराळी राज्ये होती. परंतु सांस्कृतिक ऐक्य होते.





भारताची जी ख्याती पसरली त्यामुळे इतर देशांतील राजांची नजर भारता-कडे आकर्षिली गेली. भारतावर सर्वांत प्रथम स्वारी केली ती इराण देशाचा राजा सायरस याने.

त्यानंतर दोन शतकांनंतर ग्रीस देशाचा अॅलेक्झॉण्डर इराण देश जिंकून भार-तात प्रवेश करण्याची स्वप्ने पाहू लागला. कारण त्या देशाच्या अगदी थोड्याशा भूभागावर अधिकार मिळ-विल्याबद्दल इराण देशाला गर्व होत होता.





# अर्धी किमत

रंगनाथ एक सामान्य शेतकरी होता. त्याची दोन एकर जमीन होती व जुने दोन मजली घरही होते. त्याच्या मुलीचे वय लग्नाचे झाले होते. म्हणून मुलगी सुस्थळी पडावी ही त्याची इच्छा होती. फार श्रीमंत नाही तर बऱ्या सुखवस्तु घरात मुलगी पडावी असे त्याला साहजिकच वाटे.

नशिबाने एक चांगले स्थळ आले. परंतु मुलाच्या बापाने तीन हजार रुपये हुंडा मागितला. रंगनाथाला ते स्थळ हातचे जाऊ द्यायचे नव्हते. म्हणून शेत गहाण ठेवून कर्ज काढायचे त्याने ठरविले. त्याने अनेकांना भेटून कर्ज मागितले, परंतु शेत तसे फार सुपीक नव्हते. म्हणून कोणी कर्जाऊ रकम द्यायला तयार होईना.

त्या गावातल्या लखूशेटला ती गोष्ट कळली. तो कवडीचुंबक वाणी होता. त्याने विचार केला की कोणी रंगनाथचे शेत गहाण ठेवून घ्यायला तयार नाही तर विकत घ्यायला कोण तयार होणार? आपण त्याला विचारून पहावे, स्वस्तात शेत आपल्या नावी करून घेता येईल.

लखूशेट म्हणाला ते ऐकून रंगनाथाला आनंद झाला. लखूशेटने अर्ध्या किमतीला शेत विकत घ्यायचे मान्य केले. त्याने असे वचन दिले की रंगनाथाला शेत परत हवे असेल तर किमत आणून देऊन अर्ध्या किमतीला शेत परत घ्यावे. रंगनाथाला त्यांत लखूशेटची काही लबाडी असावी असे वाटले. म्हणून विचार करून उत्तर द्यायचे त्याने मान्य केले.

त्यानंतर रंगनाथ रामजी पाटलाकडे गेला आणि लखूशेटने जे काही सांगितले होते ते पाटलाला सांगितले. रामजी पाटलाने लखूशेटला चांगला धडा शिकवायचे ठरविले.

पाटलाने रंगनाथला समजावून काही गोष्टी सांगितल्या. म्हणाला–"हे पहा, रंगनाथ, तुझ्या शेताची किंमत कमीत कमी आठ हजार असेल. ते शेत चार हजार रुपयात गळी उतरवायचा लखूशेटचा विचार दिसतो आहे. तू मुलीचे लग्न झाल्यानंतर चार हजार रुपये जमवून शेत परत विकत घेऊ शकशील असे वाटत नाही. म्हणून तू मी सांगतो तसे केलेस तर मुलीचे लग्नही होईल व लखूशेटला एक कायमचा धडाही मिळेल." नंतर पाटलाने रंगनाथला सर्व समजावून सांगितले.

दुसऱ्या दिवशी रंगनाथ आपल्या घराच्या ओसरीत बसला असतां तेथे लखूशेट आला. नेमका त्याच वेळी रामजी पाटीलही तेथे येऊन पोचले. लखूशेट म्हणाला–"पाटील, तुम्ही कसे ऐन वेळेवर आलात. आणखी कोणाची साक्ष शोधायची गरजच नाही."

रामजी पाटील सुद्धां ओसरीत सरकून बसले व विचारू लागले–"काय, ऐकू तर द्या, काय ते!"

रंगनाथ म्हणाला–"पाटीलसाहेब तसं काही विशेष नाही. लखूशेट माझे शेत अर्ध्या किमतीला विकत घेत आहेत. ते असेही म्हणाले की मला त्याची गरज भासली की अर्धी किंमत देऊन ते पुन्हां आपल्या नावी करून घ्यावे. मला आतां पैशाची गरज आहे. म्हणून मी शेताऐवजी आपले घरच लखूशेटना विकावे म्हणतो. घराची किंमत सहज वीस हजार रुपये होईल. लखूशेट, बरोबर आहे ना?"

घराची गोष्ट ऐकून लखूशेटच्या तोंडाला पाणीच सुटले. रंगनाथ दहा वेळ पुनर्जन्म घेऊन आला तरी त्याला दहा हजार उभे करून घर परत घेणे शक्य होणार नाही. तेव्हां वीस हजार रुपयांचे घर दहा हजार रुपयाला मिळत असेल तर हा सौदा पटवून घ्यायला काहीच हरकत नाही.

त्यानंतर रंगनाथाने आपले घर अर्ध्या किमतीला, म्हणजे दहा हजाराला लखूशेटला विकायचे आणि अर्ध्या किमतीला पुन्हां परत हवे असेल तेव्हां परत विकत घ्यायचे मान्य केले. पाटलाने खरेदी खत लिहून तयार केले. त्यावर प्रमुख वडीलधाऱ्या चारपांच जणांच्या स्वाक्षऱ्या झाल्या. नंतर लखूशेटने सर्वांसमक्ष दहा हजार रुपये रंगनाथाला दिले. पाटलाने आपली सही व शिक्कामोर्तब करून खरेदीखत आपल्याकडे ठेवून घेतले.

त्यानंतर रंगनाथने आपल्या मुलीचे लग्न ठरवून नातेवाइकांना व मित्रमंडळींना लग्नाची आमंत्रणे पाठविली. मुहूर्त जवळ आला तेव्हां लखूशेट सहा जणांना बरोबर घेऊन आला आणि रंगनाथशी भांडू लागला. म्हणाला–"तू हे घर मला विकलेस, आतां तू या घरात मुलीचे लग्न कसे काय करणार रे? पाहिजे तर माझे पैसे परत दे आणि घराचा ताबा घे."

रंगनाथाला कल्पना होतीच की असे काही होणार. त्याने समोर पाटील बसले





होते त्याच्याकडे, 'काय म्हणता' या अर्थी पाहिले. पाटलाने, त्यांनी 'सांगितल्या-प्रमाणे' या अर्थी डोळ्याने सहेतुक पाहिले.

तेव्हां रंगनाथ घरात गेला आणि पांच हजार रुपये लखूशेटला देत म्हणाला–"हे घ्या तुमचे पैसे, मी अटीप्रमाणे हे घर तुमच्याकडून परत घेत आहे. आतां हे घर माझे झाले. तुम्ही पाहुणे म्हणून आलां आहां, वरवधूंवर अक्षता टाकून आशीर्वाद द्या आणि जेवून चला."

ते ऐकून लखूशेट म्हणाला–"काय रे, रंगनाथ! तू ही काय थट्टा चालविली आहेस? हे तर पांच हजार आहेत, आणखी पांच हजार काढ. काय पाटील, आपणच काय ते समजावून सांगा, याला."

"मी काय बोलणार आणि काय समजावून सांगणार? तुलाच समजावून सांगावे लागणार आहे. तू खरेदीखतात जे लिहून दिले आहेस त्या प्रमाणे रंगनाथाने किमत दिली आहे!" आपल्या खिशातून खरेदीखत काढून पाटलाने दाखविले.

"खरेदीखताप्रमाणे हे कसे काय झाले हो? सांगा पाहू तुम्हीच!" लखूशेटने पाटलांनाच विचारले.

"लखूशेट ऐका तर! रंगनाथने आपले वीस हजार किमतीचे घर तुम्हांला अर्ध्या किमतीला, म्हणजे दहा हजाराला विकले. म्हणजे तुम्ही दहा हजार रुपयांना ते विकत घेतले. त्याची अर्धी किमत अटीप्रमाणे देऊन रंगनाथ त्या घराचा ताबा घेणार आहे. त्यात अटी बाहेर काय आहे? आज त्या घराची किमत दहा हजार आहे. त्याची अर्धी किमत रंगनाथने तुम्हांला दिली. तेव्हां त्या विरुद्ध तुम्हांला बोलायला जागाच उरत नाही. आतां या घरावर तुमचा अधिकार राहिला नाही!" पाटील म्हणाला.

लखूशेट रंगनाथचे घर स्वस्तात गळी उतरविण्याच्या प्रयत्नात होता. परंतु परिणाम उलटाच झाला. त्यानंतर लखूशेटने असली लबाडी पुन्हां पुढे कधी केली नाही. त्याची चांगली खोड मोडली.



# विश्वास

इमाम बुखारी नावाची एक घरंदाज व्यक्ती एका गलबतातून प्रवासाला निघाली. गलबताचा मालक व प्रवाश्यांपकी अनेक जण त्याला चांगले ओळखत होते. काही प्रवाश्यांनी त्याला भेटून त्याच्याशी ओळख करून घेतली. त्यांपैकी एकाने इमाम बुखारीजवळ एक हजार दीनार असल्याचे पाहिले आणि ते कसे उडवायचे याविषयी विचार करू लागला. चोरी केली तर पकडले जाऊ या भीतीने तो गप्प राहिला.

परंतु बराच विचार केल्यावर त्याला एक युक्ती सुचली. त्याने गलबताच्या मालकाकडे तक्रार नोंदविली की त्याचे एक हजार दीनार नाहीसे झाले आहेत, जरूर कोणीतरी चोरून घेतले असणार. म्हणून गलबताच्या मालकाने सर्व प्रवाश्यांची झडती घेतली. फक्त इमाम बुखारीची झडती घेतली नव्हती.

म्हणून त्या लबाड प्रवाश्याने मालकाला एकांतात भेटून इमाम बुखारीची झडती घ्यायला सांगितले. परंतु मालकाने त्याची झडती घेण्याची गरज नसल्याचे साफ सांगून टाकले. परंतु स्वतः इमाम बुखारीनेच झडती देऊन कोणाच्या मनात शंका असेल तर दूर करण्यास सांगितले. झडती घेतली गेली, परंतु त्याच्याकडे एकही दीनार मिळाला नाही.

लबाड प्रवाश्याला राहवले नाही. त्याने येऊन विचारले–"तुमच्या जवळचे एक हजार दीनार कोठे गेले हो?"

"समुद्रात टाकून दिले. कारण ते माझ्याजवळ सापडले असते तर कोणी कधी माझ्यावर विश्वास केला असता का? मी पैशापेक्षा विश्वासाला जास्त महत्व देतो." इमाम बुखारी म्हणाला.













# भुते थक्क झाली

दोघां लहान भुतांना एकदा वाटले की काही दिवस मनुष्यवस्तीत राहून पहावे. दोघं मानवरूप घेऊन एका गावी आली. गावाच्या वेशीवरच त्यांना एक शेतकरी भेटला.

भुतांनी त्या शेतकऱ्याला विचारले– "काय हो, आम्हांला काही काम मिळेल का? आम्ही इमानेइतबारे तुमची चाकरी करू." वास्तविक त्या दोघांच्या मनात त्या शेतकऱ्याच्या घरात शिरून त्याला पुष्कळ त्रास द्यायचा विचार होता.

शेतकऱ्याने त्यांना विचारले–"काम आहे, तुम्ही कराल की नाही, ते तुम्हीच ठरवा. माझे बैल कोणी चोरून पळवून नेले आहेत. नव्या बैलांच्या किमती वाढल्या आहेत. म्हणून नांगराला मी माणसांनाच जुंपतो. तुम्ही ते काम करायला तयार आहां का? त्यानंतर तक्रार चालायची नाही."

"माणसांना कोणी नांगराला जुंपतात का?" भुतांनी चकित होऊन विचारले.

"त्यात आश्चर्य करण्यासारखे काय आहे? बैलांपेक्षां माणसंच हल्ली स्वस्त आहेत. मी आतांपर्यंत दोन नांगरांना माणसंच जुंपली आहेत. तुम्हांला मान्य असेल तर मी तिसऱ्या नांगराची व्यवस्था करीन." शेतकरी म्हणाला.

भुतांनी शेतात जाऊन पाहिले. दोनदोन जण दोन नांगर ओढीत होते. त्यांना पाहून भुतांना त्यांची कीव आली. परंतु कष्ट किती होतात हे प्रत्यक्ष पाहून घेण्याच्या हेतूने भुतांनी आपल्याला तिसऱ्या नांगराला जुंपवून घेतले आणि काही वेळ नांगर ओढण्याचे काम केले. थोड्याच वेळाने त्यांना ते काम किती कष्टाचे आहे, कळले. म्हणजे हा शेतकरी फारच क्रूर दिसतो आहे. भुतांनी मानव देह धारण केला होता, म्हणून त्यांना फार दमल्यासारखे झाले आणि शेतकऱ्याने जी मजुरी दिली ती कष्टाच्या मानाने फारच थोडी होती.

त्यानंतर भुते तेथून गेली आणि एका तेल्याकडे त्यांनी काम मागितले. तेली त्यांना एका काळोख्या खोलीत घेऊन गेला व म्हणाला–"मी तुम्हांला ही जी फळे दिली आहेत, त्यांचे दिवसभर तेल काढावे लागेल."

"परंतु हे तेल कशाला हो? ही तर विषारी फळे आहेत?" भुतांनी विचारले.

तुम्हांला हेसुद्धा माहीत नाही का रे? हे तेल गोडे तेलात मिसळावयाचे असते!" तेली म्हणाला.

"परंतु त्यामुळे लोकांचा जीव धोक्यात येईल त्याचे काय?" भुतांनी विचारले.

"शुद्ध तेल किती महाग पडते? लोकांना स्वस्त तेल हवं असतं. भिसळीचं तेल स्वस्त विकतां येते. या स्वस्त तेलामुळे लोकांच्या तब्येती बिघडत असतील तर त्याला मी काय करणार? पैसे मिळाल्याशी माझा संबंध. इतर गोष्टींची फिकीर करीत बसण्यात काय अर्थ आहे?" तेली म्हणाला.

तेव्हां भुतांना कळले की स्वस्त मिळणारे तेल विकत घेऊन गरीब लोक आपला जीव स्वतःच धोक्यात ढकलीत आहेत. त्यामुळे निरनिराळे आजार पसरत आहेत. त्यानंतर भुते म्हणाली–"आम्ही हे काम करणार नाही!"

"अस्सं! म्हणजे, माझ्या व्यापाराचं गुपित कळल्यावर तुम्ही जिवंत पळून जाऊ


















शकाल असं वाटलं वाटतं तुम्हांला?" तेल्याने धमकीच दिली.

"अस्सं!" असे हसत म्हणत ती भुते नाहीशी झाली.

त्यानंतर ती भुते त्या देशाच्या राजाकडे गेली. त्यावेळी राजा आपल्या सेनापतीवर आग पाखडीत होता–"शेतकरी शेतसारा द्यायला तयार नसतील तर त्यांना तुरुंगात टाकून त्यांना बडवून काढा. त्यांच्या घरात शिरून शेतसारा वसूल करा."

दोघं भुतं शिपायांचे रूप घेऊन तेथे प्रगट झाली. त्यांना आपलेच शिपाई समजून सेनापती म्हणाला–"तुम्ही राजाज्ञा ऐकलीत ना? जा तर आतां!"

भुते तेथून निघणार तितक्यात राजा म्हणाला–"राजनर्तकीचे नृत्य पहायची वेळ झाली." आणि निघून गेला.

त्यानंतर भुते कित्येक जागी गेली. परंतु ती फार कोठेही राहू शकली नाहीत. शेवटी निराश होऊन ती आपल्या समाजात परत गेली.

तेव्हां एका वडीलधाऱ्या भुताने त्यांना विचारले–"तुम्ही इतक्या लौकर कां परतलात? मला वाटले होते की बरेच दिवस तुम्ही परत येणार नाही. झालं तरी काय?"

"तसं विशेष आश्चर्य करण्यासारखं काही नाही. आम्हांला आढळून आलं की मानवजातीतले लोक जास्त करून गरीब व भोळे आहेत. आमच्या आधीच काही भुते त्यांच्या समाजात गेली आहेत व मानवरूप धारण करून गरीब भाबड्या लोकांना त्रास देत आहेत. म्हणून आमच्या सारख्या लहान भुतांचा खटपाळपणा पोरकटपणाच ठरला असता. म्हणून आम्ही परतलो." भुते म्हणाली.

ते ऐकून स्मित करून ते वडीलधारे भूत म्हणाले–"अरे वेड्यांनो माणसांना त्रास देणारी ती भुतें नाहीत. माणसंच आहेत ती. तुम्हांला ते कळलं नाही!"

ते ऐकून दोन्ही भुते थक्क झाली, म्हणजे माणसात भुतांनाही लाजविणारी माणसे आहेत म्हणावयाची!



# मूळ पैंज

मंगल आणि सुमन नावाचे दोघे जण राजाकडे गेले व राजाला म्हणाले–"महाराज, आपणच काय तो निवाडा करावा!" दोघात एक पैंज लागली होती. सुमनने पैंजेची रक्कम शंभर सांगितली तर मंगलने दोनशे. परंतु त्यात मंगल हारला आणि त्याने दोनशे ऐवजी दोन नाणीच दिली. राजाने विचारल्यावर मंगल म्हणाला–"महाराज, सुमनने शंभर सांगितले तर मी रागाने दोनशे म्हणालो. परंतु मी दोनशे नाणी नव्हते म्हटले. माझ्याजवळ दहा नाणीसुद्धा नाहींत. मग मी दोनशे नाण्यांची पैंज कशी काय लावीन? माझ्या म्हणण्याचा अर्थ होता, दोनशे कवड्या!"

ते ऐकून राजा मंगलच्या हुशारीवर खूष झाला व त्याने सुमनला दोनशे नाणी दिली आणि मंगलला आपल्या दरबारी नोकरी दिली. दुसऱ्या दिवशी दोघे पुन्हां न्याय मागायला राजाकडे गेले. त्यांची तक्रार होती की त्यांनी आदल्या दिवशी पैंज लावून थोडे पैसे मिळविले होते ते मंगलच्या हुशारीमुळे मिळाले होते. परंतु मंगल ती रक्कम पुरी घेत नसून अर्धीअर्धी वाटून घ्यावी म्हणतो आहे.

दोघे भांडत असल्याचे मूळ कारण राजाने ओळखले. तेव्हां सुमनच्या प्रामाणिकपणावर खूष होऊन राजाने त्यालासुद्धा नोकरी दिली व विचारले–"तुम्ही पैंज लावली होती ती कशासाठी?" दोघे म्हणाले–"आम्ही पहिली पैंज लावली होती मंगलला दरबारात नोकरी मिळणार यासाठी आणि दुसरी सुमनलासुद्धा तो नोकरी मिळवून देईल यासाठी."





फार जुनी गोष्ट आहे, रामानंद नावाचे एक स्वामी भगवद्गीतेवर प्रवचन करीत. काही उदाहरणे देऊन प्रत्येक श्लोकाचा अर्थ स्पष्ट करूनही सांगत. स्वामीजींच्या प्रवचनाला जी भक्तमंडळी येत ती स्वामीजींना सोन्याची आभूषणे वगैरे अनेक भेटवस्तू आणून देत. श्रोत्यांकडून जी मिळकत होई ती खर्च करून धर्मशाळा बांधायचा आणि गोरगरीबांना मदत करण्याचा विचार रामानंद स्वामींच्या मनात होता. म्हणून ते गांवोगांव हिंडून फंड वसूल करू लागले. रामानंद स्वामींच्या बरोबर त्यांचा एक शिष्याआदित्यही नेहमी रहात असे.

एकदां गुरुशिष्य कोणत्यातरी गावी जात होते. तेव्हां आदित्यने गुरूला विचारले—"गुरुवर्य! महाभारत युद्धात वास्तविक खरा पराक्रमी अर्जुनच होता व जय मिळवून द्यायला कारण खरोखरी तोच होता नाही का? श्रीकृष्ण तर फक्त सल्ला देण्याचे काम करीत असे! तरी महाभारत युद्ध जिंकण्याचे श्रेय कृष्णाला कसे काय मिळाले? शिवाय कृष्णाने अनेक वेळां कूटनीतीनेच काम केले. त्याने अर्जुनाकरवी व भीमाकरवी अनेक अधर्म युद्ध करविली होती. म्हणून कृष्णाची थोरवी गाणाऱ्या भगवद्गीता व पुराण इत्यादिकांविषयीचा आदर माझ्या मनात कमी झाला आहे."

आपल्या शिष्याच्या मनावर झालेला तो विचित्र परिणाम पाहून रामानंद स्वामींना थोडे हंसू आले व ते म्हणाले—"तुझ्या शंकेचे समाधान यथावेळी आपोआप होईल."

त्यानंतर चालत असतां वाटेत एक जंगल लागले. स्वामींनी आदित्याला झाडावर चढून एक दांडके होईल अशी सरळ फांदी तोडून आणायला सांगितली. आदित्यने तशी एक सरळ फांदी तोडून त्याची काठी तयार करून आणली.

त्यानंतर ते त्या जंगलातून जात असतां एकाएकी झाडीतून एक चोर येऊन समोर उभा राहिला. त्याने बंदुकीचा नेम धरून धमकावले—"तुम्ही मुकाट्याने जवळ असेल ते धन व सोनेवगैरे समोर ठेवा. नाहीतर गोळीने ठार करीन."

त्या अनपेक्षित घटनेमुळे आदित्य तर गोंधळून गेला व कांपऱ्या आवाजात म्हणाला—"गुरुवर्य! आपल्या जवळची ती पैशाची पिशवी याला देऊन टाका."

आतां चोराला खात्री झाली की या लोकांच्या जवळ पुष्कळ पैसे आहेत. त्याला आणखीच जोर चढला.

तेव्हां रामानंद स्वामी चोराला म्हणाले—"बाबा रे, माझ्या जवळ जे धन आहे, ते गोरगरिबांना मदत करण्यासाठी जमविलेले आहे. तें तू आमच्याकडून मागून घेणे रास्त नाही."

चोराला तेवढा धीर नव्हता. त्याने रामानंदांच्या हातातली पैशाची पिशवी हिसकावून घेतली व म्हणाला—"मी सुद्धा जन्मापासून गरीबच आहे, समजलं का? तुमच्या जवळचे धन घ्यायला मला अधिकार आहे." असे म्हणत तो पैशाची पिशवी घेऊन जाऊ लागला.

रामानंद दुःखी होऊन म्हणाले—"ऐक रे, बाबा! मी सर्व आयुष्यभर मेहनत करून गरिबांसाठी जे धन एकत्र



केले ते असे सहजी कोणी घेतलेले पाहून मला आयुष्याचा कंटाळा आला आहे. तेव्हां तू बंदुकीने मला ठार करून टाक."

रामानंद म्हणाले ते ऐकून चोर खदखदां हसत म्हणाला—"अहो, ही बंदूक लाकडाची नकली बंदूक आहे!"

तेव्हां रामानंद म्हणाले—"माझी शंका खरी ठरली तर. आदित्य, अरे पाहतोस काय? फोड टाळके त्याचे!"

गुरुवर्यांच्या तोंडातून शब्द बाहेर पडतांच आदित्याली वीरश्री चढली. त्याने चोराला काठीने बडवून काढले. नंतर चोराला एका झाडाला बांधून ठेवले व पैशाची पिशवी परत मिळविली.

त्यानंतर गुरुशिष्य पुढल्या प्रवासाला निघाले. वाटेत रामानंद शिष्याला म्हणाले—"आदित्य! कळलं, महाभारत युद्धात वीरश्री अर्जुनाचीच होती, परंतु युक्ती कृष्णाचीच होती. तूच चोराला बडवलेस. परंतु चोर भेटल्यास काय करायचे, हे प्रथमच ओळखून मी तुला एक काठी तयार करून घ्यायला सांगितले. आणि त्याचा उपयोग केव्हां करायचा हे सुद्धां मीच सांगितले. चोराच्या हातातली बंदूक लाकडी आहे हे देखील मी ओळखले. कारण तो सहजी या हातातून त्या हातात लाकडी काठीसारखा तिला हलवीत होता. ती गोष्ट चोराच्याच तोंडून मी वदविण्यासाठी बंदुकीने मला ठार करायला त्याला सांगितले. त्या आधी मी त्याला हे धन गरिबांसाठी असल्याचे सांगून त्याचं मन वळविण्याचा यत्न करून पाहिला होता. परंतु त्याने ऐकलेच नाही तेव्हां दांडक्याचा प्रयोग करावा लागला. एका चोरावर जय मिळविण्यासाठी इतकी तंत्रे संभाळावी लागली तर कृष्णाला शंभर कौरवांना आणि त्यांना मदत करणाऱ्या शेकडों वीरांना जिंकण्यासाठी किती तंत्रे करावी लागली असतील?

तेव्हां कोठे आदित्याच्या डोक्यात ज्ञानाचा प्रकाश पडला.





# देवी भागवत

सूर्यवंशात श्रीरामाच्या एक युगपूर्वी त्रिशंकू नावाचा एक राजा झाला. त्याने अनेक वर्षे राज्य केले. विश्वामित्राने त्याला सशरीर स्वर्गप्राप्ती करून देण्याचे वचन दिले होते. परंतु विश्वामित्र त्रिशंकूला सशरीर स्वर्गप्राप्ती करून देऊ शकले नाहीत. तेव्हां त्यांनी एका त्रिशंकू स्वर्गाचीच सृष्टी केली.

या त्रिशंकू राजाला हरिश्चंद्र नावाचा मुलगा होता. त्याला अनेक वर्षे काही मूलबाळ नव्हते. तेव्हां त्याने अनेक नवस करून वरुण देवाला प्रसन्न केले व वचन दिले की त्याला मुलगा झाला तर वरुण देवासाठी यज्ञ करून नरबली देईन. काही दिवसांनी त्याची राणी गरोदर झाली आणि तिला एक मुलगा झाला. हरिश्चंद्राने ब्राह्मणांना स्वर्णदान व गोदान केले.

त्यावेळी वरुणसुद्धा ब्राह्मण रूपे आला व दान स्वीकार करून म्हणाला—"तू आपल्या पुत्राचा बली मला देण्याचे वचन दिले होतेस. त्या वचनाचे पालन कर."

"महात्मन्, माझी राणी प्रसूत होऊन एक महिनासुद्धा झाला नाही. मुलाचे बारसे वगैरेसुद्धा झाले नाही. तेव्हां तोपर्यंत थांबावे." हरिश्चंद्राने विनंती केली.

वरुण हरिश्चंद्र म्हणाला ते मान्य करून एका महिन्यानंतर आला. हरिश्चंद्राने योग्य अतिथि सत्कार करून विचारले—"महात्मन्, आज्ञा करावी, कोणत्या कामासाठी आलां आहां आपण?"



वरुणाने येण्याचे कारण सांगितले.

"अजून हे मूल किती लहान आहे. यज्ञपशू होण्यालायक नाही. म्हणूंन याचा उपनयन संस्कार होऊन जाऊ द्या. तोपर्यंत थांबावे." हरिश्चंद्राने विनंती केली.

वरुणाला राग आला. म्हणाला–"तू मुलावरच्या प्रेमामुळे टाळाटाळ करतो आहेस. तुझ्या मनात काय आहे, हे मला कळत नाही, असे वाटले का तुला? तरी तू म्हणतोस ते मान्य करून परत जातो आहे. तुझ्या मुलाचा उपनयन संस्कार झाल्यावर येईन. त्यावेळी तू आपले वचन मोडलेस तर मात्र मी तुला शाप देईन."

त्यानंतर हरिश्चंद्राने मुलाचे नाव लोहिताक्ष ठेवले आणि त्याला विद्याभ्यास करण्यासाठी गुरुची नेमणूक केली. त्या मुलाला काही दिवसांनी कळले की त्याला बलिपशू करणार आहेत. म्हणून तो घरातून पळून गेला आणि एका गुहेत जाऊन राहू लागला. कारण त्याला वाटत होते की त्याला दीर्घ आयुष्य लिहिलेले आहे.

त्याच सुमारास वरुणाने येऊन नरमेध यज्ञाची आठवण करून दिली. हरिश्चंद्र हताश होऊन म्हणाला–"महात्मन्, मी तरी काय करू? माझा मुलगा घरातून पळून गेला आहे!"

"तू माझी फसवणूक केली आहेस! म्हणून तुला मी शाप देतो की तुला जलोदर होईल!" वरुणाने तो शाप दिला.

शाप मिळाल्याने हरिश्चंद्र दुःखी होताच, मुलगा नाहीसा झाल्याने तो जास्तच काळजीत पडला. अशा परिस्थितीत गुप्तपणे एका गुहेत राहणाऱ्या लोहिताक्षाला एका प्रवाश्याने पाहिले आणि म्हणाला–"तुझे बाबा तिकडे काळजीत पडले आहेत आणि तू निश्चितपणे येथे राहतो आहेस. आम्ही असल्या मुलाला नाही पाहिले बुवा!"

तो प्रवासी म्हणाला ते ऐकून लोहिताक्षाला फार वाईट वाटले व तो वडिलांना भेटायला निघाला. बरोबर त्याच वेळी



इंद्र एका ब्राह्मण रूपे आला आणि लोहिताक्षाला म्हणाला–"तू आपल्या वडिलाकडे यावेळी जाऊन, व्यर्थ संकटात पडशील. मी सांगतो ते ऐक. तुझ्यावडिलांनी त्या आजारातून बरे व्हायचे म्हणजे तुझा बली द्यावा लागेल. तुझ्या बाबांनी वरुणाला तसेच वचन दिले होते." ते ऐकून लोहिताक्ष वडिलाकडे गेला नाही.

असे अनेक वेळा झाले. वडील आजारी असल्याचे ऐकून लोहिताक्ष घरी निघे आणि इंद्र त्याला भेटून त्याला परत फिरवी.

एकदा हरिश्चंद्र आपले कुळगुरु वसिष्ठ यांना म्हणाला–"गुरुवर्य, मी जलोदराने आजारी आहे. मला आयुष्याचा वीट आला आहे. काहीतरी करून या यातनेतून सोडवा."

वसिष्ठ म्हणाले–"याला एकच मार्ग आहे. तो म्हणजे पुत्राचा नरबली देणे. पुत्र तेरा प्रकारचे असतात. त्यात क्रीतपुत्र म्हणजे विकत घेतलेला मुलगा. म्हणून तू कोणाच्या तरी मुलाला विकत घे. त्याला बलिपशू करून यज्ञ कर! तू या रोगांतून बरा होऊन बाहेर पडशील."

ते कळल्यावर हरिश्चंद्राने आपल्या मंत्र्यांना बोलाविले व म्हणाला–"कोणी ब्राह्मण आपल्या मुलाला विकायला तयार असेल तर तो मागेल तितके पैसे देऊन



त्याला संतुष्ट करा व त्याच्या मुलाला खरेदी करून घेऊन या."

मंत्र्यांनी अनेक गावे फिरून पाहिली. शेवटी त्यांना अजीगर्त नावाच्या एका गरीब ब्राह्मणाने शुनश्शेव नावाच्या आपल्या मधल्या मुलाला विकण्याचे मान्य केले. त्याने जी किंमत मागितली ती त्यांनी दिली.

नरबली करितां एक तरुण मुलगा मिळालेला पाहून हरिश्चंद्राला आनंद झाला. त्याने यज्ञासाठी लागणारी सर्व सामुग्री एकत्र केली. ऋत्विकांची नेमणूक करून यज्ञ सुरू केला. शुनश्शेवला यज्ञस्तंभाला बांधण्यात आले. तो मोठमोठ्याने ओरडून रडू लागला. तेव्हां विश्वामित्रांना दया



आली. त्यांनी हरिश्चंद्राला या शब्दांत समजावून सांगितले–"राजा, या ब्राह्मण बालकाचा वध कां करतो आहेस? याला सोडून दे. प्राचीन काळी तुझ्या पूर्वजांनी इतरांसाठी स्वतःचे प्राण वेचले होते आणि आतां तू स्वतःचा जीव वांचविण्यासाठी एका अबोध मुलाचा वध करणार आहेस? मी तुला या आजारांतून मुक्त करतो. तू या मुलाला सोड."

परंतु हरिश्चंद्र शुनश्शेवला सोडायला तयार होईना. म्हणून विश्वामित्राने वरुण देवाला प्रसन्न करण्यासाठी शुनश्शेवला एका मंत्राचा उपदेश केला. शुनश्शेवने मंत्राचा जप सुरू केला. वरुण प्रसन्न झाला. त्याने त्या बालकाला सोडविले आणि हरिश्चंद्राला जलोदराच्या आजारातून मुक्त केले.

अशातऱ्हेने शुनश्शेवला वांचविण्याच्या कामी विश्वामित्राने फार मदत केली. परंतु हरिश्चंद्राने त्यांच्या विनंतीला मान दिला नव्हता. ती गोष्ट विश्वामित्र विसरला नव्हता.

एके दिवशी हरिश्चंद्र कौशिकी नदीच्या काठी शिकार करीत एका डुकराचा पाठलाग करीत असतां विश्वामित्राने एका गरीब ब्राह्मणाच्या रूपे प्रगट होऊन हरिश्चंद्राला फसविले आणि त्याचे राज्यच नव्हे तर सर्वस्व दान करवून घेतले.

त्यानंतर वसिष्ठ विश्वामित्राला भेटून त्याला खूप रागावून म्हणाला–"तू केवढे मोठे पाप केले आहेस? माझे यजमान हरिश्चंद्र महाराज. त्यांना फसवून तू त्यांना रानोमाळ हिंडायला लावलेस! तपस्वी मुनीत तू अगदी खालच्या प्रतीचा आहेस. तुझे तप म्हणजे बकध्यान आहे. म्हणून तू करकोचा हो!"

तेव्हां विश्वामित्राने क्रुद्ध होऊन वसिष्ठाला उलट शाप दिला–"ठीक, तरमग मी जोंपर्यंत करकोचा राहीन तितके दिवस तू बगळा राहशील!"

त्या दिवसापासून दोघे पक्षीरूपे मानस सरोवराच्या किनाऱ्यावर राहून परस्परांशी



भांडत राहिले आणि परस्परांना क्षतविक्षत करीत राहिले. दोघे थोर महर्षी होते तरी त्यांच्या मनात भयंकर अहंकार होता.

अशा तऱ्हेने परस्परांना शाप देऊन दोघे परस्परांशी भांडत असलेले ब्रह्मदेवाला पाहवले नाहीं. त्याने दोघांना शापमुक्त केले आणि त्यांच्या आश्रमात पाठवून दिले.

या घटनेनंतर वसिष्ठाने निमीला शाप दिला आणि त्याचा शाप मिळविला. ती कथा अशी–इक्ष्वाकूचा मुलगा निमी एक थोर धर्मात्मा व सच्चरित्र पुरुष होता. त्याने ब्राह्मणांसाठी गौतम ऋषींच्या आश्रमा–शेजारी सर्व सुखसोयी असलेले जयंतपूर नावाचे नगर बसविले.

त्यानंतर काही दिवसांनी निमीच्या मनात दीर्घकाळ यज्ञ करण्याची इच्छा उत्पन्न झाली. त्याने वडिलांच्या अनुमतीने आणि महामुनींच्या सल्ल्याने यज्ञसामुग्री जमविली. नंतर भृगु, अंगीरस, गौतम, पुलस्त्य, ऋचीक व पुलहसारख्या यज्ञकर्मांची माहिती असलेल्या तज्ज्ञांना निमंत्रित करून कुलगुरु वसिष्ठांजवळ निवेदन केले–"गुरुवर्य, मी महादेवीसाठी पांच हजार वर्षे चालू राहील असा एक महायज्ञ करण्याचे ठरविले आहे. त्यासाठी आवश्यक सर्व यज्ञसामुग्री जमविली आहे. म्हणून आपण माझ्या हस्ते हा यज्ञ करविण्याची कृपा करावी."



तेव्हां वसिष्ठ ऋषी म्हणाले–"इंद्राने हाच यज्ञ जगदंबेला प्रसन्न करण्यासाठी माझ्या हस्ते आरंभ करण्याचे ठरविले. तो यज्ञ पांचशे वर्षांत संपेल. तो पूर्ण झाल्यावर मी हा यज्ञ तुझ्या हस्ते करवीन. तोपर्यंत राजा, तू थांबावेस!"

"गुरुवर्य! मी सर्व मुनींना यज्ञाला बोलाविले आहे, यज्ञसामुग्री जमविली आहे. आपण आमच्या सूर्यवंशीयांचे गुरु आहां, असे असतांना आपण या महायज्ञाच्या शुभसमयी अन्यत्र कोठे जाणे रास्त होणार नाही. आपण धनलोभाला बळी पडून माझ्याशी असा अन्याय करणे बरोबर होणार नाही." निमी वसिष्ठाला म्हणाला.



तरी वसिष्ठ ऋषींनी निमीच्या बोलण्याकडे दुर्लक्ष केले आणि इंद्राच्या यज्ञाचे पौरोहित्य करायला निघून गेले. म्हणून निमीने गौतम ऋषींना ऋत्विज नेमले व महादेवीसाठी यज्ञ आरंभिला. यज्ञ यशस्वी झाला. निमी राजाने सर्व ब्राह्मणांना मुक्तहस्ताने दक्षिणा देऊन खूष केले.

तिकडे वसिष्ठांनी इंद्राकडे यज्ञाचे पौरोहित्य केले. तेथील यज्ञ संपल्यावर मोठी थोरली दक्षिणा घेऊन यज्ञदीक्षा घेऊन यज्ञ करीत बसलेल्या निमीला भेटायला गेले. त्यावेळी निमी विश्रांती घेत होता. म्हणून निमीला भेटू शकले नाहीत. म्हणून वसिष्ठ ऋषींना राग आला व त्यांनी निमीला शाप दिला–"मी तुझा कुलगुरु, तरी तू माझी अवहेलना करून माझे पद दुसऱ्या कोणाला देऊन टाकलेस व माझा अपमान केला. मी तुला भेटायला आलो तेव्हां तू बेफिकीरपणे झोपून राहिलास. तुझ्या या अपराधाबद्दल तुझा देह खाली पडून जावो व तू विदेह होऊन जा. हाच माझा तुला शाप आहे !"

तो शाप ऐकून निमीचे नोकर घाबरून गेले आणि त्यांनी निमीला जागे करून वसिष्ठाने दिलेल्या शापाची गोष्ट सांगितली. निमीसुद्धा चिडला. त्यानेसुद्धा प्रतिकार म्हणून वसिष्ठाला शाप दिला–"तू ब्रह्मदेवाचा नातेवाईक आहेस. तरी तुला पापाची भीती नाही. तू विनाकारण केवळ अहंकाराने मला शाप दिला आहेस. धनलोभाला बळी पडून तू माझ्यासारख्या शिष्याचा तिरस्कार केलास. धनलोभाने तू लाज लज्जा सोडलीस. तू हा जो अपराध केलास तो माझ्यावर यावा ह्यासाठी तुझा प्रयत्न चालू आहे. तू मला शाप दिलास. असा क्रोध करणाऱ्या तुझ्या देहाला माझ्या देहाचीच गती प्राप्त होवो !"

अशा तऱ्हेने दोघांनी परस्परांना शाप दिल्यानंतर वसिष्ठ ब्रह्मदेवाकडे गेले आणि म्हणाले–"भगवन, निमी नामक राजाने मला माझा देह झडून जाईल असा शाप

दिला आहे. आतां तू मला एखादा उपाय सुचव की ज्या योगे माझे ज्ञान कोणत्यातरी दुसऱ्याच्या अंगात प्रवेश करून चिरस्थायी होईल. तेव्हां ब्रह्मदेव वसिष्ठांना म्हणाला– "तुम्ही मित्रावरुणचा देहांश प्राप्त करून आपल्या ज्ञानाचे रक्षण करावे."

वसिष्ठांनी ब्रह्मदेवाला प्रणाम केला आणि वरुणलोकी गेले. तेथे आपला देह सोडला आणि प्राण मित्रावरुणाच्या शरिरात पोचते केले.

काही दिवसांनी तेथे ऊर्वशी आली. मित्रावरुण तिला पाहून तिच्यावर भाळला. त्याने तिच्या सहवासात काही काळ सुखाने घालविला. त्याला ऊर्वशीच्या पोटी अगस्त्य व वसिष्ठ जन्मले. अगस्त्यांनी जन्मल्याबरोबर तपश्चर्या करण्याची इच्छा दर्शविली आणि निघून गेले. वसिष्ठांना इक्ष्वाकूने आपला गुरु म्हणून नेमले.

तिकडे निमीनेसुद्धा उरलेल्या प्राणाने यज्ञ पूर्ण केला. यज्ञभोक्ता त्याच्याकडे येऊन विचारू लागले–" राजा, तुझ्या मनात काही इच्छा असेल तर सांग, तुला नरदेह हवा आहे की सुरदेह ?"

तेव्हां निमीने निवेदन केले–"देव हो ! जोपर्यंत या देहाला नित्य धोकाच असणार. मला देहाची गरज नाही. म्हणून मला वायुरूप देण्याची कृपा करावी !"

"राजा, तुझी इच्छा जगदंबापुरी करील." देव निमीला म्हणाले.

निमीने प्रार्थना केल्यावर त्याच्या यज्ञामुळे महादेवी संतुष्ट झाली व म्हणाली– "भूतमात्राच्या पापण्यांवर तुझा वास राहील. तुझ्या वजनामुळे सर्व प्राण्यांच्या पापण्या नित्य हालत राहतील व त्या हालण्याला 'निमिष' हे नाव प्राप्त होईल."

त्यानंतर सर्व मुनींनी निमीच्या देहाचे मंथन करून जनक राजाची सृष्टी केली. जनक विदेही निमीचा मुलगा. म्हणून त्याला विदेह नांव प्राप्त झाले. त्याने मिथिला नगरीत राजधानी स्थापन करून गंगेच्या किनाऱ्यावर राज्य केले. त्या राज्याचे नाव सुद्धा विदेहच पडले.





# विचित्र विवाह

फार प्राचीन काळी पाटलीपुत्र येथे एक श्रीमंत ब्राह्मण रहात असे. त्याला केशव नावाचा एक मुलगा होता. केशव फार सुंदर होता. लग्नाचे वय झाल्यावर लग्न करावे असे त्याला वाटू लागले. परंतु त्याला त्याच्या पसंतीची मुलगी कोठे दिसली नाही. म्हणून त्याने तीर्थाटन करण्याचे मिश काढून आईवडिलांची परवानगी घेतली व योग्य मुलीच्या शोधार्थ निघाला.

कित्येक दिवस प्रवास केल्यावर केशव नर्मदेच्या काठी पोंचला. तेथे त्यावेळी लग्नाचे एक वऱ्हाड उतरले होते. त्या गर्दीत एका वृद्ध माणसाने केशवला पाहिले. त्याचे रुपलावण्य पाहून तो केशवच्या जवळ जाऊन म्हणाला–"मुला, मला तुझ्या मदतीची गरज आहे. मी तुझे उपकार आयुष्यभरात कधी विसरणार नाही."

म्हाताऱ्याची कीव येऊन केशवने विचारले–" बोला, मी काय करू म्हणता ?"

"तू मला मदत केलीस तर त्यात तुझे नुकसान मुळीच होणार नाही. एवढेच काय, तू माझा वंशवृक्ष वाचविणारा होशील." वृद्ध ब्राह्मण म्हणाला.

केशवने पुन्हा विचारले–"मी काय करू, म्हणता ?"

"नर्मदेपलीकडे रत्नदत्त नावाचा एक ब्राह्मण राहातो. त्याला रुपवती नावाची सुंदर मुलगी आहे. मी त्या मुलीशी आपल्या मुलाचे लग्न करून देण्याच्या प्रयत्नत आहे. परंतु मुलीच्या आईवडिलांनी अद्याप माझ्या मुलाला पाहिलेले नाही. तू जितका सुंदर आहेस, तितकाच माझा मुलगा कुरूप आहे. त्याला पाहून रत्नदत्त आपली मुलगी माझ्या मुलाला देणार नाही. म्हणून तू जर माझ्याबरोबर आलास तर मी तूच

२५ वर्षांपूर्वीची चांदोबातली गोष्ट



माझा मुलगा असल्याचे सांगेन. तूच वर होशील व मुलीच्या गळयात मंगळसूत्र तूच बांधावयाचे आहेस. लग्न झाल्यावर तू आलास त्या वाटेने जा. मी आपल्या सुनेला घेऊन आपल्या गावी येईन. या मदती खातर मी उपकाराची फेड योग्य रीतीने करीनच." ब्राह्मण म्हणाला.

म्हाताऱ्याचा दुष्ट हेतू ऐकून केशवला आश्चर्य वाटले. परंतु त्याने म्हाताऱ्याला वचन दिले होते, म्हणून त्याच्या इच्छेप्रमाणे करायला तयार झाला. तो वऱ्हाडाबरोबर निघाला. नावेत बसून वऱ्हाड नदीपलीकडे मुलीच्या गावी पोचले. त्या दिवशी संध्याकाळी केशव नित्यकृत्य उरकण्यासाठी नदीकाठी गेला. तेथे एका राक्षसाने त्याला धरले व खायला तयार झाला. तेव्हां केशवने त्याला समजावून सांगितले की त्याने एका ब्राह्मणाला मदत देण्याचे वचन दिले आहे. ते वचन पूर्ण करून दुसऱ्या दिवशी रात्री तो नक्की राक्षसाचा आहार व्हायला परत येईल.

राक्षसाने विचारले–"तू आपले हे वचन पालन करशील ना?"

"मी आपले वचन नित्य पालन करीत आलो आहे. म्हणून तर त्या दुष्ट ब्राह्मणाला मदत करायला जातो आहे!" केशव म्हणाला.

"ठीक, तुझ्या सत्यपालनाची मी परीक्षाच घेतो तर!" राक्षस म्हणाला.

त्यानंतर केशव उसना वर झाला. लग्न समारंभ संपला. त्या दिवशी रात्री वर-वधूला एका खोलीत पाठविण्यात आले.

परंतु केशवने रुपवतीकडे तोंड फिरवूनही पाहिले नाही. मग बोलणार कोठला? रुपवती पतीला पाहून खूष झाली. तिला नशिबाने किती चांगला नवरा दिला? परंतु पती तिच्याशी कां बोलत नाही? रागावला आहे का? परंतु कां? तिला कळेना. झोंपण्याचे सोंग करून ती डोळे मिटून पडून राहिली.

मध्यरात्रीच्या सुमारास रुपवती झोपल्याची खात्री झाल्यावर केशव गुपचुप उठला व चाहूल न देता घराबाहेर पडला. परंतु रुपवतीची नजर केशववर होती. ती देखील उठली. तोंडावर घुंघट ओढून घेतले व केशवच्या मागोमाग काही अंतरावर चालू लागली.

केशव नदीकाठावर पोचला तेव्हां त्याला पाहून राक्षसाने विचारले–"तरुणा! तू आपल्या वचनाचे पालन केलेस. अशा सत्यवचनी पुण्यवान पुरुषाला खाऊन मी पवित्र होईन."

ते सर्व ऐकून रुपवती चटदिशी समोर आली व रडत रडत म्हणाली–"अहो, हे माझे पती आहेत. यांना सोडा ना!"

"मला फार भूक लागली आहे. मी याला खाणार आहे. मला अडवू नकोस!" राक्षस रागाने म्हणाला.

"तुम्ही उपाशीच असाल तर यांच्या ऐवजी मला खाऊन आपली भूक भागवा. तसे न करतां आपण ह्यांना खाऊन मला अनाथ केलेत तर माझे हाल होतील." रुपवती म्हणाली.

"त्याला आतां मी काय करू? तू कोठेतरी जाऊन भीक माग." निर्दयपणे राक्षस म्हणाला.

"अनाथ होऊन मी कोणाच्या दारी गेले तर मला कोण भीक घालील?" रुपवती म्हणाली. "तू भीक मागायला गेलीस व कोणी घातली नाही तर त्याचे डोके जागच्या






जागी फुटेल व तो तत्काळ मरेल. ठीक आहे न, मग जा!" राक्षसाने तिला वर दिला.

"तर मग मी प्रथम तुमच्या जवळच भीक मागते. मला पतिभिक्षा द्या!" रुपवती म्हणाली.

ते ऐकून राक्षसाला फार आनंद झाला. तो म्हणाला–"घे, हा तुझा पती! तू त्याच्या योग्य पत्नी आहेस! तुम्ही दोघे चिरकाल सुखाने संसार करा." असा त्यांना आशीर्वाद देऊन राक्षस काळोखात कोठे तरी निघून गेला.

रुपवतीची पतिभक्ती पाहून केशवला परमानंद झाला. तरी त्याने तिला खरी गोष्ट सांगितली नाही. उजाडण्यापूर्वी ती दोघं घरी परतली.

दुसऱ्या दिवशी जेवणे वगैरे झाल्यावर वऱ्हाड मुलीला घेऊन निघाले. दुष्ट ब्राह्मणाचा हेतू साध्य झाला होता. म्हणून त्याने केशवच्या अंगावरची सर्व उंची वस्त्रे व आभूषणे काढून घेतली. आपल्या कुटुंबातील सर्व लोकांना नावेत बसवून केशवला दुसऱ्या नावेत बसविले. त्याने त्या नावेच्या मालकाला खूप पैसे चारून ती नाव नर्मदेच्या मध्यधारेत बुडवून टाकायला सांगितले. त्या प्रमाणे ती नाव बुडाली व पहिली नाव पलीकडच्या किनाऱ्याला लागली.

नावाडी चांगले पोहणारे होते म्हणून पलीकडच्या किनाऱ्याला पोहून आले.

नदीच्या प्रवाहाला वेग होता. म्हणून केशवची नाव बुडून दूर वाहून गेली. केशव सुदैवाने कसाबसा नावेबाहेर आला व नदी किनाऱ्यावर आला.

म्हाताऱ्या ब्राह्मणाने त्याच्याशी जी लबाडी केली तिच्यापेक्षा रुपवतीशी होणाऱ्या लबाडीची त्याला जास्त काळजी वाटू लागली. त्याला रुपवतीशी झालेल्या ताटातुटीबद्दल फार वाईट वाटले.

तिकडे वऱ्हाडाबरोबर रुपवती नदी-पलीकडे पायी चालू लागली. तिने वृद्ध ब्राह्मणाजवळ जाऊन नम्रपणे विचारले–"मामंजी, बाकी सर्व लोक पायी जातांना दिसत आहेत. परंतु 'हे' कोठे दिसत नाहीत?"

"तू आपल्या नवऱ्याची गोष्ट विचारलीस ना? हा काय इथे आहे!" असे म्हणत त्या दुष्ट ब्राह्मणाने आपल्या कुरूप काळ्या मुलाला दाखविले.

ते ऐकून रुपवतीला भयंकर राग आला व वाईट वाटले. तिने दरडावून विचारले–"हे नाहीत माझे पती! मी राजदरबारात गाऱ्हाणे नेऊन निवाडा करून घेईन."

ते ऐकून म्हातारा थोडा घाबरला. वधूने राजदरबारी गाऱ्हाणे नेले तर राजा नक्कीच आपले डोके उडवील. म्हणून त्याने उलट पावली रुपवतीला तिच्या आईवडिलांकडे पोचते केले आणि आपण आपल्या गावी निघून गेला.

रुपवती आईवडिलांकडे आली. परंतु तिचे मन शांत कसे होणार? तिला पतीची आठवण सतत होऊ लागली. तिला पती जिवंत आहे की मृत हे कळायलाही काही मार्ग दिसेना. त्या दुष्ट ब्राह्मणाने पतीच्या जिवाचे काही बरेवाईट तर केले नाही? अशी तिला काळजी वाटू लागली.

मध्यंतरी केशवने विचार केला की आता आपण तर वांचलो. पण रुपवतीच्या आईवडिलांना त्यांच्याशी कशी लबाडी करण्यात आली आहे त्याची कल्पना करून देणे तितकेच आवश्यक आहे. त्याने स्वतः या नाटकात जी भूमिका निभावली त्याचे प्रायःश्चित्तही केले पाहिजे. कारण त्याचा अपराधही थोडा फार आहेच. असा विचार करून तो रुपवतीच्या गावी गेला.

तेथे रुपवतीला पाहून त्याला अपरंपार आश्चर्य वाटले. रुपवतीलासुद्धा परमानंद झाला. केशवचे त्या घरात स्वागत झाले. जांवयाचे झाले नसते तरच आश्चर्य!

त्यानंतर काही दिवस सासुरवाडी राहून केशव रुपवतीला बरोबर घेऊन पाटलीपुत्र येथे परतला. तेथे दोघांचा संसार सुखाचा झाला.





# प्रश्नोत्तर

**गे. हरिशंकर, रायगड**

प्र. : पृथ्वी व पृथ्वीवरील प्रत्येक वस्तूवर गुरुत्वाकर्षणशक्ती आहे. म्हणून सर्व वस्तू पृथ्वीला चिकटून असतात. अशाच तऱ्हेने सूर्याच्या गुरुत्वाकर्षणाने सूर्यमंडळातील ग्रह सूर्याला चिकटून कां रहात नाहीत?

उ. : या बाबतीत 'गति'चा नियमही लक्षात घ्यावा लागतो. राकेटच्या सहाय्याने अमित गति प्राप्त झालेल्या कृत्रिम उपग्रहाला पृथ्वीची गुरुत्वाकर्षण शक्ती पृथ्वीच्या चारीबाजूला फिरव शकते, परंतु पृथ्वीकडे आकृष्ट करू शकत नाही. चंद्राला जी स्वत:ची 'गति' असते त्यामुळेच तो पृथ्वीवर पडत नाही व तो काही अंतरावर पृथ्वीच्या सभोवती फिरतो. हेच पहा, फुटबॉलला लाथ मारल्यावर तो पृथ्वीच्या गुरुत्वाकर्षणाविरुद्ध वर आकाशात जाऊन त्याची 'गति' कमी होईपर्यंत पृथ्वीकडे खाली येत नाही. तद्वतच ग्रह आपल्या 'गति'मुळे सूर्यावर आदळत नाहीत व सूर्याच्या सभोवती निश्चित परिधीत फिरत राहतात.

**लक्ष्मणराव, बेळगाव**

प्र. : पाण्याला काही रंग नसतो. परंतु पाण्यावर जेव्हां प्रकाशाचा झोत पडतो तेव्हां त्याचे परावर्तन किंवा शोषण व्हायला हवे. म्हणजे ते पांढरे, काळे किंवा इतर एखाद्या रंगाचे दिसायला हवे. परंतु तसे होत नाही, कारण काय?

उ. : सर्व रंग असलेल्या सूर्यप्रकाशाला शोषण करण्याची शक्ति असलेल्या वस्तू काळ्या दिसतात व प्रकाशाला परावर्तन करू शकणाऱ्या वस्तू पांढऱ्या दिसतात. सूर्यप्रकाशातील काही रंगांना मात्र शोषण करू शकलेल्या वस्तू शोषण केलेल्या रंगाच्या दिसतात. (उदा. पाने हिरव्या रंगाची; फुले निरनिराळ्या रंगाची दिसतात) पाणी कोणताही रंग शोषण करू शकत नाही. म्हणून पाण्यातून प्रकाश प्रसरण होते वेळी सर्व रंग दिसतात. प्रकाशाला परावर्तन करण्याची शक्ती पाण्यात थोडी फार असते. रात्रीच्या समयी कालव्यांत सर्व प्रकारचे रंग प्रतिबिंबित होताना आपल्याला दिसतात. पाण्याला स्वत:चा रंग नसण्याचे हेच कारण आहे.



# अघटित अनपेक्षित

[८३]

मगध देशाच्या चंपकवती नामक एका जंगलात एक कावळा व एक हरण रहात असे. त्यांची परस्परांशी दाट मैत्री होती. हरण खूप हृष्टपुष्ट होते. त्याला पाहून एक कोल्हा विचार करू लागला— "या हरणाचे मांस खूप स्वादिष्ट असणार, परंतु ते मिळणार कसे? एकच उपाय आहे. आपल्यावर ह्याच्या मनांत विश्वास उत्पन्न झाला पाहिजे." असा विचार करून तो कोल्हा हरणाजवळ येऊन म्हणाला— "मित्रा, कसं काय बरं आहे ना?"

हरणाने विचारले—"तू कोण रे, बाबा?"

"मी एक कोल्हा आहे. माझे नाव क्षुद्रबुद्धी. माझे जवळचे सर्व नातेवाईक व मित्र सर्वांपासून मी दुर्दैवाने पारखा झालो आणि एकटा पडल्याने कसे तरी आयुष्य कंठीत आहे. आता आपण मित्र झालो. मी तुझ्याच जवळ रहावे म्हणतो यापुढे." कोल्हा म्हणाला. हरणाने ते मान्य केले.

संध्याकाळपर्यंत दोघे जंगलात फिरत राहिले आणि काळोख पडू लागल्यावर हरणाच्या घरी आले. सुबुद्धी नावाचा कावळा हरणाचा मित्र होता व चांफ्याच्या झाडावर बसलेला होता. त्याने हरणाला एका कोल्ह्याला घेऊन येत असलेला पाहून विचारले—"मित्रा, हा कोण रे?"

"हा क्षुद्रबुद्धी नावाचा कोल्हा आहे. आपल्याशी मैत्री व्हावी म्हणून आला आहे." हरण म्हणाले.

तेव्हां कावळा म्हणाला—"मित्रा, अनोळखी व्यक्तीशी एकदम इतकी मैत्री करणे बरोबर नाही. कोणाचे ही कुळगोत्र व स्वभाव कळल्याशिवाय त्याला आश्रय देणे धोक्याचे असते. एका मांजराला बरो-



वर न ओळखल्यामुळे जरद्गव नावाचे गिधाड आपला प्राणच गमावून बसले."

"ते कसे काय?" हरणाने विचारल्यावर कावळा गोष्ट सांगू लागला.

### जरद्गव व दीर्घकर्ण

गंगेच्या काठी गृध्रकूट नावाचा एक पर्वत होता. त्या पर्वतावरच्या एका मोठ्या झाडाच्या ढोलीत एक गिधाड रहात असे. दुर्दैवाने त्याचे डोळे व नखे कुचकामाची झाली. त्या झाडावर राहणारे इतर पक्षी त्या गिधाडाला आपल्या आहाराचा काही अंश त्या गिधाडाला खायला देत. त्याबद्दल गिधाड त्या पक्षांच्या पिलांचे रक्षण करी.

एकदा सर्व पक्षी चाऱ्याच्या शोधार्थ बाहेर गेले असतां त्यांच्या पिलांना खाण्याच्या हेतूने दीर्घकर्ण नांवाचे एक मांजर आले. त्याला पाहून पक्ष्यांची पिले ओरडू लागली. त्याच वेळी गिधाडाला पाहून दीर्घकर्ण विचार करू लागला—"आतां आपल्यालाच मोक्ष मिळणार! तरी डोक्यावर आकाश कोसळलेच आहे तर त्यातून ही काही मार्ग निघतो का, पाहिले पाहिजे, गिधाडाने आपल्याला पाहिलेच आहे. आतां पळणेसुद्धा शक्य नाही. पहिल्याने त्याचा विश्वास संपादन केला पाहिजे व नंतर जवळजायचे."

त्यानंतर दीर्घकर्ण गिधाडाजवळ जाऊन म्हणाले—"नमस्कार आजोबा!"

"कोण रे तू?" गिधाडाने विचारले.

"मी दीर्घकर्ण, मांजर!" मांजर म्हणाले.

"चालता हो, नाहीतर तुझी नरडीच धरीन." गिधाड म्हणाले.

"तुम्ही मी म्हणतो ते ऐकून तर घ्याल? त्यानंतर माझा जीव घ्या किंवा आणखी काही करा. मी एका विशिष्ट जातीचा किंवा कुळात जन्मलेला आहे एवढ्यावरच माझा आदर न करणे किंवा माझा जीव घ्यायला तयार होणे योग्य होईल का? सामान्यपणे कोणाचेही आचरण व स्वभाव कळल्यावरच त्याचा आदर केला जातो किंवा त्याला दूर ढकलले जाते." मांजर नम्रपणे म्हणाले.

"तू येथे येण्याचे कारण?" गिधाडाने विचारले.

"मी या परमपावन गंगातीरी राहते. दररोज गंगास्नान करून ब्रह्मचर्यव्रताचे पालन करीत चांद्रायण व्रत करीत आहे. मी काही पक्ष्यांच्या तोंडी ऐकले आहे की आपण स्मृतिग्रंथांचा खोल अभ्यास केला आहे. म्हणून आपल्यासारख्या वयोवृद्ध व ज्ञानवृद्धांजवळ राहून धर्माची मूळतत्वे शिकून घ्यावी या हेतूने आलो आहे. परंतु एका अतिथिरूपे आलेल्या माझ्यासारख्याला पाहून आपण माझ्या नरडीवरच हात ठेवायची धमकी दिलीत तेव्हां मला वाटले की कदाचित् धर्माचे अध्ययन आपले पूर्ण झालेले नाही. कारण धर्मशास्त्राप्रमाणे अतिथि अभ्यागत शत्रू असला तरी त्याचे योग्य आतिथ्य करावे. ज्या झाडाला लोक दगड मारतात त्यांना सुद्धा ते झाड आपली सांवली प्रेमाने देते. या उलट माघारी परतवलेला अतिथि आपल्याबरोबर माघारी परतवणाऱ्या यजमानाचे पुण्यसुद्धा घेऊन जातो. कारण अतिथि हा सर्व देवांचा प्रतिनिधी असतो." मांजर म्हणाले.

गिधाड त्याला उत्तर देत म्हणाले—"मांजरे पंखसुद्धा न फुटलेल्या पक्ष्यांच्या पिलांना आवडीने खातात. येथे तशीच पक्ष्यांची पिले आहेत. म्हणून मी तसे उत्तर दिले."



मांजर जमिनीला टेकलेले आपले हात कानाला लावून म्हणाले–" मी स्मृतिग्रंथांचे अध्ययन केले आहे. मनोविकारांना वश करून घेतले आहे. चांद्रायण व्रत करीत आहे. मला हेदेखील माहीत आहे की धर्मशास्त्रांत अनेक विषयांबाबत परस्पर मतभेद असला तरी एका बाबतीत तरी सर्व एक मताचे आहेत की अहिंसा हा परमधर्म होय! याचे आणखी काही कारण नाही; परक्याची कोणत्याही प्रकारे हानि न करतां कोणी आपली हानि केली तर जो क्षमा करतो तो सरळ स्वर्गलोकी जातो. मरणानंतर आपण संपादन केलेले पुण्यच आपल्याबरोबर येते. खादाड व्यक्तीला जिव्हेचा स्वाद तेवढ्या वेळेपुरता मिळतो, परंतु ज्या प्राण्याला तो खातो तो तर जिवानिशीच जातो. जेव्हां मरण समोर येऊन उभे राहते, तेव्हां माणसाला जे दुःख होते ते वर्णनातीत आहे. रानात आपोआप उगवलेला पालापाचोळा खाऊनही पोटाची खळगी भरता येते त्या पोटासाठी दुसऱ्याचा जीव घेऊन पापाची गठडी वर घेऊन जाणे कोणाला आवडेल?"

गिधाडाला मांजराचे हे पांडित्यपूर्ण भाषण ऐकून भुरळ पडली. इतर पक्ष्यांना कळविल्याशिवायच त्याने मांजराला आपल्या ढोलीत आश्रय दिला.

गिधाडाला गोडगोड बोलून फसविल्यानंतर ढोलीत शिरलेले मांजर दररोज पक्ष्याचे एकेक पिल्लू चोरून नेऊन आपल्या ढोलीत बसून खाऊ लागले.

असेच काही दिवस आणखी लोटले. पिलं नाहीशी झाल्यामुळे पक्ष्यांनी घाबरून जाऊन आपली एक सभा बोलाविली. मांजराला जेव्हां पक्ष्यांची ती हालचाल कळली तेव्हां ते त्या ढोलीतून पळून गेले.

पक्ष्यांनी जवळपासच्या सर्व प्रदेशात मांजराचा शोध काढला. शेवटी ढोलीतच पुष्कळशी हाडे पिसे पडलेली पाहून व गिधाडानेच पिलांना खाल्ले असावे असा गैरसमज करून घेऊन त्यांनी आपल्या चोचींनी गिधाडाला टोचून ठार केले.






फार पूर्वीची गोष्ट आहे, कुंडलिनी द्वीपावरच्या गादीवर चित्रसेन नावाचा राजा राज्य करीत होता. तो गादीवर आला त्यानंतर दोन वर्षांच्या आत त्याने प्रजेच्या हिताची अनेक कामे केली. प्रजा सर्वदा सुखी रहावी व त्याचे राज्य रामराज्यासारखे असावे अशी त्याच्या मनात एक महत्वाकांक्षा होती. म्हणून त्याने प्रजेवर जे निरनिराळे कर होते त्यांतले अर्धे अधिक बंद तरी केले आणि उरले ते अर्धे केले, म्हणजे प्रजेला कराचा भार वाटणार नाही असे त्याला वाटल.

राजाची ही धर्मशील वृत्ती पाहून प्रजेला फार समाधान वाटे. करभार उतरल्यामुळे प्रजेला फार आनंद झाला. राज्यात सर्वत्र कानाकोपऱ्यातही चित्रसेन राजाची गुणगाथाच प्रजेच्या तोंडी ऐकायला मिळे.

हे सर्व ठीकच होते. प्रजेच्या हिताची काळजी करणाऱ्या राजाची कीर्ती दिग्‌दिगंत पसरली ही आनंदाची गोष्टच म्हणायला हवी. परंतु एकीकडे कीर्ती गाजत होती तर दुसरीकडे राज्याचा खजिना रिकामा होऊ लागला होता. दानधर्मवृत्तीच चालू ठेवली तर किती काळ खजिन्यात धन राहणार? खजिना रिकामा होऊ लागल्यामुळे सर्व राज्यव्यवस्थाच डळमळली.

चित्रसेन राजाचा प्रधान सूक्ष्मबुद्धीचा कर्तबगार कारभारी होता. तो राजाची ही














दानधर्मवृत्ती सूक्ष्मपणे पहातच होता. म्हणून भविष्यकाळात जो परिणाम होणार त्याची त्याला चिंता वाटू लागली. म्हणून जेव्हां जेव्हां त्याला संधी मिळे तेव्हां तेव्हां तो राजाला राज्याची बिघडत चाललेली स्थिती समजावून सांगे.

परंतु राजा म्हणे, "मी गादीवर असे पर्यंत प्रजेच्या हिताची कामेच करण्याचा माझा विचार आहे." एकूण प्रधानाला किती काळजी वाटत असली तरी राजाच्या मनावर त्याचा काही एक परिणाम होत नव्हता.

खजिना रिकामा होत आला होता. आतां गप्प राहिल्यास राज्यावर संकट येईल असा विचार करून प्रधान योग्य वेळ पाहून राजाला भेटला व म्हणाला– "महाराज, आपल्या कारकीर्दीत प्रजा सुखीच आहे. परंतु आपला खजिना रिकामा होऊ लागला आहे. पैसा नसेल तर कोणतेच काम होणे शक्य नाही. आपणच विचार करून पहावा. मी म्हटलेले आपणांस पटत नाही. मग मी हे मंत्रिपद कसे संभाळावयाचे? माझे मलाच कळत नाही. म्हणून आपण मला या जबाबदारीतून मुक्त करावे, अशी महाराजांजवळ नम्र विनंती करीत आहे."

"स्थिती इतकी बिघडली आहे का?" राजाने विचारले.

"काय म्हणून निवेदन करू, महाराज? एकीकडे सरकारी नोकरांना तर दुसरीकडे शिपायांना महिन्याचा पगार द्यावयाचा आहे. फक्त एक आठवडा उरला आहे. खजिन्यात जेवढी रक्कम आहे ती माळयांची मजुरी द्यायला तरी पुरेल की नाही, शंका आहे." प्रधान म्हणाला.

चित्रसेन राजा काही वेळ विचार करून म्हणाला–"ठीक, तर मग उद्यांच दरबार बोलवा, प्रधान! सरकारी नोकरांबरोबर राज्यातले प्रमुख नागरिक दरबारात हजर राहतील-याची व्यवस्था करा."

प्रधान म्हणाला–"जी आज्ञा महाराज!" असे म्हणत बाहेर आला. परंतु महाराजांनी दरबार कशासाठी बोलवायला सांगितला ते त्याला कळले नाही.

राज्यात सर्वत्र दवंडी पिटविण्यात आली. ती ज्या नागरिकांनी ऐकली त्यांना दरबार कशासाठी बोलाविला आहे, कळेना म्हणून जो तो आपल्या बुद्धीला वाटले तसा विचार करू लागला. राजा कृपाळू व दयाळू आहे, हे सर्वांनाच माहीत होते. "महाराज बहुतेक सर्व कर काढून टाकायच्या विचारात असावेत!" अशी बातमी पसरली.

दुसऱ्या दिवशी दरबार भरला. राजाचे सल्लागार मोठमोठे अधिकारी व राज्यातले प्रमुख नागरिक दरबारात हजर होते. चित्रसेन राजा सिंहासनावर येऊन बसला. राजाज्ञा होताच प्रधान दरबारात उभे राहून बोलू लागले.

"फार पूर्वी पासून आपल्या राज्यात जो कर प्रजेकडून वसूल करण्यात येत होता तो नावापुरता होता. अशा परिस्थितीत करुणासिंधु अशा आपल्या महाराजांच्या कारकीर्दीत सर्व कर अर्ध्याहूनही कमी करण्यात आले आहेत. ही गोष्ट आपणा सर्वांना माहीतच आहे. हा नाममात्र कर लावून राज्याचा रथ कसा



चालू ठेवायचा ही मोठी समस्या आज आपल्या समोर उभी आहे." असे म्हणत प्रधान श्वास घेण्यासाठी थोडे थांबले.

इतक्यात एकाने दरबारात उभा राहून विचारले–"प्रजेवर कर लावले नाहीत तर राज्याचा कारभार चालणेच शक्य नाही का?"

तो प्रश्न ऐकून सभेत जे कोणी हजर होते, सर्व आश्चर्य चकित झाले. प्रधान तर थक्कच झाले. त्यांचा स्वतःच्या कानावरच विश्वास बसेना. त्यांनी फक्त एकदांच रागाने प्रश्न विचारणाऱ्याकडे पाहिले व म्हणाले–"तर मग तुम्हीच विचार करून पहा! आपल्या राज्याची

लोकसंख्या किती आहे? एवढ्या मोठ्या प्रजेला चैनीत व सुखात दिवस काढावयाचे झाले तर त्यांना कोणकोणत्या सुखसोयींची व्यवस्था करावी लागेल? शरीर स्वास्थ्य उत्तम रहायला औषधपाण्याची व्यवस्था करायला नको का? मुलांच्या शिक्षणाची व्यवस्था करायला नको का? शिवाय परमुलुखाची राज्यावर केव्हां स्वारी होईल, हे सांगतां येणे शक्य आहे का? शत्रूचे पारिपत्य करायला सैन्य नको का? कर लावले नाहीत तर ही सर्व कामे कशी पार पडणार? म्हणून प्रत्येक नागरिकाने हे समजून घ्यायला हवे की कर लावण्याची गरज कां पडते? कर हा कश्या स्वरूपाचा असतो?" प्रधान बोलत होते, त्यावेळी राजा त्यांच्याकडे पहात होता. त्याच्या चेहऱ्यावरून त्याला काही म्हणावयाचे होते हे स्पष्ट कळत होते. म्हणून प्रधान गप्प राहिले.

तेव्हां राजा म्हणाला—"प्रधान म्हणाले ते योग्यच आहे. परंतु प्रश्न असा आहे की जे कर कमी करण्यात आले आहेत ते पुन्हा पूर्वी इतके वाढविले तर पूर्वीच्या पद्धतीने वसूल करतां येतील का?"

दरबारी परस्परांशी बोलू लागले. इतक्यात एकाने उभे राहून निर्भयपणे सुचविले—"महाराज जे कर कमी करण्यात आले आहेत ते पुन्हां पूर्वी इतके वाढविण्यापूर्वी गंभीरपणे विचार केला पाहिजे. आपल्या राज्यातच नव्हे तर इतर राज्यांतही महाराजांची कीर्ती पसरली आहे, ही गोष्ट विसरून चालणार नाही. कर वाढविले तर महाराजांची कीर्ती कापरासारखी उडून जाईल. राजाने दिलेले वचन मोडणे ही सामान्य गोष्ट नव्हे!"

राजाला ही सूचना त्याची कानउघाडणी करण्यासाठी केलेली वाटली. कारण तो गादीवर बसला तेव्हांपासून त्याची कीर्ती वाढतच गेली होती. ती एकदम नाहीशी होण्याची शक्यता होती. म्हणून खजिना भरण्यासाठी दुसरा काहीतरी मार्ग काढला पाहिजे. कर वाढवून चालणार नाही अपकीर्तीच वाढेल!

राजा पुन्हा म्हणाला—"मी जमीन महसूल व इतर कर यांच्या संबंधी जो निर्णय केला त्यात काही बदल करण्याची माझी इच्छा नाही. नवीन कर लावण्याचा प्रश्नच नाही. हा आपला निर्णय निश्चित आहे. प्रधानांनी सर्व परिस्थिती समजावून सांगितली आहेच. तेव्हां तुम्हीच सर्वांनी विचार करून काय उपाय करावा, सुचवावे."

दरबारात सर्वत्र शांतता पसरली. सर्व परस्परांकडे पाहू लागले. परंतु काय करावे, कोणाला काही सुचेना. एकदोन मिनिटांनी सेनापती समरसेन उभा राहून म्हणाला—"खजिना भरून काढणे हा काही मोठा प्रश्न नाही. मी तो उपाय सुचवितो. परंतु तो उघड सांगतां येणार नाही. एकांतात निवेदन करू शकेन."

सर्व दरबाऱ्यांनी स्वीकृतिसूचक टाळ्या वाजविल्या. त्यानंतर असे ठरले की सेनापतीने त्या दिवशी रात्री दहा वाजतां राजोद्यानात महाराजांना एकांतात भेटावे आणि उपाय सुचवावे.

ठरल्याप्रमाणे सेनापती समरसेन राजोद्यानात रात्री दहा वाजतां महाराजांना भेटला व निवेदन केले—"महाराज, आपला



खजिना भरायला फार विचार करण्याची गरज नाही. आतांच्या परिस्थितीत प्रजेकडून एक पैसादेखील वसूल करणे शक्य नाही. आपल्या समोर हाच प्रश्न आहे ना, की धन कसे जमवावे? जनतेला सुखी ठेवून महाराजांचे राज्य रामराज्य म्हणून अक्षुण्ण कसे राहील? यासाठी मला एक उपाय योग्य वाटतो आहे. आपण परमुलुखावर स्वारी करून त्यांचे राज्य लुटावे, आपल्या समोरची समस्या सुटेल. हा देखील राजधर्मच आहे! याच साठी तर महाराजांनी माझी नेमणूक केली आहे व एवढे मोठे सैन्य उभे केले आहे!"










सेनापती म्हणाला ते ऐकून राजा काही वेळ विचारात पडला. नंतर म्हणाला– "तुम्ही म्हणता ते ठीकच आहे. परंतु त्यांत ज्या अडचणी आहेत त्यांचा तुम्ही विचार केलेला दिसत नाही. मुख्य म्हणजे आपले राज्य हे एक बेट आहे. त्याच्या चारी बाजूला समुद्र आहे. समुद्रापलीकडील राज्यांवर स्वाऱ्या करण्यासाठी युद्धनौका किती लागतील व सैन्य किती मोठे लागेल, हा विचार नको का करायला? तुम्ही या गोष्टीचा विचार केलेला दिसत नाही?"

"महाराज, आपण युद्धनौका व सैन्य या सर्वांची जबाबदारी माझ्यावर सोडावी." सेनापती म्हणाला.

"ठीक, तर ही सर्व जबाबदारी तुमची. आपले सैन्य वाढवायचे झाले तर नव्या तरुण युवकांना सैन्यात भर्ती करावे लागेल. त्यासाठी राजाज्ञेची गरज आहे. तरमग ही घ्या राजमुद्रा आणि तिचा योग्य तो उपयोग करा." असे सांगून राजाने आपल्या बोटातील अंगठी काढून सेनापतीच्या हातात दिली.

सेनापती राजाचा निरोप घेऊन निघून गेला. त्याने सर्व सरदारांना बोलावून परिस्थिती समजावून सांगितली व म्हणाला– "सर्व ठीक आहे, परंतु एक शंका राहून जाते."

सरदारांनी विचारले– "ती कोणती?"

सेनापती म्हणाला– "आपण सैन्य घेऊन जवळपासच्या बेटांवर स्वारी करणार ती त्या बेटांवरचे खजिने लुटायला. परंतु ती बेटे काबीज करून त्या बेटांवर राज्य करण्याचा आपला हेतू नाही. या कामासाठी आपल्या जवळ जेवढे सैन्य आहे ते पुरेसे आहे. आणखी एक गोष्ट–आपण ससैन्य हे बेट सोडून जाऊ तेव्हां संधीची वाट पहात बसलेले राजद्रोही प्रजेला चिथवून बंड करतील. तेव्हां आपले महाराज व राज-परिवार यांचे रक्षण कोण करणार?"

"होय, हा प्रश्न खरोखरच विचार करण्यासारखाच आहे. सैन्याशिवाय राजाची शक्ती कुचकामाची असते." सरदारांनी "हो ला हो" म्हटले.

सेनापती समरसेन पुढे काही बोलणार, इतक्यात एक वृद्ध सरदार उच्च स्वरात म्हणाला– "सेनापती! कुंडलिनी देवीच्या कृपेने मला एक युक्ती सुचली आहे!"

तेव्हां सर्व त्याच्याकडे उत्सुकतेने पाहू लागले. तो वृद्ध सरदार म्हणाला– "हे पहा, कोणत्याही देशात बंडाचे निशाण उभे करावयाचे झाले तर त्यासाठी तरुण पिढीलाच पुढे पाऊल टाकावे लागते. म्हणून मला वाटते की तरुण पिढीला प्रोत्साहन देऊन सैन्यात भर्ती करावे. हाच सर्वात उत्तम उपाय आहे."

तो उपाय सेनापतीसह इतर सर्व सरदारांना रुचला. लगेच सर्वांनी परस्परांचा सल्ला घेऊन हुकूम काढला की राज्यात पंधरा ते चाळीस वर्षांच्या दर्म्यान जी तरुण मंडळी आहेत त्यांनी सैन्यात भर्ती व्हावे. त्यासाठी राजाज्ञा तयार करून त्याच्यावर राजमुद्रेचा ठसा उमटवण्यात आला.

दुसऱ्या दिवसापासून राजाचे आज्ञापत्र घेऊन सैनिक राज्यभर पसरले. आणि तरुण मंडळींना सैन्यात भर्ती करू लागले. परंतु काही जणांनी सैन्यात भर्ती व्हायला नकार दिला व विनंती केली– "महाराजांनी पाहिजे तर चालू कर वाढवावे किंवा




नवीन कर बसवावे. आम्ही आनंदाने देऊ. परंतु इतर देशांवर स्वारी करण्यासाठी आम्हांला बळजबरीने सैन्यात भर्ती करून घेऊ नये. आम्हांला आमच्या आईवडिलांपासून व बायकामुलांपासून दूर ओढून घेऊन जाऊ नये."

परंतु आज्ञापत्र घेऊन गेलेल्या सैनिकांनी सैन्यात भर्ती होण्याची इच्छा असलेल्या तरुणांना भर्ती करायला सुरवात केली आणि ज्यांनी नकार केला त्यांना कैद करून राजधानीत घेऊन आले.

बळजबरीने सैन्यात भर्ती व्हायला जे लोक तयार नव्हते ते सैनिकांची नजर चुकवून पळून गेले आणि राजाकडे आपले

गाऱ्हाणे घेऊन गेले. राजाने त्यांचे गाऱ्हाणे ऐकून घेऊन त्यांना समजावून सांगितले. म्हणाला—"तुमच्या पैकी काही जणांनी मी कर कमी केले म्हणून माझी कीर्ती गाऊन काव्ये सुद्धां लिहिली आहेत ना? तेव्हां मी पुन्हा कर वाढविले किंवा नवे कर बसविले तर तुम्हांला माझ्या अपकीर्तीची गीते लिहायला संधी देणारा राजा सिद्ध होईन. म्हणून आतां यापुढे मी काही हस्तक्षेप करायला तयार नाही. आम्ही जो निर्णय दिला तोच बदलण्याची रीत आमच्या कुळात नाही."

त्यानंतर लवकरच सैन्याची भर्ती संपली. एक शुभमुहूर्तावर कुंडलिनी राज्याचे सैन्य युद्धनौकांत चढले.

चित्रसेन राजाने आज्ञा काढली—"आतां सैन्याने प्रस्थान करावे." त्याच वेळी आकाशात दक्षिणेकडून अत्यंत वेगाने एक धूमकेतू उगवला. तो पाहून सर्व थरथर कापू लागले. "हा धूमकेतू अशुभ आहे. जे काही करावयाचे असेल ते विचार करून करा!"

राजाच्या बाजूलाच दरबारी ज्योतिषी उभे होते. ते म्हणाले—"हा धूमकेतू संकटाची पूर्वसूचना देत आहे. युद्धनौका थांबवा. आपण दुसरा शुभमुहूर्त ठरवू."

ते ऐकून सेनापती समरसेनला भयंकर राग आला. तो म्हणाला—"असल्या अंधविश्वासासमोर मान वाकवून आमच्या पराक्रमी सैन्याचा अपमान करू नका. धूमकेतू त्यांच्या वाटेवर कसा काय आडवा येणार? किंवा त्यांचे कसे काय नुकसान करणार?"

दरबारी ज्योतिष्याने अनेक प्रकारे आपली बाजू समजावून सांगितली, परंतु सेनापतीने त्याच्या बोलण्याकडे दुर्लक्ष केले. राजाने सुद्धां सेनापतीच्या म्हणण्याला दुजोरा दिला. नाइलाज होऊन ज्योतिषी बाजूला झाला.

सेनापती समरसेनची आज्ञा होताच युद्धनौकांचे नांगर उचलण्यात आले आणि शिडे उभारण्यात आली. नौका धूमकेतू उगवला होता त्या दक्षिण दिशेनेच जणुकाही धूमकेतूलाच तोंड देण्यासाठी निघाली.

(क्रमश:)



# पदत्याग

विक्रमादित्याने आपला हट्ट सोडला नाही.

तो झाडाजवळ गेला, प्रेत खांद्यावर काढून घेतले आणि नेहमीप्रमाणे मौन होऊन स्मशानाच्या दिशेने चालू लागला. तेव्हां प्रेतात बसलेला वेताळ त्याला म्हणाला—"राजा, सामान्यपणे प्रत्येक माणसाला वाटते की जग त्याचा किंवा त्याच्या अंगच्या गुणांचा योग्य आदर करीत नाही. मालकाने नोकराच्या कामाची योग्य ती वाखाणणी केली तर नोकराला किती आनंद होतो? परंतु दयानिधी नांवाच्या व्यक्तीच्या योग्यतेची ओळख पटल्यावर राजाने त्याला सर्वात उच्च पदावर नेमले तर त्याने ते स्वीकारले नाही. तुला कंटाळा येऊ नये म्हणून मी दयानिधीची गोष्ट सांगतो, लक्ष देऊन ऐक." असे सांगून वेताळ गोष्ट सांगू लागला.



कलिंग देशाचा राजा मार्तंड याच्या पदरी दयानिधी नावाचा एक दलपती होता. तो एक शूर योद्धा म्हणून कोठवर कामगिरी बजावू शकेल, हे सांगणे कठीण होते. परंतु तो नेहमी युद्धाच्या डावपेचांचा आणि निरनिराळ्या प्रकारचे प्रसंग उभे राहिलें तर त्यांना तोंड कसे द्यावयाचे याचाच विचार करी.

एकदां राजा शिकारीला निघाला तेव्हां त्याने किल्ल्याच्या रक्षणाची सर्व जबाबदारी दयानिधीवर टाकली. शेजारचा राजा वीरवर्मा याला त्याच्या हेरांकडून राजा आपल्या सर्व शूर व पराक्रमी सरदारांसह शिकारीला गेला असल्याचे कळले. ते कळतांच त्याने कलिंग देशाच्या किल्ल्याला वेढा दिला. दयानिधीने अशी वेळ आली तर काय करावयाचे या गोष्टीचा विचार करून ठेवलाच होता. म्हणून त्याने लगेच किल्ल्याच्या रक्षणार्थ किल्ल्यात जेवढे सैन्य होते ते आणि इतर तरुण युवकांना जमवून किल्याच्या भिंतीजवळ उभे केले– आणि त्यांच्या करवी शरवृष्टी व अग्निवृष्टी बरोबर दगड व शिळांची वृष्टी सुरू केली. शत्रु सैन्याची पांगापांग झाली. जे शत्रु सैनिक मरण पावले दयानिधीने त्यांना मूठमाती जखमी सैनिकांच्या औषधोपचाराची योग्य ती तजवीज केली.

तिकडे राजाला शत्रूने किल्ल्याला वेढा दिल्याचे कळले तेव्हां तो परतला आणि दयानिधीच्या -प्रसंगावधानाची व शौर्याची प्रशंसा केली. परंतु त्याने शत्रु सैनिकांच्या औषधोपचाराची जी तजवीज केली होती ती त्याला आवडली नाही. त्याने त्या सर्व शत्रु सैनिकांना फांशीची शिक्षा दिली.

मार्तंडच्या मनाचे तेवढ्यावर समाधान झाले नाही. त्याने आपल्या सर्व सैन्यानिशी वीरवर्माच्या राज्यावर स्वारी केली. वीरवर्माला राजा असे काही करणार याची कल्पना होतीच. म्हणून त्याने आपल्या शेजारच्या राजांना मदतीला बोलावून मार्तंडच्या सैन्याचा पूर्ण पराभव केला आणि त्याला कैद केले. दयानिधी निसटून पळून गेला होता. तो एका सामान्य नागरिकासारखा वेष पालटून राहू लागला.

वीरवर्माने कलिंग देशात शिरून लूटमार व जाळपोळ केली. त्याने कलिंगदेश जिंकला. परंतु तो कलिंगच्या राजधानीला शत्रूची राजधानीच मानीत राहिला.

दयानिधीला हे आवडले नाही. त्याने धाडसी तरुणांना जमवून गुप्तपणे वीरवर्माची राजवट उलटून पाडण्यासाठी गुप्तपणे योग्य ती तयारी सुरू केली. त्याने एके दिवशी रात्री अचानक हल्ला करून वीरवर्मा व त्याच्या अधिकाऱ्यांना, कैद केले आणि आपल्या राजाला सोडविले.



राजा बंदीमुक्त होऊन बाहेर येताच प्रजेला चेव चढला. प्रजेने व मार्तंडच्या सैनिकांनी वीरवर्माच्या सैनिकांची कत्तल केली.

मार्तंडला पुन्हां राज्यप्राप्ती झाली. त्याने वीरवर्माला शिरच्छेदाची आज्ञा काढली आणि त्याच्या अधिकाऱ्यांना फांशी दिली. दयानिधीच्या हुशारीची खूप प्रशंसा करून त्याला मुख्य सेनापती नेमले.

परंतु त्या दिवशी रात्री दयानिधीने राजाला एकांतात भेटून निवेदन केले– "महाराज, मला आपण क्षमा करावी, आपण मला हे जे मुख्य सेनापतीचे पद देऊ केले आहे, ते पद योग्य तऱ्हेने संभाळण्याची शक्ती माझ्या अंगात नाही."

राजाने खोल नजरेने त्याच्याकडे एकदा पाहिले व म्हणाला–"तर मग ठीक, उद्या उजाडण्याच्या आत तू माझ्या राज्याच्या सरहद्दी बाहेर चालता हो!"

"जी महाराज!" असे सांगून दयानिधी रात्रीच्या रात्री आपली मातृभूमी सोडून निघून गेला.

वेताळ येथवर गोष्ट सांगून म्हणाला– "राजा, दयानिधीने पदत्याग करण्याचे कारण काय? त्या पदाची जबाबदारी

संभाळण्याची शक्ती त्याच्या अंगात नव्हती का? अशी कठोर शिक्षा दयानिधीच्या कोणत्या अपराधाबद्दल त्याला केली? दयानिधीने राजाला जी मदत केली होती ती कधी विसर पडण्यासारखी नव्हतीच. त्यानेच खरोखरी राजा मार्तंडला त्याची गादी परत मिळवून दिली होती. अशा परिस्थितीत एक दलपती म्हणून त्याला राज्यात राहू द्यायला काय हरकत होती? याने उलट एका क्षुल्लक कारणास्तव की त्याने देऊ केलेले पद दयानिधीने स्वीकारले नाही याबद्दल त्याला इतका राग कां यावा? या सर्व शंकांचे समाधानकारक उत्तर माहीत असून तू दिले नाहीस तर तुला परिणाम माहीतच आहे, तुझ्या डोक्याची शंभर शकले होऊन तुझ्या पायांवर लोळू लागतील."

विक्रमादित्य म्हणाला—"दयानिधी एक मोठा राजभक्त होता म्हणून त्याला राजाने त्या मोठ्या पदावर नेमले होते. परंतु दयानिधीने राजाने दाखविलेल्या प्रेमादराचा तिरस्कार केला. त्यावरून राजाला वाटले की दयानिधीच्या मनात राजभक्तीपेक्षा देशभक्तीची प्रेरणा जास्त आहे. शिवाय दयानिधीच्या मनात मानवतेचा अंश जास्त होता. म्हणूनच तर त्याने मृत सैनिकांना मूठमाती देऊन जखमी सैनिकांच्या औषध-पाण्याची तजवीज केली होती. वीरवर्माने प्रजापीडन केले नसते तर कदाचित दयानिधीने राजा मार्तंडला त्याचे राज्य परत मिळवून देण्याची खटपट केली नसती. हे राजाने ओळखले. म्हणूनच त्याने त्याला हद्दपारीची शिक्षा केली. एका देशभक्ताला तो सर्वात मोठा दंड होता. राजाने असा दंड दिला नसता व दयानिधीला सोडून दिले असते आणि पुढे त्याच्या राजवटीत प्रजेवर काही अत्याचार झाले असते तर दयानिधीने राजाला गादीवरून खाली खेचायला मागेपुढे पाहिले नसते. म्हणून राजाने तो निर्णय घेतला."

अशातऱ्हेने राजाचे मौन भंग होताच वेताळ प्रेतासह नाहीसा झाला व झाडाला जाऊन लोंबकळू लागला. (कल्पित)





# आंतार

"कोठवर यश आले?" पतीला हात-पाय धुवायला पाणी देत गौरीने विचारले.

"उमेश हातपाय धुवून आल्यावर पाणी पिऊन म्हणाला—"वरपक्षाला रागिणी पसंत आहे, परंतु दहा हजार हुंडा मागत आहेत!"

ते ऐकून गौरी चकित होऊन पतीकडे पहात राहिली. रागिणी त्यांची एकुलती एक लेक होती. तशी ती फार सुंदरही नव्हती. चार मुलीत एक होती. रागिणी जन्मली तेव्हांपासून उमेशने तिच्या लग्नासाठी जी थोडी रक्कम जमविली होती. ती एकूण पांच हजारच झाली.

रागिणी दाराआडून आईवडिलांचे बोलणे ऐकत होती आणि रागाने म्हणाली—"जी व्यक्ती फक्त हुंड्यासाठी माझ्याशी लग्नाला तयार नाही, तो मला पसंत नाही."

"तुला मधे बोलायला कोणी ग सांगितलं? तू आपलं काम बघ!" गौरी मुलीवर राग काढीत म्हणाली. त्यानंतर गौरी पतीला म्हणाली—"त्या लोकांना मुलगी तर पसंत पडली ना? मग आपण पैशासाठी जुळून आलेला संबंध तोडायचा का? नंतर मुलीचे लग्न होईल की नाही, शंकाच!"

"मग मी काय करू म्हणतेस? कोणाच्या घरात दरोडा घालू?" उमेशने विचारले.

त्या गोष्टीवरून दोघांत बराच वाद-विवाद झाला. हळूहळू काळोख पडू लागला. इतक्यात दाराची कडी वाजली. उमेशने दार उघडले. बाहेर कोणी अनोळखी व्यक्ती उभी होती. तो म्हणाला—"रामभाऊ शेटजींनी ही पेटी आपल्याला द्यायला सांगितले आहे. असेही त्यांनी सांगायला सांगितले आहे की त्यांनी तूर्त फक्त आठ



हजार रुपयांचेच दागिने पाठविले आहेत. शेटजींना यासंबंधी काही सांगावयाचे आहे का?" या शब्दांपाठोपाठ त्या व्यक्तीने एक पेटी उमेशच्या हातात दिली.

उमेशला ते सर्व ऐकून आश्चर्यच वाटले. रामभाऊ शेट हे नाव त्याने कधी ऐकलेच नव्हते. म्हणून त्याने त्या अनोळखी व्यक्तीला विचारले—"रामभाऊ शेट?"

उमेश म्हणाला ते ऐकून त्या नव्या व्यक्तीला थोडी शंका आली. त्याने घरासमोरच्या पिंपळाकडे बोट दाखवून विचारले—"शेटजींनी पिंपळासमोरच्या नारायण रावांना ही पेटी द्यायला सांगितली होती. आपण नारायणरावच ना?"

उमेश काही उत्तर देणार तितक्यात गौरी म्हणाली—"होय, होय! कालच दागिने पाठवायला हवे होते. उशीर कां झाला, चवकशी करून ये!"

"बरं, करतो चवकशी!" असे सांगून ती व्यक्ती निघून गेली.

त्यानंतर उमेशने चटदिशी दार बंद केले आणि पेटी उघडून पाहिली. पेटीतले दागिने पाहून दोघां नवरा बायकोचे डोळेच दिपून गेले.

"आठ हजार रुपयांचे दागिने! मुलीचे लग्न आतां झालेच, समजा!" गौरी आनंदाने म्हणाली.

"कोणाचे दागिने आहेत, कोणास ठाऊक? ह्या दागिन्यांनी माझं लग्न कसं काय होणार?" रागिणी म्हणाली.

"गप्प बैस, मध्ये आली आहे चोमडेपणा करायला!" या शब्दात बजावीत गौरीने रागिणीला घरात पाठवून दिले.

"परमेश्वराने कृपा करून मुलीच्या लग्नासाठी हे दागिने पाठविले आहेत आपल्या घरी. दोन दिवसांच्या आत मी हे दागिने वितळवून सोने करून ठेवतो." उमेश म्हणाला.

"परमेश्वराचा अनुग्रह आहे, परंतु तो उपभोगण्याचं भाग्य लागतं! उजाडेपर्यंत रामभाऊ शेटजींना दागिने यथास्थानी न पोचल्याचं कळलं. उद्या तो माणूस येऊन आपल्याजवळ दागिने मागील. त्याला आपण काय उत्तर द्यायचं?" गौरीने शंका काढली.

"तरमग असं करू या. मी ही पेटी मागे परसात पुरून ठेवतो. कोणी येऊन मागू लागला तर असं सांगू, आपल्याला त्या संबंधी काहीच माहीत नाही. त्याने ती पेटी आपल्याला आणून दिली त्यावेळी, कोणी ते पाहिले का?" उमेश म्हणाला.

त्यानंतर दोघां नवरा बायकोनी ती पेटी परसात एका नारळाच्या आळ्यात पुरून ठेवून दिली.

उजाडतांच कोणी दारासमोर येऊन ओरडून विचारू लागला. नवराबायकोने परस्परांना धीर दिला आणि दाराजवळ आली. रात्री जो माणूस पेटी घेऊन आला होता तोच दारात उभा होता. घाबऱ्या आवाजात तो म्हणाला—"अहो, काय पण फसलो? गळा कापला की माझा! काल जी पेटी मी तुम्हांला आणून दिली ती पलीकडच्या गल्लीतल्या नारायणरावांची आहे. शेटजी माझा जीव घ्यायलाच निघाले होते. तुम्ही ती पेटी द्या बघू मुकाट्याने!"

उमेश शांतपणे म्हणाला—"उजाडतांच तू कोठे पिऊनबिऊन तर नाही आलास? उजाडतांच हा काय गोंधळ माजविला आहेस तू?"



"अहो, तो वेडा असेल कोणी! तुम्ही दार बंद करून आत या कसे!" गौरी म्हणाली.

ती आलेली व्यक्ती जास्तच मोठमोठ्याने ओरडू लागली. उमेश तिकडे दुर्लक्ष करून म्हणाला—"तू काळोखात ती पेटी कोणाला देऊन आलास ते आम्हांला काय माहीत? आम्ही आपल्या मुलीच्या लग्नासंबंधी कामात गुंतलो आहो आणि तू उजाडतांच ही काय भानगड घेऊन आला आहेस रे?" गौरीने पण त्याच स्वरात दुजोरा दिला.

"तुम्हांला उगीच त्रास कशाला? हे लग्न होणारच नाही आहे!" असे म्हणत होणारे व्याही खांबाच्या आडून पुढे आले. ते

पाहून गौरी व उमेशची तोंडे पाहण्यासारखी झाली. वरपिता म्हणाला–"आम्हांला एका पैशाचाही हुंडा नको. आम्ही फक्त कुटुंबाचा गौरव आणि रीत म्हणून म्हटले होते. तुमच्या प्रामाणिकपणाची ओळख व्हावी, म्हणून आम्ही एक मोठी रक्कम मागितली. आम्हीच ते सोन्याचं पाणी चढविलेले दागिने तुमच्याकडे पाठविले होते. आतां आम्हांला खोटयाखऱ्या नाण्याची ओळख पटली. तुम्ही मंडळी पैशासाठी कोणाचा गळा कापायलासुद्धा मागेपुढे पाहणार नाही, हे आम्ही प्रत्यक्ष पाहिलं. तुमच्या मुलीतही आई बापांचे गुण उतरलेले असणार! आम्हांला अशा घराशी संबंध जोडायचा नाही!"

इतक्यांत रागिणी अचानक बाहेरून येऊन म्हणाली–"अहो, तुम्ही आपला हा निरर्थक तर्क बंद करा पाहू. आईवडिलांचं रंगरूप त्यांच्या मुलांत अवश्य उतरू शकते. त्यांचे गुण उतरतातच असेमात्र नाही. म्हणून मी पहाटेच उठून ती पेटी पोलीस स्टेशनावर पोचवून परत येते आहे. म्हणून तुम्ही तुमचा तो सोन्याचे पाणी चढवलेल्या दागिन्यांची पेटी पोलीस ठाण्यावर जाऊन घ्या! हे लग्न मोडलं तर तेवढयाने आमचं मोठं नुकसान होणार आहे असं वाटून घेण्याचं मुळीच कारण नाही." असं म्हणत रागिणी घरात निघून गेली.

रागिणीच्या तोंडचे ते शब्द ऐकून उमेश व गौरी थक्क झाले आणि वरपिता मान खाली घालून तेथून निघून गेला.

त्या दिवशी संध्याकाळी रागिणी झाडांना पाणी घालण्यासाठी विहिरीतून पाणी काढीत होती तेव्हां तिचा होणारा पती तेथे आला व म्हणाला–"रागिणी, या सर्व भानगडीत माझ्या बाबांनी जे नाटक किंवा कारस्थान रचलं त्याची मला बिलकुल माहिती नव्हती. तुमचा जो अपमान झाला याबद्दल मी क्षमा मागायला आलो आहे. तू क्षमा करू शकलीस तर मी तुझ्याशी लग्नाला तयार आहे!"

नवरदेव म्हणाला ते ऐकून रागिणी लाजेने मान खाली करून उभी राहिली.





# गुन्हेगाराचा शोध

श्रावस्ती नगरीच्या सिंहासनावर प्रसेनजित नावाचा राजा राज्य करीत असता कोणत्या तरी दूर देशाचा रहिवासी एक ब्राह्मण आला. सुदैवाने त्याला एका वैश्य व्यापाराचा आश्रय मिळाला. त्याला दररोज अन्नवस्त्राबरोबर दक्षिणा व इतर भेटीच्या वस्तूही मिळत. तो ब्राह्मण होता एकटा, मग खर्च कसला? म्हणून थोडयाच दिवसात त्याच्या जवळ एक हजार सुवर्णमुद्रा जमल्या. त्या संभाळणे त्याला अशक्य झाले तेव्हां त्याने जंगलात एका जागी त्या पुरून ठेवल्या.

त्या ब्राह्मणाला कोणी जवळचे नातेवाईक नव्हते, म्हणून त्या ब्राह्मणाचे पंचप्राण त्या एक हजार सुवर्ण मुद्रातच सदैव गुरफटलेले असत. तो दररोज जंगलात एकदा तरी जाऊन त्याने जंगलात पुरून ठेवलेले धन कोणी चोरी करून तर नेले नाही हे पाहून मनाची खात्री करून येई.

एकदां त्याने नित्याप्रमाणे जंगलात जाऊन पाहिले तर तेथे सोने नव्हते. कोणी खणून चोरून नेले होते. तो दोन्ही हातांनी कपाळ बडवीत रडत वेडयासारखा राजधानीत परतला. भेटे त्याला तो त्याच्यावर गुदरलेल्या प्रसंगाचे वर्णन करून सांगु लागला. त्याचे सांत्वन कसे करावे कोणाला कळेना.

"माझं सर्वस्वच गेले, आतां मी जगून तरी काय करू?" असे म्हणत तो ब्राह्मण नदीच्या दिशेने पळत निघाला.

त्याच वेळी प्रसेनजित राजा नदीवर स्नान संध्यादि आटोपून बाहेर आला आणि आत्महत्या करायला निघालेल्या ब्राह्मणाला पाहून त्याने त्याचे कारण विचारले–"वेडया ब्राह्मणा! अशी आत्महत्या करून

घ्यायला कां निघाला आहेस? राज्यात कोठे चोरी झाली तर चोराचा शोध लावायला मी नाही का? मी गुन्हेगाराला पकडतो व तुझे धन देववितो. मला ते शक्य झाले नाही तर ते धन मी आपल्या खजिन्यातून देववितो. तू जेथे हे धन पुरून ठेवले होतेस त्या जागेवर खुणेसाठी काही ठेवले होतेस का?"

"महाप्रभो, मी धन पुरून ठेवले होते तेथे जंगली दोडक्याचा एक वेल होता. तीच खूण. आता तो वेलही त्या जागी नाही." ब्राह्मण म्हणाला.

"जंगली दोडक्याचा वेल ही काय खूण झाली? तसले वेल कित्येक असतील!" राजा म्हणाला.

"नाही, महाराज! त्या भागात तोच एक वेल होता." ब्राह्मण म्हणाला.

"बरं, असं सांग, तू त्या बाजूला जाऊन धन पुरल्याचे कोणाला ठाऊक आहे का?" राजाने विचारले.

"महाराज, माझ्या शिवाय आणखी कोणाला ते माहीत असण्याची शक्यताच नाही. माझा असा जगात आणखी आहेच कोण? मी दररोज इकडे जातो येतो हे देखील कोणी हिले असेलसे वाटत नाही." ब्राह्मण म्हणाला.

राजाने राजवाड्यास परतल्यावर बराच वेळ विचार केला आणि चोराला पकडण्याची युक्ती त्याला सुचली. मंत्र्याला बोलावून म्हणाला—"प्रधान, माझी प्रकृती बरी नाही. लवकर वैद्यांना दाखवून घ्यावे, म्हणतो. राजधानीतल्या सर्व लहान थोर वैद्यांना बोलवून घ्या." राजा म्हणाला.

लवकरच सर्व वैद्य राजवाड्यात दाखल झाले. राजाने एकेकाला बोलावून विचारले—"काय हो, तुम्ही काल किंवा आज कोण कोणत्या रोग्याला कोणकोणती औषधे दिलीत? कोणत्या वनस्पतींचा प्रयोग केलात?" प्रत्येकाकडून उत्तर मिळाले ते ऐकून राजाने त्यांना निरोप दिला. प्रधान ते सर्व पहात होता. परंतु राजा ते सर्व कशासाठी करीत आहे, त्याला कळेना.

शेवटी एक वैद्य येऊन म्हणाला—"महाराज, मातृदत्त नावाच्या एका श्रीमंत वाण्याला मी एक औषध म्हणून रानटी दोडक्याच्या वेलाचा रस पाजला होता." ते ऐकून राजाने जास्त उत्सुकतापूर्वक म्हटले—"अस्सं! तो वेल कोठे मिळाला?"

"जंगलात खूप फिरल्यावर एका शिष्याला तो मिळाला, महाराज!" वैद्य म्हणाला.

"तरमग तुम्ही त्या शिष्याला लवकर पाठवा माझ्याकडे!" राजा म्हणाला.

वैद्यबुवांचा शिष्य येताच राजाने त्याला विचारले—"कायरे, काल जंगलातून तू रानटी दोडक्याचे रोपटे उपटून आणलेस तेव्हां त्याच्याजवळच्या खड्ड्यात सोन्याची नाणी मिळाली ती काय केलीस?"

शिष्याची दातखीळच बसली. अडखळत म्हणाला—"घरात नेऊन ठेवली, महाराज!"





"ती एका ब्राह्मणाची आहेत, ती त्याची त्याला पोचती करायची आहेत. घेऊन ये." राजा म्हणाला.

"जो हुकूम महाराज!" असे सांगून शिष्य निघून गेला. हे सर्व पहात व ऐकत प्रधान जवळच उभा होता. त्याला हे कळले नाही की महाराजांनी चोरीचा शोध कसा लावला व चोर कसा सापडला. त्याने महाराजांनाच ते गुपित विचारायचे ठरविले.

"महाराज, आपण इतक्या सहजी चोराचा शोध कसा काय लावलात? मला नाही कळले ते!" प्रधान म्हणाला.

राजा स्मित करून म्हणाला—"चोरीविषयी त्या ब्राह्मणाने जे सांगितले त्यावर विश्वास बसताच मी चोराचा शोध लावायचे मनाशी ठरविले. राजधानीत लक्षावधी नागरिक आहेत, त्यांच्या पैकी कोणी एकाने ती चोरी केली असणार, नाही का! तेथे धन पुरलेले आहे, हे कोणाला माहीत नाही, असे ब्राह्मण सांगत होता. त्या विशिष्ट जागी धन आहे हे माहीत नसताना तेथे खणण्याची गरज कोणाला असणार? रानटी दोडक्याची गरज असलेली व्यक्तीच असणार!

"जवळ पास आणखी कोठेही रानटी दोडक्याचे रोपटे किंवा वेल नव्हता. ही गोष्ट सोने लपवून ठेवणाऱ्या ब्राह्मणानेच तर सांगितली. ते खरे असले पाहिजे याची मला खात्री होती. शिवाय फक्त धनलोभानेच कोणी ती जागा खणणारा असेल तर तो रानटी दोडक्याचे रोपटे तेथेच फेकून निघून गेला असता. दोडक्याच्या वेलासाठी खणणाराच कोणी त्या वेलाबरोबर धनसुद्धा घेऊन गेला असणार!

"तर रानटी दोडक्याच्या वेलाची एवढी गरज कोणाला असणार? वैद्यालाच! म्हणूनच मी सर्व वैद्यांना बोलविले. रानटी दोडक्याच्या वेलाचा उपयोग औषधीसाठी करणारा वैद्य कळताच चोर सुद्धा सापडला. यांत कठीण असे काय होते, प्रधान?"

ते सर्व ऐकल्यावर राजाच्या चातुर्याची प्रधानाने मनोमन खूप प्रशंसा केली.




वैदिक काळातील इंद्र

इंद्र नावाची व्यक्ती वैदिक काळात किंवा त्याच्या पूर्वी एक व्यक्ती म्हणूनच असावी, परंतु कालक्रमाने इंद्रत्व एका पदाचे नाव पडले. त्या पदावर आरूढ झालेल्या व्यक्तींत सुशांत, विभू, मनोज आणि अगदी अल्पकाळ टिकलेला नहुष वगैरे होते. असे सांगितले जाई की शंभर यज्ञ करणारी व्यक्ती इंद्रत्व प्राप्त करण्यास योग्य समजली जाई.

वैदिक काळातील इंद्र व पुराण काळातील इंद्र यांत बरेच अंतर दिसून येते. म्हणून वेदकाळातील इंद्र आणि पुराण काळातील इंद्र यांमध्ये इंद्रासंबंधी जे वर्णन आपल्याला मिळते त्यांची माहिती आपण निरनिराळी पाहूया.

वैदिक काळातील इंद्र हा भारतवासी लोकांना परम आराध्य होता. ऋग्वेदात इंद्राविषयी २५० सूक्ते आहेत. कोणत्याही इतर देवासंबंधी इतकी सूक्ते नाहीत. शिवाय ५० सूक्तांत इंद्राची स्तुती अंशतः गाईली गेली आहे. इराण देशातून भारतात आर्य आले त्या पूर्वी पासूनच इंद्र शब्दाचा प्रयोग आढळतो. त्याची उत्पत्ती किंवा व्युत्पत्ती कशी झाली, यासंबंधी माहिती मिळत नाही. हे सर्व वज्रधारी होते. नगरांचा संहार करणारे ते पुरंदर होते आणि दानवांचा नाश करणारे पण ते होते. पाण्याची सर्व बंधने तोडून ते मुक्त करणारे होते. युद्धात त्यांना पराभव माहीतच नव्हता.

वेदांत इंद्रांच्या अंगप्रत्यंगाचे वर्णन मिळते. त्यांना डोके, धड आणि हात होते. सोमपान करीत असतांना म्हणजे त्या संदर्भात त्यांच्या मोठ्या पोटाचे अनेक तऱ्हेने वर्णन केले गेले आहे. त्यांच्या ओठाचे विशेष वर्णन आहे (सुशिप्र). असे सांगतात की त्यांना आवेश चढला की त्यांची दाढी



खूप हलत असे. त्यांचे केस कपिलवर्णी असत. त्यांचा देहच कपिलवर्णी होता. त्यांच्या अंगाचा रंग सुवर्णासारखा होता, असेही वर्णन कोठेकोठे मिळते. त्यांचे हात लांब, बलवान व सुंदर होते. त्यांना वाटेल ते रूप धारण करता येत असे, म्हणजे ते कामरूपी होते. अत्यंत सुंदर रूप धारण करणे त्यांना सहज शक्य होते.

इंद्राला एक विशेष प्रकारचे वज्रायुध त्वष्टाकडून किंवा काव्य उशनकडून प्राप्त झाले होते. परंतु ऐतरेय ब्राह्मणात म्हटले आहे की देवांनी हे आयुध इंद्राला दिले होते. इंद्रायुधाचे वर्णन अनेक प्रकारे झाले आहे. ते लोखंडाचे (अयस) केलेले आहे, सोन्याचे आहे, चार कडा असलेले, शंभर कडा असलेले, हजार कडा असलेले आहे. तीक्ष्ण धार असलेले आहे. ते दगडाचे (अश्मन पर्वताचे) सुद्धा आहे. असेही म्हटले आहे की इंद्राजवळ धनुष्य व बाणही होते. त्याचे बाण सोन्याचे होते आणि त्याला शंभर टोके होती आणि हजार पिसे होती. यांशिवाय इंद्र समयानुसार अंकुश (अथर्ववेदात) आणि जाळे यांचाही प्रयोग करीत असे.

इंद्राचा रथ मनोवेगापेक्षा जास्त तीव्र-गतीने जात असे. इंद्राचे वर्णन 'रथस्थ' असे प्रामुख्याने केले गेले आहे. त्याच्या रथाला हरितवर्णी दोन घोडे जुंपलेले असत. (कोठे कोठे घोड्यांची संख्या शंभर, हजार आणि अकराशे अशी वर्णिलेली आहे). इंद्राचा रथ आणि घोडे यांची सृष्टी करणारे ऋभ होते.

तसे सर्व देव सोमपान करीत. परंतु इंद्राला मात्र सोमपानाचे व्यसनच होते. एका जागी असे वर्णन मिळते की इंद्राने सोमपानासाठी सोमरसाची चोरी सुद्धा केली होती. इंद्राच्या पाठोपाठ देवांत व मानवांत उल्लेख करण्यायोग्य सोमपानाचा व्यसनी वायू होता. सोमपान जास्त प्याल्यावर इंद्र आपल्या असामान्य शक्ती व शौर्याचे प्रदर्शन करी. असे वर्णन आहे की वृत्रासुराचा वध करण्यासाठी निघते वेळी इंद्राने तीन सरोवरांइतके सोमरस-पान केले होते. आणखी एका संदर्भात म्हटले आहे की इंद्राने एका घोटात ३० सरोवरांइतके सोमपान केले होते. (हे सरोवर केवढे होते नकळे).

इंद्राने स्वत: एका सूक्तात म्हटले आहे की सोमपान केल्यावर त्याला काय वाटते? सामान्य मानवाप्रमाणे जास्त मद्यपान केल्यामुळे आजारी पडल्यावर त्याचा इलाज करण्यासाठी इंद्राला 'सात्रायणी' यज्ञ करावा लागला होता. इंद्र दुधात मध घालूनही पीत असे.



इंद्र बैलाचे किंवा म्हशीचे मांस भक्षण करीत असे. वेदांत दोन संदर्भात दोन प्रकाराने वर्णन मिळते की त्याने शंभर व तीनशे रेड्यांचे मांस भक्षण केले होते.

३,४ मंडलात काही ऋचा आहेत ज्यांत इंद्राने आपल्या जन्माविषयी वर्णन केले आहे. इंद्राने आपल्या मातेच्या पोटी अनै-सर्गिक तऱ्हेने जन्म घेण्याचा विचार केला, त्याचा जन्म होताच सर्व आकाश दैदीप्यमान झाले. जन्मधारण करताच त्याने सूर्य-मंडलाला हालविले, युद्ध केले. त्यामुळे भिऊन पृथ्वी आणि पर्वत हादरले. सर्व देव त्याला भ्याले. एका जागी वर्णिले आहे की इंद्राची माता गाय आहे. तो गाईचे वासरू (गार्ष्टेय) म्हणून जन्मला. त्याच्या मातेचे नाव 'निस्टिग्री' असे वर्णिले आहे. सायणाचार्यांनी म्हटले आहे की अदिती याचा हाच अर्थ आहे. अथर्वण वेदात म्हटले आहे की इंद्र व अग्नीला जन्म देणारी नारी एकाष्टका (प्रजापतीची पुत्री) आहे. इंद्र व अग्नीचा पिता एकच होता.

इंद्राने आपल्या पित्याचे पाय धरून त्याला आपटून ठार केले होते.

अनेक स्थानी इंद्राच्या पत्नीचे नाव 'इंद्राणी' असे वर्णिले आहे. परंतु ऐतरेय ब्राह्मणात इंद्राला प्रसहा व सेना नामक दोन बायका होत्या. काही विद्वानांच्या मते

वेदसंहिता व पुराणांप्रमाणे सुद्धा शची हीच इंद्राची पत्नी होती. एका जागी असे वर्णन मिळते की इंद्र विलिस्तेंग नामक एका असुर स्त्रीवर मोहित झाला होता आणि असुरांमध्ये स्त्रियांबरोबर स्त्रीरुपात व पुरुषांबरोबर पुरुष रूपात रहात असे.

इंद्राचा आत्मीय आणि मित्र सहचर मरुत म्हणजे वायू होता. त्याने अनेक वेळी युद्धात इंद्राला मदत केली होती.

काही ठिकाणी संदर्भानुसार असे कळते की इंद्र हाच सूर्य आहे. एका जागी इंद्रच स्वत:ला मनू आणि सूर्य म्हणतो.

इंद्राचे मोठेपण व शक्तीची फार वाखाणणी झाली आहे. त्याची बरोबरी करू शकणारी व्यक्ती जन्मास आली नाही व होणार नाही. कोणताही देव त्याच्याहून मोठा होऊ शकणार नाही, बरोबरीसुद्धा करू शकणार नाही. त्याचा पराक्रम असामान्य आहे. त्याच्या आज्ञेचे पालन वरुण व सूर्य यांना करावे लागते. तो साऱ्या विश्वाचा अधिपती आहे. 'शक्र' शचीवत् शक्तिवत (शक्तिशाली) वगैरे शब्दांचा प्रयोग फक्त इंद्रासाठीच जास्त केला जातो. अनेक संदर्भात 'असुर' म्हणूनही त्याला संबोधन करण्यात आले आहे. (असे सांगतात की वैदिक काळाच्या सुरवातीला 'असुर' शब्द आदरसूचक होता. वरुण व अग्नीला उद्देशून सुद्धा त्या शब्दाचा प्रयोग झाला आहे.

सोमपान करण्याच्या उत्साहाने मरुत्-गणांना बरोबर घेऊन इंद्र वृत्राचा संहार करण्यासाठी गेला होता. वृत्र हा पाण्याचा अभाव करून दुष्काळ पाडणारा राक्षस होता. वृत्र याचा अर्थ बांध आहे. वृत्रचा अर्थ साप असाही सांगण्यात येतो. म्हणून असे सांगतात की इंद्र नद्यांचे बांध नष्ट करून नद्यांचे पाणी मोकाट सोडीत असे. पाण्याचा बांध म्हणून झालेली वृत्राची पाठ आणि तोंडावर इंद्राने वज्र प्रहार केला आणि त्यामुळे पाणी बेफामपणाने वाहू लागले. परंतु इंद्र वृत्रासुराचे युद्ध झाल्याचा प्रसंग कोठेही येत नाही.









...नावर भारतीय
...चे सुरम्यदर्शन.
...ुंदर गोष्टी, प्रोत्साहक
...हासिक शौर्यकथा आणि
...द्ध व्यक्तींची चरित्रे. शिवाय
...तील मजेदार माहिती.
...तीचे दर्शन घडते कहाण्यांतून,
...ष्टींतून, धार्मिक व पौराणिक
...तातील खूप सुधारलेले
...े संस्कार, चालीरीती आणि
...आधार सोडू शकत नाहीत.



भारताच्या प्रत्येक घरात मुलांना गोष्टी सांगितल्या जातात शौर्याच्या, धैर्याच्या, नीतीच्या आणि न्यायप्रियतेच्या, मुलांना ते गुण लाभावेत म्हणून, साधेपणाचे उच्च जीवन जगण्याची प्रेरणा मिळावी म्हणून.

या कथा-कहाण्या परपरेने तोंडोतोंडी सांगितल्या जातात, त्यातील फारच थोड्या शब्दबद्ध करून मुलांना वाचायला दिल्या जातात.

**चंदामामा** (प्रेमळ, परोपकारी, लाडका असा कहाणीतला मामा) १९४७ साली जन्माला आला, ही उणीव भरून काढण्यासाठीच, जुन्यानव्यातील अंतर तोडून मुलांना आपल्या संस्कृतीची माहिती व्हावी म्हणून हा मासिक उपक्रम.

त्यात भरपूर वाचन मिळते. अभारतीय लोकांनाही आवडेल असे, गंमत म्हणून सांगतो, **चंदामामात** आजवर ४३१० गद्य गोष्टी, १३३ पद्यकथा आणि १२० चालू गोष्टी—महाकाव्य, पुराण, अमर वाङ्मय, कथा, कहाण्या, अद्‌भुत गोष्टी आणि ऐतिहासिक जीवनचरित्र व इतिहास कथा, प्रसिद्ध झाल्या आहेत.

सध्या इंग्रजी धरून तेरा भाषांतून प्रसिद्ध होणारे मासिक **चंदामामा** त्या प्रकारचे सर्वात अधिक लोकप्रिय मासिक आहे.

***१,२०,००,००० मुले दर महिन्याला दाखवून देतात— चंदामामाची अमाप लोकप्रियता.***

चंदामामाचा खप आता ८,००,००० प्रतींवर्वत जात असून—घरं, शाळा व वाचनालयात—भारतात व दूर पूर्वेत सर्वत्र त्याचा संचार आहे.

कमीत कमी १५ जण तरी चंदामामाचा एक अंक वाचतात, असा अंदाज आहे.

# अलेक्झांडर, राजा पुरु

इ. स. पूर्वी चवथ्या शतकात मॅसिडो-नियाचा तरुण राजा अॅलेक्झांडर जगज्जेता व्हायला निघाला. हिंदुकुश पर्वताच्या दऱ्याखोऱ्यातून वाट काढीत त्याने आपले सैन्य घेऊन पंजाब व सिंधप्रांतात पाऊल टाकले.





तक्षशिला नगरीचा राजा आंभी पुरुचा शत्रू होता. त्याने अॅलेक्झांडरशी मैत्री केली. पुरु झेलम व चिनाब नद्यांच्या मध्यदेशाचा राजा होता.

पुरु राजाला कळले की आंभीची मदत घेऊन अॅलेक्झांडर त्याच्या राज्यावर स्वारीला येत आहे. तेव्हां तो युद्धाला तयार झाला












एके दिवशी अचानक वितस्ता नामक झेलम नदीच्या दोन्ही काठांवर दोन्ही देशांच्या सैन्यांचे युद्ध सुरु झाले.

अॅलेक्झांडरने एक उपाय केला. त्याने आपल्या सैन्यातील जास्त सैनिकांना नदीच्या काठाने पुष्कळ दूर नेऊन नदी पार केली आणि पुरु राजाच्या सैन्या-वर एकदम हल्ला चढविला.





अॅलेक्झांडरने पुरूच्या सैन्यातल्या हत्तींच्या वाटेस न जाता पाठीमागून पायदळ सैन्यावर हल्ला केला. राजा पुरूला स्वप्नातही त्याची कल्पना नव्हती. तरी त्याने शौर्याने आपल्या शिबिराचे रक्षण करण्याचा खूप प्रयत्न केला.

घोर युद्ध झाले. आंभीने अॅलेक्झांडरला गजसैन्याशी कसे युद्ध करावे हे सांगितले. अॅलेक्झांडर राजा व पुरूचे सैन्य याचे शौर्य पाहून थक्कच झाला.





राजा पुरु सैन्याचे संचालन स्वतःच करी. त्याने शत्रूला कधी पाठ दाख-विली नाही. त्याच्या मूठभर सैन्याने अफाट ग्रीक सैन्याला पराक्रमाने तोंड दिले.

राजा पुरूला त्याच्या हितैषी लोकांनी सल्ला दिला की त्याने युद्ध थांबवावे. परंतु त्याने ते मान्य केले नाही. युद्ध चालू ठेवले. त्याचे अंगरक्षक एक-एक करून धराशायी पडत गेले. तरी पुरु युद्ध करीत राहिला. अॅलेक्झांडर दुरून ते पहात होता.





अॅलेक्झांडरच्या सेनापतींनी पुरु राजाला चारीबाजूंनी वेढा घालून जेव्हां कैद केले तेव्हां त्याच्या अंगावर नऊ जखमा होत्या. तरी तो शेवटपर्यंत युद्ध करीत राहिला आणि त्याला बंदी करणाऱ्यां-पैकी एकाला त्याने ठार केले

राजा पुरूला मुसक्या बांधून अॅलेक्झांडर समोर आणण्यात आले. अॅलेक्झांडरने विचारले–"तुला माझ्या हातून कोणत्या गोष्टीची अपेक्षा आहे?" पुरु तत्काळ उत्तरला–"एका राजाला दुसऱ्या राजाकडून जो आदर व सत्कार होतो, मी त्याची अपेक्षा करीत आहे."





अॅलेक्झांडरने पुरूपेक्षा जास्त शूर व पराक्रमी अन्यत्र पाहिला नव्हता. त्याने आनंदाने पुरूला मुक्त केले आणि मैत्रीचा हात पुढे केला. त्यानंतर पुरूने एक स्वतंत्र राजा म्हणून राज्य केले.



# हुंड्यावांचून लग्न

लक्ष्मीबाई श्रीमंत होत्या, परंतु थोड्या चिकटच आणि बोलायला थोड्या वायफळ होत्या. पति निवर्तले, एकुलता एक मुलगा होता नांव रामचंद्र. आईच्या अगदी विरुद्ध होता मुलाचा स्वभाव. तो सुंदरही होता. आईच्या समोर तोंड उघडण्याची हिंमत नव्हती मुलात. रामूचे रूपलावण्य व पैसा पाहून गावातल्या कित्येकांनी त्याला आपली मुलगी द्यायचे ठरविले. परंतु लक्ष्मीने पंचवीस हजार हुंडा मागितला. तितका हुंडा देण्याची शक्ती नसलेले गावकरी कोणी स्थळाच्या चवकशीला आलं की ते लक्ष्मीच्या विरुद्ध त्यांचे कान भरून त्यांना परत पाठवीत.

लक्ष्मीला तशी शंका आली व ती मुलाला म्हणालीही–"अरे रामू, गावकरी काही ढवळाढवळ तर करीत नसतील?" रामचंद्र धीर करून म्हणाला–"एवढा हुंडा मागितला म्हणून गावकऱ्यांनी वैर धरलं की काय?"

लक्ष्मी विचारात पडली. म्हणाली–"यापुढे एक पैसादेखील मागणार नाही. हुंडाच नको असे सांगेन."

ते ऐकून रामचंद्राला खूप बरं वाटलं.

शेजारच्या एका गांवी पांडुरंगरावांना सहा मुली होत्या. सगळ्यात धाकटी जानकी, नक्षत्रासारखी सुंदर होती. थोरल्या पांच जणींची लग्ने करून देऊन एक पैसा-सुद्धा हुंडा द्यायला उरला नव्हता. मुलीचे रूप पाहून कोणी तिला मागणी घालील व एक पैसादेखील हुंडा मागणार नाही, अशी त्यांना आशा वाटत होती. परंतु ती आशा पुरी कशी होणार? हुंडा मिळणार नाही हे कळतांच काही आलेली स्थळे परतली.

पांडुरंगरावांच्या कानावर रामचंद्राच्या स्थळाची बातमी आली. त्यांनी लक्ष्मीला



आणि रामचंद्राला, मुलीला पहायला यायला कळविले. दोघांनी येऊन मुलीला पाहिले. जानकीला पाहून रामूला तिच्याशीच त्याचे लग्न व्हावे असे वाटू लागले. लक्ष्मीला ते स्थळ आवडले नाही. मुलीच्या आईच्या गळयात मंगळसूत्राच्या धाग्याशिवाय काहीच नव्हते.

"हुंडाबिंडा नको आम्हांला!" असं म्हणत थोडा वेळ थांबून लक्ष्मी म्हणाली– "मुलीला पंचवीस तोळयाचे सोन्याचे दागिने घाला, म्हणजे झाले."

पहिलं वाक्य ऐकून पांडुरंगरावांचं उचंबळून आलेलं मन दुसरं वाक्य ऐकतांच धपकन खाली बसलं.

रामू टचकला– "हुंडयाऐवजी असे पैसे काढणार आहे वाटतं आई?"

"ताई, मी गरीब आहे! एवढे सोने कोठून आणू?" पांडुरंगराव म्हणाले.

"सोनं मी माझ्या अंगावर का घालायला सांगते आहे? तुमच्याच मुलीच्या अंगावर नाही का राहणार ते?" असं म्हणत लक्ष्मी बाहेर आली.

आतां जानकी आपल्या नशिबात नाही असे वाटले रामूला. मनात आईला शिव्या देत रामू तिच्या पाठोपाठ चालू लागला.

घडलेला वृत्तांत जानकीच्या थोरल्या बहिणींना कळला. त्यांनी आपले दागिने धाकटया बहिणीला घालून लग्न उरकून घ्यावे व नंतर लक्ष्मीबाईंची समजूत घालावी असा सल्ला वडिलांना दिला.

"आपल्या इच्छेप्रमाणे मुलीला दागिने घालतो." असा निरोप पांडुरंगरावांनी लक्ष्मीबाईकडे पाठविला. एक सुंदरसूनबाई दागिन्यांनी मढून येणार या विचारानेच लक्ष्मीबाई फुलून गेल्या.

लग्नसमारंभ उरकला. सर्व दागिने घालून जानकी सासरी गेली. तिच्या दागिन्यांचे गुपित नवऱ्याजवळ तोंड उघडून सांगायला जानकी भीत होती.

दागिन्यांशिवाय सासरी गेलं तर यजमान काय म्हणतील, या भीतीने जानकीच्या

# अंधविश्वास

सुभाष श्रीमंत व सुशिक्षित होता. परंतु त्याच्या मनात एक अंधविश्वास खोल मूळ धरून बसला होता की शुक्रवारी काही खर्च केला तर लक्ष्मी घरात राहणार नाही.

एकदा तो आजारी पडला. रामशास्त्र्यांनी तपासून एक औषध लिहून दिले. परंतु त्या औषधाने आराम पडला नाही. म्हणून त्यांनी दुसरे औषध लिहून देत बजावले– "आजच औषध आणवून घ्या. उशीर केला तर जिवाला धोका आहे."

"अहो पण आज शुक्रवार आहे, आज खर्च कसा काय करायचा हो?" सुभाष व त्याची बायको म्हणाली.

रामशास्त्र्यांना त्या खुळेपणाचा भयंकर राग आला. म्हणाले– "डॉक्टरी सल्ला द्यायचा तो दिला. पुढे तुमची मर्जी! माझी फी तर द्याच, नाहीतर गांवभर या गोष्टीची चर्चा होईल, सांगून ठेवतो!"

नाइलाज होऊन सुभाषने रामशास्त्र्याला फीचे पैसे दिले. त्यानंतर औषध आणायचा असा विचार करून निघाला की नियम तर मोडलाच आहे, आणखी थोडा खर्च झाला म्हणून काय हरकत आहे? त्या प्रमाणे औषध घेऊन त्याची तब्येत पूर्णपणे सुधारली.

सुभाषचा जीव वाचल्याचा सुभाषपेक्षा रामशास्त्र्यांनाच जास्त आनंद झाला.



थोड्या वेळाने दाराची कडी वाजली. तिला वाटलं मुलगा परतला असावा. परंतु एक बुरखेवाला चोर घरात शिरला आणि सुरा दाखवून म्हणाला—"ओरडलीस तर खबरदार! तिजोरीच्या किल्लचा मुकाट्याने काढ!" लक्ष्मीबाईंनी कापऱ्या हातांनी किल्ल्याचं जुडगे पुढे केलं. चोराने लक्ष्मी-बाईंचे हात बांधले आणि तिजोरी उघडून दागिने काढून घेऊन पळून गेला.

थोड्या वेळाने रामचंद्रने येऊन विचारले—"काय ग, आई! तू दारे बंद नाही का केलीस?" नंतर आईला त्या करुण अवस्थेत पाहून तिचे सांत्वन करीत तिला मुक्त केले.

"अरे काय झाल, दाराचे कडी वाजली तर मला वाटलं, तू आलास. म्हणून दार उघडलं. परंतु चोर शिरला आणि सुरा दाखवून सर्व तिजोरी रिकामी केली आणि मला बांधून ठेवले." लक्ष्मीबाईंनी त्यांच्यावर गुदरलेला प्रसंग वर्णन करून सांगितला.

"दिवस पालटले आहेत, आई! नुसती कडी वाजली म्हणून का कोणी दार उघडतं?" असं म्हणत रामूने तिजोरीचे सर्व खाने तपासून पाहिले व म्हणाला—"अग आई! बरं झालं, तुझे सर्व दागिने जागच्या जागी आहेत. फक्त जानकीचे दागिने चोरीला गेले आहेत. ती दागिने घालून गेली असती तर बरे झाले असते. आपण सांगितलं की तिचे दागिने चोरीला गेले आहेत तर कोणी विश्वास करील का?" राजचंद्रने काळजी वाटल्याचे सोंग करीत विचारले.

"अरे, आम्ही काही हातात करवंटी धरली नाही अजून! मी उद्यां जानकीचे सर्व दागिने करवून घेते! ते चोरी गेल्याचे कोणाला कळतां कामा नये." लक्ष्मीबाई म्हणाल्या.

जानकीला मुलगा झाला. मुलाच्या बारश्याला लक्ष्मीबाई गेल्या होत्या व त्यांनी सुनेला सर्व दागिने स्वत:च्या हातांनी घातले.



# अंधविश्वास

सुभाष श्रीमंत व सुशिक्षित होता. परंतु त्याच्या मनात एक अंधविश्वास खोल मूळ धरून बसला होता की शुक्रवारी काही खर्च केला तर लक्ष्मी घरात राहणार नाही.

एकदां तो आजारी पडला. रामशास्त्र्यांनी तपासून एक औषध लिहून दिले. परंतु त्या औषधाने आराम पडला नाही. म्हणून त्यांनी दुसरे औषध लिहून देत बजावले—"आजच औषध आणवून घ्या. उशीर केला तर जिवाला धोका आहे."

"अहो पण आज शुक्रवार आहे, आज खर्च कसा काय करायचा हो?" सुभाष व त्याची बायको म्हणाली.

रामशास्त्र्यांना त्या खुळेपणाचा भयंकर राग आला. म्हणाले—"डॉक्टरी सल्ला द्यायचा तो दिला. पुढे तुमची मर्जी! माझी फी तर द्याच, नाहीतर गांवभर या गोष्टीची चर्चा होईल, सांगून ठेवतो!"

नाइलाज होऊन सुभाषने रामशास्त्र्याला फीचे पैसे दिले. त्यानंतर औषध आणायचा असा विचार करून निघाला की नियम तर मोडलाच आहे, आणखी थोडा खर्च झाला म्हणून काय हरकत आहे? त्या प्रमाणे औषध घेऊन त्याची तब्येत पूर्णपणे सुधारली.

सुभाषचा जीव वाचल्याचा सुभाषपेक्षा रामशास्त्र्यांनाच जास्त आनंद झाला.





# बायको की भूत?

बाळूचे लग्न नुकतेच झाले होते. त्याची बायको कमालीची आळशी होती. म्हणून पाणी भरण्यापासून सर्व कामे बाळूलाच करावी लागत. तो शिळ्याच भाकऱ्या खाऊन शेतावर जायला निघे तेव्हां पार्वती उठे, ऐन उन्हात सूर्य डोक्यावर आला की बाळू शेतातली कामे आटोपून घरी येई तोंपर्यंत पार्वतीचा सैंपाक झालेला असे. ती स्वत: खाऊन घेई आणि सैंपाक झाकून ठेवून पुन्हां झोपे. बाळू स्वत:च वाढून घेई आणि थोडा वेळ आराम करून पुन्हां शेतावर जाई. तो रात्री परत येई तोंपर्यंत पार्वती खाऊन पिऊन शेजार-पाजारच्या मैत्रिणींकडे गप्पा मारायला निघून जाई.

बाळूला तसे जवळचे कोणी नातेवाईक नव्हते. पार्वती सुंदर होती आणि आई-वडिलांची एकुलती एक मुलगी होती. म्हणून बाळूला तिचे स्थळ पसंत पडले होते आणि त्याने मागणी घालून पार्वतीशी लग्न केले होते. अर्थातच तो पार्वतीला कधी रागावत नसे. त्याचे सासुरवाड राम-नगराला होते. पायी गेले तर कमीत कमी पांच दिवस लागत त्या गावी पोचायला. म्हणून आलं मनात की निघालं, इतके सोपे नव्हते जाणंयेणं.

काही दिवसांनी पार्वतीच्या आईवडि-लांनी मुलीला माहेरी चार ॰दिवस पाठवा-यला कळविले. पोचवायला दुसरं कोणी जाणे शक्य नव्हते. म्हणून बाळू स्वत:च बायकोला पोचवून आला. प्रवासातच दहा दिवस निघून गेले. शिवाय सासऱ्याने आग्रह करून जावयाला दोनतीन दिवस रहायला सांगितले. बाळूने परत येऊन पाहिले तर शेतातली कामे तुंबून पडून राहून गेली होती· ती पुरी व्हायला पुरा एक आठवडा लागला.

त्यानंतर दहा दिवसांनी बाळू काही कामासाठी शेजारच्या गावी गेला होता. परत येत असतां त्याला पार्वती एक नवी पेटी घेऊन परत येत असलेली दिसली. तो तर थक्कच झाला.

"तू एकटीच कशी काय आलीस? तुला येथवर पोचवायला बरोबर कोणी येणे शक्य नव्हते, तर मला कां नाही कळविलेस?" बाळूने विचारले.

"तुम्हांला सोडून मला माहेरी राहवले नाही. शेजारच्या गावापर्यंत एकजण येत होते, म्हणून मी त्यांच्या बरोबर आले." पार्वती म्हणाली. त्यानंतर दोघं गप्पा मारीत घरी आली.



पार्वतीने उत्तम सैंपाक केला व नवऱ्याला वाढले. त्यापूर्वी तिने इतका चांगला सैंपाक कधीच केला नव्हता. म्हणून बाळू आश्चर्य-चकित झाला व त्याला आनंदही झाला.

दुसऱ्या दिवशी उठल्याबरोबर बाळूला हे पाहून आश्चर्य वाटले की दारासमोर सडा व झाडलोट झालेली होती आणि डोणी पाण्याने भरलेल्या होत्या. दूध तापलेले होते. तो न्याहारीला बसला, तेव्हा पार्वती समोर बोलत बसली होती.

पार्वतीत झालेला तो बदल पाहून त्याला परमानंद झाला. पार्वती दररोज चांगला सैंपाक करू लागली व नवऱ्याबरोबर शेता-वर कामालाही जाऊ लागली. म्हणून तो आठवडा बाळूला केव्हा गेला हे कळलेच नाही. एके दिवशी मध्यरात्री बाळूची झोप मोडली. त्याची बायको तिच्या खाटेवर नव्हती. त्याने खाटेवरच बसून खिडकीतून बाहेर परसात पाहिले. चांदणी रात्र होती. परंतु त्याचा त्याच्या डोळ्यावर विश्वासच बसेना. पार्वती नुसते हात हालवी. बालडी आपोआप विहिरीत जाई व पाणी वर येऊन डोणीत पडे. त्यानंतर केरसुणीच परसात केर काढीत होती.

ते दृश्य पाहून बाळूचे दोन्ही पाय गोठल्यासारखे झाले. पार्वतीचे काम पुरे होऊन ती परत आली तोंपर्यंत बाळू खाटेवर



पडला होता. झोपल्याचे सोंग करीत होता. मध्यरात्रीच सर्व कामे करून टाकून पार्वतीने बाळूच्या चेहऱ्याकडे निरखून पाहिले. नवरा जागा नव्हता. झोपला असल्याची खात्री झाल्यावर पुन्हां आपल्या खाटेवर झोपली.

दुसऱ्या दिवशी शेतावरून परतल्यावर कोणत्यातरी भूत मांत्रिकाला पार्वतीच्या विषयी सल्ला विचारावा असे बाळूने ठरविले होते, परंतु बांधावरून चालत येत असलेल्या सासऱ्याला पाहून बाळू चक्कच झाला.

"तुम्ही इकडे कसे काय? सासुबाईंची तब्येत वगैरे ठीक आहे ना? तुम्हांला पाहून पार्वती चकित होईल!" बाळू सासऱ्याला म्हणाला.

"काय म्हणालात, पार्वती चकित होईल? बाळोबा, अहो, तुम्ही काय म्हणतां आहां, ते मला कळलेच नाही!" सासऱ्याने चकित होऊन म्हटले.

"पहिल्याने घरी तर चला, तेथेच काय ते बोलू!" असे सांगून बाळू सासऱ्याला घेऊन घरी परतला.

दाराची कडी वाजवतांच पार्वतीने दार उघडले. तिला पाहतांच पार्वतीचा बाप मोठ्याने ओरडला—"अग मुली, पार्वती!" आणि त्याला भोंवळ आल्या-सारखे झाले आणि तो खाली पडला.

तो आवाज ऐकून शेजारपाजारची मंडळी गोळा झाली.

त्याच्या तोंडावर पाणी शिंपडण्यात आले. तेव्हां शुद्धीवर येऊन म्हणाला—"अग मुली, तू आपले वचन पाळलेस का?"

तो काय म्हणत होता, कोणत्या संदर्भात म्हणत होता, कोणालाच कळले नाही. परंतु बाळूचा सासरा असे म्हणत घरात आला—"ओहो! मला वाटले होते, माझी मुलगी आम्हांला कायमशी सोडून गेली. पहिल्याने मी तिच्याशीच बोलणार आहे!" त्याच्या पाठोपाठ सर्व लोक घरात गेले.

पार्वती बेशुद्ध होऊन खाटेवर पडलेली होती. कोणी तिच्या तोंडावर पाणी शिंपले तेव्हां ती शुद्धीवर आली. चारीबाजूला जमलेल्या लोकांना पाहून घाबऱ्या आवाजात ती म्हणाली—"येथे कशी काय आले?"

"अग मुली, मी रघुनाथ, तुझा बाबा!" बाळूचा सासरा म्हणाला.

पार्वतीने बाळूला विचारले—"काय हो, हे सर्व काय आहे? मला तर सर्व विचित्रच दिसते आहे!"

बाळूसुद्धा चकित होऊन तिच्या तोंडाकडे पहात राहिला. तेव्हां रघुनाथ म्हणाला—"बाळोबा व पार्वती! तुम्ही दोघांनी मुळीच बाबरण्याचे कारण नाही. काय घडले ते मी तुम्हांला आता सांगतो, ऐका. बाळोबा, तुम्ही पार्वतीला माहेरी सोडून परतलात त्याच्यानंतर दोन दिवसांनी आम्ही दोघं आईवडील पार्वतीला घेऊन आठवड्याच्या बाजाराला गेलो. परत येतांना ती थट्टेत सांगू लागली इकडल्या गोष्टी. त्यावरून आम्हांला वाटलं की ही तुम्हांला सुख द्यायच्या ऐवजी दुःखच देत असावी. तिला आम्ही तिच्या त्या वागण्याबद्दल खूप बोललो आणि तसं वागू नये असे तिला खूप समजावून सांगितले. नंतर आम्ही गावच्या स्मशानापर्यंत आलो तेव्हां पार्वती तितक्यात दुसऱ्या एका बाईसारखी होऊन म्हणाली—"बाबा, मी आपल्या पतीला सुखी करीन." मी तिला विचारले—"मुली, पण तुझा आवाज असा बदलेला का?"











ती म्हणाली–"बाबा! मी बदलले आहे." तिला पाहून आम्हांला वाटले की तिच्या अंगात कोणाचा तरी आत्मा शिरला असावा. तिला कळू न देता आम्ही काही भस्मं वगैरेंचा प्रयोग केला. एके दिवशी ती अचानक नाहीशी झाली. आमच्या गावाच्या नदीकाठावर कोणाला तरी पार्वतीची साडी चोळी सापडली. आम्हांला वाटलं की तिने जीव दिला व आम्ही खूप रडलो. आजपर्यंत ही गोष्ट तुम्हांला कळवायला आम्हांला धीर होत नव्हता. शेवटी हिय्या करून मी तुम्हांला हे सर्व कळवायला घरून निघालो."

"बाबा! तुम्ही म्हणतां, हे सर्व खरे आहे का?" पार्वतीने चकित होऊन विचारले.

ते ऐकून बाळू म्हणाला–"होय, खरे आहे. मला सुद्धा खरी गोष्ट कालच कळली. माझ्या मनात हे सर्व काय आहे, हे पडताळून पहावयाचे होते व मी मांत्रिकाकडे जाण्याच्या विचारात होतो, परंतु मी शेतावर जाऊन पाहातो तर तुझे बाबा! तुला पाहताच तुझ्या अंगात जे भूत शिरले होते ते पळून गेले असावे! ते भूत आपल्या नवऱ्याला सुख द्यायला निघाले असावे. बापाला दिलेल्या वचनाचे पालन करण्यासाठी ते भूत पतीला सुखी करायला आले असावे. तुझ्या आईवडिलांना वाटले की तुझ्या अंगात कोणाचा तरी आत्मा शिरला. म्हणून तू त्यांना सांगितल्याशिवाय एकटी निघून गेलीस. तू मेल्याची अफवा उडावी म्हणून त्या आत्म्याने कदाचित तुझे कपडे नदीकाठी टाकले असावेत. त्याच्या मनात तुझ्या अंगातच कायम राहण्याचा विचार होता, कदाचित!"

नंतर एकांतात बाळू बायकोला म्हणाला–"तुझ्याहून ते भूतच कितीतरी चांगले होते. तुला कल्पना नसेल ते माझी किती सेवा करीत होते ते!" या शब्दात बाळूने पार्वतीला सर्व वृत्तांत सांगितला.

त्या वेळेपासून पार्वती त्या भुतापेक्षा जास्त चांगल्या तऱ्हेने नांदू लागली आणि पतीला सुखी करू लागली.





# पद्मावती

सिंहल देशाचा राजा बृहद्त याला पद्मावती नावाची एक मुलगी होती. ती लहानपणापासूनच शंकराची आराधना करीत असे. एकदां शंकराने प्रसन्न होऊन तिला दर्शन दिले व म्हणाला–"विष्णूचा अंश असलेली कोणीतरी व्यक्ती तुझा पती होईल. तसं न होतां कोणी पुरुष तुझ्याशी विवाहाची इच्छा ठेवून आला तर तो स्त्री होईल."

पद्मावतीने ती गोष्ट कधी कोणाला सांगितली नाही. कित्येक वर्षे लोटली. पद्मावतीचे लग्नाचे वय झाले. तिच्या पित्याने तिच्या स्वयंवराची तयारी केली आणि राजेरजवाड्यांकडे दूत पाठवून स्वयंवर असल्याचे कळविले.

देशोदेशीचे राजे व राजकुमार पद्मावतीशी विवाह करण्याच्या हेतून स्वयंवराला हजर झाले. परंतु पद्मावती स्वयंवर मंडपात येतांच त्या सर्वांना स्त्रीरूप प्राप्त झाले. अशा तऱ्हेने शंकर म्हणाला होता त्या पैकी अर्धी गोष्ट सत्य ठरली. परंतु पूर्ण गोष्ट सिद्ध होऊ शकली नाही. कारण विष्णूचा अंश असलेला पुरुष त्या स्वयंवराला आलेला नव्हता.

पद्मावतीच्या पित्याने दोनतीनदां पद्मावतीसाठी स्वयंवर रचले. परंतु स्वयंवराला आलेले सर्व पुरुष स्त्री झाले.

पद्मावतीला आतां फार काळजी वाटू लागली की कदाचित तिचे लग्नच व्हायचे नाही. एकदां ती राजोद्यानात बसली होती. त्याच वेळी एक पोपट कोठून तरी उडत आला आणि माणसांसारखा बोलू लागला–"राजकन्ये, तू अशी चिंता कां करीत बसली आहेस? तुझा पती कामदेवासारखा सुंदर तरुण आहे. मी त्याला तुझ्या जवळ घेऊन येतो."

पोपटाच्या तोंडचे ते शब्द ऐकून पद्मावतीला आश्चर्याबरोबर आशा वाटू लागली की उरलेले अर्धे आतां खरे ठरण्याची लक्षणे दिसू लागली आहेत.

पण हा पोपट कोण बरे असावा ?

कंबलपूर येथे विष्णुयश व सुमती नावाचे एक जोडपे रहात असे. त्याला कल्की नावाचा एक मुलगा झाला. त्याने परशुरामाकडे सर्व विद्या शिकून घेतली. तो सुद्धा पद्मावतीसारखाच शिवभक्त होता.

त्याच्या भक्तीवर प्रसन्न होऊन शंकराने त्याला दर्शन दिले आणि एक घोडा, एक खड्ग आणि एक पोपट दिला.

तोच पोपट चिंतामग्न बसलेल्या पद्मावतीला भेटून तिच्याशी बोलला. तिला कल्कीचा वृत्तांत त्याने सांगितला. नंतर परत येऊन कल्कीजवळ पद्मावतीचे वर्णन करून म्हणाला–"राजकुमार, सिंहल राजाची मुलगी पद्मावती एक अपरूप सुंदर स्त्री आहे. तिच्याहून सुंदर स्त्री जगात कोठे मिळणे शक्य नाही."

ते ऐकून कल्कीने तिला पाहण्या पूर्वीच तिची मूर्ती आपल्या हृदयात बसविली. नंतर तो सिंहलद्वीपाकडे निघाला. पद्मावती राजोद्यानात स्नानाला गेली होती. तेथे तो तिला जाऊन भेटला.

पद्मावतीने त्याच्याकडे पाहिले तरी त्याला स्त्रीरूप न मिळालेले पाहून पद्मावतीला वाटले की शंकराच्या वरदानापैकी उरलेले वरदान पूर्ण होण्याची वेळ येऊन ठेपली आहे. तिने पित्याला ती गोष्ट कळविली.

राजाला परमानंद झाला. ठरल्या मुहूर्तावर पद्मावती व कल्कीचा विवाह थाटामाटाने पार पडला. त्या शुभ समयी जे पुरुष दुर्भाग्यवश स्त्री झाले होते त्यांना कल्कीने रेवा नदीत स्नान करण्याचा सल्ला दिला. त्या प्रमाणे त्यांनी रेवा नदीत स्नान केले व त्यांना पुन्हां पुरुष रूप प्राप्त झाले.

कल्कि हा कलीला निर्मूल करण्यासाठी जन्मलेला विष्णूचा अवतारच होता.






कार्तवीर्यचा जन्म हैहय वंशात झाला होता. तो शूर व पराक्रमी होता. त्याला एक हजार हात होते. म्हणून त्याला सहस्र बाहू असेही नाव होते. त्याने असंख्य यज्ञ केले आणि अत्यंत उदारपणाने त्याने दान धर्म केला. त्याच्या गुरूचे नाव दत्तात्रेय होते. त्याचे पौराहित्य भृगु करी. म्हणून कार्तवीर्याकरवी अनेक यज्ञ करवून भृगु फार श्रीमंत झाला होता. त्याच्याजवळ अपार धनवैभव होते.

कार्तवीर्य वारल्यानंतर त्याचे वंशज दारिद्र्य भोगू लागले आणि त्यांनी आपले पुरोहित भृगुवंशीय यांच्याकडे याचना केली. परंतु भृगु वंशियांना धन देणे आवडले नाही. म्हणून त्यांनी आपले धन जागोजागी पुरून ठेवले व स्वतः गुहांत जाऊन लपून बसले.

हैहयवंशीयांनी भृगुवंशीयांचा पुष्कळ शोध केला. ब्राह्मण वस्ती निर्जन झालेली दिसली. त्यांनी घरांत शिरून जमिनी खणून पाहिल्या तेव्हां त्यांना अपार संपत्ती मिळाली. भृगुवंशीयांचा शोध लागल्यावर हैहयवंशीयांनी त्यांच्यावर आपला राग काढला आणि त्यांची कत्तल केली. त्यांच्या गरोदर स्त्रियांनासुद्धां सोडले नाही व त्यांच्या गर्भातील शिशूंचाही वध केला.

हे हिंसाकांड त्या प्रदेशात राहणाऱ्या ऋषी मुनींना पाहवले नाही. ते हैहयवंशियांना म्हणाले–"तुम्ही ही क्रूरवृत्ती सोडली पाहिजे. ब्राह्मण वंशाचा अशाप्रकारे संहार



करणे घोर पाप आहे. बायकांच्या गर्भातील अर्भकांचा वध करणे घृणित कार्य आहे. या पापाचे फळ तुम्हांला भोगावे लागेल.

हैहयवंशी त्यांना सांगू लागले—"तुम्ही सर्व थोरपुरुष आहां, परंतु भृगुवंशयांनी आमच्या पूर्वजांकडून जे अपार धन संपादन केले ते पुरून कां ठेवले? चोरांसारखे हे वागले. चोरांचा वध करणे पाप होईल का? आमचे पूर्वज कार्तवीर्य यांनी जे धन भृगूला दिले ते त्यांच्या मुलांनी पुरून ठेवावे म्हणून दिले होते का? यज्ञाचे पौराहित्य करून ब्राह्मणांना जी धनप्राप्ती होते तिचा उपयोग सुख भोगण्यासाठी त्यांनी करावा का? की निर्धन व गरीबांना दान करून पुण्य संपादन करावे. ते धन राजा, चोर किंवा अग्नी हरण करणार नाही का? शिवाय जो कोणी धन चोरून लपवून ठेवतो त्याला नरकप्राप्तीच होते. आम्ही आमचे हे पुरोहित म्हणून यांच्याकडे याचना केली. परंतु यांनी आम्हांला धन दिले नाही व पुरून ठेवले. अशा नीच व क्षुद्र व्यक्तींना दंड देणे हा अपराध झाला का?" या शब्दांत ऋषी मुनींना उत्तर देऊन कार्तवीर्याच्या मुलांनी भृगुवंशी गरोदर स्त्रियांच्या पोटांतील अर्भकांचा संहार चालू ठेवला.

तेव्हां त्या भृगुवंशी स्त्रिया हिमालय पर्वतात पळून गेल्या. धनलोभ मानवाकडून वाटेल ते काम करवितो. मानवाचा तो फार मोठा शत्रू आहे. लोभ, कामक्रोधादी शत्रूंपेक्षां भयंकर असतो.

हिमालय पर्वतात गेल्यावर भृगुवंशीय स्त्रियांनी गौरीसारख्या मातीच्या मूर्ती केल्या आणि नदीकाठी त्यांची स्थापना करून मृत्यूची वाट पाहू लागल्या.

एके दिवशी रात्री त्यांना स्वप्नात गौरीचे दर्शन घडले. देवी म्हणाली—"तुमच्यापैकी एकीच्या मांडीतून माझा अंश जन्म घेईल आणि तुमचे रक्षण करील." भृगुवंशी स्त्रियां झोपेतून जाग्या झाल्यावर त्यांना फार आनंद झाला.

त्यांच्यापैकी एकीच्या मांडीत खरोखरीच एक गर्भ होता व पुत्ररूपे जन्मला. तो सूर्यासारखा तेजस्वी होता. ज्या क्षत्रियांनी त्या मुलाला पाहिले त्यांचे डोळे दिपूनच गेले नाहीत तर कायमचे फुटले. ते त्या मुलाच्या मातेला म्हणाले—"माते! आम्ही तुला पाहिले आणि लगेच आम्हांला अंधत्व आले. तुझा थोरपणा आम्हांला कळला नव्हता. आमच्यावर अनुग्रह करून पुन्हां आम्हांला दृष्टी प्रदान कर. या अंधत्वापेक्षा मृत्यु चांगला. यापुढे आम्ही ही क्रूर कृत्ये बंद करतो. भृगुवंशियांच्या उपकाराबद्दल कृतज्ञ राहूं. आम्ही मूर्खपणाने जे अपराध केले आहेत त्यांच्याबद्दल आम्ही माफी मागतो, आम्हांला नेत्रदान कर. तू व तुझा मुलगा सुखपूर्वक राहील."

ती स्त्री हैहयवंशियांचे बोलणे ऐकून चकित झाली. म्हणाली—"तुम्हांला अंधत्व कां आले, हे मला माहीत नाही. मला वाटते, माझ्या मुलानेच तुम्हांला अंधत्व दिले आहे. तुम्ही दुष्टपणा केलात. धन लोभाने तुम्ही ब्रह्महत्या केलीत त्याचे फळ तुम्ही भोगता आहां. तुम्ही भ्रूणहत्या केलीत, वृद्ध ब्राह्मणांचा निर्दयपणे वध केलात. म्हणून तुमचे पारिपत्य करण्यासाठीच या मुलाचा जन्म झाला आहे. जगदंबेच्या अनुग्रहाने हा माझ्या मांडीतून जन्मला आहे. त्याच्या पितरांना ज्या तऱ्हेने मृत्युमुखी पडावे लागले त्याबद्दल या मुलाला भयंकर





राग आला आहे. म्हणून तुम्ही या बालकाचे पाय धरा व त्याचा कोप शांत करा. तरच तुम्हांला दृष्टिलाभ होईल."

मांडीला ऊरु असेही म्हणतात. म्हणून त्या मुलाचे नाव और्य पडले. हैहयवंशीयांनी त्या मुलाजवळ माफी मागितली. और्य शांत होऊन म्हणाला—"मी देवाचा निर्णय बदलू शकत नाही. तिच्या इच्छेप्रमाणे जी कार्ये संपन्न होतात त्यांच्याविषयी ज्ञानी पुरुष चिंता करीत नाहीत. यापुढे ऋषी मुनींना त्रास देऊ नका आणि आतां जा."

त्यानंतर हैहयवंशीयांना पुन्हां दृष्टी प्राप्त झाली. और्य त्याच्या आईच्या देख-रेखीखाली आश्रमातच वाढला.

भरतवंशाचा मूळ पुरुष भरत होता. यादववंशाचा मूळपुरुष यदु होता. तशीच हैहयवंशियांसंबंधाने सुद्धा एक कथा आहे. सूर्याच्या एका मुलाचे नाव रेवंत होते तो एका उच्चैःश्रवा नामक घोड्यावर बसून विष्णूच्या दर्शनास वैकुंठलोकी गेला.

लक्ष्मी आपला भाऊ (समुद्रमंथनाच्यावेळी लक्ष्मीबरोबर उच्चैःश्रवा जन्मला होता) उच्चैःश्रवा याला आणि त्याच्याबरोबर त्याच्यावर बसून येणाऱ्या एका सुंदर तरुण युवकाला पाहून त्याच्याकडे पहात राहिली.

"त्रिलोकात दुर्मीळ असे रूपलावण्य असलेला एक तरुण युवक घोड्यावर बसून येतो आहे, त्याला तू ओळखलेस का?" विष्णूने लक्ष्मीला विचारले.

परंतु लक्ष्मी रेवंतच्या रूपलावण्यावर भाळली होती. म्हणून तिला पतीने विचारले ते ऐकूच आले नाही. विष्णूने लक्ष्मीच्या मनाची ती स्थिती ओळखली आणि रागाने तिला शाप दिला—"तू अशी टक लावून कोणाकडे पहात आहेस? त्या घोड्याला पाहून तुझे मन त्याच्याकडे आकर्षिले गेले आहे. तू रति व रमा नावांनी ओळखली जाऊन चंचलचित्ता म्हणून तुझी अपकीर्ती होईल. भूलोकात एका घोडीच्या रूपे तू जन्म धारण कर."



तो शाप ऐकून लक्ष्मी भ्याली. ती रडू लागली आणि विष्णूचे पाय धरून त्याला म्हणाली—"तुम्ही इतक्या निर्दयपणे मला हा शाप दिलात. माझ्या या क्षणिक चंचल-पणाचा तुम्हांला इतका राग आला आणि माझ्यावरचे तुमचे स्वाभाविक प्रेम कायमचे नष्ट झाले का? तुमचे हृदय लोण्यासारखे मऊ आहे. तुम्ही कधी शाप दिला नाही. मग आज अचानक असे कां मन बदलले? तुमचा विरह मला सहन होणार नाही व मी तत्काळ प्राण त्याग करीन. कृपा करून शापमुक्तीचा उपाय करावा."

तेव्हां विष्णूचे मन विरघळून गेले. तो लक्ष्मीला म्हणाला—"तुझ्या पोटी माझ्या आकृतीचा पुत्र जन्मल्याबरोबर तुला शाप-मुक्ती प्राप्त होईल व तू माझ्याकडे परत येशील."

रेवंतने विष्णू रागावला असल्याचे तत्काळ ओळखले आणि विष्णूला प्रणाम करून विष्णूचा निरोप घेतला व आपल्या पित्याकडे परतला. त्याने पित्याला घडलेला वृत्तांत सांगितला. लक्ष्मीसुद्धा आपल्या पतीचा निरोप घेऊन सुवार्णाक्ष नामक स्थानी आली व शंकराचे स्मरण करून घोडीरूपे तपश्चर्या करू लागली.

तिच्या तपश्चर्येवर प्रसन्न होऊन शंकर आपल्या वृषभवाहनावर पार्वतीसह बसून



आपल्या गणांसह आला व म्हणाला—"माते, तू माझे स्मरण करून कां तपश्चर्या करीत आहेस? मागेल ते देणारा विष्णु तुझा पती. पतिव्रता नारीला पतीहून थोर दैवत नाही. शिवाय तुझा पती म्हणजे कोणी सामान्य पुरुष नाही?"

"महादेवा! तू म्हणतोस ते सर्व खरे आहे. परंतु दुर्दैवाने माझ्या पतीनेच मला शाप दिला आहे. त्या शापातून मुक्ती तुझ्या अनुग्रहानेच लाभेल. असा विचार करून मी तुझे स्मरण करून तपश्चर्या केली. मला माझ्या पतीनेच सांगितले की माझ्या पोटी एक पुत्र जन्मल्यावरच मला शापमुक्ती लाभेल. परंतु पुत्रप्राप्ती कशी



होईल, हे तू सांग. माझे पती तर वैकुंठ लोकात आहेत. मी या जंगलात एकटी आहे. मला पुत्रप्राप्ती कशी होईल? माझ्या तपश्चर्येमुळे तू माझी इच्छा पूर्ण कर. तू आणि माझे पती यात अंतर काय? तुझे स्मरण केले तर त्यांचे स्मरण केल्यासारखेच तर आहे! म्हणून तू असा काही मार्ग काढ की माझे पती मला येऊन भेटतील." घोडीच्या रूपात असलेल्या लक्ष्मीने निवेदन केले.

तेव्हा शंकर म्हणाला–"तू काळजी किंवा चिंता करण्याचे कारण नाही. तुझा पती अश्वरूपे तुझ्याकडे येईल. तुला एक मुलगा होईल. त्याचे राज्य त्रिलोकात स्थापन होईल. त्याचे नाव एकवीर होईल. त्याच्यापासून हैहय वंशाचा प्रारंभ होईल. त्यानंतर तू व तुझे पती वैकुंठलोकी सुखासमाधानाने रहाल. तुला हे कष्ट सहन करावे लागत त्याचे मूळ कारण तू त्या पराशक्तीला ओळखून तिची आराधना केली नाहीस हे होय!" असे सांगून शंकराने कैलासलोकी प्रस्थान केले. तेथे पोचल्यावर चित्ररूप नामक आपल्या एका गणाला आज्ञा केली–"तू वैकुंठ लोकी जा आणि विष्णूला भेटून सांग की त्याने त्याच्या पत्नीचे दुःख दूर करावे. हेही सांग की मी हा जो निरोप पाठविला आहे, त्याच्या मुळाशी तुम्हां पतिपत्नींवरचे प्रेम व भक्ती आहे!"

शंकराच्या आज्ञेने चित्ररूप वैकुंठलोकी गेला. विष्णूचे द्वारपालक जयविजय यांना त्याने शंकराचा निरोप घेऊन आल्याचे कळवायला सांगितले.

जयने आत जाऊन विष्णूला सांगितले. म्हणाला–"भगवान् शंकराचा दूत चित्ररूप आला आहे. मी त्याला आत पाठवू का?" त्याने त्याला लगेच घेऊन यायला सांगितले.

चित्ररूपने आत प्रवेश करून विष्णूला प्रणाम केला व कुशलवार्ता सांगून म्हणाला–"प्रभो! महादेवाने आपणाला हा निरोप सांगायला आज्ञा केली आहे–'आपल्या पत्नी सौभाग्यवती लक्ष्मी घोडीच्या रूपे कालिंदी व तमसा नद्यांच्या संगमस्थानी ध्यानमग्न

होऊन बसल्या आहेत. लक्ष्मीची आराधना सर्वच देव करतात. तिच्या अनुग्रहाशिवाय कोणी मानव सुखी होणे शक्य नाही. अशी सौभाग्यवती दूर असतां आपणांला तरी तो विरह कसा सहन होतो? सामान्य गृहस्थ सुद्धा पत्नीशिवाय सुखी नसतो. म्हणून माझ्याखातर आपण लक्ष्मीला भेटून तिचे सांत्वन करावे. दक्षयज्ञसमयी जेंव्हां मला पत्नीचा विरह सहन करावा लागला तेंव्हां पत्नीवियोगाचे जे दु:ख असते त्याचा अनुभव मला आला. म्हणून कोणालाही पत्नीवियोग सहन करावा लागला तर त्याचे दु:ख मला होते. आपण पत्नीपासून फार दिवस दूर आहां. या अवधीत आपणांला काय सुख लाभले? म्हणून आपण वेळ न घालवितां घोड्याच्या रूपे पत्नीला जाऊन भेटावे."

तो निरोप कळल्यावर विष्णू अश्वरूप घेऊन लक्ष्मीकडे गेला. दोघांना एक मुलगा झाला. विष्णू लक्ष्मीला म्हणाला–"आतां आपण वैकुंठलोकी परतू या. आपण या मुलाला येथेच सोडून जाऊ या. तू घोडीचे रूप सोडून दे!"

"कोणी स्त्री तिच्या पोटी जन्मलेल्या मुलाचा असा त्याग करते का? या नदी काठावर या मुलाचे रक्षण कोण करणार?" असे लक्ष्मीदेवी म्हणतच होती, तेवढ्यात तिला दिव्यरूप प्राप्त झाले. तिला न्यायला विमानही आले.

लक्ष्मी आपल्या मुलाला पोटाशी धरून म्हणाली–"हा मुलगा तर सर्व तऱ्हेने तुमच्या सारखाच आहे! मी याला सोडून जाणार नाही. आपण तिघं जाऊ या."

"या शिशूच्या हस्ते एक कार्य सिद्ध व्हायचे आहे. ययातीला तुर्वसु नामक एक मुलगा आहे. तो पुत्रप्राप्तीसाठी तपश्चर्या करीत आहे. त्याने या मुलाला घेऊन त्याला वाढवावे. तुर्वसूकडे पोहोचेपर्यंत या मुलाला कोणत्याही प्रकारचा त्रास होणार नाही." असे लक्ष्मीच्या मनाचे समाधान करून देऊन तिला बरोबर घेऊन विष्णू वैकुंठलोकी निघून गेला.



# शत्रुत्व

उमा व शांता शेजारीशेजारी रहात. दोघींत कित्येक दिवसांपासून दाट मैत्री होती. परंतु काहीतरी क्षुल्लक कारणावरून दोघींचे परस्परांशी वैर झाले व ते वाढतच गेले. त्यांची भांडणे त्या गल्लीभरच्या सर्व लोकांना एक करमणुकीची गोष्ट झाली. परंतु उमा व शांता दोघींच्या नवऱ्यांना ती गोष्ट अपमानाची वाटू लागली. बायकांच्या दररोजच्या भांडणामुळे मानखाली झालेली नवऱ्यांना कशी आवडेल?

आपल्या बायकांचे हे वैर मिटविण्यासाठी दोघा पतींनी एक युक्ती काढली. उमाच्या नवऱ्याने एक कुत्र्याचे पिल्लू आणून पाळले. शांताच्या पतीने एक भाटीचे पिल्लू आणून ते पाळले. दोन्ही पिल्लू वाढू लागली.

काही दिवस ती पिल्ले आपसात भांडत, बागडत खेळत व परस्परांवर गुरगुरत. लोकांना ती गंमत वाटे. पुढे त्या दोन्ही पिल्लांना एकाच ताटलीत खायला घालू लागले. दोघांचे परस्परांवरचे गुरगुरणे कमी होऊ लागले व पुढे कायमचे बंद झाले. दोन्ही पिल्ले खूप खेळत.

उमा व शांता दोघींनी लोक मोठमोठ्याने म्हणत ते ऐकले. "अहो, माणसांपेक्षा ही जनावरेच पुष्कळ बरी!"

दोघींनी कानाला खडा लावला व भांडायचे सोडून दिले.









# अनाथ मुलगा

**श्याम** आपल्या आईचे मुळीच ऐकत नसे. तो उडाणटप्पूपणा करी. त्याच्या आईला त्याच्या खटयाळपणामुळे फार त्रास सोसावा लागे. मुलाचं कसं होईल याची काळजी वाटे त्याच्या आईला.

एकदा श्याम एका वडीलधाऱ्या व्यक्तीशी भांडला व तोंडाला आले ते बोलला. तो वृद्ध गृहस्थ श्यामला मारण्याच्या विचारात होता. नेमकी त्याच वेळी श्यामची आई आली. ती मध्ये पडली व मुलाला म्हणाली— "बाळा, तू थोरामोठ्यांच्या तोंडाला कां लागतोस?"

श्याम म्हणाला— "आई, ते गृहस्थ माझ्याशी नीट बोलले नाहीत व हिडीस फिडीस करू लागले. माझा अपमान केला."

"बाळा, आपण गरीब आहोत. श्रीमंत लोक आपल्यासारख्यांना रागावले, त्यांनी निंदा केली, अपमान केला तरी तो सहन करावयाचा असतो" आई म्हणाली.

श्यामला तो सल्ला आवडला नाही. तो म्हणाला— "समज आई, आपण सहन केला नाही तर काय होईल?"

"पोटसुद्धा भरणार नाही, बाबा!" आई म्हणाली.

"मी जर थोरामोठ्यांशी भांडलो तर तू सुद्धा मला जेवायला वाढणार नाहीस का?" श्यामने आईला विचारले.

आईने श्यामला पोटाशी धरले व पाणावलेल्या डोळ्यांनी त्याच्याकडे पहात म्हणाली— "बाळा, मी कां नाही रे खायला घालणार? परंतु मी किती काळ जिवंत राहीन? म्हणून मला काळजी वाटते आहे."

त्या दिवसापासून त्याने एका गुरुजींकडे विद्याभ्यासास जायला सुरवात केली. तरी कोणी त्याला विना कारण काही बरे वाईट बोलला तर तो विटेचे उत्तर दगडाने देई. त्याच्या दुर्दैवाने श्यामचे शिक्षण पुरे होण्यापूर्वीच त्याची आई वारली.

श्यामला त्याच्या गुरूने समजावून सांगितले— "बाळा रे, तू विद्याभ्यासात हुशार आहेस थोडा कष्ट सहन करून तू मेहनत केलीस तर तुझा विद्याभ्यास पुरा होईल. म्हणून तू ही दोन वर्षे वार लावून घेऊन कसा तरी विद्याभ्यास पुरा कर."

अशा तऱ्हेने श्यामने वार लावून घेतले आणि विद्याभ्यास चालू ठेवला. त्या घरांत श्यामला निरनिराळ्या प्रकारची कामे करावी लागत व लोकांची बोलणी ऐकावी लागत. काम नीट केले तरी ऐकावे लागे, चूक केले तरी ऐकावे लागे.

एका घरी श्यामला झाडांना पाणी घालायचे काम दिले. घरातली मंडळी म्हणायची— "अरे, ऐक तरी जास्त पाणी घातले तर झाडे कुजून जाणार नाहीत का?" कमी पाणी घातले तर म्हणत— "अरे, एवढेसे पाणी घालून कसे चालेल? झाडे वाळून जातील की!"

अशा तऱ्हेने श्यामने कोणतेही काम केले तरी लोक त्यात दोषच काढीत. तरी श्याम सर्व सहन करी व तोंड उघडून कधी उलट बोलत नसे. हळूहळू त्याच्या सहनशक्तीबद्दल सर्व गावातील लोकांच्या तोंडी वाखाणणीच ऐकू येऊ लागली.

त्याच गावात एक सधन शेतकरी होता. त्याचा रामू नावाचा मुलगा होता. तो



वयाने श्यामच्या एवढाच होता. कोणाचे दरडावणे किंवा डोळे वटारून पाहणे देखील त्याला आवडत नसे. तो फटकळपणे उत्तर देऊन मोकळा होई.

एकदा रामूची आई त्याच्या उर्मटपणा-बद्दल रागावून त्याला म्हणाली–"बाळा, तू श्यामला पहा जरा. त्याच्याजवळ शीक, दुसऱ्यांबरोबर कसे बोलायचं आणि वागायचं ते. तो किती मेहनत करून अभ्यास करतो?"

त्या गोष्टीचा खरेपणा कळावा म्हणून रामू श्याम काय करतो याच्यावर लक्ष ठेवू लागला. एका घरी श्यामने रडत असलेल्या मुलीला उचलून घेतले नाही. म्हणून त्या घरचे लोक त्याला रागावले. दुसऱ्या घरच्या रडणाऱ्या मुलीला त्याने उचलून घेतले तेव्हां त्या घरची मंडळी म्हणाली–"कशाला रे सारखा सारखा घेऊन तिला ध्यायची संवय लावतोस?" अशा तऱ्हेने प्रत्येक घरी त्याला बोलणी ऐकून घ्यावी लागत व तो प्रत्युत्तर देत नसे.

एकदा रामूने श्यामला विचारले–"श्याम, तुझ्या या सहनशीलतेसमोर हात टेकले, बाबा! तू हा सर्व अपमान सहन कसा करतोस?"

"लोक रागावतात त्याला कोण काय करणार? त्यांचं हृदय कसं लोण्याहून मऊ आहे. ते मला पोटभर जेवायला नाही का घालीत? त्यांचे माझ्यावर प्रेम आहे!" श्याम म्हणाला.

"दोन घास गिळायला मिळतात म्हणून त्यांच्या शिव्या कां खायच्या?" रामूने विचारले.

"माझी आई जिवंत होती तोपर्यंत मलासुद्धा असल्या गोष्टी खपत नसत." श्याम म्हणाला. तेव्हां रामूला अर्थबोध झाला. आईचा त्याला आधार होता. परंतु तो आधार सुटल्यानंतर अनाथ झाल्यावर सहनशक्ती नसेल तर तो कोणाकडे धावणार?

त्या दिवसापासून रामू आईने सांगितल्या-प्रमाणे सहनशक्ती दाखवून वागू लागला.



# विलक्षण संवय

गुणवंतराव फक्त चिक्कूच नव्हते, थोडे दुष्ट व मानव द्वेषी सुद्धा होते. म्हणून त्यांच्यामुळे कोणाचे नुकसान होई तर त्याबद्दल त्यांना वाईट वाटण्या ऐवजी आनंद होई.

मध्य रात्री दोन तीनदां तरी त्यांची झोप मोडे. तिजोरी उघडून आत ठेवलेला ऐवज व पैसे यथास्थानी आहेत की नाहीत लक्षपूर्वक पाहून घेत आणि दार इतके मोठ्याने बंद करीत की त्याचा आवाज ऐकून शेजारपाजारच्या लोकांच्या झोपा मोडत.

शेजाऱ्यांनी तक्रार केली की तुमच्या मुळे रात्रभर झोप लागली नाही तर ते मनातल्या मनात गुदगुल्यासारखे हसत व म्हणत–"अहो, मी तरी काय करू? तिजोरीचे दार घट्ट बसलं होतं, म्हणून एवढा आवाज झाला."

गुणवंतरावांच्या शेजारी एक नातेवाईक आला. तो रात्रभर जागा होता. त्याने गुणवंतरावांच्या विषयी सर्व शांतपणे ऐकून घेतले व दुसऱ्या दिवशी गुणवंतरावांना म्हणाला–"अहो, तुम्ही आपल्या शेजाऱ्यांवर खरोखर उपकारच करतां आहां. तुम्ही रात्री ती खटखट करतां त्यामुळे शेजारपाजारच्या लोकांच्या घरी चोरांची भीती उरली नाही."

तेवढे पुरले गुणवंतरावांना. शेजाऱ्यांवर उपकार होतो म्हणून मध्यरात्रीच्यावेळी तिजोरी उघडण्याचे त्यांनी बंदच केले.













# प्रश्नोत्तर

पी. दुर्गाप्रसाद

प्र.: मन सर्वदा भूत व भविष्यकाळातील गोष्टींचाच विचार करते, त्यावेळी ते चालू काळातील गोष्टींचा विचार कां करीत नाही?

उ.: भूत व भविष्य यांची ओळख कोणालाही होऊ शकते, परंतु चालू काळाची व्याख्या करणे कठीण आहे. संदर्भानुसार त्याचे स्वरुप बदलते. 'हे वर्ष', 'हा दिवस' (आज) हे 'शताब्द इत्यादी शब्दांचा आपण प्रयोग करतो, तेव्हां त्यांना आपण अनुक्रमे, 'एकवर्ष' 'एक दिवस' आणि 'एक शताब्द' यांना चालू काळ म्हणजे वर्तमानच मानतो. तसेच आपण जेव्हां 'आधुनिक युगात' शब्दाचा प्रयोग करतो तेव्हां ते युग भूतकाळ नसते किंवा भविष्य काळही नसते म्हणजे ते युग चालू काळ म्हणजे वर्तमानच असते.

मनोवैज्ञानिक दृष्टया विचार केला तर आपल्याला शंका येते की चालू किंवा वर्तमान असा काही असतोच का? क्षणाक्षणाला वर्तमान भूतकाळात जात असतो आणि भविष्यकाळ वर्तमानकाळात येत असतो कोणत्याही एका विशिष्ट क्षणाला थांबवून घरुन हा 'वर्तमान' काळ असे सांगता येत नाही. म्हणुन आपले लक्ष जेव्हां विशिष्ट कालावधीवर असते तेव्हां पुरता तो वर्तमान असतो. आपल्या मनाला विशिष्ट कालावधीत जो अनुभव येतो त्याला आपण वर्तमान मानू या. अनुभव पूर्ण होताच तो भूतकाळात प्रवेश करतो. उदाहरणार्थ आपण एखादी गोष्ट वाचतो किंवा नाटक पाहातो किंवा गाणे ऐकतो ते 'हां हां' म्हणता वर्तमानकाळातून भूतकाळात जाते.

मनाला हा जो अनुभव होतो ज्ञानेंद्रियांद्वारा आणि कार्मेंद्रियांद्वारा होतो. हा अनुभव भूत किंवा भविष्य काळात प्राप्त होणे शक्य नाही. वास्तव आपले सर्व अनुभव वर्तमानकाळातच असतात. मन सर्वदा अनुभवांचाच विचार करते म्हणून जो अनुभव प्राप्त केला जातो त्याची प्राप्ती होते वेळी त्याच्या संबंधी विचार करणे शक्य नसते. उदाहरणार्थ एखाद्या गाण्यात आपल्याला एखादी गोष्ट आवडली, सिनेमात कोणाच्या अभिनयात दोष नजरेस आला, किंवा एखाद्या कवितेतला विशिष्ट श्लेष असलेला शब्द आवडला तर ते अनुभव झाल्यानंतरच आपल्याला कळते. आता भविष्य काळाची गोष्ट निराळी आहे. भूतकाळासारखी नाही, कारण भविष्यकाळातल्या गोष्टी काल्पनिकच असतात. कल्पनासुद्धा पूर्वीच्या अनुभवांवरच आधारलेल्या असतात. अनुभवाशिवाय विचार करणेच शक्य नाही.



# अघटित अनपेक्षित

[८४]

मांजरामुळे गिधाडाला मरण कसे आले ही गोष्ट सांगून कावळा हरणाला म्हणाला—"म्हणून जात, कुळगोत्र व स्वभाववृत्ती कळल्याशिवाय अनोळखी व्यक्तीस जवळ करणे धोक्याचे असते."

ते ऐकून कोल्हा संतापला. तो खवळून जाऊन म्हणाला—"बरं तर तू हे सांग, सर्वात प्रथम तुझी व हरणाची मैत्री झाली तेव्हां तुला हरणाचे कुळगोत्र व स्वभावाची माहिती होती वाटते? तरी तुमचे दोघांचे परस्परांवरचे प्रेम नित्य वाढतच गेले आहे. म्हणून मी म्हणतो तु संकुचित वृत्तीचा आहेस. अशाच माणसांच्या मनांत असल्या गोष्टींची शंकाकुशंका येत राहाते. 'हा माझा हा परका' हा कोतेपणा आहे. जेथे विद्वान पंडित नसतात तेथे मूर्खांचीच वाखाणणी होते. जेथे मोठमोठे वृक्ष नसतात तेथेच एरंडालाच वृक्ष म्हणतात (निरस्त पादपे देशो एरंडोपि द्रुमायते). परंतु जे जात्याच थोर मनाचे आहेत त्यांना सर्व 'विश्वचि माझे घर' वाटते. तेव्हां लक्षात ठेव, तू जसा या हरणाचा मित्र झालास तसाच आजपासून मी हरणाचा मित्र झालो आहे."

हरण दोघांना शांत करीत म्हणाले—"तुम्ही दोघं उगीच कशाला भांडतां आहां? आपण सर्व मिळून एकत्र सुखासमाधानाने राहू या. जन्मताच कोणी कोणाचा मित्र नसतो आणि शत्रूही नसतो!"

"ठीक, तर तु म्हणतोस तसेच राहू या!" कावळा म्हणाला आणि ते तिघे त्या दिवसापासून एकत्र राहू लागले.

एके दिवशी कोल्हा हरणाला एकटा बसलेला पाहून म्हणाला—"मित्रा, या

जंगलाच्या एका कोपऱ्यात पीक कापायला तयार असलेले एक शेत आहे. मी दाखवितो तुला ते शेत!'' हरण कोल्ह्याच्या बरोबर त्या शेतात गेले. त्या दिवसापासून हरण दररोज त्या शेतात चरायला जाऊ लागले. शेताच्या मालकाने हरणाला धरण्यासाठी शेतात एक जाळे टाकून ठेवले. हरण त्या जाळ्यात सापडले.

''या संकटातून आपल्याला मित्राशिवाय आणखी कोण वांचविणार?'' हरणाला वाटले.

इतक्यात कोल्हा त्या बाजूला आला. हरणाला जाळ्यात सापडलेले पाहून तो विचार करू लागला—''छान डाव साधला. शेतकरी याला ठार करून याचे कातडे काढून घेईल व आपल्याला याचे पोटभर मांस खायला मिळेल.''

कोल्ह्याला पाहून हरणाला आनंद झाला व ते म्हणाले—''मित्रा, तू आपल्या अणकुचीदार सुळ्यांनी हे जाळं तोडून मला सोडव. संकटसमयी मित्राची युद्धसमयीं योद्ध्याची, कर्ज परत करते वेळी विश्वासपात्रतेची, दारिद्र्यात पत्नीची आणि दु:खात बंधुमित्राची पारख होते. दुष्काळात, अराजक असेल तेव्हां आणि राजदरबारी आणि स्मशानात जो बरोबर राहतो तोच खरा मित्र किंवा बांधव होय! (राजद्वारे स्मशानेच य: गच्छति स बांधव:).''

कोल्ह्याने जाळ्याकडे पाहिले आणि विचार केला—''या जाळ्याचे धागे बळकट आहेत. हरण निसटून जाणे शक्य नाही.'' नंतर हरणाला म्हणाला—''मित्रा, हे जाळे आंतड्यांच्या धाग्याचे आहे. आज आहे रविवार. अशा पवित्र दिवशी प्राण्यांच्या शिरा आंतड्यांनी विणलेले हे जाळे कसे रे तोडायचे? सर्व जगाला प्रकाश व सभ्यता देणाऱ्या सूर्याच्या नावाने हा पवित्र दिवस ओळखला जातो. फक्त आज मी तुझ्या इच्छेप्रमाणे काही करू शकणार नाही. म्हणून तू अन्यथा मानू नकोस. उद्यास काळी येऊन मी तुझ्या इच्छेप्रमाणे जाळे तोडून तुला सोडवीन.'' असे सांगून कोल्हा एका झाडीत शिरून लपून बसला. शेताचा मालक केव्हां येतो आणि हरणाला मारून त्याचे कांतडे केव्हां काढून घेतो हे पहात कोल्हा टपून बसला.

संध्याकाळपर्यंत हरण परतलं नाही तेव्हां कावळ्याने त्याचा शोध काढायला सुरवात केली. संध्याकाळी त्याला जाळ्यात सापडलेले हरण दिसले.

कावळ्याने विचारले—''मित्रा, हे काय रे?''

''मी तुझा सल्ला ऐकला नाही, त्याचं फळ भोगतो आहे! हितैषी मित्राचा सल्ला जो मानीत नाही त्याला दु:ख सहन करावे लागते. त्याची दशा पाहून शत्रूला आनंद होतो.'' हरण म्हणाले.

कावळ्याने विचारले—''तो मित्रद्रोही कोठे आहे?''

''माझं मांस मिळेल या आशेने झाडीत लपून बसला आहे!'' हरण म्हणाले.





"मी तुला पहिल्यानेच बजावून सांगितले होते की दुष्ट लोकांवर विश्वास करू नये. सज्जनांना दुष्ट लोकांमुळे कष्ट सहन करावे लागतात. समोर गोड बोलून आडून आपल्या पायाखालाची जमीन खणणारे 'पयोमुख विषकुंभ' असतात. तोंडाजवळ दूध दिसते, परंतु असते कासंडी विषाचीच." असे म्हणत कावळयाने दीर्घश्वास सोडला व म्हणाला–"दुष्ट कोल्ह्या! तू हे नीच काम करायचे ठरविले आहेस का? तुझ्या वर भरंवसा ठेवून की तू संकटसमयी मदत करशील तू मित्रांशी दगा केलास तर तुझी कीर्ती वाढेल का? हे भूमाते तू अशा विश्वास घातक्यांचे ओझे किती दिवस वाहणार? दुष्टांशी मैत्री कधी करू नये. विश्वासघातकी मित्र कोळशा-सारखा आहे. जळत असतांना हात भाजतो व थंड असतांना हात काळा करतो. परंतु कोल्ह्याची नुसती निंदा करून तरी काय उपयोग? दुष्ट माणूस पहिल्याने पाय धरतो नंतर गोडगोड बोलून गळा कापतो. त्याच्या जिभेवर अमृत असते, पण पोटात विष असते. मित्रा, ऐक! उजाडतांच शेतकरी येईल. मी तुझे रक्षण करू शकणार नाही. परंतु शेतकऱ्याला दुरून येताना पाहून तुला सावध करण्यासाठी ओरडेन. तू मेल्या-सारखा पडून रहा. मी पुन्हा ओरडलो की ताडदिशी उठून पळ काढ."

उजाडताच शेतकरी आपला सोटा घेऊन आला. त्याला दुरूनच पाहून कावळा ओरडू लागला. हरण मेल्याचे सोंग करून पडून राहिले. शेतकरी म्हणाला–"बरं झालं, तू तर स्वतःच मरून पडलं आहेस!" असे म्हणत शेतकरी जाळे गुंडाळू लागला. हरण जाळ्या बाहेर आल्याचे दिसतांच कावळा ओरडला हरणाने उठून धूम ठोकली. ते कोल्हा होता त्याच झाडीत पळाले. शेत-कऱ्याने चिडून हरणावर आपला सोटा फेकला. सोटा हरणाला तर लागला नाहीच. कोल्ह्याला लागला व तो तत्काळ जागच्या जागी मरण पावला.






[ २ ]

[ कुंडलिनी द्वीपाचा राजा कीर्तीच्या भुकेने कर कमी करू लागला आणि त्याने कर इतके कमी केले की राज्याचा खजिनाच रिकामा होऊ लागला. सेनापतीच्या सल्ल्याप्रमाणे इतर राज्यांवर स्वाऱ्या करून धन लुटून आणण्याच्या हेतूने आरमार निघाले. त्याच वेळी दक्षिण दिशेला आकाशात एक धूमकेतू दिसला. पुढे…]

कुंडलिनी द्वीपावरचे सैन्य जहाजात बसून निघाले आणि खोल समुद्रात पोचले. त्यावेळी समुद्र शांत गंभीर होता आणि वारासुद्धा अनुकूलच होता.

सैनिकांना मोहिमेवर निघाल्याचा आनंद व उत्साह वाटत होता. परंतु सेना-पती समरसेन मात्र आपल्या जहाजात चिंतित बसल्यासारखा दिसत होता. तो एका उंच जागी बसून आकाशाकडे व समुद्राकडे पहात होता. त्याची नजर दक्षिणे-कडील आकाशात चमकत असलेल्या शेंडे-नक्षत्रावर खिळलेली होती.

समरसेन शेंडेनक्षत्राकडे पहात असतांनाच आकाशात काळे ढग धोंधावत होते आणि पापण्या लवण्याच्या आत शेंडेनक्षत्र त्यांच्या आड झाकले गेले. चहूकडे अंधार पसरू लागला. समुद्र उसळू लागला आणि लाटांचे तांडव नृत्य पाहून सैनिकांना कापरे भरले.



समरसेन मात्र निश्चेष्टपणे ते भयंकर दृश्य पहात बसला होता. तितक्यात जहाजाचा कप्तान जवळ येऊन म्हणाला–"सेनापती आपले सैनिक घाबरून गेले आहेत. त्यांच्यापैकी काहीजण 'किनाऱ्या-कडे परतू या!' असेही म्हणत आहेत."

समरसेन बसल्या जागेवरून उठला व त्याने एकदा पुन्हा आकाशाकडे व ढगांच्या गडगडाटाकडे आणि पर्वताकृती लाटांकडे पाहिले. नंतर कप्तानाकडे वळून म्हणाला–"कुंडलिनी देवीची करुणा असेल तर सर्व काही थोड्याच वेळाने स्थिरस्थावर होईल. तुम्ही जाऊन सैनिकांना समजावून सांगा की त्यांचे नेतृत्व करणाऱ्या सेनापतीला कधी पराभव मिळालेला नाही. सैनिकांना भिण्याचे काहीच कारण नाही."

त्यानंतर पाव तास उलटला तरी वाता-वरणात काही बदल झाला नाही. समुद्राच्या लाटा आणखी मोठमोठ्या होत होत्या आणि समुद्र घुसळून निघत होता. सर्व आकाश काळ्या ढगांनी व्याप्त झाले होते आणि आता तर तुफानी वारेसुद्धा सुरू झाले.

सैनिकांच्या छातीत धडधड होऊ लागली. तुफानी वाऱ्यामुळे सर्व जहाजे दिशाभूल झाल्यासारखी वाट फुटेल तिकडे वाहू लागली. अशा परिस्थितीत सर्व सैनिक जहाजात जी जागा स्वरक्षणास प्रत्येकास सोयीची वाटली त्या जागी उभे राहून देवाचा धावा करू लागले.

रात्र वाढत गेली तसातसा तुफानी वारा वाढतच गेला. खलाशी व तांडेल कोणालाही जहाजाला आवरणे शक्य नव्हते आणि जहाजे एकमेकावर आदळू लागली. पाहतांपाहतां कित्येक जहाजांचा चक्काचूर झाला. समरसेन ज्या जहाजावर होते ते एक जहाज मोठे होते व बळकटही होते. तेवढे एकच लाटांवर तरंगत राहिले व फुटले नाही. किती जहाजे बुडाली, किती सैनिक बुडाले व किती किनाऱ्यावर वाहून गेले, कळणे शक्यच नव्हते. सूर्योदयापूर्वी





ते कळायला काही मार्ग नव्हता. समरसेन त्याच्या जहाजातल्या कुंडलिनी देवीच्या मूर्तीसमोर गुडघे टेकून देवीचा धावा करीत होता.

त्यानंतर बऱ्याच वेळाने सूर्योदय झाला. अकस्मात सुरू झालेले तुफान हळूहळू ओसरू लागले. काळे ढग कमीकमी होत शेवटी पार नाहीसे झाले. समरसेन देवीच्या मूर्तीसमोर तसाच बसलेला होता. जहाजा-तले सैनिक धावत त्याच्याकडे आले व म्हणाले–"सेनापती, तुफान शांत झाले आहे. एकदा आपण खाली येऊन पुढे काय करायचे आज्ञा केलीत तर बरे होईल."

समरसेनाला डोक्यावरचे ओझे उतरल्या-सारखे वाटले. तो देवीच्या समोरून उठून उभा राहिला आणि त्याने चहूकडे नजर फिरवून एकदा पाहिले. अर्ध्याहून अधिक जहाजे व गलबते पाण्यात बुडून गेली होती. उरलेली दूरवर पसरली होती.

अर्ध्याहून अधिक सैनिकांना जलसमाधी मिळाली होती, ही गोष्ट कळायला समर-सेनाला वेळ लागला नाही. जी जहाजे बुडाली नव्हती त्यांना एकत्र करणे हे पहिले कर्तव्य आहे असा विचार करून त्याने आपल्या जहाजाचा नांगर टाकविला. लहानलहान पडावातून सैनिकांना पाठवून दूरदूर विखुर-लेल्या जहाजांना एकत्र व्हायला निरोप पाठविला. थोड्याच वेळाने सर्व जहाजे सेनापतीच्या युद्ध नौकेजवळ येऊन पोचली. सैनिक समरसेनासमोर माना खाली करून उभे राहिले. त्यांच्यापैकी प्रत्ये ेचे रात्रीच्या तुफानामुळे हाल झाले होते आणि देवाच्या कृपेनेच प्राण वांचले होते.

सैनिकांची तोंडे पाहूनच परिस्थिती किती भयंकर आहे याची कल्पना समर-सेनाला झाली. रात्रीच्या अनुभवामुळे समुद्राच्या नावानेच सैनिकांच्या अंगावर शहारे उभे रहात होते. म्हणून आणखी काही काळ समुद्रावरच घालवावे लागणार हा विचारच सैनिकांच्या मनाला शिवत



नव्हता. समरसेनाने सैनिकांपैकी एकाला हाक मारून शिडाच्या दांडीवर चढून कोठे जमीन दिसते का पाहून सांगायला सांगितले.

त्याप्रमाणे तो सैनिक शिडाच्या दांडीवर चढून गेला. सर्वांचे डोळे त्याच्यावर होते. त्या सैनिकाने चहूकडे लक्षपूर्वक दूरवर नजर जात होती तेथेपर्यंत पाहिले व म्हणाला–"जवळपास कोठेही जमीन दिसत नाही. परंतु पूर्वेकडे पुष्कळ दूर पक्षी उडत असल्यासारखे वाटत आहे."

ते ऐकतांच समरसेनाने जयघोष केला–"कुंडलिनी महादेवी की जय!" त्याच्या पाठोपाठ सर्व सैनिकांनीसुद्धा कुंडलिनी महादेवीचा जयघोष केला.

सेनापतीच्या आज्ञेप्रमाणे पक्षी उडतांना दिसले त्या दिशेला सर्व युद्धनौका निघाल्या. शिडाच्या दांडीवर चढलेला सैनिक दांडीच्या टोकालाच बसून राहिला व युद्धनौकांना वाट दाखवू लागला. काही वेळाने दुपार झाली आणि सूर्य पश्चिमेकडे उतरू लागला. परंतु जमिनीचे चिन्हच कोठे दिसत नव्हते. म्हणून सैनिकांच्या मनांत निराशा वाढू लागल्यासारखे झाले. सैनिकांपैकी एकजण म्हणाला–"सूर्यास्ताची वेळ होऊ लागली आहे! आतां काळोख पडू लागायला कितीसा वेळ लागणार?" सर्व सैनिकांत घबराट वाढू लागली. 'या महासागरांच्या अगदी मधोमध आपण सांपडलो आहो आणि दैव आणखी कायकाय दाखविणार आहे कोण जाणे', प्रत्येकाच्या मनात हाच एक विचार होता.

इतक्यात शिडाच्या दांडीवरचा सैनिक मोठ्याने ओरडून म्हणाला–"ती पहा, जमीन, जमीन! अगदी जवळच दिसते आहे!" ते ऐकून सैनिकांना जो आनंद झाला तो एवढा तेवढा नव्हता.

सर्व युद्धनौका जमीन दिसली त्या बाजूला वेगाने जात होत्या. त्या वेळी सूर्यास्त झाला. काही वेळाने सर्व युद्धनौका कोण-त्यातरी जमिनीच्या तुकड्याला जाऊन टेकल्या. थोडे लक्षपूर्वक पाहिल्यावर कळले की एक बेट होते. जहाजांतून उड्या टाकून जमिनीवर पाऊल टाकण्याची प्रत्येक सैनिकाला घाई झाली होती. परंतु समर-सेनाने आज्ञा केली–"माझ्या आज्ञेशिवाय कोणी जमिनीवर उतरू नये!"

ते ज्या जागी पोचले होते ते समुद्रातले एक फार भयंकर असे मोठे द्वीप होते. त्या बेटावरचे डोंगर समुद्रात दूरवर शिरल्यासारखे दिसत होते. त्या डोंगरा-वर मोठमोठी उंच झाडे होती आणि झाडीत निरनिराळ्या प्रकारची रानटी जनावरे होती. म्हणून अशा बेटावर पाऊल



टाकणे धोक्याचेआहे असे समरसेनाला वाटले.

त्याने आपल्या सैन्याचे दोन भाग केले आणि काही निवडक सैनिकांनाच बेटावर पाठवून सर्व माहिती काढून यायला पाठवायचे ठरविले. त्यांनी परिस्थितीचा अभ्यास करून परत येऊन सांगितल्यावर इतरांनी पुढले पाऊल टाकणे श्रेयस्कर होईल, असे साहजिकच त्याला वाटले.

तरमग बेटावर जाऊन बारकाईने सर्व गोष्टींची चवकशी करून येण्यालायक कोण कोण सैनिक आहेत? अशा अनोळखी प्रदेशात जाऊन प्रसंगानुसार वागणे म्हणजे सोपी गोष्ट नव्हती. साहसी, शूर आणि



हुशार व्यक्तीच ही कामगिरी चोख बजावतील.

बराच विचार केल्यावर समरसेनाला स्वतःच जाणे सर्व प्रकारे श्रेयस्कर वाटले. त्याने आपल्या सैन्यातल्या फक्त सहा जणांना निवडले. हे सहाजण त्याच्याबरोबर अनेक युद्धांत गेले होते व त्यांच्या शौर्य साहसाची समरसेनाला पूर्ण कल्पना होती. म्हणून त्या सहा जणांना एका लहान पडावात बसवून समरसेन त्या नव्या बेटाच्या दिशेने निघाला. थोड्याच वेळात तो नव्या बेटाला जाऊन लागला.

किनाऱ्याचा प्रदेश अगदी निर्जन होता. तेथे मनुष्यवस्ती असल्याचे एकही चिन्ह दिसत नव्हते. तरी समरसेन निर्भयपणे तलवार उपसून बेटावर उतरला व पुढे निघाला. त्याच्या पाठोपाठ ते सहा सैनिकही निघाले. मनुष्य दिसत नसले तरी ते झाडावर किंवा झाडाखडकाआड लपून तीरकमानीचा उपयोग करतील ही भीती होतीच!

त्याच विचारात गढून गेलेल्या समरसेनाला एकाएकी धडकी भरेल इतकी एक भयंकर गर्जना ऐकू आली. त्या पाठोपाठ एक सैनिक म्हणाला—"सेनापती! ही गर्जना कोणत्यातरी प्राण्याचीच वाटत आहे, परंतु अगदी विकृत व भयंकर आवाज आहे हा! असली गर्जना मी आयुष्यभरात कधी ऐकली नाही!" त्याच्या सर्वांगाला कांपरे भरले होते.

इतर सैनिकांच्या सर्वांगाला घाम सुटला होता. समरसेनाने सर्वांना धीर दिला आणि पुढे निघाला तेव्हां सर्व त्याच्या पाठोपाठ निघाले. काही वेळ चालत राहिल्यावर ते एका दाट झाडीत आले. त्या झाडीच्या जवळच एक सरोवर होते. त्याच्या समोर त्यांनी जे दृश्य पाहिले ते पाहून सर्व निश्चेष्ट जागच्या जागी थबकले. पाऊल पुढे टाकण्याचे धाडसच झाले नाही.

सरोवराच्या काठावर दोन भयंकर व विचित्र प्राण्यांचे द्वंद्व चालू होते. काही

अंतरावर झाडाखाली उभे राहून इतर काही प्राणी ते दृश्य पहात उभे होते. जवळच झाडावर बसून वनमाणसे भयभीत नजरेने ते द्वंद्व पहात होती व आपसात काही खुणा करून परस्परांशी काही बोलतही होती. त्यांच्या हातात दगडाची काही हत्यारे सुद्धा होती.

समरसेन ते दृश्य आपल्या अनुयायांना दाखवून म्हणाला–"खरोखरच ही जनावरे विचित्रच दिसत आहेत. झाडावर दिसत आहेत ती माणसे नव्हेत आणि माकडेही नव्हेत. पाषाणयुगातली माणसे आपण या युगात पहात आहो. ही द्वंद्व करणारी जनावरे लक्षावधी वर्षांपूर्वीची जनावरे आहेत."

सैनिकांना काय बोलावे हेच सुचेना. अशा या भयंकर बेटावर लुटून नेण्यासारखं धन ते काय मिळणार? सर्वांच्या मनात हाच एक प्रश्न होता.

समरसेनाच्या मनातही तीच शंका होती. कुंडलिनी द्वीपावरच्या राज्याचा जो रिकामा खजिना होता तो भरून काढण्याच्या विचाराने व ती हामी देऊन तो मोहिमेवर निघाला होता. परंतु नशिबाने पाठ फिरविली आणि एकाएकी तुफान आले आणि त्यांच्यावर केवढे मोठे संकट आले. आतां येऊन पोचले ते अशा एका भयंकर द्वीपावर. तरमग पुढे काय करायचे?

समरसेनाच्या मनात हे विचार चालू असतां सरोवराच्या काठावर त्या भयंकर प्राण्यांचे परस्परांशी द्वंद्व आणखी भयंकर स्वरूप धारण करू लागले. त्यांच्या भयंकर गर्जना ऐकून दुरून पहात असलेले हत्ती सुद्धा भिऊन दूर पळाले. त्या वेळी हत्तींच्या कळपातून दूर झालेला एक बंडखोर हत्ती झाडाच्या आडून पळत समरसेन व सैनिक होते त्याच बाजूला येऊ लागला.

समरसेनाने आपल्या वेळ न घालविता अनुयायांना सावध केले आणि जवळच्या एका झाडावर चढू लागला. तितक्यांत दोन सिंह गर्जना करीत त्या हत्तीवर उडी मारून चढले. (क्रमशः)





# वात्सल्य

विक्रमादित्याने आपला हट्ट सोडला नाही. तो झाडाजवळ गेला प्रेत खांद्यावर काढून घेतले आणि नेहमीप्रमाणे मौन होऊन स्मशानाच्या दिशेने चालू लागला. तेव्हा प्रेतात बसलेला वेताळ त्याला म्हणाला–"राजा, मला वाटत होते की राजाला राजनीतीसमोर इतर नीतीच्या गोष्टी क्षुल्लक वाटतात. परंतु राजनैतिक दृष्टीने भयंकर प्रसंग ओढवला असतानाही काही राजे वात्सल्याला बळी पडतात. त्याचे उदाहरण म्हणजे रविवर्म्याची वागणूक. मी त्याची गोष्ट तुला सांगतो." असे सांगून वेताळ गोष्ट सांगू लागला.

रविवर्मा नावाचा राजा एक शूर पराक्रमी राजा होता. त्याने विजयशेखर नावाच्या राजाला युद्ध करून जिंकले आणि त्याचे राज्य काबीज केले. त्या युद्धात विजयशेखर असामान्य शौर्य व पराक्रम

दाखवून धरातीर्थी पडला. ती बातमी कळतांच त्याची राणी जी नुकतीच बाळंतीण झाली होती ती शोकवार्ता ऐकून त्या धक्कयाने ती तत्काळ मरण पावली. तिचा मुलगा म्हणजे विजयशेखरच्या गादीचा वारस एक लहान अर्भक होता, तो अनाथ झाला. परंतु रविवर्म्याला कोणी मूलबाळ नव्हते. म्हणून त्याने त्या मुलाचे नाव विजयवर्मा म्हणून ठेवले आणि स्वतःच्या मुलासारखे त्याला वाढविले.

त्या नंतर थोडयाच दिवसांनी रवि-वर्म्याला एक मुलगी झाली. तरी रवि-वर्म्याचे विजयवर्म्यावरचे प्रेम व वात्सल्य थोडे देखील कमी झाले नाही. काही लोकांना वाटले की तो मुलगा आता अनाथ होणार. परंतु ते खोटे ठरले. रविवर्म्याने विजयवर्म्याला आपल्या स्वतःच्या मुली इतक्याच प्रेमाने व वात्सल्याने वाढविले.

रविवर्म्याची मुलगी वयात आली व तिच्या स्वयंवरासाठी राजाने दवंडी पिटविली की जांवयाला अर्धे राज्य दिले जाईल.

ते कळल्यावर विजयवर्म्याला कोणत्याही प्रकारचे दुःख किंवा मानसिक कष्ट झाला नाही. परंतु सेनापती पदावर नुकतीच नेमणूक झालेल्या भूपतीला मात्र फार राग आला. त्याने विजयवर्म्याशी मैत्री वाढविली आणि त्याचा एक हितैषी असल्याचे सोंग करून राजाच्या विरुद्ध अनेक गोष्टी सांगून त्याचे कान भरू लागला.



एकदा भूपती विजयवर्म्याला म्हणाला— "राजाने किती प्रेमाचे आणि वात्सल्याचे सोंग केले तरी तू त्याने पाळलेला एक मुलगाच तर आहेस! ते तुझे खरे वडील असते तर तुला जे राज्य हक्काने मिळायला हवे. त्यातले अर्धे राज्य कधी आपल्या जावयाला द्यायला राजा तयार झाला असता का? वास्तविक हे तुझ्या वडिलांचे आहे. म्हणून तुलाच सर्व राज्य मिळायला हवे. तू थोडे धाडस व धैर्य दाखविलेस तर सर्व राज्य तुलाच मिळेल. त्यासाठी सर्व मदत करायला मी तयार आहे."

तेव्हां विजयवर्मा भूपतीला म्हणाला— "राजाला जर हे कळले की आपण त्याच्या विरुद्ध एक कट करीत आहो तर तो कट मोडून तर काढीलच व त्याच बरोबर आपणांला मृत्युदंड देईल."

"तुला त्यासाठी भिण्याचे मुळीच कारण नाही. आपला कट राजाला कळणार ह्याची नुसती कुणकुण आपल्याला लागली की लगेच आपण चोरवाटेने शेजारचा राजा नरसिंह याच्याकडे जाऊ. त्याच्या मदतीने आपण सहजी राजवाडा काबीज करू."

त्या दिवशी संध्याकाळी राजा रविवर्मा राजोद्यानात विहार करीत एक कबूतर त्याच्या खांद्यावर येऊन बसले. कबूतराच्या चोचीतल्या चिठ्ठीत मजकूर होता तो असा—"आज रात्री महाराजांच्या वधासाठी कट झालेला आहे. विजयवर्मा राज्य





काबीज करण्यासाठी भूपतीशी संगनमत करून कट करीत आहे. म्हणून महाराजांनी सावध असावे!"

राजा रविवर्मा तत्काळ अंतःपुरात परतला व त्याने पाहारेकऱ्यांना सावध केले. राजाचा वध करण्यासाठी नेमलेला मारेकरी कैद झाला. भूपती व विजयवर्म्याने राजाचा वध करण्यासाठी त्याला नेमले असल्याचे त्याने कबूल केले.

त्या दिवशी रात्री भूपती विजयवर्म्याबरोबर होता, ही बातमी तर कळली. परंतु दोघे राजवाड्यात कोठेही नव्हते. त्याच बरोबर या गोष्टीचा पुरावाही मिळाला की दोघे चोर वाटेने पळून गेले होते. ज्या भुयाराच्या वाटेने दोघे पळून गेले होते त्याचे दुसरे दार जंगलातल्या देवळात मूर्तीच्या पाठीमागे निघत होते. म्हणून देवळाच्या चहूकडच्या झाडीत काही सैनिकांना गुप्तपणे ठेवण्यात आले.

त्याच वाटेने विजयवर्मा व भूपती दोघे नरसिंहच्या राज्यात गेले होते. भूपतीने नरसिंहला समजावून सांगितले की विजयवर्मा अंतःपुरात बंडखोर म्हणून राहिला तर नरसिंहाचे नुकसानच होईल. म्हणून त्याला कैद करणे योग्य होईल. नरसिंहने त्या प्रमाणे विजयवर्म्याला कैद केले.

त्यानंतर भूपती नरसिंह व पन्नास निवडक सैनिक घेऊन चोरवाटेने निघाला. अंतःपुरात ही बातमी पोचली की चोरवाटेने येणाऱ्या बंडखोरात विजयवर्मा नाही. भुयाराची दोन्ही दारे बंद करण्यात आली. बंडखोर त्या चोरवाटेतच अडकले.

मध्यंतरी राजा रविवर्मा ससैन्य नरसिंहच्या राज्यावर चालून गेला. विजयवर्म्याला कैदेतून सोडविण्यात आले व त्याला नरसिंहाच्या राज्याचा राजा करण्यात आले.

एक आठवडाभर भुयारात उपाशी राहलेले बंडखोर दुसरा काही मार्ग नसल्याने रविवर्म्याजवळ शरण मागायला तयार झाले. भूपती व नरसिंह दोघांना फाशीची शिक्षा ठोठावण्यात आली. सैनिक आपल्या राज्यात परतले आणि विजयवर्म्याचे अंगरक्षक म्हणून नेमले गेले.

रविवर्म्याने आपल्या मुलीच्या विवाह प्रसंगी तिच्या पतीला अर्धे राज्य दिले आणि उरलेले अर्धे विजयवर्म्याला देऊन टाकले.

येथवर गोष्ट सांगून वेताळ म्हणाला— "राजा, बंडखोरात भूपतीसुद्धा एक होता म्हणून रविवर्म्याने त्याला फाशीची शिक्षा केली. परंतु दुसरा बंडखोर विजयवर्मा असूनही त्याला दंड देणे तर दूरच त्याला राज्य कां दिले? ही काय राजनीती झाली? की हा केवळ वात्सल्यभाव म्हणावयाचा? या शंकांचे समाधानकारक उत्तर माहीत असूनही तू दिले नाहीस तर तुझ्या डोक्याची शंभर शकले होऊन तुझ्याच पायावर लोळू लागतील."

तेव्हां विक्रमादित्य म्हणाला—"भूपतीने जे बंडाचे निशाण उभे केले होते ते बंड अयशस्वी व्हावे म्हणून मदत करणारी व्यक्ती विजयवर्माच होती, यात मला तरी शंका वाटत नाही. राजाकडे कबूतराबरोबर चिठ्ठी पाठविली होती ती विजयवर्म्यानेच! राजाचा वध करण्यासाठी जो कट होता त्यात तो सामील असता तर ते काम त्याला सहजी केव्हांही करतां आले असते. त्यासाठी दुसऱ्या व्यक्तीची नेमणूक करण्याची त्याला गरजच नव्हती. पळून जाण्यासाठी भुयाराच्या चोरवाटेचा उपयोग त्याला करता आला असता. यावरून हे स्पष्ट होते की भूपतीला तो मार्ग दाखवून आणि त्या तऱ्हेने खऱ्या शत्रूचा शोध लागावा यासाठीच तर विजयवर्म्याने तसे केले होते. कारण विजयवर्मा सामान्य मार्गाने नरसिंहकडे जाऊ शकला असता. चोरवाटेने जाण्याची गरजच नव्हती. या सर्व गोष्टी रविवर्म्याने ओळखल्या. तरी काही शंका उरली असती तर नरसिंह करवी तो कैद झाल्यामुळे शंका राहण्याचे कारणच उरले नाही."

अशातऱ्हेने राजाचे मौन भंग होताच वेताळ प्रेतासह नाहीसा झाला आणि झाडाला जाऊन पुन्हां लोंबकळू लागला.

(कल्पित)



# लबाडी भोवली

रघू स्वभावानेच गरीब होता. तो गांवकऱ्यांना अडीअडचणीच्या वेळी मदत करी. म्हणून सर्व त्याचे गुण गात. गावकऱ्यांना मदत करीत असूनही रघूने चार पैसे मागे टाकले आणि लग्न करून संसार थाटला. त्याने एक लहानसे घरसुद्धा विकत घेतले.

एकदा एकाएकी रघूच्या घरात चोर शिरले आणि त्याच्या घरात जी थोडी चीजवस्तु आणि पैसाअडका होता चोरून नेला. गावकऱ्यांनी चंदा करून नुकसान भरपाई केली.

त्याच गांवात भिकूशेट नावाचे एक व्यापारी रहात असत. त्याने काळा बाजार करून खूप पैसे मिळविले होते. परंतु रघूला गावकऱ्यांनी सहजी जमा करून दिलेले पैसे पाहून तो हेवा करू लागला. एके दिवशी रात्री त्याने आपल्या घरातले सर्व सोने आणि पैसे नेऊन गावाबाहेर एका तलावात ठेवले. उजाडल्यावर छाती बडवून रडू लागला की चोरांनी त्याला लुबाडले. त्याच्या घरच्या चोरीची बातमी 'हां हां' म्हणतां गावभर पसरली. प्रत्येकाने सहानुभूती दर्शविली. परंतु कोणी त्याच्या मदतीला धावला नाही. कारण त्याने आपल्या आयुष्य भरात कधी कोणाला मदत केली नव्हती.

म्हणून भिकुशेट नवरा बायकोने अमावास्येच्या दिवशी रात्री पुरून ठेवलेले व धन घेऊन गांव सोडून दूरच्या कोणत्यातरी गावी निघून जायचे ठरविले. तिकडे गावच्या पाटलाने मनांत गावात एक मोठे देऊळ बांधायचे ठरविले आणि पाया खणायला सुरवात केली. पाया खणत असतां भिकूशेटने पुरून ठेवलेले धन निघाले. लोक म्हणू लागले देवानेच स्वतःचे देऊळ बांधायला पैशाची तजवीज करून ठेवली होती. परंतु भिकूशेटला त्याच्या लबाडीबद्दल चांगलीच शिक्षा भोगायला लागली.





# हुंड्यासाठी आसवे

सोनूशेट नामक व्यापाऱ्याला चार मुलगे होते. म्हणून सर्व त्याला भाग्यवान मानत. सोनूशेटला पण तसेच वाटत असे.

एक श्रीमंत माणूस सोनूशेटकडे येऊन म्हणाला—"मी तुमच्या थोरल्या मुलाच्या स्थळासाठी आलो आहे. माझी मुलगी एकुलती एक आहे. म्हणून मी तुमच्या चिरंजीवांना घरजावई करणार आहे."

सोनूशेटला पैशाचा फार लोभ म्हणून त्याने आपल्या व्याह्यांकडून हुंड्यासाठी म्हणून पंचवीस हजार रुपये घेतले. मुलाचे लग्न करून देऊन त्याला सासऱ्याच्या घरी पाठवून दिले.

अशाच तऱ्हेने वीस हजार रुपये हुंडा घेऊन दुसऱ्या मुलाच्या इच्छेविरुद्ध त्याचे लग्न करून दिले.

तिसऱ्या मुलाचे लग्न एका श्रीमंत घराण्यातल्या मुलीशी झाले. व्याह्यांकडून सोनूशेटने हुंड्याचे वीस हजार रुपये वसूल केले. परंतु तिसऱ्या मुलाच्या बायकोने पतीला सांगून निराळाच संसार थाटला.

अशा तऱ्हेने एकेक करून त्याचे तिघे मुलगे त्याच्या हातातून निसटले. परंतु सोनूशेटला त्याची फिकीर नव्हती. कारण त्याला हुंड्याचे पैसे खूप मिळाले होते.

परंतु चवथ्याने आपल्या पित्याच्या इच्छे विरुद्ध हुंडा घ्यायचे अमान्य केले. बापाने त्याला पैशाचे महत्व अनेक प्रकारे समजावून सांगितले, परंतु त्याने तिकडे दुर्लक्ष केले. म्हणून सोनूशेटने दुसऱ्या तऱ्हेने थोडे फार पैसे उकळण्याचा विचार केला. तो मुलाला म्हणाला—"तर मग बाळा, आपण हुंडा घ्यायचाच नाही. ते लोक भेटअहेर म्हणून जे देतील ते घ्यायचे!"

मुलाने हट्ट धरला व म्हणाला—"तुम्ही हुंडा किंवा अहेर, मानपान इत्यादी सांगून

पैसे उकळणार नाही, हे तुम्हांला मान्य असेल तरच मी लग्न करीन!" असे सांगून चवथ्या मुलाने स्वतःच मुलीची निवड करून परस्परांना हार घातले आणि खर्चा शिवायचे लग्न केले.

मुलाने आपल्या बोलण्याकडे केलेले दुर्लक्ष सोनूशेटला मुळीच आवडले नाही. त्याने रागाने आपल्या चवथ्या मुलाला व सुनेला घराबाहेर काढले.

कित्येक वर्षे लोटली. सोनूशेट म्हातारा झाला. त्याची बायको फार पूर्वीच मरण पावली होती. मुले तर दूर रहात होती. एकटेपणा डाचू लागला. सोनूशेटने अंथरूण धरले. कोणाला पगारी नोकर म्हणून ठेवावे तर सोनूशेटला भीती वाटे की नोकराने गळा दाबला तर त्याचे हाल कुत्रासुद्धा पाहणार नाही. त्याला काळजी वाटू लागली की तो आतां अनाथ अपंग झाला आहे आणि मरण आले तर त्याचा देह उचलायला सुद्धा कोणी येणार नाही. चवथ्या मुलाला बाप आजारी असल्याचे कळले तेव्हां तो बायकोबरोबर वडिलांकडे चवकशीला आला. मुलाला पाहून सोनूशेटचे डोळे पाणावले. मुलाने पित्याचे सांत्वन केले आणि सुनेने सासऱ्याची सेवाशुश्रूषा केली. सोनूशेटला पुनर्जन्म मिळाल्यासारखे वाटले. हळूहळू त्याची तब्येत सुधारू लागली.

सोनूशेटने आपल्या तिघां थोरल्या मुलांची चवकशी केली तेव्हां चवथा मुलगा म्हणाला—"बाबा! दादा आतां कधी या घरी परत येणार नाही. तुम्ही त्याला हुंडा घेऊन त्याच्या सासऱ्याच्या हातात विकलेत. दुसरा भाऊ, तो तर त्याला न आवडणाऱ्या बायकोबरोबर मोठ्या कष्टाने दिवस काढतो आहे. तिसरा अण्णा, तो तर भांडूनच घराबाहेर गेला आहे."

ते ऐकून सोनूशेटला अनावर दुःख झाले आणि तो लहान मुलासारखा रडू लागला. आतां मुलांना परत विकत घेणे त्याला अशक्य होते. जो विकला गेला नव्हता तोच शेवटी विचारपूस करायला आला.





# खरे मोठेपण

श्रवणानंद नावाचे एक श्रीमंत गृहस्थ होते. त्यांना वाडवडिलार्जित मोठी इस्टेट मिळाली होती. तिचा पूर्ण उपभोग करून घेत व वाचनात सर्व काळ घालवीत ते आपल्या खेडे गावातच रहात असत.

एके दिवशी त्यांच्या घरी त्यांचे तिघे नातेवाईक आले. त्यांच्यापैकी एक जण व्यापारी होता, तर दुसरा गवई आणि तिसरा एक सरकारी पदाधिकारी. श्रवणानंदांनी तिघांचा उत्तम प्रकारे आतिथ्य सत्कार केला आणि त्यांच्या व्यवसायासंबंधी खोल चवकशी केली.

तेव्हां तिघांनी श्रवणानंदांना विचारले—"तुम्हांला लोकव्यवहाराची चांगली माहिती दिसते आहे. तेव्हां आम्हां तिघांत खरोखरी मोठा कोण, हे सांगू शकाल का?"

"मला विचाराल तर हा धंदा मोठा किंवा तो हे सांगणेच बरोबर नाही. माझ्या मते जे लोक आयुष्यभर प्रसन्न चित्ताने व समाधानी वृत्तीने राहतात तेच थोर होत. कारण प्रत्येकाच्या आयुष्यात तेच तर मुख्य असते."

"असं नका सांगू! कित्येकांच्या मनात व्यापार करण्याची इच्छा असते, परंतु प्रत्येकाला व्यापारी होणे शक्य आहे का?" व्यापाऱ्याने विचारले.

गवयाने व सरकारी अधिकाऱ्याने आपापल्या कामातील वैशिष्टय सविस्तर वर्णन करून श्रवणानंदांना सांगितले.

सर्वांचे बोलणे ऐकून घेऊन श्रवणानंद म्हणाले—"तरमग तुमच्यापैकी एकात ही मोठेपणा नाही असेच मला म्हणावे लागेल. मी स्वतः तुमच्यापैकी प्रत्येकाच्या व्यवसायात प्राविण्य दाखवू शकेन."

श्रवणानंदांच्या नातेवाइकांना ते एक आव्हानच वाटले. ते म्हणाले की जर



श्रवणानंदांनी आपले म्हणणे सिद्ध करून दाखविले तर प्रत्येक व्यक्ती त्यांना एकेक हजार रुपये बक्षिस देईल. श्रवणानंदांनी ते मान्य केले आणि आपल्या नातेवाइकांबरोबर राजधानीच्या गावी गेले. ते सर्वांत प्रथम व्यापाऱ्याच्या घरी उतरले.

त्या व्यापाऱ्याची राजधानीत कित्येक दुकाने होती. त्यांत एक भाजीचे दुकानसुद्धा होते. श्रवणानंदांनी त्या दुकानातून एक टोपलीभर चांगल्या जातीची वांगी विकत घेतली आणि बाजूला विकायला जाऊन बसले. त्यांनी वांग्याचा भाव जरा ज्यास्तच वाढवून सांगितला.

काही लोकांनी त्यांना विचारले–"तुम्ही इतर दुकानदारांपेक्षां जास्त भाव सांगता आहां." श्रवणानंद त्यांना उत्तर देत– "जसा माल तसा भाव! इतर दुकानदारांसारखाच माल असता तर मी किंमत जास्त कां सांगितली असती? हा माल सर्वांच्या लायक नाहीच. धनगुप्त सावकार नेहमी माझ्याकडूनच वांगी घेतात."

स्वतःला सुखवस्तू मानणारे लोकच श्रवणानंदांनी सांगितले त्या भावाने वांगी विकत घेणे आपल्या इभ्रतीलायक मानीत. म्हणून श्रवणानंदांकडचा सर्व माल विकला गेला. त्यांना खूप फायदा झाला.

दुसऱ्या दिवशी श्रवणानंद सामान्य लोकांच्या बाजारपेठेत गेले. तेथे त्यांनी नफ्याचे प्रमाण कमी ठेवून दुसऱ्या दुकानदारांपेक्षा स्वस्त भावाने मालाची विक्री केली. विक्री खूप झाली म्हणून नफासुद्धा फार झाला.

"तुमचे व्यापारी कौशल्य खरोखरच एक हजार रुपयांचे आहे!" या शब्दात श्रवणानंदांची वाखाणणी करून त्या नातेवाईक व्यापाऱ्याने श्रवणानंदांना एक हजार रुपये दिले. त्यानंतर श्रवणानंदांनी गवयाच्या घरीच आपला मुक्काम हलविला. तेथे दररोज गवयाजवळच संगीत शिकू लागले आणि कोठे तरी जाऊन येऊ लागले.

एके दिवशी ते बरोबर एक हरण घेऊन आले. ते गवयाला म्हणाले–"हे पहा हो, आपल्या दोघांमध्ये गायनाची चढाओढ होईल तेव्हां श्रेष्ठ गाणारा कोण हे हे हरण सांगेल."

दोघांमध्ये संगीताची चढाओढ होणार ही गोष्ट आसपासच्या लोकांना कळली. चहूकडून पुष्कळ लोक ती चढाओढ पहायला जमले. सर्वांत आधी गवयाने गाणे म्हटले. सर्वांनी त्याच्या गाण्याची वाखाणणी केली.

त्यानंतर श्रवणानंदांनी एक विरहगीत म्हणायला सुरवात केली. ते गीत एका तरुणाने आपल्या प्रेमिका राणीच्या विरह दुःखाने म्हटलेले होते. ते गीत फार चांगले किंवा वाईट होते असे नाही. परंतु श्रवणानंदांनी गाणं म्हणायला सुरवात करतांच ते हरण जवळ येऊन उभे राहिले व ते गाणे संपे पर्यंत तेथेच उभे राहिले. गाणे थांबल्यावर ते तेथून निघून गेले.

श्रोता व तो गवई सर्वच चकित झाले. सर्वांनी श्रवणानंदांची प्रशंसा केली. गायन ऐकून एक जनावर सुद्धा भुरळून जावे म्हणजे सामान्य गोष्ट आहे का?

गवयाने श्रवणानंदांना एक हजार रुपये दिले व विचारले–"तुम्ही हरणाला आपल्या गायनाने कसे हो आकृष्ट केलेत?"

"त्यात विशेष असे काहीच नाही. मी गाणं म्हटलं ते हरणालासुद्धा समजेल असे



म्हटलं. मीच त्याला तसं शिकवून तयार केले होते. मी त्याचे नाव राणी म्हणून ठेवले आहे. ते आपले नाव ऐकतांच जवळ येऊन उभे राहिले.' श्रवणानंद म्हणाले.

त्यानंतर श्रवणानंद सरकारी अधिकाऱ्याच्या घरी गेले आणि म्हणाले–"मी आपल्याला राजाकडून एक चांगलेसे इनाम देववून दाखवितो."

ते ऐकून सरकारी नोकराला थोडासा रागच आला. श्रवणानंदांनी एक रत्न भेट म्हणून मंत्र्याला नेऊन दिले.

प्रधानाने प्रसन्न होऊन विचारले– "आपल्याला माझ्याकडून कोणत्या प्रकारच्या मदतीची अपेक्षा आहे?"

"राजाच्या दर्शनाला जायला, आपण थोडा वेळ देवविण्याची कृपा करावी." श्रवणानंद म्हणाले.

प्रधानाने श्रवणानंदांना दुसऱ्या दिवशी दरबारात यायला सांगितले.

श्रवणानंद मंत्र्याचा निरोप घेऊन एका कवीकडे गेले. त्याला एक सोन्याचे नाणे देऊन राजाची स्तुती करून एक कविता लिहून द्यायला सांगितले.

दुसऱ्या दिवशी दरबारात श्रवणानंदांनी तीच कविता म्हणून दाखविली.

राजाने प्रसन्न होऊन विचारले–"ही कविता कोणी लिहिली?"

श्रवणानंद म्हणाले–"महाराज, ही कविता लिहिणारा कवी कोण, हे मला माहीत नाही. परंतु एवढे खरे की माझे एक नातेवाईक ही कविता म्हणून नंतरच सर्व कामे दररोज सुरू करतात. ही कविता ऐकूनच आपले दर्शन घेण्याची इच्छा माझ्या मनांत उद्भवली. आता माझी इच्छा पूर्ण झाली."

राजाला कळले की श्रवणानंदांचा तो नातेवाईक त्यांच्याच दरबारात काम करतो तेव्हां राजाने त्या सरकारी नोकराचा पगार वाढविण्याची आज्ञा केली.

त्यानंतर तिथे नातेवाईक श्रवणानंदांना म्हणाले–"तुमच्या अंगी इतके सर्व गुण असतां तुम्ही एखाद्या खेडेगावात कां पडून राहतां? राजधानीत येऊन रहा. तुमच्या गुणांची पारख राजधानीतच होईल."

श्रवणानंद हसून म्हणाले–"मला हे जे यश मिळाले ते क्षणिक आहे. तुमच्यासारख आपल्या धंद्यात किंवा व्यवसायात मग्न राहून यश मिळविणे सोपे नाही. मी तुमच्याहून मोठा होणे शक्य नाही. परंतु ज्ञानप्राप्तीच्या शोधात राहून आपले आयुष्य सुखाने घालविण्याची इच्छा माझ्या मनात आहे आणि ते इतरत्र कोठेही नाही, आपल्याच गावात."

श्रवणानंदांची नम्रता पाहून सर्व चकित झाले.





# इंद्र

[ २ ]

इंद्राने केलेल्या कामांत त्याने वृत्रासुराचा वध केला होता हे एक होते. ऋग्वेदात ७० वेळां वृत्रहन्ता म्हणून त्याचा उल्लेख झाला आहे. खरे पाहिले तर वृत्रासुर वधाच्या वेळी इंद्राबरोबर अग्नी व मरुत यांचाही हात होता. इंद्राने वृत्रासुरा व्यतिरिक्त उरण, विश्वरूप अर्बुद इत्यादी राक्षसांचा सुद्धा वध केला होता. तेव्हां त्यांच्या कडून त्याला सोमरस प्राप्त झाला होता.

इंद्राने पर्वतांचे आणि सपाट जमिनीचे कंपन थांबविले म्हणे. (पुराणांत इंद्राने पर्वतांचे पंख कापले असा उल्लेख आहे.) इंद्राने पृथ्वी व आकाश यांना निरनिराळे करून त्यांना उभे केले. कोणत्या तरी राक्षसाने त्यांना एक केले होते, त्या राक्षसाचा वध करून इंद्राने त्यांना निराळे केले असाही उल्लेख आहे.

आर्य ज्याज्यावेळी शत्रूशी युद्धाला निघत तेव्हां ते इंद्राचे स्मरण करीत व त्याचे आवाहन करीत. त्याने कृष्णवर्णीयांना जिंकले; ५० हजार कृष्णवर्णियांना पळवून लावून त्यांची नगरे ध्वंस केली. दस्यूंना आर्यांचे दास केले आणि आर्यांना भूमी दिली. सप्तसिंधु देशात दस्यूंच्या आयुधांचा आर्यांवर प्रयोग होऊ दिला नाही.

इंद्र त्याच्यावर जे पूर्ण विश्वास ठेवीत त्यांना मदत करी. त्याची जे आराधना करीत त्यांचा तो मित्र, सहोदर एवढेच नव्हे तर पितृतुल्य होता. त्याच्या मनात कुशिक वंशियांविषयी विशेष आदर होता म्हणे. एका जागी तर त्याचा कौशिक असाही



उल्लेख झाला आहे. सर्व संपत्तीला मूळ कारण तोच होता. त्याच्या युद्धांना 'गविष्टि' (गाईंची इच्छा असणारा) म्हणत. तो सामान्यपणे गोदाने करी. कधी कधी तो पुत्रकलत्रांचे दानही करी. ऋग्वेदातला 'मघवा' (पुष्कळ देणारा) हा इंद्रच होय. तोच वसुपति (संपत्तीचा नाथ) होता.

इंद्राच्या पराक्रमाची अनेक कामे वर्णिलेली आहेत. त्याने उषेचा रथ भग्न करून वाहनांचा वध केला होता. उषा त्यामुळे भयभीत होऊन पळून गेली होती.

एकदां सूर्याचा रथ आणि एतशा नावाचे घोडे जुंपलेला रथ यांची चढाओढ लागली होती म्हणे. सूर्याचा रथ पुढे जात असतां इंद्राने मध्ये ढवळाढवळ केली आणि सूर्याच्या रथाचे एक चाक काढून टाकले होते म्हणे. म्हणूनच की काय सूर्याच्या रथाला एकच चाक असते असे सांगतात.

एकदां पणि नामक जातीच्या लोभी लोकांनी यज्ञात बली देण्यासाठी गाई दिल्या नाहीत म्हणे. त्यांना त्यांनी कोठेतरी गुहांत लपवून ठेवले होते. तेव्हां इंद्राची सरमा नांवाची दूत दासी त्यांचा शोध काढीत गेली व तिने इंद्राच्या वतीने गायी मागितल्या. पणींनी तिच्याशी थट्टामस्करी केली. इंद्राने पणींना जिंकून गाईंचे हरण केले.

इंद्राने दासांना आणि दूस्यूंना जिकल्याचा उल्लेख अनेक स्थानी झाला आहे. हे मानवच होते. हे चपटचा नाकांचे व कृष्णवर्णीय होते. इंद्राने काही विशिष्ट व्यक्तींच्या हिताची कामे केली होती. इंद्राचा अनुग्रह असलेल्यात दिवोदास अतिथिग्व हा एक होता. त्याचाच मुलगा सुप्रसिद्ध राजा सुदास. दिवोदासाचा शत्रू शंबर हा दास जातीचा होता. इंद्राने दिवोदासाच्या साठी शंबराचा वध केला.

नमुचि नावाच्या राक्षसाचा वैदिक वाङ्मयात अनेक स्थानी उल्लेख झाला आहे. इंद्राने याची मान पिळवटून याचा वध केला आणि पाण्याच्या फेसाने वध केला असाही उल्लेख आहे. (इंद्राने राक्षसांचा संहार समुद्राच्या फेसाने केला हे वृत्रासुराच्या संदर्भातही सांगितले आहेच.) इंद्र नमुचीबरोबर सोमरस पान करून आजारी पडला तेव्हां अश्विनीकुमारांनी व सरस्वतीने औषधोपचार केल्याचा उल्लेख ऋग्वेदाच्या दहाव्या मंडळात आहे.

इंद्राने यदू आणि तुर्वसू यांना नदीपार केले होते. ही जवळ जवळ ऐतिहासिक घटना असावीशी वाटते. (यादव अनेक शाखोपशाखांत विभक्त झाले आणि भारताच्या निरनिराळ्या प्रांतात कायम वस्ती करून राहू लागले, ही गोष्ट संशोधनावरून सिद्ध झाल्यासारखी आहे.) आर्य भटक्या जातीचे जीवन घालवीत असतां इंद्र त्यांच्या मदतीला होता यावरूनही ही गोष्ट सिद्ध होते.

इंद्र आणि सुश्रवस दोघांनी मिळून रानटी जातीच्या वीस नायकांचा आणि साठ हजार नव्याण्णव रानटी जातीच्या योद्धयांचा संहार केला होता अशी एक कथा आहे. तशीच सुदासाची सर्व युद्धे ऐतिहासिकच असावीशी वाटतात. दशराज्ञ युद्ध हे सुदासाने दहा राजांसह केले तेच युद्ध. त्या युद्धात इंद्राने सुदासाला मदत केली होती. तसे सहाय्य करावे अशी इच्छा वसिष्ठ, तृत्स इत्यादी ऋषींनी प्रगट केली होती. त्याप्रमाणे इंद्राने सुदासाच्या शत्रूंना परुष्नी नदीत फेकले होते.



वैदिक कालातील इंद्र नैतिकदृष्ट्या किंवा थोरपणात वरुणाच्या बरोबरीचा नव्हता. तरी वरुणात जे काही गुण होते त्यातले अनेक इंद्रातही होते असा उल्लेख आहे. गौतम ऋषींची पत्नी अहिल्या हिच्याशी इंद्राचा संबंध होता ती कथा वेदकाळातीलच आहे, पौराणिक कल्पना नाही.

वरुण हा इंद्राच्या आधी होता असे काही विद्वानांचे मत आहे. ऋग्वेदकाळ चालू झाल्यावर क्रमेण वरूणाचा उल्लेख कमी होत गेला आणि इंद्राचाच उल्लेख उरला.

पारशी लोकांचा धर्मग्रंथ 'आवेस्ता' यात इंद्राचा उल्लेख मिळतो. परंतु त्याची स्तुती गायली गेलेली नाही. त्यांच्या म्हण-ण्याप्रमाणे इंद्र एक राक्षस होता. याच प्रमाणे 'आवेस्ता'त देव शब्दाचा उल्लेख आदर युक्त नाही. त्या ग्रंथात 'असुर' शब्दाचा उल्लेख आदरयुक्त झालेला आहे. वेदांतील अनेक शब्द आवेस्तात आढळतात. यावरून हे कळते की कधी काळी वैदिक-काळातील व आवेस्ता काळातील संस्कृती एकच असल्या पाहिजेत. वेदात 'असुर' शब्द एका काळी आदरार्थी होता. या वरूनही वरील गोष्ट सिद्ध होते. परंतु एका संदर्भात दोन्ही ग्रंथांतील भेद जाणवतो. काही लोकांच्या मताप्रमाणे दशराज युद्धाच्या वेळेपासूनच हा भेद सुरु झाला असावा.

पुराण कालातील इंद्राबरोबर वैदिक-कालातील इंद्राची तुलना केल्यास तो तेवढा मोठा योद्धा आढळत नाही. यज्ञकाल समाप्त झाल्यावर तपश्चर्येला महत्व मिळाले. तेव्हां प्रत्येक राक्षसाने तपश्चर्या करून ब्रह्मदेवाकडून किंवा शंकराकडून वर प्राप्त केले आणि इंद्राचा सहजी पराभव केला. त्या परिस्थितीत इंद्राने विष्णूसारखीच दशरथ राजासारख्या मानवांची सुद्धा मदत मागितली होती.





## विचारमग्न

कित्येक शतकांपूर्वी साकेतच्या सिंहा-सनावर एक राजा राज्य करीत असे. त्याला चार मुलगे होते. पुढे कित्येक वर्षांनी त्याला पुन्हां एक मुलगा झाला तेव्हां त्याने आपल्या धाकट्या राणीला कोणतातरी वर मागून घ्यायला सांगि-तला. धाकट्या राणीने आपल्या मुलाला गादी द्यावी. अशी मागणी केली. तेव्हां बाकी चार राजकुमार साकेत सोडून कोठेतरी निघून गेले.

ते राजकुमार सकुटुंब हिमालय पर्व-ताच्या पायथ्या लगतच्या प्रदेशात आले. तेथे एक नगर काबीज केले व ते राज्य करण्याचा प्रयत्न करू लागले. परंतु एका मुनीने त्यांना सल्ला दिला की त्यांनी दुसरे नगर वसवावे. राजकुमा-रांनी मुनीच्या कुटी नजीकच स्वतः राहण्यासाठी घरे बांधली.





त्या मुनीचे नाव कपिल होते. म्हणून त्या नगराचे नाव कपिलवस्तु पडले. त्या प्रदेशात शाक (सागवान) वृक्ष आधिक असल्याचे कारणाने तेथे राहणाऱ्यांना शाक्य नाव पडले. कित्येक पिढ्या होऊन गेल्यानंतर शुद्धोदन त्या वंशाचा राजा झाला. एके दिवशी रात्री त्याची राणी माया हिला तिच्या शरिरात एका श्वेत



ज्योतिष्यांनी त्या स्वप्नाचा अर्थ असा सांगितला की राणीच्या पोटात कोणी तरी थोर पुरुषाने प्रवेश केला आहे. त्यानंतर राणी आपल्या माहेरी निघाली. वाटेत लुंबिनीवनात राणी विश्रांती घेत एका सागवानाच्या झाडाची फांदी धरून उभी असतां तिच्या पोटात दुखू लागले.

राणी लुंबिनीवनातच बाळंत झाली. त्यानंतर बाळबाळंतीण कपिलवस्तूला परतली. राजाला परमानंद झाला आणि राज्यभर पुत्रजन्मोत्सव साजरा करण्यास आज्ञा केली. परंतु तो उत्सव चालू असतांच राणी मुलाला तो सात दिवसांचाच असतां मुलाला मातृहीन साथ स्वर्गलोकी निघून गेली.





राजाकुमाराचे नाव सिद्धार्थ ठेवण्यात आले. सिद्धार्थ शब्दाचा अर्थ, ज्याने आपला सद्हेतू किंवा उद्देश्य प्राप्त केला आहे, असा होतो. सिद्धार्थ राजोद्यानात बसले असतां एक पक्षी बाण लागून त्यांच्या मांडीवर येऊन पडला. सिद्धार्थने पक्ष्याच्या अंगात शिरलेला बाण काढून त्याला वांचविले. इतक्यात

देवदत्त म्हणाला–"मी या पक्ष्याला मारले आहे. म्हणून मला हा मिळाला पाहिजे." परंतु सिद्धार्थने पक्षी दिला नाही राज्य दरबारात गेला. सिद्धार्थने तेथे विचारले–"कोणताही प्राणी, त्याला मारणाऱ्याचा असतो की वांचा-विणाऱ्याचा ?" मंत्र्यांनी सिद्धार्थाच्या बाजूने निवाडा दिला.





एके दिवशी शेत नांगरण्याचा उत्सव साजरा होत होता. युवराज तो उत्सव पहायला गेले. एका शेतात काही शेतकरी सांपाला धरून त्याला ठार करण्याच्या प्रयत्नात होते. तेव्हां सिद्धार्थाला वाटलं की या जगात मानवाचे आस्तित्व हिंसेने भरलेले आहे. राजकुमाराचे मन त्या क्षणा-पासून विचारात गढून गेले.

त्या दिवसापासून सिद्धार्थ जगाच्या गतिविधि संबंधाने विचार करू लागला. तो विचारमग्न झाला "मानव हा सर्वदा संघर्ष आणि हिंसाच करीत राहणार का ? मानवाला सुख व समाधान देतां येईल का ? मानव जीवनाचे ध्येय इतर काही नाही का ?













युवराजाने घराचा उंबरठा ओलांडला नाही तर चक्रवर्ती होईल, नाहीतर बुद्धित्व प्राप्त करील, असे ज्योतिष्यांनी सांगितले. राजाने युवराजासाठी तीन महाल बांधून तयार करविले, एक ग्रीष्मऋतुसाठी संगमरवरी, दुसरा हिवाळ्यासाठी लाकडाचा आणि तिसरा पावसाळ्यासाठी, तिन्हींत सर्व प्रकारच्या सुखसोयी होत्या.

सुप्रबुद्ध याची मुलगी यशोधरा अत्यंत लावण्यवती होती. तिच्या स्वयंवराची तयारी केली. राजा शुद्धोदन याने त्या स्वयंवराला सिद्धार्थाला पाठविले. स्वयंवरप्रसंगी चढाओढीत भाग घ्यायला अनेक राजकुमार आले होते. परंतु सर्व प्रकारच्या स्पर्धांत सिद्धार्थच यशस्वी झाला.





यशोधरेने सिद्धार्थाच्या गळ्यात माळ घातली. त्यांचा विवाह झाला. सिद्धार्थ पत्नीसह आपल्या राजधानीत परतला. कपिलवस्तुलाही थाटामाटाने उत्सव साजरा झाला. शुद्धोदनाच्या मनाला निश्चितता वाटली की आता मुलगा महालाबाहेर कोठे जाणार नाहीं.



# निरुपयोगी वस्तू

मणिपूर येथे रामूशेट खोबरेल तेलाचे व्यापारी होते. घाण्याचे तेल काढायला कोरडे खोबरे लागते. परंतु ते पुरेसे मिळत नव्हते. म्हणून रामूशेट नारळ विकत घेऊन त्यातले खोबरे काढून वाळवीत आणि करवंट्या फेकून देत. वाळलेल्या खोबऱ्याचे तेल घाण्यात काढीत.

एकदा रामूशेटच्या घरी जनार्दन नावाचा एक तरुण युवक आला. त्याने रामूशेटच्या घराच्या आवारात करवंट्यांचे ढीगच्या ढीग पडलेले पाहून विचारले—"तुम्ही या करवंट्यांचे काय करणार हो?"

"जाळायच्या कामाला येतात या करवंट्या. याहून जास्त यांचा काही एक उपयोग नाही." रामूशेट म्हणाला.

"तुम्ही मोठमोठ्या करवंट्या मला विकत द्या, मी विकत घ्यायला तयार आहे." जनार्दन म्हणाला.

रामूशेटने विचार केला पाणी तापवायला सरपणाशिवाय या करवंट्यांचा उपयोगच काय? त्याने शक्य तितक्या मोठमोठ्या करवंट्या निवडून दोन पोती भरली. त्यांची किंमत देऊन जनार्दन त्या करवंट्या घेऊन गेला.

तेव्हां पासून रामूशेट नारळ फोडतांना नारळाच्या गोल गोल सरळ दोन करवंट्या निघतील असा फोडवून घेऊ लागला. जनार्दन दर पंधरवड्याला येऊन सर्व करवंट्या घेऊन जाऊ लागला. असेच एक वर्ष लोटले. त्यानंतर जनार्दनने नारळाच्या करवंट्या विकत घ्यायच्या बंद केल्या.

दोन महिने लोटले.

शेवटी एकदा रामूशेटला कळले की जनार्दन लक्ष्मणपूर नावाच्या गावी राहू लागला आहे. ते गाव मणिपूरपासून



पंचवीस मैलांवर होते. एकदां रामूशेट काही कामानिमित्त जिल्ह्याच्या गावी गेला व परत येतांना लक्ष्मणपूर मार्गे परतला. त्याने लक्ष्मणपूरला पोचल्यावर जनार्दन संबंधी चवकशी केली. सुदैवाने सहजी त्याच्या घराचा पत्ता मिळाला.

रामूशेट नारळाच्या बागातून जाताजातां एका आमराईतल्या एका मोठ्या वाड्यासमोर आला. तो वाडा कोणा श्रीमंताचा वाडा असावा असे त्याला वाटले. रामूशेटला वाटले की जनार्दन या श्रीमंत माणसाकडे नोकरी करीत असावा. रामूशेटने त्या वाड्याच्या फाटकाजवळ काम करणाऱ्या गड्याला विचारले–"काय रे, या घरात कोणी जनार्दन नावाचा माणूस राहतो का?"

त्या माणसाने चकित होऊन रामूशेटकडे पाहिले आणि आंत यायला विनंती केली. ते घर कोणत्या तरी जमिनदाराच्या घरासारखे होते. वाड्याच्या गच्चीवर काही लोकांशी बोलत असलेली व्यक्ती जनार्दन सारखीच रामूशेटला वाटली. त्याच्या अंगावरचा पोशाख श्रीमंत घराण्यातल्या माणसासारखा होता. त्याने रामूशेटला गच्चीतूनच पाहिले आणि त्यांना घरात बोलवून आणायला नोकराला पाठविले आणि स्वत: जिना उतरून खाली आला. खाली दिवाणखान्यात दोघे भेटले. जनार्दनच्या घरचा तो थाट पाहून रामूशेट थक्कच झाला.

"रामूशेट, माझ्या घरातला हा थाट व वाडा वगैरे पाहून तुम्हांला आश्चर्य वाटत असेल नाही? तुम्हांला वाटत असेल की करवंटचा विकत घेऊन जाणाऱ्याला एवढा मोठा वाडा आणि हे रेशमी कपडे वगैरे कोठे मिळाले? पहिल्याने तुम्ही माझ्या घरी चार दिवस आनंदाने रहा. नंतर आपण स्वस्थपणे सर्व काही बोलू!" जनार्दन म्हणाला.

पंचपक्वान्नांचे जेवण झाल्यावर दिवाणखान्यात कोचावर बसून जनार्दन रामूशेटला आपल्या आयुष्यातले मार्मिक प्रसंग सांगू लागला. म्हणाला–"एका काळी आम्ही सर्व जमिनदार घराण्यातलेच. आमच्या वाडवडिलांनी मागेपुढे न पाहतां दानधर्म करण्यात अलोट पैसा खर्च केला. शेवटी कंगाल झाले. मी वयात आलो तेव्हां माझे वडील आजोबा वगैरे कोणीच नव्हते व ते वैभवही नव्हते.

येथून जवळच मायावती नावाचे एक गाव आहे. त्या गावाचे जमिनदार देशमुख एकदा आपल्या गाडीत बसून कोठेतरी जात होते. वाटेत त्यांची गाडी उलटली. नेमका त्याच वेळी मी त्या बाजूने जात होतो. मी आणि गाडीवाल्याने मिळून गाडी सरळ उभी केली. त्यानंतर मी देशमुख साहेबांना त्यांच्या घरी सुखरूप पोचते केले.

"बोलतां बोलतां त्यांनी माझ्याविषयी चवकशी केली व माझे पूर्वचरित्र ऐकून त्यांना फार वाईट वाटले.

"मी त्यांना समजावून सांगितले की त्यांनी ही गोष्ट मनाला लावून घेऊ नये. कधी कधी निरुपयोगी वस्तूंच्या मदतीने दौलत संपादन करता येते."

देशमुखसाहेब म्हणाले–"जनार्दन, तू निरुपयोगी वस्तूतून दौलत संपादन करू शकतोस, म्हणालास, तर मी तुझे लग्न माझ्या मुलीशी करून देतो. तू भांडवल



म्हणून तुला वाटेल तितके पैसे माझ्याकडून मागून घे." त्यानंतर मी देशमुख साहेबांकडून काही पैसे कर्जाऊ मागून घेतले खेळणी व मातीच्या मडक्यांवर चित्रे रंगविणाऱ्या दोघांना आणि दोघां हुशार सुतारांना कामाला लावले. करवंटचा जमवून त्यांची उत्तमोत्तम खेळणी, बाहुल्या, पळ्या वगैरे तयार करवून त्यांच्यावर सुंदर रंग भरविले. चित्र विचित्र रंगाचे बाहुलेबाहुल्या स्वत:च डोकी हलवू लागल्या म्हणजे फार आकर्षक वाटत. म्हणून शहरात त्यांना चांगली किंमत मिळू लागली.

"त्याच बरोबर नारळाच्या सावळ्या आणवून त्यांचे हीर काढविले. चार

बायकांना रोजी मिळाली आणि त्यांच्याच कडून केरसुण्या बांधवून घेतल्या. माझ्या बाहुल्यांना, खेळण्यांना, केरसुण्यांना आणि नारळांना देशभर चांगली मागणी मिळू लागली. त्याच प्रमाणे परप्रांतात आपल्या प्रांतात न मिळणारा अशाच तऱ्हेचा माल मिळे. तो मी मागवू लागलो. त्याला आपल्या प्रांतात चांगली मागणी होती. म्हणून चांगली किंमत मिळू लागली. अशातऱ्हेने खूप पैसे मिळविले.

"सुरवातीला कच्चा माल मला तुमच्या कडून मिळत असे. तुम्ही खोबरेलाचा व्यापार करतां व करवंट्या विकतां. पुष्कळ पैसे जमल्यावर मी लक्ष्मणपुरला कायम रहायचे ठरविले. कारण तेथे नारळाच्या बागा पुष्कळच आहेत."

"देशमुख साहेब माझे काम पाहून फार खूष झाले. एकदां त्यांनी मला बोलवून घेतले आणि म्हणाले–"फ़क्त नारळाच्या करवंट्या व हीरांचा व्यापार करून तू इतके पैसे मिळविलेस हे पाहून मला फार आश्चर्य होत आहे. सर्व लोक अशी मेहनत करून काम करू लागले तर जगात अशक्य असे काही राहणारच नाही." असे सांगून त्यांनी एका सुमुहूर्तावर आपल्या एकुलत्या एका मुलीचे लग्न माझ्याशी लावून दिले.

"मी देशमुख साहेबांची जमिनदारीची सर्व कामे पाहतो आणि लक्ष्मणपुरीत त्यांच्याच वाड्यात राहातो आहे. परंतु ते मात्र मायावती येथेच राहतात."

रामूशेट जनार्दनने जे आत्मवृत्त सांगितले ते ऐकून खूष झाले. म्हणाले–"जनार्दन राव! अहो, तुम्ही तरुण पिढीला एक उदाहरण घालून दिलेत! तुमच्यासारखी योजना करून प्रत्येक जण काम करू लागला तर बेकारी आणि गरीबी राहीलच कां?"

त्यानंतर जनार्दनने जेजे छोटेखानी धंदे सुरू केले होते ते रामूशेटने स्वत: जाऊन पाहिले. स्वत: चांगली कमाई करीत राहून चारचौघांच्या पोटापाण्याची त्याने व्यवस्था करून दिली त्याबद्दल त्यांनी जनार्दनचे अभिनंदन केले.





# सदाचरणी

सीताराम एक दिवशी संध्याकाळी हिंडायला कालव्याच्या काठाकाठाने निघाला. काळोख पडू लागल्यावर परत निघाला. वाटेत एक अमराई होती. तीतून दोन चोरांनी बाहेर येऊन मारहाण करायला सुरवात केली. त्यांच्या हातात सुरे होते. एकाने सीतारामाचे दोन्ही हात धरून पिळवटले. दुसऱ्याने सीतारामाच्या हातातली अंगठी आणि खिशातले पैसे काढून घेतले. नंतर सुरा गळयावर ठेवला.

सीताराम ओरडला–"वांचवा हो, वांचवा!"

तितक्यात एका तरुणाने समोर येऊन दोघां चोरांना दरडावून विचारले–"कोण रे, तुम्ही?" चोर त्याला मारायला धावले. पण त्याच्यासमोर टिकाव लागणार नाही, हे कळतांच त्यांनी पाय काढला.

सीताराम जिवात जीव आल्यासारखा त्या तरुणाचे आभार मानीत म्हणाला–"मुला, तू कसा देवासारखा पावलास! तू बरोबर घरापर्यंत चल!"

"अहो, असं काय बोलतां? तुम्हीवडील माणसं? संकट समयी जो कोणी मदतीला धावत नाही, तो माणूस नसून राक्षस असतो. चला." या शब्दात त्या तरुणाने सीतारामाला हाताचा सहारा देऊन घरापर्यंत पोचते केले.

वाटेत सीतारामने त्या मुलाची जास्त चवकशी केली. त्या मुलाचे नांव धर्मराज होते. त्याच्या लहानपणीच त्याचे आई-वडील वारले. गांवकऱ्यांच्या कृपेने त्याने विद्याभ्यास पुरा केला आणि नोकरीच्या शोधार्थ त्या गावी आला होता. परंतु अद्याप त्याला नोकरी मिळाली नव्हती. घरी पोचताच सीताराम मुलीला धर्म-



राजाची ओळख करून देऊन म्हणाला—"हा धर्माचा अवतार जर वेळेवर आला नसता तर माझं प्रेतच घरी परतलं असते."

सीतारामाची मुलगी सरला डोळ्यात पाणी आणून म्हणाली—"बाबा, तुम्हांला मी कितीदां सांगितले की काळोख पडल्या-वर एकटयाने कोठे हिंडायला जाऊ नका, परंतु तुम्ही कधी ऐकतच नाही, नशीब बलत्तर म्हणून हे गृहस्थ वेळेवर आले."

धर्मराज म्हणाला—"बरं तर मला आतां निरोप द्या."

"अरे तू या काळोखात कोणाकडे जाऊन राहणार? तू आमच्याच घरी रहा." सीताराम म्हणाला. सरलाने लगेच एक खोली झाडून धर्मराजाला रहाण्यासाठी तयार करून दिली.

जेवायला बसल्यावर सीताराम धर्मराजाला म्हणाला—"मुला, माझ्याजवळ लक्षावधी रुपये आहेत. परंतु जोंपर्यंत माझ्या मुलीचे लग्न एखाद्या सदाचरणी व्यक्तीशी होत नाही तोपर्यंत माझ्या मनाला शांती मिळणार नाही."

दुसऱ्या दिवशी धर्मराज सीतारामाला म्हणाला—"बरं मी आतां निरोप घेतो. कोठेतरी नोकरी मिळते का पाहातो."

"कोठे शोधणार? तुला नोकरी मिळाली असेच समज. या गावात माझी कापडाची चार दुकाने आहेत. त्यांची देखरेख तू कर." सीताराम म्हणाला.

धर्मराजाने अगदी अनिच्छेने ते मान्य केले. सरलाला वाटले की वडिलांनी योग्य तेच केले. परंतु लवकरच धर्मराजाविषयी सरलाचे मत पालटू लागले. कारण तो सीताराम घरात असे त्यावेळी सरलाशी ज्या तऱ्हेने वागे त्यापेक्षा सीताराम घरात नसतांना अगदी निराळ्या तऱ्हेने वागू लागला. सरलाचे मन आकृष्ट करण्यासाठी तो थोडा आगाऊपणा करू लागला.

एकदां सरला वडिलांना म्हणालीसुद्धा—"बाबा, धर्मराज आतां किती दिवस





आपल्या घरात राहणार? त्याला राहण्यासाठी एखादे घर कां नाही पाहून देत?"

"तू म्हणतेस ते बरोबरच तर आहे! नाहीतरी तो परका म्हणून आपल्या घरात किती दिवस राहणार? तो एक सदाचरणी मुलगा आहे. मला वाटतं तो घरजावई होऊन राहील कायमचा घरात. तुला काय वाटतं?" सीतारामाने मुलीला विचारलं.

ते ऐकून सरला थक्कच झाली. तिला विचारल्याशिवाय धर्मराजाशी वडिलांनी लग्नाची गोष्ट काढली म्हणावयाची? सरलाला ती गोष्ट आवडली नाही. तो तिचा अपमान होता. कारण तिच्या मनात मैत्रिणीचा भाऊ राजेश नावाचा होता, त्याच्याशी लग्न करायचे होते. तिने ती गोष्ट चुकूनसुद्धा वडिलांच्या कानावर घातली नाही. कारण तो परजातीचा होता.

सरलाने वडिलांना विचारले—"तो सदाचरणी मुलगा आहे, हे तुम्हांला कशावरून वाटले?"

सीतारामाने थोडयाशा रागाने म्हटले—"मी लोकांचा स्वभाव ओळखतो. पुढल्या महिन्यात तुझे लग्न धर्मराजाशी होईल! मी मुहूर्तसुद्धां ठरविला आहे."

ती वडिलांसमोर काही बोलू शकली नाही. खोलीबाहेर निघून गेली. दोघांचे संभाषण आड उभा राहून धर्मराज ऐकत होता, हे तिच्या लक्षात आले. सरलाला बाहेर येत असलेली पाहून तो तेथून निसटला होता.

त्या दिवशी रात्री सरलाला झोप आली नाही. तिने पुढे काय करायचे याविषयी राजेशशी बोलायचे ठरविले.

त्याच वेळी धर्मराजाच्या खोलीतून त्याची किंकाळी ऐकू आली. सरला जागीच होती. ती धावत धर्मराजाच्या खोलीत गेली. धर्मराज घाबरल्यासारखा खाटेवर थरथर कापत बसला होता. खाटेच्या दुसऱ्या कोपऱ्यावर एक पांढरा बोका बसलेला होता. सरलाला पाहतांच धर्मराज म्हणाला—"या बोक्याला पळव पाहू!"



"तो काय करणार हो तुम्हांला? तो पाळलेला बोका तर आहे!" असे म्हणत सरलाने त्या बोक्याला उचलून घेतले.

"मला मांजर मुळीच आवडत नाही. म्हणजे मला त्याची भीती वाटते, असे मुळीच नाही!" धर्मराज आपली बाजू संभाळू लागला.

सरलाला धर्मराज म्हणाला ते खरे वाटले नाही. ती बोक्याला घेऊन निघून गेली.

दुसऱ्या दिवशी तिने राजेशला भेटून सर्व काही सांगितले आणि म्हणाली– "धर्मराजाने बाबांना आपल्या जाळ्यात फंसवून ठेवले आहे. जी व्यक्ती एखाद्या सामान्य मांजराला पाहून थरथर कांपते ती चोरांपासून माझ्या वडिलांचे रक्षण कशी करू शकली, हेच मला कळत नाही!

"मी काढतो त्याचे गुपित शोधून. परतु त्यापूर्वी आपण गोष्ट सिद्ध करून दाखवायची आहे!" असे सांगून राजेशने सरलाला एक युक्ती सुचविली.

दुसऱ्या दिवशी सरला धर्मराजाला म्हणाली–"मी डोंगरावरच्या देवीच्या दर्शनाला जावे म्हणते! तुम्ही येता का बरोबर सोबतीला?"

धर्मराज आनंदाने तिच्या बरोबर निघाला. ते देवीचे दर्शन करून डोंगर उतरू लागले तेव्हा काळोख पडू लागला. पूर्वी ठरल्याप्रमाणे राजेश एका झाडाआडून एकदम पुढे आला आणि त्याने सरलाच्या गळ्यातला सोन्याचा हार तोडून घेतला.

सरला ओरडली–"चोर, चोर! पकडा चोराला! दहा हजारांचा सोन्याचा हार आहे हो!" तरी राजेश तेथून हलला डुलला नाही. तो तेथेच उभा राहून धर्मराजाला आव्हान करीत म्हणाला– "काय रे, ए! तू येतो आहेस का मला धरायला? तुझा गळा दाबून तुझे प्रेत देईन फेकून त्या दरीत!"

परंतु धर्मराज ती धमकी ऐकून जागचा हलला नाही. त्याचे पायच गारठले होते. तेवढ्यात आणखी कोणाला येत असलेला पाहून राजेश झाडीत गडप झाला.

"सोन्याचा हार गेला तर गेला, जीव तर वांचला. चला, घरी जाऊं या." सरला म्हणाली.

दुसऱ्या दिवशी सरला राजेशच्या घरी गेली तेव्हां तो म्हणाला–"आतां हे पूर्णपणे सिद्ध झाले आहे की धर्मराज अगदी भित्रा आहे. त्याने भाडोत्री चोरांचे नाटक करून तुमच्या घरात शिरायला मार्ग काढला आणि तुझ्याशी लग्न करून तुमच्या सर्व इस्टेटीची मालकी मिळविण्याचा कट केला होता. मी त्याचे हे नाटक बंद करतो. तू एक काम कर." असे सांगून राजेशने सरलाला एक युक्ती सुचविली.

दुसऱ्या दिवशी संध्याकाळी राजेश सीतारामला भेटला व म्हणाला–"माझे नाव राजेश आहे. तुमच्या हिताची म्हणून एक गोष्ट सांगायला आलो आहे. तुम्ही ज्या धर्मराजला आपला जावई करून घेण्याच्या विचारात आहां त्याचे खरे स्वरूप तुम्हांला पहावयाचे असेल तर माझ्याबरोबर चला."

सीतारामला त्याच्याबरोबर जाण्याची मुळीच इच्छा नव्हती. तरी त्याला वाटले की राजेश म्हणतो आहे त्यामागे काहीतरी भयंकर गोष्ट कानाडोळा न करण्यासारखी आहे.



इकडे धर्मराज काळोख पडल्यावर घरी परतला. तेव्हां सरला त्याला म्हणाली– "तुम्हांला शोधत दोघे जण आले होते. त्यांनी तुमच्या हिताचे काहीतरी काम केले आहे. त्याचे फळ तुम्हाला पूर्णपणे मिळालेले नाही. लगेच त्यांना भेटायला त्यांनी सांगितले आहे." असे सांगून सरलाने राजेशच्या घराची खूण धर्मराजाला सांगितली.

ते ऐकून धर्मराजाच्या चेहऱ्याचा रंगच पालटला. तो लगेच राजेशच्या घरी निघाला.

राजेश आपल्या घरात पुढल्या बैठकीतला दिवा थोडा मंद करून सीतारामाला

म्हणाला–"धर्मराज लवकरच येथे येईल. तुम्ही तो काय बोलतो तें लक्ष देऊन ऐका."

धर्मराजने काळोखात त्या खोलीत दोघांना पाहिले. त्याला फक्त त्यांची आकृतीच दिसत होती. रागाने म्हणाला– "तुमचं डोकं तर फिरलं नाही? माझं सासुरवाड होणार आहे त्या घरात तुम्ही कशाला आलां होतां? त्या म्हाताऱ्याने तुम्हांला पाहून ओळखले असते तर काय झाले असते? तुम्ही दोघांनी मला जी मदत केली होती त्याबद्दल दामदुप्पट प्राप्ती तुम्हांला झाली आहे! मी जे शंभर रुपये दिले होते त्याशिवाय तुम्हांला म्हाताऱ्याची अंगठी व रुपयेसुद्धा मिळाले आहेत. तुमच्या लोभीपणाला आतां काय म्हणावयाचे? लग्न झाल्यावर म्हाताऱ्याच्या हातातून मी सर्व अधिकार काढून घेईन. तोपर्यंत तुम्ही गप्प रहा. तुम्ही त्या पूर्वी पुन्हां आलात तर सर्वच डाव फसेल व एक कवडी सुद्धा मिळावयाची नाही."

धर्मराजचे ते वाक्य पूर्ण होताच राजेशने दिवा मोठा केला. त्या उजेडात सीताराम व राजेशला पाहून धर्मराजला 'सळो की पळो' झाले.

त्याच वेळी सरलाने बैठकीत पाऊल टाकले व म्हणाली–"बाबा, पाहिलेत ना? तुम्ही या लबाडाला सदाचरणी व आपल्या जातीचा सांगून डोक्यावर चढविले होते. त्याची ही लबाडी राजेशने उघडकीला आणली नसती तर आपले जे हाल झाले असते ते त्या परमेश्वरालाच माहीत!"

सीताराम धर्मराजकडे एकदां करड्या नजरेने पाहून म्हणाला–"तू माझ्या डोळ्या समोरून आतांच्या आतां दूर झाला नाहीस, तर मी पोलीस शिपायांना बोलवून तुला अटक करवीन."

धर्मराजने लगेच तेथून पाऊल काढले.

त्यानंतर सीतारामने विचार केला की राजेश परकी जातीचा असला तरी सदाचरणी आहे. म्हणून त्याने स्वखुशीने सरलाचे लग्न त्याच्याशी करून दिले.





# स्त्रीला जे पाहिजे

शारदा एक विधवा बाई होती. ती चिक्कू व लोभीपण होती. तिचा मुलगा सदाशिव. त्याचे नुकतेच लग्न झाले होते. या लग्नात तिने वधूपक्षाकडून इतका हुंडा घेतला की व्याह्यांचे दिवाळंच निघालं. रीतीप्रमाणे सदाशिवाच्या सासऱ्याने मुलीला व जांवयाला दिवाळसणासाठी बोलाविले.

आणखी दोन दिवसांनी सदाशिव सासुरवाडी निघणार होता. तेव्हां शारदाने सदाशिवला बाजूला बोलावून काही समजावून सांगितले. म्हणाली–"बाळा! तू पहिल्यानेच सासुरवाडी जातो आहेस. सासऱ्याला सोन्याची अंगठी करून द्यायला सांग, वरं का? तू नवा जावई आहेस ना? सासरा तू मागशील ते देईल!"

सदाशिवला ते आवडले नाही. चिडून म्हणाला–"आई, लग्नात त्यांनी अंगाबाहेर खर्च केला आणि डोक्यावर कर्ज करून घेतलं असेल. तेव्हां आणखी अंगठी मागून त्यांना संकटात टाकू म्हणतेस?"

"बाळा, तुझ्या हातात अंगठी असावी-असे मला वाटते. आईची इच्छा मुलानेच पुरी करायची असते. बायकोची इच्छा अशीच पतीने पुरी करावी." आई म्हणाली.

सदाशिवने भांडण वाढविले नाही. तो दिवाळसणासाठी बायकोला घेऊन सासुरवाडी गेला. दिवाळसण संपल्यावर दोन-तीन दिवस राहून बायकोबरोबर घरी परतला.

आपल्या मुलाच्या बोटात सोन्याची एक मोठी अंगठी पाहून शारदाला परमानंद झाला. तिने ती अंगठी तिला फार आवडल्याचे पण सांगितले.

आणखी काही दिवसांनी शारदा मुलाला हाक मारून म्हणाली–"बाळा, मी वर

माळयावर पेटीत हजार रुपये ठेवले होते. ते आता दिसत नाहीत! तू घेतले होतेस का? कसे गेले? कोणी नेले?"

"होय आई, मी सासुरवाडी जाते वेळी ते रुपये घेऊन गेलो होतो. मी तुला नव्हते का सांगितले की माझ्या सासऱ्याच्या डोक्यावर कर्जाचे केवढे मोठे ओझे झाले आहे म्हणून? तुला माझ्या बोटात अंगठी पहायला हवी होती. तुला हवं होतं तेच नाही का झाले? सासऱ्याला डोके वर काढायला जागा नव्हती. म्हणून तुझी इच्छा पुरी करण्यासाठीच तर मी तुझ्या पैशाने ही अंगठी करवून घेतली." सदाशिव शांतपणे म्हणाला.

शारदाने चकित होऊन विचारले— "म्हणजे तू माझेच पैसे खर्च करून अंगठी करविली का? माझे पैसे घेऊन अंगठी करायची गोष्ट तुझ्या मनात आलीच कशी?"

"आई, तूच नव्हतं का मला सांगितलंस की आईची इच्छा पुरी करणे मुलाचे आद्य कर्त्तव्य आहे म्हणून?" सदाशिवने निःसंकोचपणे विचारले.

"ठीक, मी मानते की तू माझ्या इच्छे प्रमाणेच हे केलेस. आतां ही अंगठी विकून माझे रुपये मला परत आणून दे!" सरला म्हणाली.

"आई, तुला असे वाटलं का की ती अंगठी अजून माझ्याजवळ आहे म्हणून? तुझ्या सुनेनं रेशमी शालू साठी हट्ट केला. म्हणून मी अंगठी विकली व एक चांगला जरीचा काठपदरी शालू बायकोसाठी विकत घेतला." सदाशिव म्हणाला.

"अरे, तू हे काय रे केलेस? तुझ्या बायकोची हौस तू माझ्या पैशाने कां पुरविलीस?" असे म्हणत ती दोन्ही हातांनी आपलं कपाळ बडवू लागली.

"आई, तूच तर सांगितलं होतंस की बायकोची इच्छा पुरी करणे पतीचे कर्त्तव्य असते म्हणून?" सदाशिवने आईला उलट प्रश्न विचारला. त्याचे उत्तर काय द्यायचे बराच वेळ शारदाला विचार करूनही सुचले नाही.






पतीने दिलेल्या शापामुळे लक्ष्मी घोडी झाली होती. त्या पतीपासूनच तिला एक मुलगा झाला आणि शापमुक्ती मिळाल्यावर पतीबरोबर वैकुंठलोकी निघतांना तिने आपल्या मुलाला नदी-काठच्या अरण्यात सोडले. त्यानंतर थोड्या वेळाने चंपक नावाचा एक विद्याधर आपल्या मदालसा नावाच्या पत्नीबरोबर विमानात तेथे आला. त्याने अत्यंत तेजस्वी अशा त्या मुलाला पाहिले. तो विमानातून उतरला आणि त्याने त्या मुलाला उचलून मदालसेला दिले. मदालसेने अत्यंत आनंदाने व प्रेमाने त्या मुलाला पोटाशी धरले व पतीला विचारले—"कोणाचा बरे असावा हा मुलगा? तुम्हांला कसा काय मिळाला? कोणी याला जन्मतांच या अरण्यात एकटा सोडून दिले?"

"कोणाचा मुलगा आहे, न कळे? इंद्राची परवानगी घेऊन त्याने होकार दिल्यावर याला वाढवू या." असे मदालसेला सांगून चंपक इंद्राकडे गेला.

त्याने इंद्राला, त्या मुलाला दाखविले व म्हणाला—"हा मुलगा, कोण कोणाचा हे मला माहीत नाही. तमसा नदीच्या काठावर सांपडला. कोणीतरी याला जन्मताच नदीकाठी ठेवून निघून गेलेली दिसते आहे. आपण परवानगी दिलीत तर याला घरी घेऊन जाऊन याचे लालन पालन करावे, म्हणतो."



इंद्र चंपकला म्हणाला–"हा मुलगा अश्वरूपात असलेल्या लक्ष्मीनारायणांचा मुलगा आहे. ह्याचे नाव हैहय आहे. ययातीचा मुलगा तुर्वसु याला दत्तक देण्यासाठी विष्णूच्या पोटी हा मुलगा शिशुरूपे जन्मला आहे. म्हणून तू या मुलाला तो जेथें मिळाला तेथेंच सोडून ये. विष्णूच्या प्रेरणेने तुर्वसु लवकरच तेथे जाईल. या मुलाचे नाव एकवीर पडेल."

इंद्राच्या सूचनेप्रमाणे चंपक त्या मुलाला परत, तो जेथे मिळाला होता तेथे पोचवून निघून गेला.

मध्यंतरी भगवान विष्णू ययातीचा मुलगा तुर्वसूला दर्शन देता झाला. थोर ऋषीमुनींनासुद्धा दुर्लभ अशा विष्णूचे दर्शन झाल्याने स्वत:ला भाग्यवान मानून तुर्वसू विष्णूचे स्तोत्र गाऊ लागला.

विष्णूने त्याला विचारले–"तुला काय पाहिजे ते मागून घे!"

तुर्वसु म्हणाला–"मला एक पुत्र देण्याची कृपा करावी!"

"तुझ्यासाठी लक्ष्मीच्या पोटी माझा एक मुलगा जन्मला आहे. तो शिशुरूपे तमसा व कालिंदी नद्यांच्या संगमस्थानी आहे. तू लगेच जाऊन त्याचा स्वीकार कर." विष्णू म्हणाला.

तुर्वसूला परमानंद झाला. विष्णूने सुचविलेल्या स्थानी तो गेला. तेथे त्याला पायाचा अंगठा तोंडात घालून खेळत पडलेला मुलगा दिसला. त्याचे सौंदर्य पाहून तुर्वसूने त्याला उचलून घेतले व म्हणाला–"बाळा, मी थोर तपश्चर्या केली तेव्हां विष्णूने अनुग्रह करून तुला जन्म दिला व मला माझा पुत्र म्हणून स्वीकारण्यास आज्ञा केली. तू माझा वंशवृक्ष वाढव!" असे म्हणत तुर्वसू मुलाला घेऊन राजधानीत गेला.

राजवाड्यात आनंदीआनंद झाला. तुर्वसूने त्या मुलाला आपल्या राणीच्या हातात देत त्याचा जन्मवृत्तांत सांगितला. मुलाचे नाव एकवीर ठेवण्यात आले. तो



चंद्रकलेसारखा नित्य वाढत गेला. सहा महिन्याचा झाल्यावर त्याचा अन्नप्राशन संस्कार करण्यात आला आणि तीन वर्षांचा झाल्यावर त्याचे जावळ करण्यात आले. अकराव्या वर्षी त्याचा उपनयन संस्कार झाला. त्यानंतर गुरुगृही राहून त्याने वेदाध्ययन केले धनुर्विद्या शिकून घेतली.

वयात आल्यावर तुर्वसूने मुलाचा राज्याभिषेक केला आणि स्वत: सपत्नीक वानप्रस्थाश्रमात प्रवेश केला. तेथे पार्वतीचे स्मरण करून दोघं तपश्चर्या करू लागली. कालक्रमाने दोघांनी वैकुंठलोकी प्रस्थान केले. ते कळल्यावर एकवीरने आपल्या मातापित्यांची अन्त्येष्ठीक्रिया वगैरे केली. त्याची प्रजा सुखी होती.

एकदा एकवीर आपल्या कुटुंबियांसमवेत गंगा काठी गेला. तेथे ऋषी मुनींचे सुंदर आश्रम पाहून व तेथील शांत वातावरणात पक्ष्यांचा मनोहर कलरव ऐकून त्याच्या मनाचे समाधान झाले. तो एका गंगेच्या काठी फिरत असतां त्याला एका जागी एक स्त्री एकटीच चिंतामग्न स्थितीत बसलेली दिसली. ती नदीतील शतदल कमळाच्या दक्षिणेकडे बसलेली होती. ती स्त्री अत्यंत रूपवती होती. परंतु चिंतामग्न स्थितीत बसलेली होती.



तिला पाहून एकवीरने विचारले–"कोण हो तुम्ही? फार चिंतित दिसतां आहां? तुम्ही मानवी आहांत की देवी? तुमचे नाव काय? तुम्ही आपल्या दु:खाचे कारण सांगू शकलांत तर मी ते दूर करण्याचा यत्न करून पाहीन. तुमच्या दु:खाचे कारण मानव, दानव किंवा देव कोणी ही असो, मी त्याचे परिपत्य करून आपले दु:ख दूर करीन."

तेव्हां ती स्त्री म्हणाली–"संकट आल्याशिवाय का कोणी दु:खी होईल? एका देशाच्या राजाचे नाव रम्य आहे. तो एक थोर पुण्यात्मा आहे. त्याच्या राणीचे नाव रुक्मरेखा आहे. त्यांना मूलबाळ नव्हते.



राणी पतीला म्हणाली–'ज्या स्त्रीला मूलबाळ नाही, तिचे जिणे व्यर्थ होय!' राणी म्हणाली ते ऐकून राजाने ब्राह्मणांना बोलावून पुत्रेष्टी यज्ञ आरंभिला. यज्ञ-कुंडातून सोन्याच्या बाहुलीसारखी एक मुलगी जन्मली. त्या मुलीला दाखवून होता म्हणाला–"ही मुलगी एकावलीसारखी (सोन्याचा एकसर असावा तशी) अग्नीतून जन्मली आहे. तिचे नाव एकावली ठेवून तिला आपल्या पोटच्या संतती सारखी वाढव. विष्णूचा ह्याच रूपे तुझ्यावर अनुग्रह झाला आहे."

राजा रम्यला ते ऐकून परमानंद झाला. त्याने त्या मुलीला आपली राणी रुक्म-रेखाच्या हातात दिले. ती मुलगी जणुकाही तिच्याच पोटी जन्मल्यासारखा तिला आनंद झाला. ती मुलगी एखाद्या मुलासारखी राजवाड्यात लहानाची मोठी झाली. मी त्या रम्य राजाच्या प्रधानाची मुलगी आहे. माझे नाव यशोवती आहे. आम्ही दोघी एकाच वयाच्या आहोत. म्हणून राजाने मला तिची सखी म्हणून नित्य तिच्या बरोबर राहण्यास सांगितले आहे. आम्ही दोघी मिळून खेळत होतो आणि बरोबरच खातपीत होतो. राजकन्येला कमळे फार आवडतात. म्हणून ती मला व आमच्या इतर मैत्रिणींना बरोबर घेऊन गंगेच्या काठी कमलवनात हिंडायला येई. मी राजकन्येला अनेक प्रकारे समजावून सांगे की इतक्या दूर आपण स्त्रियांनी हिंडणे बरोबर नाही. परंतु ती माझ्या बोलण्याकडे दुर्लक्ष करी. मी ती गोष्ट महाराजांच्या कानावरसुद्धा घातली. तेव्हा रम्य राजाने आपल्या राजधानीतच मोठमोठी सरोवरे करवून त्यात कमळे लावली. आणि मुलीला समजावून सांगितले की मुली, 'तुला कमळे असलेल्या पाण्यातच क्रीडा करावयाची असेल तर तू आपल्या राज्यातल्या या सरोवरात क्रीडा कर. परंतु तू राजवाड्या-बाहेर किंवा राजधानीच्या बाहेर कोठेही जातां कामा नये."

परंतु राजकन्येने दूर गंगेकाठी विहार करणे सोडले नाही. म्हणून राजाने राज-कन्येच्या रक्षणार्थ सशस्त्र सैनिकांना नेमले. ती मला व इतर सखींना बरोबर घेऊन गंगाकाठी दररोज हिंडत राहिली. एके दिवशी आम्ही सर्व नित्याप्रमाणे या प्रदेशात आलो. आमच्या आधी रती अप्सरांना बरोबर घेऊन येथे आली होती. आणि जलक्रीडा करीत होती. माझी मैत्रीण त्यांच्या बरोबर जलक्रीडेत मग्न झाली.

इतक्यात कालकेतू नावाचा राक्षस सैन्यासह तेथे आला. ती माझी सखी एकावली हिच्या जवळ तिला पळवून नेण्याच्या हेतूने आला. त्याला पाहून मी मोठ्याने ओरडले–"राक्षस येतो आहे!" माझ्या मैत्रिणीने मागे वळून पाहिलेमात्र आणि ती राक्षसाला पाहून पळू लागली आणि आम्हां सखींमध्ये मिसळून दिसेनाशी झाली. कालकेतू राक्षसाने आमच्या रक्षणार्थ जे सैनिक आले होते त्यांना आपल्या गदेने ठार केले. माझी मैत्रीण घाबरून जाऊन रडू लागली. मी राक्षसाचे पाय धरून पुष्कळ विनवण्या केल्या–"तू मला घेऊन जा, माझ्या मैत्रिणीला सोड!" परंतु त्याने माझ्या बोलण्याकडे लक्षच दिले नाही आणि राजकन्येला घेऊन पळून गेला. मी रडत रडत त्याच्या पाठोपाठ गेले. मला पाहून एकावलीला हायसे वाटले. ती मला मिठी मारून रडू लागली. तेव्हां कालकेतू आपली राजधानी दाखवून म्हणाला–"माझी





राजधानी इंद्राच्या अमरावतीपेक्षा कोणत्याही तऱ्हेने कमी नाही. तू आपल्या सखीला धीर दे. मी तिचा दास होऊन आनंदाने तिची सेवा करीन." या शब्दात मला समजावून सांगून त्याने मला सुद्धा रथात बसवून घेतले आणि आपल्या राजधानीच्या दिशेने निघाला. तेथे त्याने एका संगमरमरी दगडाच्या महालात आमची राहण्याची व्यवस्था केली. त्याने त्या महालाच्या चारीबाजूला सशस्त्र राक्षसांचा पाहारा ठेवला.

कालकेतू दुसऱ्या दिवशी आमच्या महालात आला व मला म्हणाला—"तू काय वाटेल ते करून आपल्या सखीला माझ्याशी लग्नाला मान्य व्हायला सांग. तिला सांग की ती माझ्या राज्याची अधिकारिणी होईल. मी तिचा एक दास म्हणून राहीन आणि तिच्या प्रत्येक आज्ञेचे पालन करीन."

मी त्याला साफ सांगून टाकले—"तुझ्या इच्छेप्रमाणे करणे मला शक्य नाही. म्हणून तूच तिचे मन वळवण्याचा यत्न करून पहा." तेव्हां तो माझ्या सखीला म्हणाला—"मी तुझा दास आहे. माझ्यावर अनुग्रह कर. तुझे हे यौवन शाश्वत नाही, हे देखील लक्षात असू दे!"

माझी सखी त्याला म्हणाली—"माझ्या वडिलांनी एका राजकुमाराशी माझा विवाह करून द्यायचे योजले आहे. मी हैहय नावाच्या राजकुमाराला मनाने वरले आहे. तेव्हां मी आणखी कोणाशी विवाह कशी काय करणार? मुलींनी मातापिता ठरवितील त्या मुलांशीच विवाह करावयाचा असतो. त्या स्वतंत्र नसतात."

"तरी दुष्ट राक्षस आपला हट्ट सोडायला तयार नव्हता. त्याची राजधानी पाताळात आहे व नगराच्या रक्षणार्थ राक्षस सैन्य रात्रंदिवस पाहारा देत आहे. तेथे कोणाला प्रवेश मिळणे शक्य नाही."

यशोवतीच्या तोंडी सर्व वृत्तांत ऐकून एकवीर म्हणाला—"राक्षसाने तुला व तुझ्या



सखीला एका महालात नजरकैदेत ठेवले होते, तर तू बाहेर कशी काय आलीस? तू म्हणालीस की तुझ्या सखीने हैहयला मनाने वरले आहे. माझ्या शिवाय इतर कोणी हैहय नावाची व्यक्ती नाहीच. माझ्याशीच विवाह करून घेण्याच्या हेतूनेच का राजाने या मुलीला आपल्या पोटी जन्म दिला? निःसंकोच तू सर्व गोष्टी सांग. म्हणजे मी त्या राक्षसाचा वध करून तुझ्या सखीला सोडवीन. तेथपर्यंत जाण्याचा मार्ग तूच दाखव. राजकन्येचे अपहरण कालकेतू राक्षसाने केले आहे, ही गोष्ट राजाला माहीत आहे का? ते कळल्यावर तो तिला सोडविण्याचा यत्न करण्याचे सोडून स्वस्थ बसेल का? की तो असमर्थ आहे?"

यशोवती म्हणाली—"लहानपणी एका सिद्ध पुरुषाने मला एक मंत्र शिकविला होता. मी राक्षसांच्या राजधानीत असतां मला त्या मंत्राची आठवण झाली. मी सुटका मिळेल या हेतूने त्या मंत्राचा जप करून देवीला आळविले. तेव्हां देवीने लाल वस्त्र धारण करून स्वप्नांत दर्शन दिले व म्हणाली—'तू लगेच ऊठ आणि गंगेकाठी जा. तुला राक्षसाचे भय बाळगण्याची गरज नाही. तेथे माझा भक्त हैहय तुला भेटेल. तो तुला भेटल्यावर राक्षसाचा वध करील आणि एकावलीला सोडवील.



त्यानंतर तू त्यांचे लग्न करून दे.' असे सांगून देवी अंतर्धान पावली.

"मी स्वप्नातून जागी होऊन एकावलीला ते सर्व सांगितले. तिला फार आनंद झाला. अशा तऱ्हेनें मी त्या पराशक्तीच्या कृपेने येथे आले."

एकवीर म्हणाला—"लक्ष्मी माझी आई आहे. मीच तो हैहय. मला एकवीर म्हणूनही ओळखतात. तुझ्या सखीचे सौंदर्यवर्णन ऐकूनच माझे मन हरपले आहे. तू म्हणालीस की तिचे माझ्यावर प्रेम आहे, तेव्हांच मी तिचा दास झालो. तुझ्या ऋणातून मी कसा मुक्त होईन, मला कळत नाही. तुझ्या सखीजवळ कसे पोचावयाचे?" एकवीरने विचारले.

"राजा! मी आपल्याला एक मंत्र सांगते. त्या मंत्राच्या बळाने आपल्याला राक्षसाच्या राजधानीत निर्विघ्न प्रवेश मिळेल. आपण कालकेतू राक्षसाचा वध करून एकावलीला सोडवून घेऊन या." असे सांगून यशोवतीने एकवीरला 'त्रिलोक तिलक' नावाचा मंत्र शिकविला. त्या मंत्रबळाने एकवीर यशोवतीसहस सैन्य राक्षसाच्या राजधानीत दाखल झाला. दूतांकरवी राक्षसाला मोठे सैन्य राजधानीत आल्याचे कळले.

ते कळल्यावर कालकेतू संतापला. तो एकावलीला जाऊन म्हणाला-"हे पहा, सैन्य घेऊन येणारी व्यक्ती तुझे वडील असतील तर मी सामोरा जाऊन त्यांचे स्वागत करीन. कोणी दुसरा असेल तर तत्क्षण त्याचा वध करीन. कोण आहे तो, सांग!"

"मी तर तुझ्या कैदेत आहे. कोण आला आहे हे मला कसे कळणार? एवढे मात्र मी निश्चित सांगते की आलेली व्यक्ती माझे वडील नाहीत की भाऊ नाहीत. कोणी असो, पण ती शक्तिशाली व्यक्ती कां बरे येत असावी, मलाच कळत नाही." एकावली म्हणाली.

इतक्यात दूतांनी येऊन कालकेतूला युद्धाला तयार व्हायला सांगितले. कालकेतू रथात बसून युद्धाला निघाला. एकवीर घोड्यावर बसून कालकेतूशी युद्धाला तयार होऊन समोर आला. दोघांचे द्वंद्व सुरू झाले. लवकरच कालकेतू एकवीरच्या तलवारीचा वार लागल्याने धरातीर्थी पडला. त्याचे सैन्य सैरावैरा पळू लागले.

यशोवतीने एकावलीला भेटून ती शुभ-वार्ता कळविली. नंतर दोघी एकवीरच्या शिबिरात जाऊन त्याला भेटल्या. नंतर सर्व मिळून एकावलीच्या पित्याच्या राजधानीत गेले. तेथे एकावली व एकवीर यांचा विवाह थाटामाटाने पार पडला. एकवीरने सपत्नीक आपल्या राजधानीत जाऊन राज्यकारभार हाती घेतला.

एकवीरचा मुलगा कृतवीर्य झाला. कृतवीर्याच्या मुलाचे नाव कार्तवीर्य झाले. अशा तऱ्हेने हैहयवंशाची वृद्धी झाली.





# पुरुषजातीची वैरीण

प्राचीन काळी विजय नामक राजाला रत्नावली नावाची मुलगी होती. ती लहान मुलगी होती तेव्हां तिची दाई तिला एक गोष्ट सांगे. ती गोष्ट अशी:

"एका जंगलात रानटी कबूतरांचे एक जोडपे रहात असे. पुष्कळ दिवसांनी त्यांना चार पिले झाली. एकदा जंगलाला आग लागली. पिलांना उडून जाता आले नाही, म्हणून ती आगीत होरपळून मेली. ते पाहून मादीला फार वाईट वाटले. पिलं मेली आतां मी तरी जिवंत कशाला राहू? आगीत उडी टाकून जीव देते.

"नरकबूतरसुद्धा जीव द्यायला निघाले. परंतु वाटेत म्हणाले-"आत्महत्या करण्यात शहाणपण नाही. आपण जिवंत राहलो तर आपल्याला पुन्हां पिले होतील. आपणच जीव दिला तर पिलं होणेच शक्य नाही!"

"हे काय बोलणे झाले? तुला पिलं मेल्याचं थोडंसुद्धा दुःख वाटलं नाही पटत तू म्हणतोस ते!" असे सांगून मादी कबूतर एकटी आगात उडी टाकून मेली. म्हणून जगात वाटेल त्याच्यावर विश्वास करावा, पुरुषांवर कधी करू नये!"

ती गोष्ट ऐकल्यावर राजकन्येने दाईला विचारले-"मेलेल्या मादीचे काय झाले?"

दाई स्मित करून म्हणाली-"तीच मादी आमच्या महाराजांच्या वाड्यात राजकन्या म्हणून जन्मली." असे म्हणत तिने राज-कन्येच्या कपाळाचा मुका घेतला.

पुढे काही दिवसांनी ती दाई मरण पावली. कबूतरांच्या गोष्टीतले पुरुषांवर विश्वास करू नये हे तात्पर्य राजकुमारी विसरली नाही.

राजकन्या एकदां आपल्या वडिलांना म्हणाली-"बाबा! माझ्यासाठी राजोद्यानात

२५ वर्षापूर्वीची चांदोबातील गोष्ट



एक कुटी बांधून द्या. तीत फक्त मी व माझ्या मैत्रिणी राहतील. आणखी उद्यानात कोणत्याही पुरुषाला प्रवेश मिळणार नाही यासाठी कडक पाहऱ्याची व्यवस्था करा."

"मुली, अग, हे कां? मी उद्यां परवांच तुझ्या स्वयंवराची तयारी करतो आहे." राजा म्हणाला.

"बाबा! या जन्मात तर नाहीच, सहस्र जन्म मिळाले तरी मी लग्न करणार नाही!" राजकन्या म्हणाली.

आणखी काही दिवस लोटले. दूर देशात राहणारा एक राजकुमार आणि मंत्र्याचा मुलगा त्या गावी आले. रत्नावलीच्या कुटीच्या चारीबाजूची फुलझाडे पाहून व त्यात थोडा वेळ विश्रांती घ्यायचे ठरवून त्या उद्यानात दोघे शिरले.

त्याच वेळी एक दाई तेथे ओरडत धांवत आली—"निघा बाहेर, या उद्यानात पुरुषांना प्रवेश करण्यास मनाई आहे. तुम्ही परदेशी दिसतां आहां. ही कुटी आमच्या राजकन्येची आहे. येथे कोणी पुरुष आला तर आमचे महाराज त्याला कडक शिक्षा करतील!"

"आम्ही तुझ्या राजकन्येला पळवून न्यायला का आलो आहो?" राजकुमाराने विचारले.

"आमच्या राजकन्येला पुरुषांची सावली सुद्धा खपत नाही, समजले? चालते व्हा, लवकर!" दाई म्हणाली.

तेव्हां दोघे बागेच्या बाहेर आले. राजकुमार म्हणाला—"मित्रा, माझे मन मला सांगते आहे की पुरुषजातीच्या ह्या वैरिणीशीच लग्न कर. त्यासाठी उपाय काय, सांग!"

"कदाचित ती कुरूप असेल! मी विचार-पूस करतो!" मंत्र्याचा मुलगा म्हणाला.

त्यानंतर दोघे राजधानीत गेले आणि एका खाणावळीत उतरले. मंत्र्याच्या मुलाने खाणावळीच्या मालकिणीला विचारले—"आजी, तुमच्या देशाची राजकन्या पुरुषांची वैरीण आहे म्हणे! ती कुरूप असली पाहिजे?"

"नाही रे, बाबा! आमची राजकन्या रूपवती आहे!" खाणावळीची मालकीण म्हणाली

"मग पुरुषांचा एवढा द्वेष कां करते ती?" मंत्र्याच्या मुलाने विचारले.

"मुला, ते एक फार मोठे गुपित आहे! रत्नावली पूर्वजन्मी म्हणे, मादी कबूतर होती. पुष्कळ काळ लोटल्यावर तिला पिले झाली. तेव्हां अरण्यात आग लागली व त्यात सर्व पिले भस्म झाली. तेव्हां मादी व नर कबूतरांनी आत्महत्या करण्याचे ठरविले. परंतु ऐनवेळी म्हणे नर कोठेतरी पळून गेला. मादी आगीत जीव देऊन मरण पावली आणि आमच्या महाराजांच्या पोटी जन्मली." खाणावळीच्या मालकिणीने सर्व गुपित उघड सांगून टाकले.

"आजी, परंतु हे सर्व गुपित कसे कळले?" मंत्र्याच्या मुलाने विचारले.

"मुला, रत्नावलीला पूर्वजन्माची चांगली आठवण आहे!" मालकीण म्हणाली.

"अस्सं होय!" असे म्हणत मंत्र्याच्या मुलाने मनात एक युक्ती योजली.

दुसऱ्या दिवशी उजाडतांच दोघे खाणा-वळीच्या मालकिणीचा निरोप घेऊन निघाले. ते राजधानीच्या बाहेर गेले. तेथे वेष पालटून पुन्हां त्यांनी गावात प्रवेश केला. ते सरळ राजाच्या दरबारात गेले.



"कोण तुम्ही दोघे? कोठून आलात?" राजाने त्यांना विचारले.

मंत्र्याचा मुलगा म्हणाला—"महाराज, आम्ही दोघे नेपाळचे राहणारे आहो. हे माझे गुरुवर्य. इंद्रजाल विद्येत यांची बरोबरी जगात कोणाला करतां येणार नाही. हे जलस्तंभन, वायुस्तंभन, अग्निस्तंभन इत्यादि विद्यांचे प्रदर्शन करतील. वाळवंटांत दाट अरण्यांची सृष्टी हे करतात. वाळक्या खुंटांना फुले फळे आलेली दाखवू शकतात. आपण यांच्या विद्येची परीक्षा करून पहावी!"

राजा म्हणाला—"ठीक, आम्ही या प्रदर्शनाची व्यवस्था उद्यानातील कुटीसमोर करतो. राजकन्येलासुद्धा ते पाहतां येईल."

# प्रश्नोत्तर

**जी. वासू, हैदराबाद**

प्र. : अंतराळात उपग्रह (कृत्रिम) रॉकेट आदि सोडतात नाही का? त्यांची परस्परांशी टक्कर होत नाही का? त्यांत माणसे असतात का? त्या उपग्रहांचे काम झाल्यावर ते कोठे जातात?

उ. : कृत्रिम उपग्रहांची परस्पर टक्कर सामान्यपणे होत नाही. त्याला एक महत्वाचे कारण आहे कृत्रिम उपग्रह पृथ्वीच्या चारीबाजूला फिरणार असेल तर त्याची कक्षा त्याच्या वेगावर पूर्णपणे अवलंबून असते. एकाच वेगाने दोन किंवा अधिक उपग्रह सोडले आणि ते एकाच कक्षेत फिरत राहिले तरी सोडताना दोघांमध्ये जे वेळेचे अंतर असते ते कक्षेतही कायम राहते. त्यांचे वेग कमी जास्त होत नाही, म्हणून अंतरही कमी जास्त होत नाही.

कृत्रिम उपग्रह पृथ्वीच्या चारीबाजूला न फिरतां दूर इतरत्र गेला तर तो चंद्राच्या चारीबाजूला फिरण्याची शक्यता असते. असे कृत्रिम ग्रह फार थोडे असतात. सामान्यपणे उपग्रह चंद्राच्या चारीबाजूला फिरतील असे सोडीतच नाहीत.

चंद्राच्या गुरुत्वाकर्षणाबाहेर गेलेले राकेट सूर्याच्या चहूकडे फिरण्यालायक स्वतःची कक्षा करून घेतात. कालांतराने त्यांची गत किंवा दुर्गत काय होते कोणी सांगू शकत नाही. विज्ञानशास्त्रज्ञ दोन उपग्रह सोडून ते अंतराळात भेटावे अशी तजवीज करतात, ही गोष्ट वर्तमान पत्रांद्वारे आपणांला माहीतच आहे. तसे करावयाचे झाले तर पृथ्वीच्या कक्षेत फिरणाऱ्या उपग्रहाला पुन्हां राकेटचा प्रयोग करून दुसऱ्या उपग्रहाच्या कक्षेत आणावे लागते. हे कार्य करण्यासाठी उपग्रहात माणसे असतात.

त्याचप्रमाणे चंद्रावर उतरून पृथ्वीवर परत येणाऱ्या अंतरिक्ष नौकांसही आवश्यक असेल त्याप्रमाणे राकेटांचा प्रयोग करणारी माणसे असतात.

काम पुरे झाल्यावर कृत्रिम उपग्रह माणसांसह असतील तर पृथ्वीवर येतातच. नसतील तर असे उपग्रह अंतरिक्षात तसेच सोडून देतात. तेव्हां ते शेकडो मैल उंचीवर असतील तर हवेच्या घर्षणामुळे ते जळून जातात. सामान्य आकाराचे उपग्रह आकाशातच लहानलहान उल्का होऊन भस्म होऊन जातात. मोठमोठे उपग्रह असतील तर ते 'स्कायलॅब'सारखे पृथ्वीवर तुकडेतुकडे होऊन पडण्याची शक्यता असते उल्कांचा स्पर्श झाल्यास त्यांची गती कमी होते.



# अघटित अनपेक्षित

[८५]

**परधर्मो भयावहः**

सुप्रसिद्ध तीर्थक्षेत्र वाराणसी नगरी कर्पूरपटक नांवाचा एक धोबी रहात असे. तो एके दिवशी रात्री गाढ झोपी गेला होता. त्याच्या अंगणात एक गाढव आणि एक कुत्रा बांधलेला होता. इतक्यात एक चोर धोब्याच्या आवारात शिरला.

त्याला पाहून गाढव कुत्र्याला म्हणाले– "मित्रा! तू भुंकून मालकाला जागा कर."

"तू माझ्या कर्तव्याची मला जाणीव करून देण्याची गरज नाही. मी यापूर्वी मालकाची चाकरी किती इमाने इतबारे केली? कित्येक दिवसापासून मी पाहतो आहे, मालक माझ्या चाकरीची किंमत विसरला आहे. तो मला पोटभर खायला सुद्धा घालीत नाही. चांगले मोठे संकट आल्याशिवाय मालक चाकराची फिकीर करणार नाही. आज चोर काही माल चोरून घेऊन गेला की उद्यांपासून मालक विसरल्याशिवाय मला पोटभर खायला घालतो की नाही, पहा!" कुत्रा म्हणाला.

"तू स्वामिद्रोही आहेस! आपला धर्म पालन करते वेळी स्वार्थाचा विचार करणारा माणूस सेवक म्हणावयाचा की मित्र?" गाढवाने थोडेसे रागातच विचारले.

"सेवकाला उपाशी मारणारा आणि काम पडले की गोडगोड बोलणारा हा काय मालक म्हणावयाचा?" गाढवाने विचारले.

ते ऐकून गाढव जास्तच चिडले. म्हणाले–"अरे पाविष्टी कुत्र्या! अशा समयी मालकाच्या हिताची फिकीर न करणारा तू किती नीच प्राणी आहेस रे? मीच यथाशक्ती ओरडून मालकाला जागा

करतो. उष्णता हवी असेल तर सूर्याकडे पाठ करून उभे राहले पाहिजे. विस्तव असेल तर समोर तोंड करून उभे रहावे. निर्मल चित्ताने उत्तमलोकप्राप्तीसाठी प्रयत्न करावा." असे म्हणत गाढव जोरजोराने रेंकू लागले.

चोर पळून गेला. पण झोंप मोडल्याने चिडून जाऊन धोब्याने उठून गाढवाला खूप बडविले.

### हत्तीला ठार करणारा कोल्हा

ब्रह्मारण्यात कर्पूरतिलक नावाचा एक हत्ती रहात असे. त्याला पाहून कोल्ह्यांच्या कळपाने विचार केला, या हत्तीला ठार करतां आले तर आपल्याला चार महिनेतरी पोटाची विवंचना राहणार नाही.

एक म्हातारा कोल्हा इतर कोल्ह्यांना म्हणाला–"मी त्या हत्तीला येथे आणून ठार करतो." तो हत्ती होता तेथे गेला आणि त्याला साष्टांग नमस्कार करून म्हणाला–"प्रभो, गरिबाची विनंती ऐकावी."

"कोण रे बाबा, तू? आलास कोठून?" हत्तीने विचारले.

"मी एक कोल्हा आहे. या अरण्यांतील जनावरांनी एक सभा केली व मला आपला दूत म्हणून पाठविले आहे. त्यांनी आपणांजवळ निवेदन करायला असे सांगितले आहे–"आम्ही राजाशिवाय जीवित घालविणे शहाणपणाचं होणार नाही. म्हणून राजपुरुषाची सकल लक्षणे असलेल्या आपल्यासारख्यांची राजा म्हणून निवड करण्याचे आम्ही सर्वांनी एकमताने ठरविले आहे. उच्चकुलात आपला जन्म झाला. आपण उदार स्वभावाचे आहां, राजनीती निपुण आहां. सर्व तऱ्हेने राजाची पदवी सुशोभित करण्यास योग्य आहां. कोणी का असो, प्रथम त्याने राजाची कृपा संपादन करावी, नंतर बायकापोरांची चिंता व धनसंपत्तीचा विचार करावा. राजाच नसेल तर पुत्रकलत्र व धनसंपदा असून तरी काय फायदा? एका क्षणार्धात चोर चोरून नाही का नेणार? पावसासारखा राजा प्राण्यांचा रक्षक असतो. सामान्यपणे प्रजा राजाच्या भीतीनेच सन्मार्गाने वागते. सज्जन व साधुवृत्तीचे लोक जगात एकंदर कमीच. पती वृद्ध झाले, आजारी पडले किंवा निर्धन झाले तर पातिव्रत्याने राहणाऱ्या बायका या जगात कमीच. परंतु राजाच्या भीतीने त्याही पतीची सेवा करीत असलेल्या दिसतात. आपण एक आदर्श थोर प्रभू! म्हणून आपला राज्याभिषेक करण्यासाठी आम्ही सर्व वाट पहात आहो. म्हणून हे महाप्रभो! आपण माझ्या बरोबर चलण्याची कृपा करावी. सुमुहूर्त टळण्याच्या आत आपला राज्याभिषेक झाला पाहिजे."

राज्याच्या लोभाने कर्पूरतिलक कोल्ह्याच्या बरोबर निघाला.

वाटेत एक दलदलीची जागा आली. परंतु वरून ती सामान्य जमिनीसारखीच दिसत होती. कोल्हा त्या दलदलीच्या काठाकाठाने चालत पलीकडे निघून गेला.





परंतु हत्ती मात्र सरळ दलदलीच्या वाटेने पुढे जातजात एकदम ओरडला–"मित्रा, कोल्ह्या! मी या दलदलीत रुतलो आहे की रे! आता मी मरणार की काय असे वाटू लागले आहे! थोडा मागे वळून पहा तरी!"

कोल्ह्याने मागे वळून पाहिले व म्हणाला–"माझी शेपटी धर आणि तिच्या आधारे वर ये! माझ्या सारख्या क्षुद्र प्राण्यावर विश्वास केल्याचा परिणाम भोगावा लागणारच! सज्जनांची संगती करणारे सुखी होतात आणि दुर्जनांच्या नादी लागणारे आत्मनाश करून घेतात, हे थोरा मोठ्यांचं सांगण आहेच!"

हत्ती त्या दलदलीत खोल रुततच गेला आणि बाहेर न येऊ शकल्याने मरण पावला. कोल्ह्याच्या कळपाला कित्येक महिने त्याचे मांस खायला मिळाले.

### गरज सरो अन् वैद्य मरो

अरवली पर्वताच्या एका उंच शिखरावर महाविक्रम नावाचा एक सिंह रहात असे. तो झोपी गेला की एक चिचुंदरी येऊन त्याच्या अंगाखांद्यावर चढे आणि त्याची आयाळ कुरतडून खाई. सिंहाला त्याचा फार राग येई. परंतु ती चिचुंदरी फार चपळाईने सिंहाच्या पंजातून निसटून पळून जाई.

चिचुंदरीची पीडा कशी टळणार याचा विचार करीत असतां सिंहाने विचार केला की चिचुंदरीचा हाडवैरी मांजर आहे. म्हणून एका मांजराला बोलावून तो सिंह त्याला खूप मांस खायला घालू लागला.

मांजराला पाहून चिचुंदरी बिळाबाहेर आलीच नाही. भुकेने तिचा जीव कासावीस झाला. पण तशी उपासमार ती किती दिवस सहन करणार? एकदां धाडस करून ती बिळाबाहेर आली मात्र मांजराने स्वामिभक्ती दाखवून चिचुंदरीला धरून गट्ट केले.

झालं, त्यानंतर सिंहाला मांजराची गरज उरली नाही. मांस खायला घालायचं त्याने बंद केलं. म्हण आहे ना–'गरज सरो अन् वैद्य मरो!"






[ ३ ]

[कुंडलिनी द्वीपावरच्या युद्धनौका मोठे तुफान आल्यामुळे फुटून गेल्या व त्यांवरच्या सैन्यासह पाण्यात बुडाल्या. सेनापती समरसेन याने ज्या नौका वाचल्या त्या एकत्र केल्या. त्यानंतर तो एका लहान पडावात मोजक्या सैनिकांसह एका भयंकर बेटावर पोचला. तेथे विचित्र जनावरांची झुंज पाहून सर्व भयभीत स्थितीत झाडांवर चढले. पुढे–]

समरसेन व त्याचे सैनिक झाडांच्या फांद्यांवर पानांआड लपून त्या विचित्र जनावरांची झुंज पाहू लागले. सिंहांपासून झालेला त्रास असह्य झाल्याने एक हत्ती स्वतःला वाचविण्यासाठी खूप प्रयत्न करीत होता.

समरसेनाबरोबर झाडावर चढलेल्या सैनिकांपैकी एक जण म्हणाला–"सेनापती, आपण मोठ्या संकटात सापडलो आहो. या भयंकर बेटावरून लुटून नेण्यालायक काय मोठे धन आपल्याला मिळणार आहे?"

त्या पाठोपाठ दुसरा सैनिक म्हणाला–"धनराशी? आपण आपला जीव वाचवून बाहेर पडू शकलो तर कोट्यावधी रुपये मिळाले, असे समजू या."

समरसेन विचारमग्न असल्यामुळे काहीच बोलला नाही. सर्व जग सभ्यतेच्या शिखरावर पोचून आनंदाने रहात असतां या



बेटावरचे लोक मात्र अद्याप पाषाणयुगातच कसे काय रहात आहेत? येथे राजा, राज्य किंवा शासनव्यवस्था असे काही असल्यासारखे दिसतच नाही. अशा स्थितीत या बेटावर धनदौलत ती काय मिळणार? त्याची कल्पना करणेच मूर्खपणाचे ठरेल.

समरसेन या विचारात असतां सर्व जंगल एका भयंकर राक्षसी आवाजाने दुमदुमले— "ए कालभुजंगा! कंकाळा! या, या, त्या चतुराक्षाला शोधून ठार करा."

सेनापती व त्याचे सैनिक तो आवाज ऐकून दचकले. समरसेनाची जणुकाही हृदयक्रियाच बंद पडली. झाडांच्या फांद्यांवर दडून बसलेले, त्याच्या बरोबरचे सैनिक थरथर कापू लागले. तो भयंकर आवाज ऐकून सरोवराकाठचे प्राणी आणि झाडावरची वनमाणसे सैरावरा पळू लागली.

पाहतां पाहतां त्या सरोवराच्या बांधावर एक भयंकर आकाराची व्यक्ती आली. ती व्यक्ती एका लहानशा ताडाच्या झाडाएवढी असेल. त्याला एकाच डोळ्याने दिसत होते. त्याच्या दोन्ही पायांमधून वळण घेत व सुळे काढून एक काळसर्प फडा काढून चालत होता. त्याच्या पाठीमागून त्याच्या डोक्यावरून हालत येत असलेली माणसाच्या डोक्याची एक कवची होती.

ती भयंकर आकृतीवाली व्यक्ती सरोवराच्या काठावर उभी राहून व एकदां चहूकडे नजर फिरवून आणि डोके वर करून हुंकारली—"हूं:! मंत्रद्वीप, धोतऱ्यांची टेकडी, वाट तिकडची वांकडी, टेकडीची टोकं दोन्ही फारच फाकडी! त्या टेकडीवरून पाहिलं तर काय दिसतं, कवचे! सांग पाहू!"

त्याचे जणुकाही उत्तर म्हणून ती कवची हसली व म्हणाली—"समुद्राच्या मध्य भागी नाचणारी एक नाव; नावे मध्ये धनाच्या राशीच राशी! नावेबाहेर पहाऱ्याला नागकन्या! आणि त्या नागकन्येला ठार केल्यावर विचारायला काय हवे? सर्व धनाच्या राशी आपल्याच!"

"होय, होय! बरोबर! हे साध्य झाले तर सर्व धन वैभव आपलंच! पण पहा, तो चतुराक्ष...हूं...!" असे म्हणत पुन्हां एकदां तो एकाक्ष हुंकारला.

झाडावरून हे सर्व संभाषण ऐकणाऱ्या समरसेनाला एकीकडे भीती वाटत होती तर दुसरीकडे फार आश्चर्यही वाटले. आतां आपण आहों ते मांत्रिकाचे मंत्रद्वीप आहे हे त्याला कळले व त्या द्वीपावरच्या कोणत्यातरी डोंगराच्या टोकाला जाऊन पाहिले तर समुद्रात धनाच्या राशी भरलेली एक नाव दिसेल एवढे त्याला कळले.



परंतु तो चतुराक्ष कोण बरे असावा? या एकाक्ष मांत्रिकाशी त्या चतुराक्षाचे वैर कशामुळे आले असावे? या वैराचे कारण नावेतील धन वैभवच आहे का? की आणखी काही आहे?

समरसेन या विचारात गढून गेला असता मांत्रिक सरोवराच्या बांधावरून उतरून जंगलात निघून गेला. त्याच्या पाठोपाठ कालसर्प आणि माणसाचा अस्थिपंजरही निघून गेले.

आतांपर्यंत झाडावर थरथर कापत बसलेल्या सैनिकांना एकाक्ष मांत्रिक निघून गेल्याबरोबर थोडेसे हायसे वाटले व ते जागचे हलले व सेनापतीकडे पाहू लागले.




सर्वांच्या तोंडावर भीतीची अवकळा स्पष्ट दिसत होती.

एक सैनिक अडखळत कापऱ्या आवाजात म्हणाला–"हा एकाक्ष कोणी मोठा मांत्रिक दिसतो आहे. त्याच्या बरोबरचा साप आणि माणसाची कवची दोन्ही पाहून तर कोणी किती धीट असला तरी त्याचा थरकाप उडाल्याशिवाय राहणार नाही. असे बेट जितक्या लौकर सोडून जाता येईल तितके बरे!"

त्यावर सेनापती काय म्हणतो ते ऐकण्यासाठी सर्व सैनिक उत्सुकतेने त्याच्या उत्तरासाठी कान लावून बसले होते. समरसेन काही वेळ काहीच बोलला नाही. परंतु थोडया वेळाने समाधान झाल्यासारखा मान हलवून म्हणाला–"इतक्या भयंकर बेटावरही आपल्याला धनलाभ होण्याची चिन्हे स्पष्ट दिसत आहेत. परंतु त्यासाठी कष्ट सहन करण्याची तयारी, धैर्य व साहस मात्र हवं!"

समरसेन सैनिकांच्या उत्तराची अपेक्षा न ठेवतां निःशब्दपणे झाडावरून खाली उतरून आला. त्याच्या पाठोपाठ सैनिकही खाली उतरून आले. "पुढे काय होणार आहे?" हाच प्रश्न सर्वांच्या मनांत खळबळ करीत होता. पुढे काय करायचे याचा निश्चय समरसेनच करणार, म्हणून सर्व तो काय म्हणतो हे ऐकायला त्याच्याकडे वळून पहात होते.

समरसेनाने सर्व सैनिकांच्या तोंडाकडे एकदां लक्षपूर्वक पाहिले व म्हणाला–

"तुम्ही ऐकलंत ना? 'धोतऱ्याची टेकडी वाट तिकडची वाकडी...' वगैरे तो एकाक्ष म्हणाला ते? ती टेकडी व तिची टोके आपण हुडकून काढू शकलो तर आपण ज्या साठी आलो ते काम फत्ते झालेच, समजा!"

ते ऐकून एक सैनिक धीर करून शंका करीत म्हणाला–"तो मांत्रिक म्हणाला ते सर्व खरे आहे असे वाटते आहे का आपल्याला?"

समरसेन उत्तर द्यायला क्षणभरच थांबला, नंतर म्हणाला–"मांत्रिकाने विचारलेल्या प्रश्नात व अस्थिपंजराने दिलेल्या उत्तरात खोटे असण्याचे काही कारणच नाही. आणखी त्यांच्या संभाषणावरून आपल्याला हे कळते की धनवैभव असलेली एक नाव आहे व तिची राखण करायला एक नागकन्या नेमलेली आहे. शिवाय चतुराक्ष नावाचा आणखी एक मंत्रवेत्ता त्यांचा हाडवैरी आहे. हेदेखील खरे असावे. परंतु ह्या सर्व अडचणींना तोंड देऊन धनसंपदा असलेली ती नाव कशी काबीज करावयाची खरोखरी हाच मुख्य प्रश्न आपणांसमोर आहे."

सैनिकांना तो प्रश्न फार धोक्याचा व गूढ असल्यासारखा वाटला. परंतु आपल्या सेनापतीला योग्य सल्ला देण्याचे धाडस मात्र त्यांच्या पैकी एकातही नव्हते. वादळातून कसाबसा जीव वांचून निघालेले सैनिक समरसेन म्हणाला ते ऐकून जास्तच भयभीत झाले. समरसेनाने एकदां चहूकडे नजर फिरवून पाहिले आणि नंतर काही बोलल्याशिवाय चालू लागला. सैनिक मुकाट्याने त्याच्या पाठोपाठ निघाले. ते झाडाखालून काही अंतर चालून गेल्यावर त्यांना एकाएकी कानाचे पडदे फाटतील इतका मोठा






समरसेनने आश्चर्यचकित होऊन त्या बाजूला पाहिले असेल नसेल, तेवढ्यात एक काळेकुट्ट घुबड त्यांच्या डोक्यावरून उडत जात मनुष्याच्या आवाजात ओरडू लागले—"चतुराक्षा! अरे चतुराक्षा! माणसं आहेत रे, नराधम माणसं! खबरदार!"

त्या काळ्या घुबडाला पाहून व त्याचा तो भयंकर आवाज ऐकून समरसेन व त्याचे सैनिक सर्वांचे रक्तच जणुकाही गोठले. पक्ष्यांच्या तोंडी माणसासारखा बोलवू शकणारा मांत्रिक किती भयंकर शक्तिशाली असला पाहिजे, या विचारानेच त्यांचे हातपाय गारठले व सर्वांची वाचाच

इतक्यात समरसेन व त्याच्या सैनिकांना किंकर्तव्य विमूढ करून टाकणारे आणखी एक विचित्र दृश्य दिसले. ते एक वनमाणूस होते. त्यात वानरांची व माणसांची लक्षणे समसमान होती. ते एका झाडावरून 'धम्म' दिशी उडी मारून खाली आले. आतापर्यंत हवेत उडणारे आणि माणसाच्या आवाजात ओरडून सावध करणारे घुबड त्या वनमाणसाच्या खांद्यावर येऊन बसले व त्याने त्याच्या कानात कुजबूज करीत काहीतरी सांगितले.

त्या पाठोपाठ ते वनमाणूस समरसेनाकडे व सैनिकांकडे एकदा पाहून झाडावरून लोंबत असलेल्या वेलांच्या आधारे एका झाडावरून दुसऱ्या झाडावर उड्या मारीत क्षणार्धात कोठेतरी नाहीसे झाले.

सैनिकांपैकी एक सैनिक वनमाणूस दिसेनासे झाले त्या दिशेकडे पहात म्हणाला—"सेनापती, आता आपण मागे वळून जितके लौकर जाता येईल तितके परत जाण्यातच आपले सर्वांचे हित आहे. या मंत्रद्वीपावर राहून आपल्याला काही लाभेलसे मुळीच दिसत नाही. पक्ष्यांना व प्राण्यांना दूतांसारखा आणि हेरांसारखा शिकवू शकणाऱ्या मांत्रिकाच्या मंत्रशक्तिसमोर आपल्या तलवारी व

समरसेनला तो सैनिक म्हणाला ते जणुकाही ऐकूच आले नाही असा गप्प राहिला. काळे घुबड शेजारच्या झाडाच्या फांदीवर बसून निखाऱ्यासारखी आपली लाल बुबुळे इकडे तिकडे फिरवीत सर्व काही आपल्या डोळ्यांनी टिपून घेत होते.

समरसेन घुबडाकडे एकदोन क्षण निरखून पहात राहिला. त्यानंतर काहीतरी चांगलीशी युक्ती सुचल्यासारखा मान हलवीत आपल्या शेजारच्या सैनिकाजवळून त्याने धनुष्य व बाण घेतला आणि त्या घुबडाच्या दिशेने नेम धरला.

लगेच एक सैनिक धावरून जाऊन उच्च आवाजात म्हणाला—"सेनापती, त्या मांत्रिक शक्ती असलेल्या घुबडावर आपल्या बाणाचा बहुतेक काही एक परिणाम होणार नाही. शिवाय त्याच्या मालकाला यामुळे राग येण्याची शक्यताही आहे. म्हणून थोडा विचार करून काय ते करा!"

समरसेन धनुष्यावर चढविलेला बाण न उतरविता म्हणाला—"पाहूया तरी काय होते ते!" असे म्हणत त्याने तो बाण घुबडावर सोडला. तो बाण घुबडाला लागलाही. बाण लागून घुबड किंचाळत जमिनीवर पडेल आणि लोळू लागेल असे समरसेनाला वाटले होते. परंतु समरसेनाची




घुबडाने त्याच्या पंखात शिरलेला बाण सहजी चोचीने काढून दूर फेंकला आणि मोठ्याने ओरडून म्हणाले—"दुष्ट नराधमांनो! तुम्ही मला ठार करू शकाल असे वाटलं होतं का तुम्हांला? मंत्रशक्ती असलेला तो महामांत्रिक एकाक्ष सुद्धा माझे बरेवाईट करू शकला नाही, मग तुमची काय बिशाद? थांबा, थोडावेळ थांबा! आमचा मालक चतुराक्ष येईल आतां व तुमचे वहात असलेले रक्ताचे पाट पाहयला मिळतील. शुभ वेळ जवळच आली आहे! लक्षात असू द्या."

समरसेनाला आणि त्याच्या बरोबरच्या








सांपडणार आहेत याची कल्पना तत्क्षण आली. सेनापतीने आपल्या सर्व अनुयायांना सावध केले आणि तेथून जितक्या वेगाने त्यांना पळून जाणे शक्य होते तितक्या वेगाने पळू लागला. सर्व सैनिकांनी त्याचे अनुसरण केले. परंतु घुबड त्यांच्या डोक्या-वरून उडत व ओरडत निघाले.

लवकर समुद्रकिनाऱ्यावर पोचून आपल्या पडावात बसून त्या भयंकर बेटापासून दूर पळून जावे या विचारात समरसेन होता. परंतु घुबडाचे ओरडणे ऐकून त्या बाजूने मांत्रिक कदाचित येईल या भीतीने वाट फुटेल तिकडे पळत पळत ते वाट चुकून एका दाट अरण्यात पोचले. एका जागी निश्चितपणे उभे राहून आपण बेटावर आपल्या गलबतापासून कोणत्या बाजूला व किती अंतरावर आहो, ह्याचा विचार करावा असे समरसेनाला वाटले. परंतु घुबड त्यांचा पाठलाग करीत तेथेही आले आणि त्यांना घाबरवून सोडण्यासाठी मोठ-मोठ्याने ओरडू लागले.

"आपण एक तर वाट चुकलो आहों आणि या बेटावर राहणाऱ्या एका मांत्रिकाशी आपण वैर केले आहे. अशा परिस्थितीत आपले रक्षण कुंडलिनीदेवीशिवाय इतर कोणालाही शक्य नाही." समरसेन म्हणाला.

एक सैनिक म्हणाला–"सेनापती, ते बरोबर आहे, परंतु त्या आधी काय वाटेल ते करून आपण या घुबडाच्या नजरेआड झाले पाहिजे!"

समरसेन त्याला काही उत्तर देणार तितक्यात "कालभुजंगा! कंकाला!" या आवाजाने सर्व अरण्य दुमदुमले. तो आवाज ऐकताच चतुराक्षचा हेर असलेले ते घुबड झाडावरून ओरडत दूर उडून गेले.

मांत्रिकाच्या घुबडाचे संकट टळले या आनंदाबरोबर समरसेनाला व त्याच्या सैनिकांना एकाक्ष येत असल्याची सूचना मिळाली आणि ते भयभीतही झाले. तरी त्यांनी तेथून पाय काढला आणि अंगातली सर्व शक्ती एकवटून जोराने पळू लागले.

(क्रमशः)





# भ्रातृद्रोही

विक्रमादित्याने आपला हट्ट सोडला नाही.

तो झाडाजवळ गेला प्रेत खांद्यावर काढून घेतले आणि नेहमीप्रमाणे मौन होऊन स्मशानाच्या दिशेने चालू लागला. तेव्हां प्रेतात बसलेला वेताळ त्याला म्हणाला–"राजा! माणसाचे सर्व जीवनच स्वार्थपूर्ण आहे. प्रत्येक व्यक्ती स्वार्थ-सिद्धीसाठीच कार्यतत्पर असते, तरी स्वार्थाची प्रेरणा माणसाला सर्वात कशामुळे होत असेल तर ती राज्याच्या लोभाने किंवा एखाद्या रमणीच्या मोहाने! त्या करितां मनुष्य वाटेल ते भयंकर दुष्कृत्य करायलाही मागेपुढे पहात नाही. त्याचे एक उदाहरण म्हणून मी तुला चंद्रसेन नावाच्या एका तरुण राजकुमाराच्या दुष्कृत्याची गोष्ट सांगतो. लक्ष देऊन ऐक." असे सांगून वेताळ गोष्ट सांगू लागला.



अमरावती नावाच्या एका छोटेखानी राज्याचा अमरसेन नावाचा एक तरुण राजकुमार अधिपती झाला. शेजारच्या कालीकोटच्या राजाचे अमरावतीशी हाडवैर होते. अमरसेनाचे पराक्रमी वडील राज्य करीत असेपर्यंत कालीकोटच्या राजाने अमरावतीवर कधी वांकडी नजर टाकण्याचे साहस केले नाही. अमरसेन हा तरुण अननुभवी मुलगा आहे असा विचार करून कालीकोटचा राजा काटमराजू याने स्वारी केली आणि अमरसेनच्या हाती पूर्ण पराभव झाल्याने जीव घेऊन परतला.

त्यानंतर काही दिवसांनी काटमराजूची मुलगी मणिमाला हिच्या लग्नाची तयारी सुरू झाली. तिच्या स्वयंवरासाठी काटमराजूने सर्व मित्र राजेरजवाड्यांकडे आमंत्रणे पाठविली, परंतु अमरसेनाकडे आमंत्रण पाठविले नाही. अमरसेनाला तो त्याचा अपमान वाटला. त्याचा प्रतिकार कसा करावा, या विषयी अमरसेनाने प्रधानाला सल्ला विचारला.

प्रधान म्हणाला–"काटमराजू आपला हाडवैरी आहे. त्याने आपल्याला आमंत्रण पाठविले नाही, यात आपण गैर मानण्यासारखे काही नाही. उलट त्याने आमंत्रण पाठविले असते तरी आपण जाता कामा नये, कारण तो केव्हां कसा गळा कापील याची कोण खात्री देईल?"

परंतु प्रधानाचा सल्ला अमरसेनाला रुचला नाही. सर्व राजकुमारांनी आपापल्या तसविरी पाठविल्या होत्या त्याप्रमाणे अमरसेनाने एका दूताकरवी आपली एक तसवीर काटमराजूकडे पाठविली.

ती तसवीर हाती येताच काटमराजूने ती पायाखाली तुडवून ती तसवीर आणणाऱ्या दूताच्या हाती देत म्हणाला–"ही नेऊन दे आपल्या राजाला!"

काटमराजूने त्याचा अशातऱ्हेने जो अपमान केला त्याचे वृत्त ऐकून अमरसेनाने काटमराजूच्या राज्यावर चालून जायचे ठरविले.





ती गोष्ट कळतांच काटमराजूने जाहीर केले की अमरसेनाचे डोके कापून जो कोणी आणील त्याच्याशीच आपल्या मुलीचे लग्न करीन. मणिमालेशी आपले लग्न कसे होणार या विचाराने आलेले राजकुमार सर्व एक झाले व त्यांनी ससैन्य अमरावतीवर स्वारी केली.

त्यावेळी अमरसेनाचा धाकटा भाऊ चंद्रसेन गुरुकुलात विद्याभ्यास करीत होता. भावावर मोठे संकट ओढवत असल्याचे ऐकून तो घरी आला. तटावरून त्याने बाहेर पाहिले तर सर्व किल्ल्याला वेढा पडलेला होता. तो वेढा पाहून अमरसेन घाबरला.

त्याच वेळी चंद्रसेन तलवार उपसून आला आणि त्याने वडील भावाची मान उडविली आणि धड खाली ढकलून दिले.

ते धड जे राजकुमार किल्ल्याला वेढा देऊन बसले होते त्यांनी पाहिले. कोणीतरी अमरसेनाचे डोके आपल्या आधीच कापले आहे आणि आता आपले लग्न मणिमालेशी होणे शक्य नाही असा विचार करून ते आपापल्या सैन्यासह परतले.

त्यानंतर चंद्रसेनने आपल्या वडील भावाचे डोके नेऊन काटमराजूला दाखविले. चंद्रसेनाचे मणिमालेशी लग्न झाले. अशातऱ्हेने चंद्रसेनाचे काटमराजूशी नाते झाले व दोघामध्ये मैत्रीही झाली.

येथवर गोष्ट सांगून वेताळ म्हणाला–"राजा, चंद्रसेनाने आपल्या भावाचा वध केला. यांत त्याचा काय हेतू होता कळत नाही! मणिमालेशी लग्न व्हावे या साठीच नाही का? की थोरल्या भावाचा वध केल्याने आपल्याला राज्य मिळेल या हेतूने? काटमराजूने तरी त्याचा हाडवैरी अमरसेन याच्या सख्या भावाशी आपल्या मुलीचे लग्न कसे काय करून दिले? या शंकांचे समाधानकारक उत्तर माहीत असूनही तू दिले नाहीस तर तुझ्या डोक्याची शंभर शकले होऊन तुझ्याच पायांवर लोळू लागतील."

विक्रमादित्य म्हणाला–"क्रुद्ध होऊन अमरसेनाने काटमराजूवर स्वारी करून, स्वतःच आपल्या मरणाला आवाहन केले. त्याने मंत्र्याचा सल्ला मानायला हवा होता. अमरसेनाला या गोष्टीची कल्पनाही नव्हती की मणिमालेमुळे दुसरे राजकुमार काटम-राजूच्या बाजूने उभे राहतील. इतक्या शत्रूंशी एकटयाने युद्ध करणे त्याला शक्यच नव्हते. म्हणन त्याचे मरण निश्चितच होते. या गोष्टीची कल्पना येताच चंद्र-सेनाने विचार केला की त्याच्या वडील भावाचा वध इतरांकडून होण्यापेक्षा आपल्याच हाताने झाल्यास त्यापासून राज्याचे तर रक्षण होईलच, त्याच बरोबर काटमराजूशी वैर कायमचे दूर होईल. आणि तो काटमराजूचा जावई झाला तर त्याच्या मनाला शांती मिळेल. तसं न होता, दुसरा कोणी काटमराजूचा जावई झाला असता तर त्याच्या मदतीने काटम-राजू अमरावतीवर स्वारी करीत राहला असता, याची शक्यता होती. या सर्व कारणांमुळे चंद्रसेनने जे ठरविले व केले ते योग्यच होते. आता काटमराजूने स्वयं-वराच्या अटी प्रमाणे चंद्रसेनाशी मुलीचे लग्न करून दिले त्यात त्याचे ही काही नुकसान होण्यासारखे नव्हते. या उलट त्याने आपल्या मुलीच्या लग्नासाठी आणखी एखादे स्वयंवर रचले असते तर त्याने स्वयंवरासाठी घातलेल्या अटीवर कोणाचा-ही विश्वास बसला नसता. सर्व राज-कुमार अमरसेनावर स्वारी करण्यास याच साठी तयार झाले की अमरसेनाचे डोके कापून आणून दाखविणारालाच काटमराजू आपली मुलगी देणार. नाहीतर कोणत्याही राजा किंवा राजकुमाराचे अमरसेनाशी व्यक्तिशः वैर नव्हतेच. म्हणून काटम राजूने जे ठरविले तेही विवेकाचेच काम होते."

अशा तऱ्हेने राजाचे मौन भंग होताच वेताळ प्रेतासह नाहीसा झाला आणि पुन्हां झाडाला जाऊन लोंबकळू लागला.

(कल्पित)





# राजाचे कर्तव्य

महाराज कुबेर यांच्या राज्यात सामान्य पणे प्रजा सुखी होती. पिके वेळेवर व छान निघत. परंतु राजाला प्रजेच्या सुखसोयींची फिकीर होती असे मात्र नाही. राज्यकारभार अधिकाऱ्यांवर सोडून राजा सुखोपभोगात निमग्न असे. म्हणून राज्यात धनधान्य भरपूर असूनही प्रजेला आवश्यक वस्तू वेळेवर मिळतच होत्या असे नव्हते. सामान्य प्रजा भूक व गरीबीमुळे हालाकीच्या स्थितीत होती.

त्या राज्यात सुचोर नावाचा एक दरोडे-खोर होता. तो प्रजेच्या हितासाठी त्याला जे शक्य होई ते करीत असे. श्रीमंत लोक पैशाच्या बळावर प्रजेला छळत असत. म्हणून तो श्रीमंत लोकांची घरे लुटून ते धन गरीब लोकांत वाटू लागला. साहजि-कच सामान्य लोकांच्या मनात सुचोरच्या-विषयी आदरभाव वाढत गेला.

सुचोरच्या चोरीच्या तक्रारी राजाच्या कानावर येऊ लागल्या. परंतु राजाने त्याला कैद करण्यासाठी जे जे प्रयत्न केले ते सर्व अयशस्वी ठरले. हुशार हेरांनासुद्धा चोराचा पत्ता लागेनासा झाला. याचे कारण हे होते की चोर चोरी करण्यात पटाईत होता. मुख्य कारण हे होते की गरीब प्रजा त्याच्या उपकारांमुळे नेहमी त्याला आसरा देई.

सुचोरला पकडण्याचे सर्व प्रयत्न निष्फळ ठरले तेव्हां राजाने सुचोरला पकडून देणाराला एक हजार सोन्याची नाणी इनाम देण्याचे जाहीर केले. तरी काही फायदा झाला नाही. तेव्हां राजाने रक्कम वाढवून दहा हजार केली आणि पुढे तर एक लाख केली. तरी कोणी सुचोर कसा आहे हे कळू दिले नाही. जास्त चवकशी करितां कळले की सामान्य प्रजेत सुचोर फार

लोकप्रिय आहे, कोणी चोराचा ठाव ठिकाणा सांगणार नाही.

म्हणून राजाने आणखी एक युक्ती काढली. काही निरपराध लोकांवर हा आरोप लावला की त्यांना सुचोरचा पत्ता माहीत असूनही ते देत नाहीत आणि त्यांना तुरुंगात डांबून ठेवले. राजाला वाटत होते की त्या गरीब निरपराध लोकांची कीव करून सुचोर बाहेर येईल. परंतु तो प्रयत्न-ही हुकला.

तेव्हां संतापून जाऊन राजाने दोघां निरपराध लोकांना फाशी दिली आणि राज्यभर दवंडी पिटवून जाहीर केले की सुचोराच्या दोघां साथीदारांना त्यांनी केलेल्या घोर अपराधाबद्दल फाशीची शिक्षा देण्यात आली आहे आणि त्याच्या इतर साथीदारांना अशीच सक्त शिक्षा देण्यात येणार आहे. ते जाहीर झाल्यावर सुचोर स्वत:च राजाच्या दरबारात हजर होण्या-साठी प्रगट झाला. शिपायांनी त्याला कैद केले व राजासमोर उभे केले.

राजाने सुचोराला विचारले—"तू किती क्रूर माणूस आहेस रे? तुझ्यामुळे निष्कारण तुझ्या दोघां साथीदारांना फाशीची शिक्षा भोगावी लागली. तू आधीच शिपायांच्या समोर प्रगट झाला असतास तर त्या दोघां बिचाऱ्यांचा जीव वांचला असता."

ते ऐकून सुचोरने निधडकपणे राजाला विचारले—"तुम्ही तरी किती क्रूरपणा केलात की, तुम्हांला हे चांगले माहीत असूनही की ते दोघे निरपराध आहेत, तुम्ही त्यांना निर्दयपणे फाशीची शिक्षा केलीत! हा अन्याय नाही का?"

"चोराला धरायला दुसरा काही मार्ग निघाला नाही की राजाला असला थोडा अन्याय करावाच लागतो. म्हणूनच त्यांना फाशीची शिक्षा द्यावी लागली." राजा म्हणाला.

"चोराला धरायला दुसरा मार्ग कां निघू शकला नाही, याचे कारण काय असावे या विषयी तुम्ही कधी विचार करण्याचा प्रयत्न तरी केलात का?" चोराने पुन्हां विचारले.

"तुझ्याजवळ लुटून जमविलेले खूप पैसे आहेत, ते देऊन तू प्रजेला स्वत:कडे वळवून घेतले असशील!" राजा म्हणाला.

"मी लांच देऊनदेऊन किती देणार? किती जणांना देणार? स्वार्थासाठी किती लोकांचे प्रेम विकत घेणे शक्य आहे? मी चोर असेन, परंतु राजाचेही काहीतरी कर्तव्य असतेच की नाही? आपले कर्तव्य करणे राजाने सोडले तेव्हां ते मला करावे लागले. आपण दिलेल्या एक लाख रुपयांच्या लोभाने प्रजेने माझ्यासारख्या चोराला कदापि सोडले नसते. आपण निरपराध लोकांना कैद केले तरी प्रजेने मला धरून तुमच्या अधिकाऱ्यांच्या हाती सोंपविले नाही. परंतु ते अत्याचार सहन करणे मलाच असह्य झाले आणि तुमच्या समोर हजर झालो. आतां तरी तुम्ही माझ्या केसाला धक्का लावू शकणार नाही. माझ्या केसाला-





ही धक्का लागला तर एक अपार जनसमर्द येऊन तुमच्यासह तुमचा वाडा बुडवून टाकील." सुचोरने बजावून सांगितले.

सुचोर म्हणाला ते खरे असल्याचे प्रत्यक्ष कळावे, म्हणूनच की काय सुचोर कैद झाल्याचे कळताच लाखो प्रजा राजधानीवर चालून आली व राजवाड्याला वेढा देऊन सुचोरचा जयघोष करू लागली.

ते कळताच राजा चकित झाला व त्याने चोराला थट्टेत विचारले–"तू म्हणतोस की राजाने करावयाचे काम तू केलेस! म्हणजे राजाचे कर्त्तव्य चोरी व दरोडेखोरीच का?"

"नाही, राजाचे कर्त्तव्य प्रजेच्या हिताची कामे करणे आहे, त्यांच्या गरजा भागविणे आहे. तुम्ही ते काम केले नव्हते, मी केले. म्हणून मी एक सामान्य चोर असूनही प्रजेचे प्रेम संपादन करू शकलो आणि मला कैद करणे आपल्याला अशक्य झाले." सुचोर म्हणाला.

"तरमग तुला काय हवे आहे? या देशाचा कारभार तू हाती घेणार आहेस का?" राजाने विचारले.

"ते सामर्थ्य माझ्यात नाही व ती महत्वाकांक्षाही माझ्या मनात नाही. माझी आपणांजवळ एवढीच विनंती आहे की आपण प्रजेला सुख होईल अशातऱ्हेने राज्य करावे. प्रजेला माझ्यासारख्या चोराची गरज भासावी असा राज्यकारभार होता कामा नये. प्रजेच्या हिताचा विचार करून राजा राज्य करील तर माझ्यासारखे चोर जन्माला येणारच नाहीत. याहून अधिक मला काही सांगावयाचे नाही." असे सांगून सुचोर तेथून निघून गेला. त्याला धरण्याचा प्रयत्नही राजाने केला नाही. राजाला लाज वाटू लागली की एका सामान्य चोरासमोर त्याला मान वांकवावी लागली. प्रजेचे प्रेम संपादन करणे राजाला जमले नाही, ते एका चोराला जमले. त्या दिवसापासून राजाने भोगविलास सोडला व मन लावून राज्याची सर्व कामे स्वतः पाहू लागला.





# फडक्याचे धन

काळोख पडू लागला होता आणि पाऊस पडत होता. म्हणून माधवराव बाहेरचे दार बंद करायला गेले तर बाहेर कोणी अनोळखी माणूस उभा दिसला. पावसात तो चांगला भिजला होता. एका कोरड्या फडक्याने तो डोके पुसत होता. त्याच्या बाजूला कपड्यांचे एक गाठोडे होते. त्याच्या उजव्या हाताला एक सहावे बोटही होते.

माधवरावांनी त्या माणसाला थोडे खोल नजरेने पाहिले आणि त्याला आत यायला सांगून म्हणाले–"तुम्ही भिजलेले दिसतां आहां, आत या, कपडे बदला!"

"नमस्कार, आभारी आहे!" असे म्हणत त्या अनोळखी माणसाने घरात पाऊल टाकले. तो कपड्यावरून अगदी गरीब दिसत होता. तो आत येऊन कपडे बदलून ओले कपडे वाळत घालीत होता. तेवढ्यात रुक्मिणी बाई स्वैपाकघरातले आवरून बाहेर आल्या. त्यांनी त्या अनोळखी माणसाला पाहिले. यजमानांना आत बोलावून विचारले–"वाटेने जाणाऱ्या येणाऱ्या माणसाला असे अवेळी घरात कोणी शाहणा माणूस बोलवील का?"

"ते गरीब असले म्हणून काय झाले? ते आपले पाहुणे आहेत. त्यांच्या विषयी असे वेडेवांकडे बोलू नकोस. आधी त्यांच्या साठी जेवायची तयारी कर." माधवराव म्हणाले.

"बरंच झालं की! घरात बोलावून पाय पसरायला जागा दिलीत आणि त्याला मेजवानी देणार वाटतं? हे सर्व नाही चालायचं! पाऊस थांबल्याबरोबर त्याला घराबाहेर काढा." रुक्मिणीने बजावून सांगितले.

बायकोचे ते वांकडे बोलणे ऐकून माधवराव बाहेर डोकावून पहात म्हणाले–

जगन्नाथाचा प्रामाणिकपणा पाहून माधवरावांच्या डोळयात पाणी आले. अशा माणसाची कमाई आपण चोरली याबद्दल त्यांना फार वाईट वाटले. त्यानंतर ते म्हणाले–"अहो, मीच ते पुडके तुमच्या गाठोडयात ठेवले होते. तुर्त तुमची आर्थिक स्थिती बरी नसल्यासारखी दिसली मला. तुम्ही हे पुडके ठेवून घ्या."

जगन्नाथ स्मित करून म्हणाला–"पर-क्याचं धन माझ्या हाताच्या सहाव्या बोटा-सारखं निरुपयोगी आहे, असे वाटतं मला! मी हे धन खर्चून काही खाईन किंवा मिळवीन तें मला पचणार नाही. सुख किंवा शांती लाभणार नाही. मला हे धन नको. मेहनतीची कमाईच अंगाला लागते!"

माधवरावांना आतां मात्र राहवले नाही. त्यांनी पेटी चोरली होती ती गोष्ट सांगितली व म्हणाले–"मला क्षमा करा! माझी ही एवढी मिळकत सर्व तुमचीच आहे. हे परके धन कसं काय होईल?"

जगन्नाथ चकित होऊन म्हणाला–"त्या दिवशी ओढयावर मी आंघोळ केली हे खरे! परंतु मी ती पेटी पाहिलीसुद्धा नव्हती. त्या पेटीच्या मालकाला कोणी वाघ किंवा दुसरं जनावर उचलून घेऊन गेले असेल. ती पेटी तुम्हांला मिळाली, तुमचीच आहे! बरं येतो, मला बरंच दूर जायचं आहे!" असे सांगून जगन्नाथ तेथून निघून गेला.

जगन्नाथाचा प्रत्येक शब्द माधवरावांच्या कानात घुमत होता. तो म्हणाला त्यातले प्रत्येक अक्षर खरे असले पाहिजे. त्यांना तरी घरात कोठे सुख होते. नेहमी अपच-नाचा विकार, पोटशूळ व देह स्थूल झालेला.

रुक्मिणी तेव्हां घरी नव्हती. माधव-रावांनी माळयावरून ती पेटी काढली. पेटी भरून सोन्याची नाणी भरली आणि गावच्या पाटलाला देऊन म्हणाले–"पाटील, हे पैसे प्रजेच्या हितासाठी काहीतरी कार्याला लावा!" असे सांगून माधवराव घरी निघून गेले.





# यशस्वी प्रवास

ब्रह्मदत्त नावाचा राजा जेव्हा काशीच्या राज्यावर राज्य करीत होता तेव्हां बोधिसत्वांनी एका वैश्य कुटुंबात अवतार धारण केला. वयात आल्यावर बोधिसत्व पांचशे गाडयांत माल घेऊन पूर्वेकडून पश्चिमेकडे व पश्चिमेकडून पूर्वेकडे व्यापारा-साठी प्रवास करीत.

काशी येथेच मंदमती नावाचा आणखी एक व्यापारी होता. तो खरोखरच मंदमती होता. एकदा बोधिसत्व गाडया भरून माल घेऊन प्रवासाला निघाले तेव्हांच मंदमतीने स्वत: व्यापाराला निघण्याची इच्छा असल्याचे सांगितले.

बोधिसत्वांनी मंदमतीला बोलावून सांगितले की दोघांनी गाडया भरून माल घेऊन एकदम प्रवासाला जाणें अनेक दृष्टीनी अडचणीचे होईल. म्हणून एका-मागून एकाने जाणे जास्त श्रेयस्कर होईल. दोघांपैकी कोणी प्रथम निघायचं हे मंदमतीनेच ठरवावं हेही बोधिसत्वांनी सुचविलं.

मंदमतीने विचार केला, आपण पहिल्याने गेलो तर पुष्कळ फायदे होतील. एकतर वाट मोकळी मिळेल. बैलांना वाटेत चरायला हिरवे गवत व मोकळी कुरणे मिळतील. नोकराचाकरांना भरपूर भाजी-पाला व फळफळावळ मिळेल. स्वच्छ निर्मळ पाणीसुद्धा मिळेल. मालाला अनुकूल चांगला दर येईल वगैरे.

परंतु बोधिसत्वांनी विचार केला, पहिला तांडा त्या वाटेने पुढे निघून गेला की रस्ता कोठे बिघडला असेल तर तो पुढे जाणा-राला दुरुस्त करून घ्यावा लागेल. त्यामुळे पाठीमागून येणाऱ्याला सोयीचे होईल. कुरणात बैलांना चरायला मिळेल. भाजी-पाला व फळफळावळसुद्धा मिळणे सोपे



जाईल. पुढे गेलेल्यांनी पाणी कोठे मुबलक मिळते हे पाहून ठेवलेले असणार. मालाची किंमत पहिल्याने ठरल्यावर काळवेळ पाहून दर वाढवून सांगता येईल. पहिल्याने जाणारालाच दर ठरविणे कठीण जाते. पुढच्यास ठेच व मागचा शहाणा, या न्यायाने पाठीमागून जाणेच जास्त हिताचे होईल.

म्हणून मंदमतीने तो आधी पुढे जाणार असल्याचे म्हणताच बोधिसत्वांनी तत्काळ होकार दिला.

मंदमतीला जेथे जायचे होते ती जागा साठ योजन अंतरावर होती. वाटेत एक वाळूचे मोठे मैदान लागत होते. म्हणून खाद्यपदार्थ व प्यायचं पाणी पिपे भरून बरोबर न्यायची तयारी करण्यात आली. मंदमतीला वाटलं की बोधिसत्व मूर्खासारखा पाठीमागून यायला तयार झाला. मंदमती आनंदाने प्रवासाला निघाला.

मंदमतीच्या गाड्यांचा तांडा बरेच दिवस प्रवास करीत शेवटी त्या वाळवंटात पोचला. वाळूच्या मैदानातून थोडे अंतर चालून गेल्यावर त्यांना समोर एक विचित्र वाहन दिसले. त्या वाहनाला उत्तम जातीचे पांढरे बैल जुंपलेले होते. त्यांत कोणी राजघराण्याचा एक तरणा बांड माणूस बसला होता. त्या वाहनाच्या मागे पुढे भालदार चोबदार तलवार ढाल व धनुष्य-बाण घेऊन चालत होते. गाडीची चाके चिखलाने भरलेली होती. सर्वांच्या डोक्या-वर कमळांची देठं व पाण्यातल्या वेलांची पाने वगैरे होती व हातात कमळे होती.

राजघराण्यातील तो तरणाबांड माणूस मंदमतीला म्हणाला—"अहो, काय पाऊस होता म्हणून सांगू? मुसळधार पावसामुळे नद्यानाले तुडुंब भरून वहात आहेत. गाड्या चिखलात रुततील. पिंपे रिकामी करून पुढे जा. हलक्या गाड्या ओढून नेणे बैलांना सोपे जाईल."

त्या रथात बसलेली ती व्यक्ती आणि बरोबरचे लोक नरमांसभक्षी यक्ष होते. ते वाळूच्या मैदानात प्रवास करणाऱ्या प्रवाशांना फसवून उपाशी मारीत व त्यांचे मांस खाऊन आपले उदर पोषण करीत.

हे सर्व मंदमतीच्या लक्षात येण्यासारखे नव्हतेच. त्याने बरोबर आणलेली सर्व पिपे रिकामी केली आणि पुढे निघाला. त्या राजबंड्याने जे हिरवळ असलेले जंगल दाखविले ते दिसत होते, परंतु तेथपर्यंत पोचायला पुष्कळ दिवस लागले. मंदमतीच्या गाड्या त्याच्या जवळपासही पोहोचू शकल्या नाहीत. सर्व लोक तहानेने जीव कासावीस होऊन पटापट मृत्युमुखी पडले. नंतर बैल मरू लागले. मेलेल्या माणसांना आणि बैलांना खाऊन यक्षांनी त्यांचे हाडांचे सापळे वाळवंटात तसेच सोडून दिले.

दीड महिन्यांनी बोधिसत्व आपल्या शंभरावर गाड्यांचा तांडा घेऊन व्यापाराला त्याच वाटेने निघाले. त्यांनी प्रवासात रसद व पाणी भरपूर मिळावे यासाठी तजवीज करून घेतली होती. ते त्या भयंकर वाळ-वंटात पोचले तेव्हां बोधिसत्वांनी आपल्या अनुयायांना समजावून सांगितले की पाण्याचा एकही थेंब व्यर्थ सांडू नये. वाळवंटात जागोजागी विषारी वृक्षवनस्पती असतात म्हणून कोणी विचारल्याशिवाय कोणत्याही झाडाचा पाला किंवा फळे खाऊ नयेत.

बोधिसत्वांबरोबरचा गाड्यांचा तांडा काही अंतर आणखी गेल्यावर तो राजबंडा नरमांसभक्षी यक्षांचा पुढारी रथात बसून आला आणि त्याने मंदमतीला सांगितले



तसेच बोधिसत्वांना सांगितले. बोधिसत्व म्हणाले–"ठीक, तुम्ही आम्हांला आगाऊ सूचना दिलीत त्याबद्दल फार आभारी आहे. आम्ही व्यापारी आहो. आम्हांला पुढे जोंपर्यंत पाणी दिसणार नाही तोंपर्यंत आम्ही बरोबरचे पाणी फेकणार नाही. ताजे पाणी दिसल्यावर शिळे पाणी ओतून टाकू!"

यक्ष व त्याचे साथीदार गुपचूप निघून गेले.

यक्ष म्हणाला ते बोधिसत्वांच्या काही साथीदारांना खरे वाटले व ते पाण्याची पिंपे रिकामी करावी का विचारू लागले होते. परंतु बोधिसत्वांनी वेळीच त्यांना सावध केले व म्हणाले–"या वाळवंटात एखादे सरोवर असेल असे वाटते का तुम्हांला? यक्ष म्हणतो त्याप्रमाणे मुसळधार पाऊस पडला असेल तर हवेत ओलावा कां नाही? आकाशात ढगाचा एकही तुकडासुद्धा नाही. विजा चमकलेल्या आपल्याला कां दिसल्या नाहीत? हे लोक यक्ष आहेत. आपण मेल्यावर त्यांची पोट भरावी म्हणून त्यांनी हा डाव टाकला आहे. आपल्या आधी जो व्यापाऱ्यांचा तांडा गेला त्याला या लोकांनी असेच फसवून त्यांना खाऊन टाकले असावे. त्यांच्या हाडांचे सापळे वाटेत आपल्याला दिसतील!"

बोधिसत्वांनी म्हटल्यासारखे काही अंतर गेल्यावर मंदमतीच्या पांचशे गाड्या दिसल्या आणि माणसाढोरांच्या हाडांचे सांगाडे दिसले. सर्व लोक चकित झाले.

बोधिसत्व म्हणाले–"पाहिलेत ना? मंदमतीने अदूरदर्शीपणाने स्वतःचे आणि आपल्या साथीदारांचे केवढे नुकसान करून घेतले?"

बोधिसत्वांनी त्याच प्रदेशात मुक्काम केला. मंदमतीच्या गाड्यात जो माल उपयोगी सापडला तो आपल्या गाड्यात ठेवून घेतला आणि पुढल्या प्रवासाला निघाले. बोधिसत्वांचा तो प्रवास यशस्वी झाला. त्यांना खूप नफा झाला व त्यांचे सर्व साथीदार सुखरूप घरी परतले.





## अपूर्व चिंतन

राजा शुद्धोदनने आज्ञा काढली की राजकुमाराला कष्ट म्हणजे काय हे कळू देता कामा नये. दुःखवार्ता त्यांना ऐकायला किंवा पहायला मिळता कामा नये. त्यांनी सिद्धार्थाच्या महालात अशी व्यवस्था केली की त्याच्या नजरेस सुंदर वस्तूच यावी. त्याच्या करमणुकीसाठी उत्तमोत्तम गायक व नर्तक नेमले.

पुढे काही काळ लोटल्यावर यशोधरेच्या पोटी एक पुत्ररत्न जन्माला आले. राजा शुद्धोदनाला सिद्धार्थाच्या वैराग्य वृत्तीची भीती वाटत होती. परंतु त्याला एक मुलगा झाल्याचे कळल्यावर राजाला वाटले की सिद्धार्थाच्या मनात बदल होईल व तो संसारात लक्ष घालू लागेल.





एके दिवशी सिद्धार्थ वडिलांची अनुज्ञा घेऊन रथात बसून उद्यानात निघाला. वाटेत एक म्हातारा दिसला. त्याची कंबर वाकलेली होती. नंतर एक रोगी व त्यानंतर एक प्रेत दिसले. सिद्धार्थाने त्यापूर्वी असा कोणी माणूस पाहिलाच नव्हता.



अगदी शेवटी सिद्धार्थाला एक संन्यासी दिसला. त्याचे मुखमंडल शांत होते. सिद्धार्थाने चेन्ना नावाच्या सारथ्याला विचारले तेव्हा शंका समाधान करून तो म्हणाला—"वार्धक्य, आजार आणि मरण यांपासून सुटका नाही. असे मानून हा सर्वस्व परित्याग करून ईशचिंतन करतो."

त्यानंतर सिद्धार्थ त्याला मिळालेल्या या नव्या अनुभवाविषयी विचार करू लागला. मानवाला दुःख कां भोगावे लागते? सांसारिक सुखोपभोगाने त्याचे मन तृप्त होत असेल तर तो संन्यास कां घेतो? या प्रश्नांचे उत्तर मिळावे यासाठी सिद्धार्थ एके दिवशी रात्री राजवाड्याबाहेर निघाला.





राजवाड्याच्या द्वारातच त्याला एक विचित्र आकृती दिसली. तिच्याकडून राजकुमाराला बोध झाला—"राजकुमार, तुला कीर्ती आणि सुख प्राप्त होईल. तू राजाधिराज होशील. म्हणून तू राजवाड्याबाहेर जाणे इष्ट नाही." ते शब्द कामदेवाचे होते. सत्यान्वेषण करणाऱ्याला तोच परावृत्त करतो.

सिद्धार्थ घोड्यावर बसला व चेन्नाला बरोबर यायला सांगितले. जंगलात तो घोड्यावरून उतरला व चेन्नाला त्याने आदेश केला—"तू घोडा घेऊन परत राजवाड्यात जा." त्यानंतर त्याने तलवारीने आपले लांब लांब केस कापून टाकले.





दुसऱ्या दिवशी उजाडल्यावर चेन्नाने राजकुमाराच्या निष्क्रमणाची बातमी राजा व इतर लोकांना कळविली. त्याच वेळी अरण्याच्या पलीकडे सिद्धार्थने एका भिकाऱ्याला आपली राजवस्त्रे देऊन त्याची वस्त्रे मागून घेतली व ती परिधान केली.

त्यानंतर सिद्धार्थ अनेक प्रदेश हिंडत फिरत अनेक विद्वान व ज्ञानी पुरुषांना भेटत गेला. त्यांच्याकडून त्यांना प्राप्त असलेले ज्ञान शिकून घेतले. परंतु सिद्धार्थाला वाटले की ज्ञानार्जन स्वतःच करून घेणे आवश्यक आहे. म्हणून ध्यान धारणेसाठी योग्य स्थानाचा शोध काढू लागला.





शेवटी सिद्धार्थ उरुवेल वनात आला. तेथे एका वटवृक्षाखाली बसून ध्यानमग्न झाला. देशाटन करीत फिरणाऱ्या पांच तपस्व्यांनी त्याला पाहिले व त्याला एक महापुरुष मानून त्याची सेवाशुश्रूषा करू लागले. सिद्धार्थाला आत्मज्ञान व्हायला सहा वर्षे लागली.

शेवटी त्याला ज्ञानबोध झाला की देहाला कष्ट दिल्याने ध्येय प्राप्त होत नाही. सुजाता नावाच्या एका तरुणीने त्याच्यासाठी जो आहार आणून दिला होता सिद्धार्थाने त्याचे सेवन केले. तेव्हां पांचही शिष्य सिद्धार्थाची निष्ठा भंग झाली असे मानून त्याला सोडून निघून गेले.





त्यानंतर सिद्धार्थ नदीकाठी बोधिवृक्षाखाली जाऊन बसला. ती पौर्णिमेची रात होती. त्याला असे वाटले की त्याच्या चारही दिशांना शांतता आहे, आणि हृदयांतरात एक अपूर्व प्रकाश विकास पावला आहे. अशातऱ्हेने त्याला ज्ञानोदय झाला आणि बुद्धत्व प्राप्त झाले.



# अज्ञात चोर

रत्नाकर जव्हेऱ्याच्या दुकानात विठ्ठल नावाचा एक कारकून होता. तो मेहनती व प्रामाणिक होता. मालकाचा त्याच्यावर विश्वास होता व विठ्ठलला ती गोष्ट चांगली माहीत होती. त्याला एकदां दुर्बुद्धी झाली. मालकाचा एवढा विश्वास असल्यावर एखादी वस्तू उचलून नेली तर काय हरकत आहे?

त्याप्रमाणे एके दिवशी दुकान बंद करण्यापूर्वी कोणाची नजर नाही हे पाहून एक रत्नहार उचलून त्याने खिशात टाकला आणि घरी निघून गेला.

दुसऱ्या दिवशी दुकानात आल्याबरोबर रत्नाकरला तो रत्नहार नसल्याचे लक्षात आले. तो रत्नहार त्याने एका जमिनदाराच्या साठी तयार करविला होता. तो रत्नहार ज्या डबीत ठेवला होता ती जागच्या जागी होती, परंतु रत्नहार मात्र पेटीत नव्हता.

रत्नाकरला आश्चर्य वाटले. कारण दुकानातली ती पहिलीच चोरी होती. दुकानांत विठ्ठलच्या शिवाय आणखी दोघे नोकर होते. ते देखील कित्येक वर्षे झाली दुकानात नोकरी करीत होते व प्रामाणिक होते. विठ्ठलच त्यांच्या मानाने उशिरां कामावर लागला होता. परंतु रत्नाकरला त्याच्यावरही शंका करण्यासारखे काही वाटले नाही. कारण कित्येक दिवसांपासून त्याच्यावर बारीक नजर ठेवूनही शंका येण्यासारखे रत्नाकरला विठ्ठलच्या वागण्यात संशय येण्यासारखे काही दिसले नव्हते. आतां संशय करावयाचा तर कोणाचा? रत्नाकरला ते एक धर्मसंकटच वाटत होते. त्याने एक गोष्ट ठरविली, माल चोरी गेल्याचे



बोलायचेच नाही, आणि तिघांवर नजर ठेवायची.

दुकानात तिघे नोकर नित्याप्रमाणे काम करीत होते. एकदा लक्ष्मीचंद शेट नावाचे एक व्यापारी रत्नाकरच्या दुकानात आले व म्हणाले–"मित्रा, तुला कळलं का रे, माझ्या दुकानात चोरी झाली होती!"

"अहो! म्हणतां काय? तुमच्या दुकानात चोरी! अन् चोर मिळाला का, की निसटला?" रत्नाकरने आश्चर्यचकित होऊन विचारले.

"कां नाही मिळणार? काल संध्याकाळी मी उशिरां दुकान बंद केले. कुलपे लावण्यापूर्वी मी सवयीप्रमाणे सर्व दागिने जागच्या जागी आहेत की नाही लक्षपूर्वक पाहिले. एक कंठहार दिसला नाही. मी लगेच सर्व नोकरांची झडती घेतली. कित्येक दिवसांपासून प्रामाणिक म्हणून काम करणारा रंगनाथ, तुम्ही ओळखताच त्याला, पण त्याच्या खिशात तो सापडला. हा सर्व काळ बदलल्याचा परिणाम आहे! त्याच्यावर माझा केवढा विश्वास!"

"तर मग त्याला शिपायांकडून अटक करविलीत की नाही?" विचारतांना रत्नाकरची नजर आपल्या तिन्ही नोकरांवर होती.

"नाही हो! त्याची गरज? त्याला बेदम ठोकून काढला. कारण आपली वस्तू सापडली होती! त्याला मिळायला हवी होती ती शिक्षा मीच केली होती." लक्ष्मीचंद शेट म्हणाला.

"मित्रा! चुकले तुमचे! अहो असल्या चोरांना क्षमा करणे म्हणजे वेडेपणा आहे! मी असतो तर त्याला प्रथम बडवून नंतर पोलीसांच्या हवाली केले असते!" रत्नाकर म्हणाला.

ते ऐकताच विठ्ठलच्या हातात त्यावेळी सुरई होती ती सुटून खाली पडली. विठ्ठलची ती दशा पाहून रत्नाकरला अगदी पहिल्याने त्याचा पक्का संशय आला. तो दोघां व्यापाऱ्यांचे बोलणे लक्षपूर्वक ऐकत होता हे देखील रत्नाकरच्या लक्षात आले होते.

त्यानंतर लक्ष्मीचंद शेट निघून गेले. विठ्ठलच्या मनात पोलीस शिपायांची दहशत मात्र कायम होती. तुरुंगात होणारे हाल त्याला दिसू लागले. तो तेथे फार वेळ उभाच राहू शकला नाही. मालकाला म्हणाला–"मालक, आज तब्येत बरोबर नाही, रजा द्यावी!"

रत्नाकरने आश्चर्य वाटल्याचे सोंग करीत म्हटले–"गृहस्था! काय झाले रे इतक्यात? तुझी तब्येत बरी नव्हती तर तू आज कामावर आलासच कशाला? घरीच राहिला असतास तर मी काही म्हटले असते का?"

विठ्ठलच्या तोंडावर रत्नाकरला स्पष्ट दिसत होते, तो लोभाला बळी पडला होता. परंतु त्याची चोरी कळली असल्याचे कळू न देण्याचे रत्नाकरने ठरविले. त्याच बरोबर त्याला चुकीची दुरुस्ती करायला एक संधी द्यायचेही रत्नाकरने ठरविले. असा विचार करून "तुला एक गोष्ट सांगायची आहे!" असे म्हणत रत्नाकर काही वेळ गप्प बसून राहिला.

ते ऐकल्यावर विठ्ठलचा चेहरा पांढराफट्ट झाला. मालकाच्या नजरेला नजर भिडविणे त्याला अशक्य झाले.

रत्नाकर पुढे म्हणाला–"तसं काही विशेष नाही. तू मेहनती आहेस व प्रामाणिकही आहेस. म्हणून मी आजपासून



तुझ्या पगारात पन्नास रुपयांनी वाढ करायचं ठरविले आहे!"

विठ्ठल मालकाकडे पहातच राहिला. मालक म्हणाला ते त्याला खरंच वाटत नसल्यासारखे त्याच्या चेहऱ्यावरून दिसले. त्याचा चेहरा गोरामोरा झाला. मालकाच्या मनात आहे तरी काय? मालकाने आपली चोरी ओळखली काय? आपण फार मोठी चूक केली. त्याच्या तोंडावाटे एक शब्दही उमटत नव्हता.

रत्नाकरने विचारले–"कायरे, बोलत कां नाहीस?"

"आपली दया, मालक!" एवढेच शब्द त्याच्या तोंडावाटे बाहेर पडले.

"बरं तर जा! तब्येत चांगली सुधारल्यावरच कामावर ये. आणखी गोष्ट सांगायची राहली. इनामदारांकडे आजच रत्नहार पोचवायचे मी कबूल केले होते. तेवढा बरोबर घेऊन जा आणि पोचवून करणावळीचे पैसे घेऊन ये. कामावर येशील तेव्हां पैसे आणून दिलेस तरी चालेल!"

रत्नाकरने या शब्दात विठ्ठलवर एक कामगिरी सोपविली.

विठ्ठलला जिवात जीव आल्यासारखे वाटले. मालकाला आपली चोरी कळली नाही, असा विश्वास त्याला वाटला. म्हणजे डबीतच रत्नहार आहे असे त्यांना वाटते आहे. त्याने रिकामी डबी उचलली व आनंदाने पुढे येऊन म्हणाला–"येतो मालक!" म्हणत तो झपाझप दुकानाच्या पायऱ्या उतरून निघून गेला.

नंतर विठ्ठल सरळ घरी गेला. रत्नहार डबीत ठेवला आणि इनामदारांकडे तो पोचवून करणावळ वसूल करून घेऊन आला. दुसऱ्या दिवशी मालकाला पैसे आणून दिले.

विठ्ठलला पाहतांच रत्नाकर हसत म्हणाला–"कायरे, तब्येत चांगली सुधारली ना?" तेव्हां विठ्ठलला वाटले, मालकाला सर्व काही माहीत आहे. म्हणून खरी गोष्ट का लपवावी? असा विचार करून म्हणाला–"होय, मालक, कालच तब्येत बरी झाली!"



# योग्य निवाडा

रामूचा शेजारी श्याम् एक भांडखोर माणूस होता. तो लहानसहान गोष्टींवरून रामूशी भांडायला येई. रामू स्वभावाने गरीब होता, तरी त्याला श्यामूशी बोलताना कधीकधी दरडावून धमकावून बोलावे लागे.

रामूच्या परसात एक नारळाचे झाड होते ते वाढत गेले तसतसे श्यामूच्या परसात वाकू लागले. म्हणून नारळ श्यामूच्या परसात पडला आणि त्याने तो उचलला तर रामू गप्प राही. परंतु श्यामूचे तेवढ्यावर समाधान झाले नाही. एकदा त्याने रामूच्या माडावरचा नारळाचा पडच्या घडच कापून घेतला.

अर्थातच रामूने त्याला विचारले. श्यामू तोंडाला आले ते बोलला व मारामारीला तयार झाला. म्हणून रामूने गावच्या पाटलाकडे गाऱ्हाणे नेले. पाटील म्हणाला–"श्यामू, तू हे काय रे केलेस! श्यामूने खत पाणी घालून जो माड वाढविला त्याचे नारळ तोडून घ्यायचा अधिकार तुला कसा काय रे?"

"अहो, माड कोणी लावला आणि कोणी खत पाणी घातले त्याचे मला काय? माड माझ्या परसात वाकला आहे की नाही? म्हणून त्याला लागणारे सर्व नारळ माझेच!"

पाटील रामूकडे वळून म्हणाले–"श्यामू म्हणतो ते बरोबर आहे. माड त्याच्या परसात डोकावतो आहे आणि त्याचे मूळ तुझ्या परसात आहे. तेव्हां कोणत्याही परिस्थितीत त्याला लागणारे नारळ तुला मिळणे शक्य नाही. तेव्हां तू खतपाणी फुकटचे घालायचे बंद तरी कर नाहीतर मुळात घाव घालून झाड तोडून टाक. झाड कोलमडून श्यामूच्या गोठ्यावर किंवा घराच्या छपरावर पडले आणि त्याचे घर पडले तर मी असा निकाल देईन की त्यात तुझा काही दोष नाही." श्यामूने मुकाट्याने नारळाचा घड रामूला आणून दिला आणि कानाला हात लावला. रामूने त्यातले काही नारळ तोडून स्वतःच श्यामूला दिले.





# माकडांचे उपकार

एका गांवी एक गरीब बाई रहात असे. तिच्या नवऱ्याने चांगले नाव मिळविले होते. परंतु त्याने आपल्या मागे बायको व मुलांसाठी चार पैसे ठेवले नव्हते. म्हणून बायका पोरांना गरीबीत दिवस काढावे लागले. त्याच्या मुलाचे नाव झोपाळू रंगा असे होते.

वडील वारले तेव्हां रंगाचे वय पंधरा वर्षे असेल. परंतु तो होता भयंकर आळशी. जेव्हां पहावे, तेव्हां आपला झोपलेला. बसल्या बसल्याच घोरायचा.

रंगाच्या आईला वाटे की देवाने त्याला जन्म दिला. त्याने त्याच्या नशिबात जे लिहिले असेल तेच होणार. ती कधी रंगाला कोणतेही काम करायला सांगत नसे. ती स्वतः चार घरी जाऊन कामे करी आणि त्यावर मायलेकांचा उदरनिर्वाह चाले.

रंगाची आई कधी त्याला उठवी तेव्हां तो उठे, परंतु लगेच काहीतरी खाऊन पिऊन झोपी जाई.

रंगाच्या शेजारी लखूशेट नावाचा एक व्यापारी रहात असे. त्याचा परदेशांशी व्यापार होता. रंगाच्या आईला एकदा कळले की लखूशेट व्यापारासाठी सुवर्ण द्वीपाला निघणार आहेत. तिच्या नशिबाने तिला नुकताच चारही घरचा पगार मिळाला होता. तिने त्यातले पांच रुपये काढून रंगाच्या हातात दिले व म्हणाली– "बाळा, तू लखूशेटकडे जाऊन हे पांच रुपये दे आणि विचार की या पांच रुपयांचा काहीतरी माल सुवर्णद्वीपातून त्यांना आणता येईल का? तो माल मिळाला की तुला लहानसा व्यापार करता येईल."

आईने उठवून बसविलेच म्हणून रंगा जांभया देत उठून बसला व पेंगतच त्याने आईच्या हातातून पांच रुपये घेतले आणि झोपेतच लखूशेटकडे गेला. पांच रुपये त्यांच्या हातात देत आईने सांगितले होते ते जसेच्या तसे त्यांना सांगितले.

रंगाकडे पाहून व त्याच्या गरीब आईचा विचार करून लखूशेटला कीव आली. एवढयाशा भांडवलावर हा मुलगा काय व्यापार करणार? हा मुलगा सुधारणार तरी कसा? हे सर्व माहीत असूनही लखूशेट स्वभावाने उदार असल्या कारणाने म्हणाले–"बरं, बाळा! तू म्हणालास तसं करीन हो!"

ते ऐकून रंगा आनंदाने घरी परतला व लगेच झोपला.

लखूशेटने आपल्या इतर व्यापारी मित्रांसह एक गलबत ठरविले आणि त्यात माल भरून सुमुहूर्तावर व्यापारासाठी निघाले. सुदैवाने वारा अनुकूल होता. त्यांचे गलबत ज्याज्या बंदराला लागले तेथे मालाची खूप खरेदी व विक्री झाली. काही दिवसांनी त्यांचे गलबत सुवर्णद्वीपाला लागले. तेथे सर्व व्यापाऱ्यांनी बरोबर आणलेला सर्व माल चांगल्या दराने विकला व तेथून चीन देशातले रेशमी कापड, हस्तीदंती उत्तम कालाकृतीच्या वस्तू, हिरे व माणके विकत घेतली व स्वदेशी परतण्यासाठी गलबतात बसून निघाले.

दहा दिवसांनी लखूशेटला रंगाने दिलेल्या पांच रुपयांची आठवण झाली. व्यापार-





धंद्याच्या कामात ते ती गोष्ट बिलकूल विसरून गेले होते. त्यांनी विकत आणले-ल्या मालापैकी एखादी वस्तू रंगाला द्यावी म्हणावे तर इतकी स्वस्त एकही वस्तू दिसत नव्हती.

लखूशेट आपल्या साथी व्यापाऱ्यांना म्हणाले—"आपण आपले गलबत परत सुवर्णद्वीपाला घेऊन जाऊ या. माझ्या हातून एक चूक झाली आहे." असे सांगून त्यांनी घडलेली गोष्ट थोडक्यात सांगितली. परंतु इतर व्यापाऱ्यांना परत फिरणे मान्य नव्हते. सर्व म्हणाले—"पाहिजे तर आम्ही पांचपांच मोहरा प्रत्येकी देतो. तुम्ही त्या त्या मालाला द्या. परंतु गलबत परत फिरवायला आम्ही तयार नाही."

काही दिवसांनी गलबत पूर्वेकडच्या बेटावरच्या बंदराला लागले. त्या बंदरात नांगर टाकला गेला. जहाजाजवळ अनेक भिकारी आले. त्यांत एकाजवळ तीन माकडे होती. त्यांच्यापैकी दोन फार हुशार होती. मालक जो खेळ करायला सांगे तो खेळ ती माकडे करीत. तिसरे माकड म्हातारे होते. त्याला एकही खेळ करता येत नव्हता. दोन्ही माकडे निरनिराळे खेळ करून प्रेक्षकांची करमणूक करीत असतां म्हातारे माकड समुद्राकडे पहात नुसते बसून होते.

त्या माकडांना पाहून लखूशेटच्या मनात एक विचार आला, त्या माकडांपैकी एक माकड विकत घेऊन रंगाला नेऊन दिलं की आपली जबाबदारी संपली. त्याप्रमाणे त्याने माकडवाल्याला विचारले—"काय रे, मी पांच रुपये देतो. तू मला एक माकड देशील का?"

माकडवाला म्हणाला—"मी ते म्हातारे माकड देईन."

"अरे, एखादे तरुण माकड दे की!" लखूशेट म्हणाले.

"या दोन तरण्या माकडांपैकी एकाला ही शंभर रुपये दिलेत तरी मी देणार नाही. त्यांच्यावरच तर त्यांचे आणि आमचे पोट भरते आहे! हे म्हातारे माकड मीच पांच रुपयांला विकत घेतले. याला नुसते पोसावे लागते आहे मला. याला काही करतांच येत नाही! पाहिजेतर हे घेऊन चला, शेटसाहेब!" माकडवाला म्हणाला.

नाइलाजाने लखूशेटनी ते म्हातारे माकड विकत घेतले आणि गलबतात घेऊन बसले. ते माकडसुद्धा रंगासारखं भोळसट आहे, असे लखूशेटला वाटले. खायची वेळ सोडून बाकी वेळ ते पेंगत बसून राही.

थोड्या दिवसांनी गलबत मोत्यांच्या बेटाला लागले. त्या बेटाच्या किनाऱ्यावर समुद्रातून मोती निघत. त्या बेटावर फक्त कोळीच रहात. व्यापारी त्या बेटावर आले की कोळी पाण्यात बुडी मारून मोती असलेले शिंपले काढून आणीत आणि स्वस्तात व्यापाऱ्यांना विकीत. ज्यांच्या त्यांच्या नशिबाप्रमाणे लहान मोठे मोती मिळत आणि व्यापारी कोळ्यांना खूप इनाम देत. ते गलबत मोत्यांच्या शिंपल्या-साठीच त्या बेटावर आले होते. बंदराला जहाज लागताच तरुण कोळी धावले व पाण्यात बुड्या मारून शिंपले काढून आणू लागले. त्या गडबडीमुळे म्हातारे माकड पेंगत बसलेले होते ते एकदम जागे झाले समोरचे दृश्य पाहून त्याला एकदम काहीतरी आठ-वल्यासारखे झाले आणि त्याने पाण्यात उडी मारली. लखूशेटला वाटले की रंगाच्या नशिबात ते माकडही नाही वाटते? परंतु थोड्याच वेळात ते माकड शिंपले घेऊन



काठावर आले व गलबतात उडी मारून चढले. शिपले गलबतात लखूशेटच्या समोर टाकून पुन्हा त्याने समुद्रात उडी मारली. पाहतां पाहतां शंभरावर शिपल्यांचा ढीग लखूशेटच्या समोर उभा राहिला.

इतर व्यापाऱ्यांनी मोती विकत घेतले. परंतु त्यांचे शिपले रिकामेच निघाले. त्यांना दोनदोन तीनतीन मोत्यांपेक्षां जास्त मोती मिळाले नाहीत. तेसुद्धा लहान होते. परंतु माकडाने आणलेल्या सर्व शिपल्यांतून पुष्कळ मोती निघाले. त्यातले काहीतर खूप मोठे होते. त्यावरून हे स्पष्ट झाले की त्या माकडाला मोत्याच्या शिपल्यांची चांगली पारख होती.

ते माकड कधी काळी त्याच बेटावर रहात होते. त्याच्या मालकाने (तो एक कोळीच होता) त्याला मोती काढायला शिकविले होते. परंतु पुढे तो मालक मेला. त्यानंतर एका गलबतावरच्या खलाशांनी त्या अनाथ म्हाताऱ्या माकडाला धरून नेले. परंतु ते नेहमी पेंगत बसून असलेले पाहून खलाशांनी दुसऱ्या एका बेटावर त्या माकडाला एका माकडवाल्याला विकले. तेच माकड आतां रंगाच्या मालकीचे झाले. त्याच माकडाने रंगाला मूल्यवान मोत्यांचा मालक केले.

लखूशेटने रंगाचे मोती नीट जपून ठेवले. स्वदेशी परतल्यावर त्याने रंगाला त्याचे मोती देऊन टाकले. व्यापाऱ्यांनी दिलेल्या वचनाप्रमाणे आपापल्या वाट्याच्या पांच पांच मोहरा दिल्या. त्यासुद्धा रंगाला मिळाल्या.

रंगाचे नशीब उघडले. त्याने एक मोठा वाडा बांधला. तो मोत्यांचा व्यापार करू लागला. मोत्यांचे बेट लागताच माकडाची जशी झोप गेली तशी रंगाची झोंप मोत्यांचा व्यापार करू लागल्यावर कायमची उडाली. त्याचा झोपाळूपणा कायमचा सुटला. तो माकडाला घेऊन त्या मोत्यांच्या बेटावर जाऊ येऊ लागला आणि रंगूशेट मोतीवाले या नावाने त्याला बाजारपेठेत लोक ओळखू लागले.





# कर्मफळ

भिकूशेट नावाचा एक सावकार होता. कोणी त्याच्याकडे कर्ज मागायला आला की कर्ज मागणाऱ्याच्या ऐपतीप्रमाणे व्याज सांगून भिकूशेट त्याला कर्ज देई. एकदा विठोबा पाटील कर्ज मागायला आला. म्हणाला—"सावकार, मुलीचे लग्न आहे. दहा हजार तरी खर्च होणार. तुम्ही तेवढी रक्कम द्या. मी हप्त्या हप्त्याने फेडीन."

इतकी मोठी रक्कम कर्जाऊ देणारा सावकार गावात दुसरा कोणी नव्हता. म्हणून भिकूशेटला फावले. त्याने व्याजाचा दर वाढवून सांगितला.

विठोबा म्हणाला—"सावकार! इतका कहर करू नका. आमच्या वडिलार्जित इस्टेटीतला एवढा वाडा आहे. तो विकून मी मुलीचं लग्न करून देईन." असे सांगून तो निघून गेला.

भिकूशेटला वाटले जाळ्यात सापडलेला मासा निसटला. म्हणून त्याने एक युक्ती योजली. त्याने गावात अफवा पसरवली की विठोबाचा वडिलार्जित वाडा म्हणजे भुताटकीचे एक घर आहे. त्याला वाटले की भुताटकी असलेला वाडा विकत घ्यायला कोणी धजणार नाही.

विठोबाने गावभर फिरून लोकांकडे कर्ज मागितले. परंतु कोणी त्याला कर्ज द्यायला तयार होईना. शेवटी त्याने आपला वाडा विकायचे ठरविले. परंतु तो भुताटकी असलेला वाडा असल्याचे सांगून कोणी तो वाडा विकत घ्यायला पुढे येईना.

मध्यंतरी भिकूशेटचा एक जमिनदार मित्र त्याच्याकडे पुष्कळ दिवसांनी भेटायला आला. त्याने विठोबाचा तो वाडा पाहिला व चकित होऊन भिकूशेटला म्हणाला—"असले वाडे आणि देवड्या हल्लीच्या

काळात कोणी बांधीत नाही. एक लाख रुपये देऊन सुद्धा मी हा वाडा विकत घ्यायला तयार आहे."

भिकू शेटने गावात जी अफवा पसरविली होती ती गोष्ट त्याच्या मित्राला माहीत नव्हती. भिकूशेट सरळ विठोबाच्या घरी गेला व म्हणाला–"विठोबा! तू आपला वाडा विकणार आहेस म्हणे! मी दहा हजार रुपये द्यायला तयार आहे! माझ्या नावे लिहून दे!

विठोबा तसा मूर्ख नव्हता. त्याने ओळखले की भिकूशेटचा काही तरी डाव असला पाहिजे. तो म्हणाला–"मला तर कर्जाऊ दहा हजार पाहिजे आहेत. तुम्हांला कोणी सांगितले की मी हा वाडा दहा हजाराला विकणार म्हणून? हा वाडा कमीत कमी पन्नास हजारांचा तरी असेल!"

भिकू शेटने विचार केला, पन्नास हजाराला विकत घेतला तरी काही बिघडणार नाही; जमिनदाराला एक लाखाला विकून पन्नास हजार रुपयांचा फायदा आपल्याला होईल. असा विचार करून भिकू शेटने जास्त घासघीस न घालता पन्नास हजार देऊन तो वाडा विकत घेतला.

विठोबाने विचार केल्याशिवाय फक्त पन्नास हजारांचा असेल असे म्हटले खरे, परंतु त्याला वीस हजारांहून जास्त किमत मिळेल याची स्वप्नातही कल्पना नव्हती. विठोबाने आपल्या मुलीचे लग्न थाटात करून दिले आणि उरलेली रक्कम खर्च करून नवीन शेत विकत घेतले.

काही दिवस लोटल्यावर भिकू शेटने आपल्या मित्राकडे निरोप पाठविला की त्याने पाहिलेला वाडा विकायला निघाला आहे व किमत एक लाख रुपयेच आहे.

जमिनदाराने त्याला कळविले की तूर्त तो वाडा विकत घ्यायचा विचार त्याने सोडला आहे. कारण त्या वाड्यात भुताटकी असल्याचे गावकऱ्यांकडून त्याला कळले आहे. तेव्हां भिकू शेटचे कान उघडले की आपण स्वतःच आपल्या पायावर कुऱ्हाड मारून घेतली.






एकदां नारद भ्रमण करीत व्यासमुनींच्या आश्रमात आला. व्यासाने नारदाला भक्तिभावनेने अर्घ्यादी देऊन त्याचे आतिथ्य केले व म्हणाला–"देवर्षी! संसारसुख म्हणतात ना, ते सर्व खोटे आहे!" असे सांगून व्यासाने त्यांना आयुष्यात आलेले सर्व अनुभव वर्णन करून सांगितले.

व्यासाचा जन्म झाला तेव्हां त्याच्या आईने त्याला सोडले. त्याने तपश्चर्या करून एक पुत्र मिळविला. शंकराच्या कृपेने झालेला तो मुलगा बापाला दुःखात लोटून निघून गेला. अशा तऱ्हेने वरच्या पिढीतल्याकडून व नंतरच्या पिढीतल्याकडून परित्यक्त झालेल्या व्यासाला पुन्हां संसारात गुरफटण्याची परिस्थिती निर्माण झाली. त्याची आई सत्यवती हिचा शंतनूशी विवाह झाला व तिला मुले झाली. त्यानंतर तिचे पती व पुढे तिची मुले मरण पावली. म्हणून व्यासांना त्यांची आई सत्यवती हिने बोलाविले. आईच्या आज्ञेप्रमाणे व्यासांना तिच्या दोघां सुनांच्या पोटी अनुक्रमे आंधळा धृतराष्ट्र व निस्तेज पांडू आणि दासीच्या पोटी विदुर मुलगे झाले. परंतु त्यांपैकी एकही व्यासांना पिंडदान करण्यास योग्य नव्हता.

त्यानंतर व्यासाचे मुलगे धृतराष्ट्र व पांडू यांना मुले झाली आणि आणखी एक पुढली पिढी सुरू झाली. त्यांची भांडणे विकोपाला गेली आणि व्यासाला त्यांत डोके खुपसावे लागले. पांडूच्या मुलांना वनवासात अनेक कष्ट सहन करावे लागले.



अशा तऱ्हेने संसारात किती दुःख सहन करावे लागले त्याचे वर्णन व्यासाने सविस्तर केले व नारदाला विचारले–"महामुने! मला अनुभवाने वाटते आहे की, पुत्र, पिता, नातवंडे हा केवळ भ्रम आहे, त्यातून मुक्ती कशी मिळेल? संसारात फसलेल्याला सुखप्राप्ती कशी होऊ शकेल? कृपा करून सांगाल का?"

देवर्षी नारद म्हणाला–"बाबा रे, संसारात पडून मोहापासून मुक्त राहलेला प्राणी कोठे असू शकेल का? ब्रह्मा, विष्णू व महेश हे त्रिदेव सुद्धा मोहात पडले व त्यांनी मी थोर ज्ञानी असल्याबद्दल माझी स्तुती केली. परंतु ते खरे नव्हे. एकदां मी मोहाला बळी पडलो आणि बायकोसाठी मला किती कष्ट सहन करावे लागले ते सविस्तर सांगतो, लक्ष देऊन ऐक." असे सांगून नारदाने आत्मवृत्त सांगायला सुरवात केली.

एके दिवशी नारद आणि पर्वत भूलोक भ्रमणाला निघाले. अनेक तीर्थक्षेत्रे, ऋषींचे आश्रम इत्यादी पहात त्यांनी परस्परांशी वागण्यासंबंधी एक नियम ठेवला. तो नियम असा होता की एकाच्या मनात काही विचार आला तर त्याने तो न लपविता दुसऱ्याला सांगायचा.

असे ठरवून दोघे भ्रमण करीत फिरत असतां उन्हाळा संपला आणि चातुर्मास (पावसाळा) सुरू झाला. चातुर्मास संपेपर्यंत कोठे तरी एका जागी रहावयाचे असते. त्यासाठी त्यांना संजय नावाच्या राजाची राजधानी सोयीची मिळाली. ते राजाच्या राजवाड्यातच राहू लागले. पावसाळ्याचे दिवस म्हणजे नेहमी पाऊस, म्हणून कोठे हिंडणेफिरणे अशक्यच होते. म्हणून राजवाड्यातच त्यांचे दिवस मजेत जात होते. राजकन्या मदयंती सर्व काळ त्यांच्या सेवेला जातीने हजर राही. तिने त्यांच्या स्नान संध्यादीची, जेवणाखाण्याची, झोपण्याची, दोघांमध्ये कोणताही भेदभाव न दाखविता, उत्तम प्रकारे व्यवस्था ठेवली. वेदाध्ययनात व गानविनोदात त्यांचा सर्वकाळ सुखाने जात होता.

हळू हळू मदयंतीचे मन नारदाकडे जास्त जास्त आकर्षिले जाऊ लागले. विशेषेकरून त्याच्या वीणावादनाचा व सामगानाचा मदयंतीच्या मनावर जास्त परिणाम झाला. ती अत्यंत प्रेमाने नारदाची सर्व कामे करी. त्याचा नारदाच्या मनावर खोल परिणाम झाला. ती दोघांकरितां सर्व कामे बरोबरच करी, परंतु नारदाच्या बाबतीत झुकते माप असल्याचे स्पष्ट होऊ लागले. स्नानाच्या वेळी नारदाला ऊन पाणी मिळे तर पर्वताला गार पाणी मिळे. जेवणाच्या वेळी नारदाला दही वाढले जाई तर पर्वताच्या वाट्याला ताकच येऊ लागले. अंथरुणे सुद्धां दोघांसाठी सारखी घातली जात नसत. ती नारदाकडे ज्या मोहक दृष्टीने पाही, त्याविषयी वेगळे काही सांगण्याची गरज नाही. अर्थातच पर्वताला तो भेदभाव स्पष्टपणे कळला.

नारदाला सुद्धा राजकन्या मदयंतीच्या सेवेत ते अंतर स्पष्ट दिसून आले. तेव्हां पर्वत नारदाला ते दोघेच असतां म्हणाला–"राजकन्या, काही दिवसांपासून जशी वागते आहे त्यावरून तिने तुला मनाने वरले असल्याचे स्पष्ट दिसू लागले आहे! तुझे मनसुद्धा तिच्यावर बसल्यासारखेच आहे.



तर मग आपण दोघांनी परस्परांना आपल्या मनात काय आहे ते सांगण्याचे जे व्रत घेतले होते ते तू विसरलास वाटते? ही लपवालपवी कशाला? खरं काय ते सांगून टाक!"

नारद थोडा संकोचल्यासारखा होऊन म्हणाला–"मुनींद्रा! लपवालपवी करण्यासारखं आहे तरी काय? मी तरी काय करणार? राजकन्येने मला मन दिले, माझे तिच्यावर प्रेम बसले!"

ते ऐकतांच पर्वताला भयंकर राग आला व त्याने शाप दिला–"तू व्रतभंग केलास आणि मला फसविलेस म्हणून तुला माकडाचे तोंड मिळो!"



नारदाला पण भयंकर राग आला व त्याने पर्वताला प्रतिशाप दिला—"या लहानशा चुकीबद्दल तू मला एवढा मोठा शाप दिलास म्हणून तुला स्वर्गप्राप्ती होणार नाही! तुला भूलोकातच कायम रहावे लागेल!"

तो शाप मिळाल्यावर पर्वत निघून गेला. नारदाला माकडाचे तोंड आले. तरी नारदाचे वीणागान ऐकत व त्यांत आनंद मानीत राजकन्या मदयंती नारदाची सेवा प्रसन्न चित्ताने पूर्ववत करीत राहिली. परंतु त्याचा भाचा पर्वत निघून गेल्यामुळे नारदाला मात्र फार वाईट वाटले.

त्याच समारास संजयराजाने आपल्या मुलीचे स्वयंवर करायचे ठरविले व प्रधानाला म्हणाला—"मुलीचे लग्न करून द्यावे, म्हणतो. तेव्हां तिच्या रुपलावण्याला, गुणांना व कुलगोत्राला साजेल असा चांगला वर पहा!"

"महाराज, आपण म्हणालात तसे वर तर अनेक आहेत. त्यांच्या पैकी आपणच योग्य वर निवडावा." प्रधान म्हणाला.

वडील तिच्या लग्नासाठी वरशोधनाच्या कामात गुंतले असल्याचे कळतांच राजकन्येने आपल्या दायीला बोलावून तिने नारदाला वरले असल्याचे व तिच्यासाठी इतर कोणताही वर पाहण्याची गरज नसल्याचे वडिलांना सांगायला सांगितले.

दायीने संजय राजाला ते सांगितले तेव्हां त्याची राणी कैकेयी तेथेच होती. राजा तिच्याकडे वळून म्हणाला—"राजकन्येने माकडाचे तोंड असलेल्या नारदाला कसे काय वरले? तो आपल्या मुलीजोगता वर कसा काय होईल? त्याला कशी मुलगी द्यायची? मुलीने मूर्खपणाने चुकीचा निर्णय घेतला तर चुकीची दुरुस्ती करण्याचे कर्तव्य आपले आहे. तो एक भिकारी आहे, हे तू आपल्या मुलीला जाऊन सांग."

कैकेयी आपल्या मुलीला एकांतात बोलावून म्हणाली—"मुली, तू नक्षत्रासारखी रेखीव व सोन्यासारखी लावण्यवती आहेस. तो नारद भस्म फासून राहणारा रांगडा





आहे. तुझं सौंदर्य कोठे आणि त्या माकडतोंड्याचं कोठे? तू त्याला कसं काय वरलेस? शिवाय तो रात्रंदिवस भटकत असतो, भिकारी आहे तो! त्याला तू वरणार? तुझं मंदमतित्व पाहून तुझ्या बाबांना फार फार वाईट वाटले. कोणी कोवळी विड्याची पाने उंटाला खायला घालील का? तुझं लग्न त्या नारदाशी लावून दिलं तर सारे जग आम्हांला हंसणार नाही का?" अशा प्रकारे कैकेयीने मुलीची समजूत घालण्याचा प्रयत्न केला.

परंतु संगीताची आवड असलेल्या मदयंतीचे मन पालटले तर नाहीच, ती पुढे म्हणाली—"आई! माणूस मूर्ख अडाणी असल्यावर त्याला किती सुंदर नाकतोंड असले आणि राज्यवैभव असले तरी काय ग उपयोग? या नारदासारख्या संगीत निष्णाताला सुबक नाकतोंड, राज्य, धन आणि रूपलावण्य यांची गरजच काय? त्याचं गायन ऐकून हरणे देहभान विसरून जातात. त्याच्यासारखा गायक त्रिलोकात दुसरा कोणी नाही. रसिकता नसलेल्याशी लग्न केले तर क्षणाक्षणाला मरण आल्यासारखेच नाही का? रसिकाची पत्नी होण्याचे भाग्य लाभलं तर आयुष्यभर आनंदच! स्वरज्ञान असलेली व्यक्ती सामान्य माणूस असली तरी देवांसारखीच असते! पशूलासुद्धा डोलवणाऱ्या संगीताविषयी अनादर दर्शविणाऱ्या थोरामोठ्याचे जीवित हे काय जीवित झाले? नारदाचे वैशिष्ट्य बाबांना माहीत नाही. त्याला शाप लागून वानररूप आले त्याच्या आधीपासून मी त्याला मनाने वरले. तो माकडतोंड्या झाला असला तरी तो माझा प्रियकर आहे! किन्नरांची तोंडे घोड्याची असतात. तरी त्यांच्या गायनाचे कौतुक न करणारे कोणी असतील का? विद्या नसेल तर नुसते तोंड काय कामाचे? त्याच्याशिवाय कोणी दुसरा मदनाचा पुतळा आला तरी मी त्याच्याशी लग्न करणार नाही. माझं नारदाशी लग्न करून दे, त्यासाठी बाबांचे मन वळव!"











कैकेयीने पतीला भेटून तिच्या मुलीने दृढ निश्चय केला असल्याचे सांगितले. त्यानंतर राजा कोणत्याही प्रकारे आपला विरोध न दर्शविता लग्नाच्या तयारीला लागला. त्याने नारदाचे मदयंतीशी लग्न करून दिले.

नारद सासऱ्याच्याच घरी राहू लागला. त्याची बायको जेव्हांजेव्हां त्याच्याकडे येई तेव्हांतेव्हां त्याला आपल्या माकडतोंडाची आठवण होई व फार वाईट वाटे. परंतु मदयंतीला त्या बाबतीत थोडेदेखील वाईट वाटले नाही.

काही काळ लोटला. मध्यंतरी पर्वत त्रिलोकभर हिंडत नारदाला भेटायला आला व आपल्या मामाचे ते माकडतोंड पाहून त्यालाच फार वाईट वाटले व म्हणाला– "राजकन्येकडे पाहून मी तुला दिलेला शाप परत घेतो. तुझे तोंड पूर्ववत होवो!"

"मीसुद्धां मूर्खपणाने तुला शाप दिला होता, तू नेहमीप्रमाणे स्वर्गलोकी परत जा." नारद पर्वताला म्हणाला.

पर्वत आनंदाने निघून गेला.

नारदात झालेला हा बदल पाहून राजकन्येला परमानंद झाला व ती धांवतच आईकडे गेली व तिने पतीला पूर्वीचे सुंदर मुख प्राप्त झाल्याचे सांगितले. तिने राजाला ती गोष्ट कळविली. राजालासुद्धा आनंद झाला. अशा तऱ्हेने नारदाला संसारात पडल्यावर मायेमुळे कसे कष्ट सहन करावे लागतात त्याचा अनुभव मिळाला. त्याने व्यासाला संसारात गुरफटल्याचा त्याचा आणखी एक अनुभवसुद्धा सांगितला.

एकदां नारद श्वेत द्वीपात विष्णूच्या दर्शनाला गेला असतां लक्ष्मी चटदिशी उठून घरात निघून गेली. नारद त्यामुळे थोडा चिडला व त्याने विष्णूला विचारले–"मी काय चोरभामटा किंवा बदमाष आहे का? मी तपस्वी व इंद्रियनिग्रही आहे हे ठाऊक नाही का लक्ष्मीला? मग ती मला पाहतांच अशी उठून घरात कां गेली? ही वागण्याची रीत झाली का?"

नारद अत्यंत उर्मटपणे बोलला, परंतु विष्णु मुळीच रागावला नाही व म्हणाला– "पतीशिवाय इतर परपुरुषासमोर न येणे किंवा राहणे स्त्रीधर्म आहे! किती थोर महात्मा झाला तरी इंद्रियावर ताबा राखणे सोपे आहे का? महापुरुषालासुद्धा ते साध्य नाही. आम्ही त्रिमूर्तीसुद्धा मायाजाळातून वांचलो नाही!"

नारद चकित होऊन म्हणाला–"माया म्हणजे काय रे? तिच्या अंगात अशी काय मोठी शक्ती असते?"

"तू माझ्याबरोबर चल व माया म्हणजे काय हे मी दाखवीन. परंतु तिला पाहून दुःखी मात्र होऊ नकोस हं!" असे सांगून विष्णूने गरुडाला बोलाविले. नारद आणि विष्णू दोघे मिळून गरुडावर कोठेतरी निघाले.

कान्यकुब्ज नावाच्या गांवाशेजारी एक सरोवर होते. त्यांत सुंदर कमळे होती. सरोवराचे पाणी स्फटिकासारखे स्वच्छ निर्मळ होते.

विष्णू नारदाच्या हाताची करंगळी धरून त्याला सरोवराजवळ घेऊन आला व म्हणाला–"या सरोवरात स्नान करून आपण कान्यकुब्ज गावात जाऊ."



नारदाने आपले हरणाजिन काढून एका जागी ठेवले आणि सरोवरात पाऊल टाकल्याबरोबर त्याचे पुरुषरूप जाऊन त्याला स्त्रीरूप मिळाले. ती गोष्ट नारदाला कळली नाही. परंतु विष्णू नारदाचे ते हरिणाजिन व वीणा घेऊन गरुडावर बसून निघून गेला.

नारद सरोवरातून बाहेर आला. परंतु त्याला त्याचे हरिणाजिन, वीणा किंवा विष्णू यांपैकी एकाचीसुद्धा आठवण झाली नाही. इतक्यात तालध्वज नावाचा राजा रथात बसून तेथे आला. त्याच्या बरोबर हत्ती, घोडे व शूर सैनिक होते. स्त्रीरूपात असलेल्या नारदाकडे तो एक टक पहात राहिला व त्याने विचारले–"सुंदरी तू नदीसुंदरी, देवसुंदरी की नागसुंदरी कोण आहेस? तू येथे एकटी कशी काय?" तो

तिच्या रूपावर भाळला असल्याचे व तिच्याशी लग्न करायला तयार असल्याचेही त्याने सांगितले. स्त्रीरूपात असलेल्या नारदाने होकार दिला. दोघे राजधानीत गेले आणि दोघांनी तेथे लग्न करून घेतले.

नारदाला तो पुरुष असल्याचे भान राहिले नाही व त्याचे ब्रह्मज्ञानही पूर्णपणे लयास गेलेले होते. आपल्या सारखी दूसरी रूपसुंदरी जगात कोठे मिळणार नाही, असा गर्वही त्याला झाला. बारा वर्षे तालध्वजा-बरोबर संसार केल्यावर नारद गरोदर झाला व त्याला एक मुलगा झाला. त्याचे नाव वीरवर्मा असे ठेवण्यात आले. त्यानंतर एकामागून एक मुलगे होऊ लागले. त्या स्त्रीरूपात नारदाला बारा मुलगे झाले. मुले वयात आल्यावर त्यांची लग्ने झाली व त्यांनासुद्धा मुले झाली. वंशवृक्ष वाढू लागला.

काही काळ लोटल्यावर कान्यकुब्ज नगरावर शत्रूने स्वारी केली. त्या युद्धात नारदाच्या पोटी जन्मलेली मुले आणि त्यांची मुले मरण पावली. नारदाला त्याचे फार दु:ख झाले.

अशा वेळी विष्णू म्हाताऱ्या ब्राह्मणाचे रूप घेऊन आला व म्हणाला–"कोण तुझी मुलं आणि कोण तू? केवळ भ्रम आहे हा! कालक्रमाने सर्व घडते. प्रथम स्नान कर आणि त्यानंतर तर्पण कर."

विष्णू नारदाला पुरुषतीर्थ नांवाच्या सरोवरावर घेऊन गेला व नारदाला त्यात स्नान करायला सांगितले. त्यात बुडी मारताच नारदाला पुरुषरूप पुन्हां प्राप्त झाले. काठावर त्याला विष्णू त्याचे मृगचर्म व वीणा घेऊन दिसला. तो नारदाला म्हणाला–"किती वेळ रे? ये!"

नारद सरोवराबाहेर आला. स्त्रीरूपे त्याने केलेला संसार वगैरे सर्व तो विसरला. परंतु तालध्वज, त्याची बायको पुरुष झालेली पाहून फार दु:खी झाला. विष्णूने त्याला वेदांताचा उपदेश करून निरोप दिला.

मायाजालात पडून माणूस कसा कळीच्या बाहुल्यासारखा होतो हे नारदाला कळले.



# सवतींचे भांडण

यशवंतरावांच्या दोन बायका होत्या. लहानसहान गोष्टीवरून दोघी आपसात भांडत. यशवंतरावांनी आपल्या एका मित्राचा सल्ला विचारला आणि त्याने एक उपाय सुचविला.

पुढे काही दिवसांनी यशवंतराव आपल्या दोघां बायकांना म्हणाले–"मला परगावी एका महत्वाच्या कामासाठी जावयाचे आहे. त्याप्रमाणे ते घरून निघाले आणि गावातल्याच एका धर्मशाळेत गेले. त्यांनी वेष पालटला आणि एक भयानक चेहरा करून ते एका चोरा सारखे घरी आले आणि घरावर थाप दिली दोघां सवतींनी खिडकीतून बाहेर पाहिले.

"ताई, मला भीती वाटते बाई!" म्हणत धाकटीने मोठीला मिठीच मारली.

"वेडे, भ्यायचे काय कारण आहे?' असे म्हणत मोठीने धाकटीला काहीतरी समजावून सांगितले.

दोघां सवतींनी परस्परांशी सल्ला करून एकएक मुसळ घेतले आणि दरडावून विचारले–"कोण आहे रे तो समोर तर ये!" ते ऐकून यशवंतरावांनी तेथून पळून जाण्या-पूर्वी शंभर रुपये भरून एक पिशवी आत सरकवली. मिळून राहल्याचा फायदा कसा होतो हे कळावे म्हणून यशवंतरावांनी ती पिशवी सरकवली होती.

परंतु दुसऱ्या दिवशी ते परतून पाहतात तर दोघी भांडत होत्या–"वा ग वा! तो चोर मला पाहून पळून गेला. हे पैसे माझे!" यशवंतराव ते ऐकून थक्क झाले.





# भेडसावणारी भुते

धर्मपूर नावाच्या गावी गावाबाहेर एक ओसाड पडलेला वाडा होता. त्याच्या समोर वडाची झाडे होती. वाटसरू त्या झाडांच्या सावलीत आराम करीत. परंतु रात्रीच्या वेळी त्या बाजूला कोणी फिरकतही नसे. कारण गावात अशी अफवा होती की त्या वाड्यात कामिनी भुते रात्रीच्या वेळी धिंगाणा घालतात. ते खरे वाटण्याचे कारण होते. चुकूनमाकून कोणी गावकरी संध्याकाळी त्या बाजूने गेला की त्याला वाड्यातून पैंजणांचा व बांगड्यांचा आवाज ऐकू येई.

धर्मपूरच्या तिघां तरुणांनी त्या भुतांचा छडा काढायचे ठरविले. ते एके दिवशी धाडस करून त्या ओसाड वाड्यात शिरले आणि मार खाऊन आणि कसाबसा आपला जीव वाचवून पळून गेले.

धर्मपूर गांवच्या कामिनी भुतांची बातमी शेजारच्या शहरातही पोचली. त्या शहरातून परमेश नावाचा तरुण एक कोणाला काही कळविल्याशिवाय तेथे आला आणि संध्याकाळी एका वडाच्या झाडावर चढून बसला. रात्रभर तो त्या झाडावरच बसून राहिला आणि काय होते ते पहात राहिला. रात्री त्याने त्या वाड्यातून पैंजणांचा व बांगड्यांचा आवाज मधूनमधून ऐकला. उजाडल्यावर तो शहरात निघून गेला.

दहा दिवसांनी धर्मपूर गावी बाहुल्यांचा नाच करणाऱ्या एका कंपनीचे लोक आले. त्या कंपनीत बायका व पुरुष मिळून दहाजण होते. त्या कंपनीच्या लोकांनी गावकऱ्यांना भेटून भुतांच्या वाड्यासमोरच्या वडाच्या झाडांजवळ बाहुल्यांचा नाच दाखविणार असल्याचे जाहीर केले. काही वडीलधारी मंडळी त्यांना म्हणाली की तेथ तर कामिनी भुते आहेत. ती जागा सोडून आणखी कोठेही खेळ ठेवा. परंतु बाहुल्यांचा नाच करणारे हट्टाला पेटले. म्हणाले– "अहो, आमच्या बाहुल्यांना वीर हनुमान पडद्यावर असेपर्यंत डाकिनी, शाकिनी वगैरे भुतांची तिळमात्र भीती बाळगण्याचे कारण नाही. त्यांच्या काही गमजा चालणार नाहीत."

तरी काही वडीलधाऱ्या मंडळींनी बाहुल्यांचा खेळ दाखविणाऱ्या कंपनीवाल्यांना तो हट्ट सोडायला सांगितले.

तेव्हां कंपनीच्या प्रमुखाने सांगितले की तुमच्या गावचे लोक पहायला येवोत अगर न येवोत आम्ही आपला खेळ तेथेच ठेवण्याचे आहे.

खेळ दाखवणाऱ्या कंपनीच्या लोकांनी प्रयोगासाठी सर्व आवश्यक तयारी वडाच्या झाडांखाली केली. थोडी रात्र झाल्यावर प्रयोगाला सुरवात झाली. काही धाडशी तरुण गावकरी खेळ पहायला आले.

खेळ सुरू होताच कोठून तरी हाडे येऊन रंगभूमीवर पडू लागली. प्रेक्षकांपैकी काही जण उठून पळून गेले. ते पाहून इतर लोकसुद्धा पळून गेले.

आता नाइलाज होऊन त्या कंपनीच्या लोकांनी हनुमानाला पडद्यावर आणून उभे केले. तरी हाडे रंगभूमीवर येऊन पडत



राहिली. तेव्हां कंपनीवाल्यांनी विचार केला की ही भुते भिणारी नाहीत भेडसावणारी आहेत.

इतक्यात कंपनीच्या लोकांना भुतांच्या वाड्यातून पैंजणाबांगड्यांचा आवाज ऐकू येऊ लागला. थोड्या वेळाने वाड्यातून पांचसहा बलदंड व्यक्तींनी येऊन कंपनीच्या लोकांना घेरले.

त्यांच्यापैकी एकजण धमकावीत म्हणाला–"तुमचा हनुमान कामिनी भुतांना मारणार असेल तर आम्ही तुम्हांला बडविणार आहो." ते लोक धमकी देत असतानाच कंपनीवाल्यांनीच एकदम प्रतिहल्ला केला आणि त्या बलदंड माणसांच्या

हातातून काठ्या हिसकावून घेऊन त्यांनाच ठोकून काढले. त्या बलदंड लोकांना या प्रतिहल्लचाची कल्पनाच नव्हती. 'किंकर्तव्य विमूढ स्थितीत पळून जाण्याचे भानही त्यांना राहिले नाही. कंपनीच्या लोकांनी त्यांना धरून झाडांना बांधून ठेवले. काही जण मशाली घेऊन वाड्यात शिरले. आत एका खोलीत त्यांना पैंजण व बांगड्या ठेवलेल्या दिसल्या.

कंपनीच्या लोकांनी त्या बलदंड लोकांना चांगले बडवून काढल्यावर त्यांनी खरी गोष्ट सांगितली.

खरी गोष्ट अशी होती की धर्मपूर गावातला मल्लांचा नायक जग्गू आणि संतू मास्तर त्या ओसाड वाड्याचा उपयोग आपल्या भामटेगिरीसाठी करीत होते. तेथे बसून ते कट करीत. चोरवाटेने आलेला माल साठवून तो विकण्याच्या कामी त्यांना वाड्याचा उपयोग सोयीचा असे. त्यांनीच त्यांच्या या कृष्ण कृत्यांवर पडदा पडावा म्हणून भुताची सृष्टी केली होती. जे बलदंड व्यक्ति पकडले गेले होते ते त्यांनी नेमलेले गुंड नोकर होते. या नोकरांकडून ते दोघे वाटेल ती कामे करवून घेत.

कामीनी भुतांची गोष्ट जशी खोटी होती, तशीच बाहुल्यांची कंपनीसुद्धा बनावटी होती. ती शिपायांची एक निष्णात तुकडी होती. परमेश त्यांनीच पाठविलेला हेर होता. त्याने जी माहिती दिली त्याच्या आधारे गावातल्या लबाड गावकऱ्यांची लबाडी चवाठ्यावर आणण्यासाठी बाहुल्याची ही कंपनी गावात आली होती.

त्या दिवशी रात्री गावातल्या सर्व बडील धान्या लोकांची झडती घेण्यात आली. त्या घरातून सर्व बेकायदा आणलेला व जमा करून ठेवलेला माल सापडला. उजाडल्यावर त्या सर्व बडील धान्यांना अटक करून पोलीस ठाण्यावर नेण्यात आले.

धर्मपूरच्या लोकांना या सर्व दुष्ट कृत्यांची दानवाच नव्हती. ज्यांना ते भुते मानीत ती खरोखरी गावातली 'प्रतिष्ठित' मंडळीच होती हे कळल्यावर तर ते थक्कच झाले.



# चतुर भाऊ

देवगिरी येथे तीन भाऊ होते. ते कोणतेही काम असो आपापल्या तऱ्हेने तीन प्रकाराने करीत.

ती गोष्ट कंजीवरंच्या राजाला कळली. त्याने त्या तिघांची आपल्या दरबारात परीक्षा घेऊन त्यांची घमेंड उतरविण्याचे ठरविले. त्याने त्यांच्याकडे निरोप पाठविला की नेमलेल्या दिवशी तिघांनी दरबारात हजर व्हावे. राजाच्या मनात असे होते की तिघे एकाच वेळी दरबारात आले की तिघे एक काम एकाच पद्धतीने करतात हे सिद्ध करायचे.

तिघे भाऊ ठरलेल्यावेळी दरबारात हजर झाले, परंतु राजाला हे पाहून आश्चर्य वाटले की तिघे एकाच वेळी तीन निरनिराळ्या दरवाज्यातून आत आले. त्यानंतर राजाच्या शिपायांनी तिघांना तीन निरनिराळ्या पेल्यातून पाणी आणून दिले. एकाने गटागट पाणी पिऊन टाकले. दुसरा सामान्य पद्धतीने प्याला. तिसरा एकेक घोट पीत सावकाश प्याला.

पाणी प्याल्यावर पहिल्याने पेला नेहमी सारखा ठेवून दिला. दुसऱ्याने आडवा ठेवला. आणि तिसऱ्याने उपडा ठेवला. त्यानंतर शिपाई सरबत घेऊन आले. ज्या भावाने पेला नेहमी सारखा ठेवला होता त्याने पेल्यात सरबत ओतायला सांगितले. उपडा पेला ठेवणाऱ्याने शिपायला थांबयला सांगितले. आडवा पेला ठेवणाऱ्याने सरबत ओतलेस तर पिईन नाहीतर नको असे शिपायाला सांगितले.

राजा त्या भावाचे ते चातुर्य पाहून चकित झाला. त्यांना परास्त करणे अशक्य असल्याचे ओळखून त्यांना उलट इनाम देऊन आदरपूर्वक निरोप दिला.



















# प्रश्नोत्तरे

**जी. मुरली, नरसापूर**

प्र. : भाषा कशा अस्तित्वात आल्या? लिपिसुद्धा नसलेल्या भाषा कशा उद्भवल्या? लिपि नसलेल्या भाषांत पत्रव्यवहार कसा काय होतो?

उ. : भाषा म्हणजे वस्तूंना, गुणांना, क्रियांना दिलेली संकेत नामें किंवा शब्द होत. माणसाची वाढ इतर प्राण्यांप्रमाणे सहज प्रवृत्तींनी होत नसते. त्याला मेंदू असल्या कारणाने त्याने आपल्या चहूंकडच्या वस्तु, वातावरण व परिस्थितीनुरूप बदल घडवून अनुभवाने ज्ञान संपादन केले आहे. त्याचा हा अनुभव इतरांना काही अंशी अनुकरण करून ग्रहण करता येतो. परंतु तो अनुभव पूर्णपणे कळावा यासाठी त्या अनुभवाबरोबर काही संकेत असावे लागतात. एखादे रोपटे, मूळ, फळ किंवा प्राणी खाण्यायोग्य आहे असे अनुभवाने काही माणसांना कळले आणि त्या खाण्यायोग्य वस्तूंना नावे असतील तर त्या नांवाद्वारे सर्वांना ते कळणे शक्य होते.

भाषा जन्मल्या तशाच लिपी जन्मल्या. भाषेप्रमाणे लिपीसुद्धा कृत्रिमच आहे. 'साप' म्हणून कोणी एका भाषेत ओरडला तर ती भाषा ज्याला कळते त्यालाच धोका असल्याचा बोध होतो. त्याचप्रमाणे एका भाषेची लिपी ज्याला माहीत आहे त्यालाच ती उपयोगी असते. परंतु लिपीचा उपयोग कोणतीही भाषा बोलणाऱ्यांना होऊ शकतो.

लिपीमुळे भाषांचा उपयोग विस्तीर्णपणे होतो. कधी काळी भेटलेल्या दोन व्यक्ती हजारो मैल दूर जाऊन राहिल्या तरी पत्रव्यवहार करून परस्परांची मैत्री कायम राखू शकतात. इंग्लिश भाषेला लिपी नसती तर जगात कोठे काय घडले हे आपल्याला काही तासांत कळू शकले असते का? लिपी नसेल तर तारेने बातम्या पाठविणे शक्य झाले असते का?

तरी लिपी येत नसलेले लोकसुद्धा दूरदूर बातम्या पोचत्या करतातच. आफ्रिकेत एका प्रदेशात घडलेल्या घटना शेंकडो मैल दूरच्या प्रदेशातील लोकांना 'टेलिग्राफी' पेक्षा जास्त वेगाने डफ वगैरे वाजवून कळवीतच असत म्हणे. त्याचप्रमाणे अमेरिकन इंडियन धूर करून त्या द्वारे दूर प्रदेशातल्या लोकांना संदेश पाठवीत असत म्हणे. परंतु डफांचा आवाज आणि धूर लौकरच हवेत विरून जातात. लिपी द्वारा पाठविलेल्या बातम्या व संदेशासारखे जास्त काळ टिकत नाहीत.



# अघटित अनपेक्षित

[८६]

## गुन्ह्याची शिक्षा

सिंहलदेशाचा राजा जीमूतवाहन याचा मुलगा कंदर्पकेतू हा फार सुंदर होता. एके दिवशी एका व्यापाऱ्याने त्याला एक विचित्र बातमी सांगितली. म्हणे प्रत्येक चतुर्दशीच्या दिवशी समुद्राच्या मध्यभागी कल्पवृक्षाखाली एक लोकातीत सुंदर स्त्री सुंदर वस्त्रालंकार धारण करून एका शय्येवर बसलेली दिसते.

कंदर्पकेतूला त्या स्त्रीला पाहण्याची तीव्र इच्छा मनात उद्भवली व त्याने, व्यापाऱ्याने सांगितलेल्या दिवशी त्या जागी जाऊन कल्पवृक्षाखाली त्या अत्यद्भुत सुंदर तरुणीला पाहिले. त्याला पाहतांच ती सुंदरी समुद्रात बुडी मारून अदृश्य झाली.

तिच्या सौंदर्यावर भाळलेल्या कंदर्पकेतूने समुद्रात उडी टाकली आणि समुद्राच्या तळाला गेला. समुद्राच्या तळाला एका सोन्याच्या वाड्यात विद्याधर स्त्रियांमध्ये ती स्त्री एका स्वर्णशय्येवर बसलेली होती.

तिने त्याला पाहून त्याच्याजवळ एका विद्याधर स्त्रीला पाठविले. ती विद्याधर स्त्री त्याला म्हणाली—"ही सुंदरी कंदर्पकेली नावाच्या विद्याधर राजाची मुलगी आहे. तिचे नांव 'रत्नमंजरी आहे. तिला पाहून तिच्यावर भाळलेला कोणी साहस करून समुद्रात उडी टाकून या सोन्याच्या वाड्यात येईल त्याच्याशीच लग्न करीन अशी या विद्याधर राजकन्येने प्रतिज्ञा केली आहे म्हणून ही तुमच्याशी विवाहाला तयार आहे."

कंदर्पकेतूला आनंद झाला व त्यान तिच्याशी गांधर्व विवाह केला. दोघे त्या स्वर्णभवनातच काहीकाळ स्वर्गसुख उपभोगीत राहिले.

पंचतंत्र



त्या स्वर्णमंदिरातील एका मोठ्या दालनात रत्नमंजरीचा सोन्याचा पुतळा ठेवलेला होता. "ह्या पुतळ्याला हात लावत कामा नये. हात लावला तर सर्वनाश होईल!" या शब्दांत रत्नमंजरीने कंदर्पकेतूला पूर्वीच सांगितले होते.

तरी देखील एकदां रत्नमंजरी जवळ नसतांना कंदर्पकेतूने त्या पुतळ्याला हात लावलाच. लगेच त्या पुतळ्याने त्याला जोराने लाथ मारली. ती लाथ लागताच कंदर्पकेतू सिंहल द्वीपात येऊन पडला.

**मारण होम**

श्रीपर्वत प्रदेशातल्या ब्रह्मपुर येथे एक बातमी पसरली की पर्वताच्या शिखरावर घंटाकर्ण नावाचा एक राक्षस आला आहे.

ती बातमी कळल्यानंतर त्या पर्वतावर लाकूडफाटा आणायला जाणारे लोक भयभीत झाले. कोणी वर चढून गेला नाही.

वास्तविक गोष्ट अशी होती की एक घंटा चोरून नेणाऱ्या चोराला पळून जात असता एका वाघाने ठार केले होते व त्याच्या हातातली घंटा काही माकडांना सापडली होती. ती माकडे ती घंटा मधून मधून वाजवीत. म्हणून ब्रह्मपूरला राहणाऱ्या लोकांना ती घंटा वाटेल त्यावेळी ऐकू येई. ती घंटा वाजविणारा घंटाकर्ण राक्षस असावा असा विचार करून कित्येक जण गाव सोडून निघून गेले. कारण तो राक्षस नरभक्षक आहे आणि एखाद्या माणसाला त्याने धरले की त्याला खाऊन टाकीपर्यंत घंटा वाजतच राहते अशी वार्ता कोणी तरी उडविली होती.

घंटाकर्ण राक्षसाला ठार करण्यासाठी जो कोणी मारण होम करील त्याला एक हजार स्वर्णमुद्रा इनाम दिले जाईल अशी दवंडी त्या देशाच्या राजाने वाजविली.

त्या घंटेचे गुपित एका नर्तकीला माहीत होते. ती आपल्या प्रियकराला गुप्तपणे भेटण्यासाठी त्या पर्वतावर निर्जन स्थानी जात असे. अशाच एका वेळी तिने घंटा वाजवीत असलेल्या माकडांना पाहिले होते.

दवंडी ऐकून ती राजाला जाऊन भेटली आणि राक्षसाला ठार करण्यासाठी ती मारण होम करण्यास तयार असल्याचे तिने सांगितले. नंतर तिने रांगोळी काढली आणि गणपतीची पूजा करून काही तांत्रिक क्रिया केल्या. नंतर एक पाटीभर माकडांना आवडणारे खाद्यपदार्थ फळे वगैरे घेतली आणि पर्वत चढून गेली. नंतर तिने माकडं रहात तिथे ती फळे वगैरे फेकली. माकडांनी घंटा सोडली व फळे खायला धावली. तिनें चटदिशी घंटा उचलली आणि पर्वतावरून उतरून गावात आली व राजाला म्हणाली—"मी घंटाकर्णचा वध करण्यासाठी मारण होम केला आणि त्याची घंटा काढून आणली. यापुढे आपल्याला घंटेचा आवाज कधी ऐकू येणार नाही."

त्यानंतर घंटेचा आवाज येईलच कसा?

राजाने तिला हजार स्वर्णमुद्रा दिल्या.

**घुंगरांची हौस**

एका देशात उज्वल नावाचा एक गाडीवान होता. त्याचे दुर्भाग्य असे की कोणी त्याची गाडी भाड्याने घेत नसे. गाडीवानाच्या धंद्यात त्याच्या पोटापाण्याची व्यवस्था होतनाशी झाली.

"पोट भरण्याला निरुपयोगी वृत्ती आणि जीवित चालवायला निरुपयोगी देश कितीकाळ धरून ठेवायचा? 'अखिल विश्वचि माझं घर' असे असता कोठेही



जाऊन पोटापाण्यापुरता धंदा करायला काय हरकत आहे?" असा विचार करून तो स्वदेश सोडून परदेशात गेला.

वाटेत त्याला एक वाळवंट लागले. तिथे त्याला एक उंटाचे पिल्लू दिसले. ती मादी होती. त्या पिल्लाची आई उंटीण आपल्या पिल्लाला सोडून कोठेतरी निघून गेली होती.

त्याने त्या उंटाचे पिल्लू घरी आणले आणि रानातून गवत आणून त्याला चारा घालू लागला. ते पिल्लू म्हणजे मादी होती. ते मोठे झाले आणि उंटीण होऊन उंटात हिंडू फिरू लागले. त्या उंटिणीला पिल्ले झाली. ती तो भाड्याने देऊ लागला. त्याचा उदरनिर्वाह छान चालू लागला.

तो वाळवंटात मधून मधून त्या उंटिणीवर बसून राजस्थान, मारवाड व गुजरात वगैरे प्रदेशात प्रवास करी आणि लहान लहान उंट विकत घेई. आपल्या उंटांचा कळप त्याने वाढविला.

त्याने विकत घेतलेल्या उंटांमध्ये एक फार सुंदर होता. म्हणून त्याने त्याच्या गळ्यात चांदीचे घुंगरू बांधले. तो उंट चाले तेव्हां घुंगरांचा मंजुळ आवाज ऐकू येई. म्हणून त्या उंटाला आपल्या घुंगरांचा थोडा गर्वही चढला. घुंगरू नसलेल्या उंटांना त्याचा हेवा वाटे.

एकदां त्या उंटांचा कळप जंगलात चरायला गेला असतां घुंगरूवाला उंट मागे एकटा राहून गेला. तो आनंदाने उड्या मारीत हिंडत असतां तो एकटा मागे पडल्याची गोष्ट त्याला कळलीच नाही.

एका म्हाताऱ्या उंटाने त्याला पाहिले व म्हणाला—"वेड्या, तू एकटा मागे पडलास की रे! सिंह वगैरे हिंस्र प्राणी आहेत बरं का! तुझ्या घुंगरांच्या आवाजाने ते नक्की येतील."

तरी घुंगरूवाल्या उंटाने दुर्लक्ष केले. उंटांचा कळप दृष्टीआड झाला. काळोख पडला. घुंगरूवाला उंट वाट माहीत नसल्यामुळे भटकत फिरू लागला. त्याच्या घुंगरांचा आवाज ऐकून एक सिंह आला आणि त्याने त्या उंटाचे पोट फाडले.






[ ४ ]

[कुंडलिनी राज्याचे सैन्य खजिना भरण्यासाठी परकी राज्यांवर स्वारीला निघाले. त्याच वेळी त्यांना शेंडेनक्षत्र दिसले. वादळामुळे काही युद्धनौका समुद्रात बुडाल्या. काही सैनिक एका बेटावर पोचले. तेथे क्रूर जनावरांच्या व मांत्रिकाच्या हातून स्वतःला वांचवून ते पळू लागले पुढे—]

सेनापती समरसेन व सैनिक तसेच पळत राहिल्यावर एका डोंगराळ प्रदेशात पोचले. तेथे त्या भयंकर एकाक्ष मांत्रिकाचा आवाज आतां त्यांना ऐकू येत नव्हता. जिवावरचे संकट टळले असे वाटून त्यांनी समाधानाचा श्वास घेतला. त्याला आणखी एक कारण होते. त्यांचा पाठलाग करणारे चतुराक्षाचे काळे घुबड आणि वनमाणूस-सुद्धा कोठे त्यांना दिसत नव्हते. अशातऱ्हेने सर्व निश्चित होऊन एका जागी दम घ्यायला थांबले.

पण आतां पुढे काय करायचे? हा प्रश्न सर्वांच्या समोर उभा होताच. सुटला नव्हता, त्यांना वाटत होतेच की पुन्हां एखाद्या मोठ्या संकटात सापडण्यापूर्वी या मंत्र-द्वीपातून निसटून बाहेर पडले पाहिजे. परंतु नेट सुटायचे कसे? आपण सोडून आलेल्या युद्धनौका समुद्रात कोठल्या बाजूला आहेत?



युद्ध नौकात ज्या सैनिकांना आपण सोडून आलो त्यांच्यावर काही प्रसंग गुदरला तर नसेल? आपण या बेटावर आहों तरी कोठे, कोणत्या दिशेला?

सर्व बेटावर पसरलेल्या या अरण्यात पूर्व, पश्चिम की इतर दिशा कशा कळणार? त्या प्रदेशात जिकडे पहावे तिकडे डोंगर नि पर्वत आणि गगनचुंबी वृक्ष नि झाडे आणि झाडांवर चढलेल्या नागमोडी वेली. दिशा कळल्या तर ना आपण आहो कोठे हे कळणार?

या गुंतागुंतीच्या प्रश्नांच्या जाळ्यात समरसेन सांपडला असतां एकाएकी आकाशातून ढग नाहीसे होऊ लागले आणि सूर्यदर्शन घडले. सूर्य होता त्या दिशेला पाहील्यावर दिशांचे ज्ञान झाले आणि आपण आतां बेटावर कोणत्या जागी आहो याची कल्पना समरसेनाला झाली.

तो आपल्या अनुयायांना म्हणाला– "आपण या वेळी या मंत्रद्वीपाच्या पश्चिमेकडे आहो. आपल्या युद्ध नौका पूर्वेकडच्या किनाऱ्यावर आहेत."

"तरमग आपण काय वाटेल ते करून पूर्वेकडील किनाऱ्यावर पोचले पाहिजे." एक सैनिक म्हणाला.

"हे तुझे म्हणणे बरोबर आहे, परंतु पूर्वेकडील किनाऱ्यावर पोंचणे सोपे नाही. वाटेत कोणकोणत्या संकटांना तोंड द्यावे लागेल, नकळे. सरळ पूर्वेकडे जायचं झालं तर वाटेत मोठमोठे डोंगर व जंगले आहेत. त्याचबरोबर क्रूर रानटी जनावरेही आहेत. त्यांच्या तोंडातून वांचलो तर पूर्वेच्या समुद्रकिनाऱ्याला आपण पोचणार." असे म्हणत समरसेनाने निराशेचा दीर्घश्वास सोडला आणि एका झाडाला टेकून उभा राहिला.

स्वत: सेनापतीच निराश झालेला पाहून सैनिकांचासुद्धा धीर खचला. समरसेनाच्या ते लक्षात आले. म्हणून तो म्हणाला– "तुम्ही म्हणतां तसे पूर्वेकडच्या किनाऱ्याकडे पळणेच सर्व तऱ्हेने बरोबर दिसते आहे. मलासुद्धा तसेच वाटते आहे. आपण तसेच करू या. आता वाटेत तोंड द्यायला लागणारी अनेक संकटे व धोके हे आहेतच! आपल्या हातात तलवारी आहेत व आपल्या डोक्यावर कुंडलिनी देवीचा वरदहस्त आहे, तेव्हां आपण भिण्याचं कारणच नाही. येईल त्या संकटांना तोंड देऊन आपण आपल्या गम्यस्थानी सुरक्षित पोहोचूच! तरमग नि:शंकपणे चला, माझ्याबरोबर!" सैनिकांना या शब्दात धीर देत समरसेन निघाला.

थोडे अंतर चालून गेल्यावर समरसेन एकाएकी थांबला व म्हणाला–"थांबा, तुम्ही सर्व थांबा!" त्याने सर्वांना थांबायला खूणही केली. त्यांना समोर एक भयंकर दृश्य दिसले. ते दृश्य मोठमोठ्या शूर साहसी वीरांच्या सुद्धा अंगावर कांटा उभा राहील असे भयंकर होते.

एक मोठे अजगर त्यांच्या समोरच थोड्या अंतरावर झाडाच्या फांद्यांवरून खाली सरकत येत होते. दोन चित्ते निश्चिंत उभे होते, जणुकाही त्यांना त्यांच्यावर अजगर उडी मारणार असल्याची कल्पनाच नव्हती.

समरसेन व इतर सैनिकांसमक्ष एका चित्यावर त्या अजगराने हल्ला केला आणि त्याचे डोके आपल्या तोंडात धरून त्याच्या अंगाला विळखा देऊ लागला. ते दृश्य





पाहून दुसरा चित्ता भ्याला आणि तेथून पळून गेला.

परंतु लगेच थोड्या वेळाने तो परतला आणि अजगराच्या विळख्यातून स्वतःला सोडविण्यासाठी धडपड करीत असलेल्या साथीदाराला पाहून जोराने गरजला आणि त्या अजगरावर धावला.

त्या भयंकर परिस्थितीत समरसेनाने आपल्या अनुयायांना धीर देत म्हटले– "पाहिलंत कसले भयंकर द्वंद्व चालू आहे ते! आपणा सर्वांना पुढल्या वाटेवर याच तऱ्हेच्या संकटांना सावधपणे तोंड द्यायचे आहे.

त्यानंतर सर्वजण दुसऱ्या बाजूने वाट काढीत पुढे निघाले. ती वाट पाणी चालायला तितकीशी चांगली नव्हती. डोंगरी ओहोळांच्या पाण्याने त्या बाजूची जमीन खोल चिखलाने भरलेली होती. त्या बाजूला जिकडे पहावे तिकडे उंच गवताची कुरणं, बोरू आणि बांबूची बेटं पसरलेली होती. त्यांच्या मधून वाट काढीत पुढे जाणे तितके सोपे नव्हते. त्या परिस्थितीत सर्व सैनिकांना सावधपणे तळहातावर आपले पंचप्राण घेऊन पुढे जावयाचे होते, समरसेन पुढे होता व मार्ग काढीत होता आणि मधूनमधून आपल्या अनुयायी सैनिकांना प्रोत्साहन देत होता.

आणखी थोडे अंतर चालून समरसेन सैनिकांना म्हणाला–"हे पहा, हा सर्व प्रदेश पाणथळ दिसतो आहे. येथे जे तलाव आणि डबकी दिसत आहेत त्याच पाण्यात राहणारे भयंकर प्राणीसुद्धा असण्याची शक्यता आहे. तरी जंगली जनावरांइतके पाण्यातील प्राण्यांना भ्यायचे कारण नाही."

समरसेनचे बोलणे संपले असेल नसेल तेवढ्यात एक गेंडा बाजूच्या झाडीतून बाहेर आला. त्याला पाहून सर्व सैनिक घाबरले आणि कोणत्या बाजूला पळून जावे याचा विचार करू लागले. समरसेन त्यांना सावध करून म्हणाला–

"येथून आणखी कोठे पळण्याचा प्रयत्न करणे म्हणजे याहून मोठ्या संकटात स्वतः होऊन उडी घेण्यासारखे आहे. तुम्ही एका पाठोपाठ एक असे रांगेत उभे रहा आणि तलवारी उपसून जरूर पडल्यास एकदम हल्ला करण्यास तयार रहा."

गेंड्याने जरा मान उचलून त्यांच्याकडे पाहिले आणि एकदा डरकाळी फोडून पुढच्या पायाने जमीन उकरून मागे फेकू लागला. त्याची ती भयंकर मुद्रा पाहून सर्व सैनिक घाबरले. त्यांचा नायक समरसेन काय म्हणतो हे कळावे म्हणून सर्व त्याच्याकडे पाहू लागले. समरसेन काही म्हणणार, तितक्यात गेंडा त्यांच्यावर झडप मारण्यासाठी पुढे येऊ लागला.

समरसेन सर्वात पुढे होता. त्याने सारी शक्ती एकवटून गेंड्यावर आपल्या तलवारीचा वार केला. दुसरे एखादे जनावर असते, तर जखमी होऊन तत्काळ जमिनीवर लोळू लागले असते परंतु गेंड्याच्या अंगाला तलवारीचा तो वार जणुकाही लागलाच नाही, अशा तऱ्हेने तो गेंडा ताठ जागच्या-जागी उभा होता परंतु गेंडा चिडून गेला होता आणि त्याने एक डरकाळी फोडली. सर्व आकाश दुमदुमले. नंतर त्याने पुढल्या खुराने जमीन उकरून सैनिकांवर हल्ला केला.

परंतु सैनिक मुळीच भ्याले नाहीत. त्यांच्या नायकाने जे धाडस दर्शविले होते त्यामुळे त्यांचा उत्साह द्विगुणित झाला होता. त्यांनी गेंड्याला चारही बाजूंनी घेरले व आपल्या तलवारी भोसकून त्याच्या अंगाची चाळणी करून टाकली.



गेंडा जखमी होऊन मोठ्याने डरकाळी फोडून एका बाजूला कोसळला. तेव्हा समर-सेन सैनिकांना म्हणाला–"आपण आतां तरी या संकटातून वाचलो. परंतु याची डरकाळी ऐकून जवळपासची क्रूर जनावरे या बाजूला नक्की येतील. म्हणून आपण या जागेपासून लवकर पाय काढणे हिताचे होईल." असे म्हणत तो तेथून निघाला. त्याच्या पाठोपाठ सैनिकही निघाले.

थोडे अंतर चालून गेल्यावर त्यांना एक मोठे सरोवर दिसले. ते दिसतांच काही सैनिकांना पाणी पिऊन तहान भागवून घ्यावेसे वाटले. एकजण म्हणाला ही–"पहा तरी, पाणी कसे स्फटिकासारखे स्वच्छ निर्मळ आहे. यांत आंघोळ करायला पण गंमत वाटेल."

ते ऐकून समरसेनाने त्या सर्वांना सावध करीत म्हटले–"हे मंत्रद्वीप आहे, विसरलात वाटते? सावध होऊन काय ते करा."

ज्या दोन सैनिकांना खूप तहान लागली होती, ते मागेपुढे न पाहतां पाण्यात उतरलेच. त्याच वेळी त्यांच्या लक्षात आले की त्यांच्या चारी बाजूचे पाणी हलू लागले आहे आणि तीनचार मगरींनी येऊन त्यांना धरलेच. ते मोठ्याने ओरडले. काठावरून समरसेनाने आणि इतर सैनिकांनी आपले बाण मगरींवर सोडले. परंतु निरुपयोग मगरी त्या दोघांना सरोवरात ओढून घेऊन गेल्याच.

या घटनेमुळे सर्वांना धास्तीच बसली. समरसेन व इतर चार सैनिक तेथे जास्त



वेळ थांबणे धोक्याचे आहे हे ओळखून तेथून निघाले. आतां ते आणखी सावधगिरी बाळगून चालू लागले. थोडे अंतर आणखी चालून गेल्यावर त्यांना आणखी एक मोठे सरोवर दिसले.

ते सरोवर पाहून समरसेनासमोर हा प्रश्न उभा राहिला की हे सरोवर पार करून पलीकडे कसे जावयाचे? परंतु त्याच वेळी पाणी हलत होते ते पाहून समरसेनला कळायला वेळ लागला नाही की सरोवरात दूर कोणी तरी आंघोळ करतो आहे. परंतु त्याला दूरवर नजर फिरविली तरी माणसाची आकृती दिसली नाही. जवळच एका झाडाच्या फांदीला एक लांब टोपी टांगलेली होती ती दिसली. त्या टोपीला माणसांच्या डोळ्यांसारखी दोन विचित्र भोके होती.

ती विचित्र टोपी पाहून सर्व सैनिक आश्चर्यचकित झाले. समरसेन देखील चकित झाला. परंतु ही टोपी कोणाची आणि पाण्यात कोण आंघोळ करतो आहे, या प्रश्नांची उत्तरे त्याला मिळाली नाहीत. सरोवराचे पाणी अद्याप हलतच होते. पाण्याच्या हालण्यावरून असे वाटत होते की कोणीतरी अदृश्य रूपे पाण्यात आंघोळ करीत आहे.

त्यानंतर समरसेन व सैनिक एका झाडीत शिरून झाडांच्या आड लपून सतर्कपणे एक



टक लावून ती व्यक्ती दिसते का पाहू लागले. समरसेनाला एक शंका आली, ही व्यक्ती एकाक्षी मांत्रिक तर नाही?

थोडा वेळ विचार केल्यानंतर समर-सेनाला खात्रीलायक वाटू लागले की ती व्यक्ती एकाक्षी मांत्रिक नसावा. परंतु ही टोपी कशी काय येथे? ही त्याची नसेल तर आणखी कोणी मांत्रिक आहे की काय? ही शंका त्याच्या मनात आली.

इतक्यात सरोवरातून कोणीतरी बोलत असल्याचा भास झाला. सर्वांना तो आवाज ऐकू आला. स्नान करणारी व्यक्ती कोणता तरी मंत्र म्हणत होती. त्याचा स्वर थोडा वेगळा व गंभीर वाटत होता. तेव्हा

समरसेनाला वाटले की हा कोणी तरी सर्व-सामान्य माणूस नसावा.

त्याच वेळी त्यांना आणखी एक भयंकर दृश्य दिसले. सरोवरच्या काठच्या झाडीच्या मागून एका सापाची फडा असावी तसे एका जनावरचे तोंड वर येत होते.

ते एक विचित्र जनावर होते. त्याची आकृती हत्तीहून चारपाच पट तरी मोठी असावी. परंतु इतक्या मोठ्या जनावराचे तोंड इतके बारीक कसे?

सर्वजण त्या विचित्र जनावराकडे एकटक पहात होते आणि मनात म्हणत होते, पुढे काय होते नकळे! त्या जनावराने आपले बारीकसे तोंड सरोवरात घातले आणि असे वाटले की जमिनीवरूनच पाण्यातल्या त्या अदृश्य व्यक्तीला धरण्यासाठी त्या प्राण्याचा तो प्रयत्न होता.

त्या विचित्र जनावरचे डोके पाण्याच्या पातळीपासून हातभर वर असेल नसेल की सरोवराच्या आतून एका व्यक्तीची भयंकर किंकाळी ऐकू आली. त्या किंकाळीच्या पाठोपाठ तत्काळ झाडाच्या फांदीला अडकवलेली लांब व विचित्र डोळे असलेली टोपी खाली सरकू लागली.

दुसऱ्या क्षणाला सरोवरात ती व्यक्ती ती टोपी घालीत असलेली दिसली. त्या व्यक्तीला पाहताच ते विचित्र जनावर घाबरून जाऊन सरोवराच्या काठावरून दूर पळून गेले.

तेव्हां सरोवरातली ती व्यक्ती ओरडून म्हणाली—"अस्सं! तूच का होतास महोदरा? तू मलाच गिळायला आला होतास होय? चतुराक्षाला गिळण्याचे तुझे एवढे धाडस होते का रे!"

मांत्रिक चतुराक्षाला पाहून समरसेन व इतर सैनिक सर्वांना कांपरेच भरले. एकाक्षी मांत्रिकाच्या या हाडवैऱ्याची नजर चुकवून आतां कसे पळायचे? समरसेन याच विचारात चहूंकडे नजर फिरवून पाहू लागला.

(क्रमशः)



# कीर्तीची आकांक्षा

विक्रमादित्याने आपला हट्ट सोडला नाही. तो झाडाजवळ गेला प्रेत खांद्यावर काढून घेतले आणि नेहमीप्रमाणे मौन होऊन स्मशानाच्या दिशेने निघाला. तेव्हां प्रेतात बसलेला वेताळ त्याला म्हणाला—"राजा, तू हे सर्व श्रम यश आणि कीर्तीची आकांक्षा ठेवून करीत असशील तर तुझा हा सर्व प्रयत्न फुकट आहे. कारण मेहनत आणि यश यांचा परस्परसंबंध क्वचितच असतो. ही गोष्ट प्रयत्न करून त्याचा जो परिणाम झाला त्यावरून मुकुंदाला कळली होती. ती गोष्ट मी तुला सांगतो. असे सांगून वेताळ गोष्ट सांगू लागला.

मुकुंद एक सामान्य शेतकऱ्याचा मुलगा होता. परंतु त्याच्या अंगात अद्भुत असामान्य शक्ती होती. म्हणून त्याला अनेक विद्या सहजी अवगत झाल्या होत्या. तरी



शेवटी त्याला एका सामान्य शेतकऱ्याचेच आयुष्य घालवावे लागले होते.

मुकुंद एका सामान्यशा खेडगावात रहात असे. ते गाव कधी काळी एक सुप्रसिद्ध तीर्थक्षेत्र होते. तेथून जुन्या काळातील अनेक अवशेष व शिलालेख उपलब्ध झाले होते. ते पाहण्यासाठी दूर दूरच्या प्रदेशातून लोक येत. त्यांच्याशी बोलतांना मुकुंदच्या मनात हा विचार येई की हे लोक तर बुद्धिमत्तेत माझ्याहून कोणत्याही प्रकारे श्रेष्ठ दिसत नाहीत. परंतु आयुष्यात हे यशस्वी कसे काय झाले? त्याला असेही वाटे ही यशस्विता आपल्याला सदा मिळाली तर किती बरे होईल? त्याने त्यापैकी काहीजणांजवळ ती गोष्ट बोलूनही दाखविली.

एका वृद्ध माणसाने मुकुंदच्या मनातली गोष्ट ओळखली व म्हणाला—“काय रे, तू या एका खेडेगावात असाच पडून राहिलास तर तुझी ही हुशारी वाया जाणार नाही का? तू एखाद्या मोठ्या शहरात जाऊन कां नाही रहात?”

मुकुंदच्या मनाला ती गोष्ट पटली व तो, वडिलांनी त्याला किती समजावून सांगितले असूनही तिकडे दुर्लक्ष करून, एका शहराच्या वाटेने निघाला.

मुकुंदला वाटेत एक जंगल लागले. त्या वाटने एकट्याने प्रवास करणे धोक्याचे होते. परंतु मुकुंदला वाटले की त्याच्यासारख्या हुशार व साहसी तरुणाने पाय मागे घेणे अपमानास्पद होईल. म्हणून तो त्याच वाटेने पुढे निघाला.

जंगलात एका जागी एका चोराने त्याला अडविले. मुकुंदने त्या चोराला बडवून काढले. चोराने चकित होऊन मुकुंदला विचारले—“मी गेली दहा वर्षे चोऱ्या करीत आलो आहे. माझं नाव ऐकूनच लोक घाबरून पळून जातात. परंतु मी तुझ्यासारख्या बहादूराला मी आजपर्यंत कधी पाहिले नाही.” मुकुंदला जेव्हां मार खाणारी व्यक्ती वीरेंद्र नावाचा चोर असल्याचे कळले तेव्हां त्यालासुद्धा आश्चर्य वाटले.

तो वीरेंद्रला म्हणाला—“मला यश आणि कीर्ती मिळावी म्हणून फार इच्छा आहे. तू मला चोरी करायला शिकव आपण दोघे मित्र म्हणून राहू.”

त्यानंतर दोघे शहरात गेले. वीरेंद्र चोरी करायला एका घरी गेला. रात्री दोघे त्या घराच्या आवाराभोंवतीची भित ओलांडून गेले. वीरेंद्रने त्या घराच्या मागच्या दाराची कडी बाहेरूनच काढली. मुकुंद त्याचे प्रत्येक काम लक्षपूर्वक पहात होता.

नंतर दोघे त्या घराच्या तिजोरीच्या खोलीत शिरले. वीरेंद्रने काहीतरी युक्ती करून तिजोरी उघडली व दागिने रुपये काढून घेऊन त्याचे एक गाठोडे बांधून घेतले. दोघे तेथून पळून जायच्या बेतात होते, तेवढ्यात वीरेंद्रला भितीला टांगलेली एका बाईची तसबीर दिसली. तेथे झोपलेल्या लोकांकडे त्याने पाहिले आणि इतकी जोखिम घेऊन बांधून घेतलेले गाठोडे तेथेच टाकले आणि मुकुंदाबरोबर रिकाम्या हातांनी बाहेर निघून गेला. तेव्हां मुकुंदाने चिडून जाऊन चोराला विचारले—“काय रे, इतकी जोखिम घेऊन तू हे सर्व जे संपादन केलेस ते टाकून कां निघून आलास?”



चोर म्हणाला—“एकदां मी जंगलात एका जागी जखमी होऊन मरणाची वाट पहात पडलो होतो. त्यावेळी एक बाई आपल्या माहेरी एका गाडीत बसून जात होत्या. त्यांनी मला गाडीत आपल्या माहेरी नेऊन माझं औषध पाणी केले. आज आपण चोरी केली ते घर त्या बाईच्या नवऱ्याचे आहे. माझा जीव ज्या बाईने वांचविला तिच्याच घरात चोरी करणे पाप आहे!”

मुकुंदने विचार केला, असला वेडा पीर काय कामाचा? तो त्याला सोडून आणखी कोठेतरी निघून गेला. हिंडत फिरत मुकुंद आता कोठे रहायचे असा विचार करीत



असतां अचानक त्या गावाचे न्यायाधीश शरच्चंद्र यांची भेट झाली.

न्यायाधीश शरच्चंद्रांचा एक नियम होता, दररोज जेवायला बरोबर कोणीतरी पाहुणा असला पाहिजे. त्या दिवशी मुकुंद त्यांना भेटला व त्याला त्यांनी बरोबर जेवायला बोलाविले. मुकुंदशी बोलत असतां त्याच्याविषयी सर्व माहिती त्यांना कळली. त्यांनी त्याला सांगितले. त्याची राहण्या खाण्यापिण्याची चांगली सोय होई-पर्यंत त्याने त्यांच्याकडेच रहावे.

त्या गावात चक्रधर नावाचा एक शूर योद्धा रहात होता. मुकुंदने विचार केला की तो आपल्या हाती हारला की आपल्याला लोक पराक्रमी वीर म्हणून ओळखू लाग-तील. परंतु मुकुंदने घाई न करतां चक्रधर दिवसभर काय करतो हे बारकाईने पाहून घेतले. चक्रधर एकटा आपल्या बागेत संध्या-काळच्या वेळी फिरायला जाई. मुकुंद एके दिवशी गुप्तपणे त्या बागेत शिरला आणि चटदिशी तलवार उपसून चक्रधरवर वार करायला गेला.

चक्रधरने चकित होऊन विचारले–"तू कोण रे?"

"मी तुझ्याशी द्वंद्व करून तुझ्याहून मोठा वीर म्हणवून घेण्यासाठी आलो आहे." मुकुंद म्हणाला.

"तरमग तू असा लपून छपून कां आलास? सर्वांसमक्ष मला आव्हान कर आणि ये!" चक्रधर म्हणाला.

"सर्वांसमक्ष मी हारलो तर माझी मान खाली होईल. ते मला पसंत नाही. त्या पूर्वी तुझ्यात किती शौर्य आहे हे कळावे हाही एक हेतू आहे." मुकुंद म्हणाला.

चक्रधरने चटदिशी म्यानेतून तलवार उपसली आणि मुकुंदवर धावला. परंतु दोनतीन मिनिटातच मुकुंदने चक्रधरची तलवार पाडून त्याला निःशस्त्र केले.

चक्रधर चकित होऊन म्हणाला–"तू कोणत्याही गुरूजवळ शिकलेला दिसत नाहीस. तुला खड्गयुद्ध सहजी आले आहे. तू माझ्याबरोबर मैत्री करून राहिलास तर मी तुझ्याकडून काही पवित्रे शिकून घेईन.'

"त्यात मला काय फायदा मिळणार?" चक्रधरने विचारले.

"तुला मी दररोज शंभर रुपये देईन." चक्रधर म्हणाला.

थोर व्यक्ती म्हणवून घेण्यास पैसा पाहिजे, हे ओळखून मुकुंदने चक्रधर बरो-बर रहायचे कबूल केले.

दोन महिन्यांनी चक्रधरने मुकुंदकडून इतके शिकून घेतले की तो मुकुंदहून पटाईत झाला. म्हणून मुकुंदची नोकरी सुटली. परंतु त्याला त्याचे एवढे वाईट वाटले नाही. कारण त्याच्याजवळ सहा हजार रुपये जमा झाले होते. त्या भांड-वलावर व्यापार करतां येईल असे त्याला वाटले. असा विचार करून त्याने वासुदेव नावाच्या एका व्यापाऱ्याचा सल्ला घेतला. वासुदेव एक प्रसिद्ध व्यापारी होता. त्याच्या मदतीने व्यापार करून मुकुंद एका वर्षात लक्षाधीश झाला. त्यानंतर वासुदेवने मुकुंदला सल्ला दिला–"मुकुंद तुला जो फायदा झाला आहे त्यातले दहा टक्के दानधर्म करून कीर्ती संपादन कर."



मुकुंद लक्षाधीश झाला खरा, परंतु त्याला यश प्राप्त झाले आहे असे वाटले नाही. म्हणून त्याने वासुदेवचा सल्ला मानला नाही. त्याने चित्रकला व संगीत-शास्त्राचा अभ्यास सुरू केला. तरी त्याला यश मिळाले नाही.

मध्यंतरी मुकुंदचे वडील त्या गावी आले. वडिलांना पाहून त्याला आश्चर्य वाटले. त्याने त्यांना विचारले–"बाबा, तुम्ही एकाएकी या गावी कसे काय आलात?"

"या वर्षी आपल्या शेतात एकरी तीस मण धान्य निघाले आहे. मी इतके दिवस श्रम करीत आलो त्यात मला या वर्षी यश

मिळाले. राजाने माझा सत्कार करण्यासाठी मला बोलाविले आहे." मुकुंदचे वडील म्हणाले.

पित्याचा सत्कार राजसभेत झाला. तो मुकुंदने प्रत्यक्ष डोळ्यांनी पाहिला. त्याला फार आनंद झाला. त्यानंतर तो आपल्या वडिलांबरोबर आपल्या खेडेगावी येऊन राहू लागला आणि शेतीभातीची कामे पाहू लागला. त्या दिवसापासून यश आणि कीर्तीच्या पाठीमागे पळण्याचे त्याने सोडले.

येथवर गोष्ट सांगून वेताळ म्हणाला—"राजा, मुकुंदने यश आणि कीर्तीच्या मागे लागणे कां सोडले? त्याच्या अंगात त्यासाठी लागणारे सामर्थ्य किंवा शक्ती नव्हती म्हणून का? की वडील भेटतांच त्याला घर आठवले. त्याने जे जे प्रयत्न केले होते त्यात तो यशस्वी झाल्याचेच सिद्ध झाले होते! तरमग यश आणि कीर्ती मिळविण्याविषयी तो निराश कां झाला? या शंकांचे समाधानकारक उत्तर माहीत असून तू दिले नाहीस तर परिणाम तुला माहीत आहे, तुझ्या डोक्याची शंभर शकले होऊन तुझ्याच पायावर लोळू लागतील."

विक्रमादित्य म्हणाला—"मुकुंदला कोणत्या क्षेत्रात यश मिळेल असे वाटत होते, ही त्याची चूक होती. जवळजवळ सर्वच क्षेत्रात त्याला यश मिळण्या इतकी त्याच्या अंगात शक्ती होती. परंतु खरे यश मिळाल्यावर ते चिरस्थायी करण्यास लागणारी साधना त्याच्या अंगी नव्हती. वडिलांना शेतीच्या धंद्यात सर्वांत उत्तम शेतकरी म्हणून यश मिळाल्याचे कळल्यानंतर मुकुंदला आपली चूक कळली. यश प्राप्तीसाठी त्याला देशभर भटकण्याची आणि निरनिराळ्या क्षेत्रात आपली शक्ती अजमावून पाहण्याची गरज नव्हती. निष्ठा व चिकाटी असेल तर आपल्या घरी राहून कोणत्याही क्षेत्रात यश संपादन करणे शक्य आहे. हे कळतांच तो वडिलांबरोबर घरी परतला."

अशातऱ्हेने राजाचे मौन भंग होताच वेताळ प्रेतासह अदृश्य झाला आणि झाडाला जाऊन लोंबकळू लागला. (कल्पित)





# साव नि चोर

**श्या**मूचे वाडवडील चोर व दरोडेखोर म्हणून प्रसिद्ध होते. म्हणून श्यामूसुद्धा चोरीचा धंदाच करू लागला. त्याला रामू नावाचा मुलगा होता. श्यामूचे उतारवय होत गेले तसतसे त्याला वाटू लागले की रामूला आपला धंदा वेळीच शिकवून अट्टल चोर केले पाहिजे. परंतु रामूला वडिलांचा तो धंदा आवडत नव्हता.

रामूने आपल्या उदरनिर्वाहासाठी कोणतातरी दुसरा धंदा करावयाचे ठरविले. त्याप्रमाणे तो कामाच्या शोधार्थ गांवभर फिरत राहिला. शेवटी इनामदारांनी त्याला आपल्या घरी पाहारेकरी म्हणून नेमले. रामूने ते काम इमाने इतबारे केले.

इनामदारांजवळ दोन अत्यंत मूल्यवान असे दोन हिरे होते. परदेशात तशा तऱ्हेच्या हिऱ्यांना फार मोठी मागणी होती. तसेच हिरे जहागीरदारांच्या घरी चार होते. इनामदारांनी विचार केला की आपले दोन आणि जहागीरदारांकडले चार मिळून सहाचे सहा हिरे परदेशात पाठविले तर चांगली किंमत मिळेल. परंतु जहागीरदार, जास्त किंमत मिळाल्याशिवाय ते हिरे विकणार नाहीत, म्हणून इनामदारांनी ते चोरून आणायचे ठरविले.

त्याप्रमाणे पुष्कळ विचार करून ते रामूला जवळ बोलावून म्हणाले—"रामू, मी तुझ्या फायद्याची गोष्ट सांगतो आहे. जहागीरदारांकडचे चार हिरे तू चोरून आणून दिलेस तर मी तुला एक मोठे बक्षिस देईन."

रामू म्हणाला—"मालक, मी चोर व दरोडेखोर असलेल्या कुटुंबातच जन्मलो आहे. परंतु मला तो धंदा आवडला नाही म्हणून मी पाहारेकऱ्याची नोकरी आपल्या

पदरी करू लागलो. तेव्हां हे काम माझ्या हातून होणार नाही. मला माफ करा."

ते ऐकून इनामदारांना आश्चर्याबरोबर रागही आला व म्हणाले–"काय म्हणालास? तू चोर लुटेऱ्यांच्या कुटुंबात जन्मलास? मला हे यापूर्वी कळले असते तर मी आपल्या घरी नोकरी दिली असती का? चालता हो, आताच्या आता!"

रामू नोकरी सोडून निघून गेला.

ही गोष्ट घडली त्याच्या दुसऱ्याच दिवशी जहागीरदार इनामदारांच्या घरी येऊन म्हणाले–"हे पहा, मित्रा, मी व्यापाराच्या कामाने महिन्याभरासाठी परगावी जातो आहे. हल्ली चोरांचा सुळसुळाट वाढला आहे. म्हणून हे चार हिरे ठेवून घे. परत आल्यावर घेऊन जाईन." असे सांगून व ते चार हिरे इनामदारांना देऊन जहागीरदार निघून गेले.

परगावाहून परत आल्यावर जहागीरदार इनामदारांकडे हिरे परत मागायला गेले. इनामदार जणुकाही त्यांना काही माहीत नाही, असा आव आणून जहागीरदारांना म्हणाले–"तुम्ही, मला हिरे दिलेत? केव्हां? कशासाठी? माझ्याकडून तुम्ही पावती वगैरे काही लिहून घेतली होती का?"

जहागीरदार चकित होऊन रागाने इनामदारांना म्हणाले–"मला रामूने तुझ्या मनात काही तरी काळेबेरे असल्याचे सांगितले आहे. परंतु ते मला खरे वाटले नाही. त्या गोष्टीची खात्री व्हावी याचसाठी मी हिरे तुझ्याकडे ठेवले. ते रामूने केव्हांच तुझ्या घरातून आणून माझ्याकडे पोचते केले आहेत. हे पहा, डोळे उघडून!" असे म्हणत जहागीरदारांनी खिशातून ते चार हिरे काढून दाखविले व म्हणाले–"आज मला कळले की तुझ्यासारख्या संभावित चोरांवर विश्वास करतां कामा नये. मी गावातल्या सर्व प्रतिष्ठित वडीलधाऱ्यांच्या कानावर ही गोष्ट घातल्याशिवाय राहणार नाही." त्यानंतर त्यांनी रामूला आपल्या घरी चांगला पगार देऊन पाहारेकरी नेमले.



# शाप भोंवला नाही, पावला!

भीमाकाकू व ठकूताईंचे परस्परांशी हाडवैर होते. एकदा ठकुताई एक गाय विकत घ्यायला आठवड्याच्या बाजाराला निघाल्या. तेव्हां भीमाकाकू म्हणाल्या–"ओहो, गाय विकत घ्यायला निघालीस का, वेडे! तू बरोबर नेते आहेस ते पैसे घालवून बसली नाहीस म्हणजे मिळविलीस, समज!" आपल्या तोंडचे वाक्य म्हणजे शापच वाटायचा भीमाकाकूंना.

ठकुताईंनी भीमाकाकूंच्या बोलण्याकडे दुर्लक्ष केले व बाजाराला गेल्या. संध्याकाळी त्यांना रिकाम्या हातांनी येत असलेल्या पाहून भीमाकाकू आपला शाप लागला असे वाटून म्हणाल्या–"काय ग ठकुताई, रिकाम्या हातानेच का? हांय बाई, व्हायचं असेल ते टळते का?"

"तसं नाही हो, भीमाकाकू. मी बाजारात सहाशे देऊन गाय विकत घेऊन येत होते आणि शेजारच्या गावचे सावकार भेटले. गाईला पाहून इतके खूष झाले की 'एक हजाराला देता का?' विचारलं त्यांनी. चारशे रुपये फायदा होतो आहे, का सोडा, असा विचार करून ते पैसे घेऊन येते आहे. तुम्ही म्हणालात तसं 'व्हायचं असतं ते टळतं का? होतंच!' असे म्हणत ठकुताई आपल्या घरात गेल्या.





# जांवई हृय

लखुजी एक गरीब शेतकरी होता. त्याने दोघां मुलींची लग्ने करून दिली आणि आणखी गरीब झाला. लग्नांच्या खर्चाखाली घरातली सर्व चीजवस्तु गेली. उरली काय ती चार एकर जमीन, एक बैलांची जोडी आणि गाडी.

लग्ने झाल्यावर सहा महिन्यांनी संक्रांत आली. सणाला मुलींना व जावयांना बोलवायला लखुजीची बायको आग्रह करू लागली. लखुजी फक्त होकारार्थी मान हलवी, परंतु त्याने त्यासाठी काही केले नाही.

धाकट्या मुलीला माहेरचा फार अभिमान होता. "माहेरी जाऊ या का?" नवऱ्याला म्हणाली.

"तुझ्या बाबांनी बोलाविले नाही आणि आगंतुकासारखं जायचं का?" धाकटे जावईबापू म्हणाले.

"आपल्याला माझ्या आईबाबांनी बोलवायला हवे का हो? हे काय बोलणं झालं?" धाकटी मुलगी म्हणाली.

धाकटे जांवईबापू तयार झाले.

त्याच प्रमाणे लखुजीची थोरली मुलगी-सुद्धा आपल्या नवऱ्याला घेऊन माहेरी निघाली. थोरला जांवई पहिल्याने तयार होत नव्हता.

"आमच्या बाबांनी धाकट्या जांवयाला सण म्हणून काही भेट दिली समजा, आणि तुम्ही तेथे गेला नाहीत म्हणून तुम्हाला काही अहेर मिळाला नाही तर माझी मान खाली नाही का होणार?" थोरली मुलगी नवऱ्याला म्हणाली. म्हणून बिचारा बायकोच्या आग्रहाने निघाला होता. अशातऱ्हेने थोरले जांवईसुद्धा सासुरवाडी पोचले.

वाजत गाजत बोलावून आणल्यासारखे दोघे जांवई सासुरवाडी पोचले. दोघां मुलींना व जावयांना गाड्यांतून उतरतांना पाहून लखुजी थक्कच झाला. त्याच्या बायकोला मात्र वाटले की नवऱ्याने आपण म्हटल्या प्रमाणे दोघां मुलींना व जांवयांना बोलाविले. म्हणून तिला फार आनंद झाला.

सण कसातरी पार पडला. परंतु लखुजी दोघां जावयांना सणाचा काही अहेर वगैरे करणार असल्याची लक्षणे दिसली नाहीत. "असं कां?" हा एकच प्रश्न दोघां जावयांच्या मनात पुन्हां पुन्हां येत होता. दोघांना वाटे की दुसऱ्याला कळू दिल्याशिवाय गुपचुप देण्या घेण्याचा कार्यक्रम उरकून घ्यायचा विचार सासऱ्याच्या मनात आहे की काय? दोघांना शंका आली होती त्याप्रमाणे लखुजी, दोघे परत आपल्या घरी निघणार होते तेमका त्या दिवशी लखुजी घरातून नाहीसा झाला व कोठे गेला कोणाला कळले सुद्धां नाही.

थोरली आईला जाऊन म्हणाली— "आमच्या ह्यांना सणाच्या वेळी काहीतरी द्यायला नको का ग, आई?"

आई गोंधळलेल्या स्वरात म्हणाली— "तुमचे बाबा घरातलं धान्य सर्व विकून लग्नासाठी जे कर्ज झालं होतं ते फेडायला व उरलेली रक्कम जावयांना काही आणून द्यायला गेले असतीलसे वाटतं!"

दाराआड उभी राहून धाकटीने ते ऐकले. तिने सुद्धा धांवत जाऊन अहेरा-विषयी आईला विचारलं.



आई म्हणाली—"तुमचे बाबा बैल विकून धुझ्या लग्नाकरिता झालेला खर्च फेडायला व उरले तर अहेर आणायला गेले असावेत की काय, मला ते माहीत नाही."

दोघां जावयांना ती बातमी त्यांच्या त्यांच्या बायकोकडून कळली. थोरल्या जावयाने सासऱ्याचे बैल गाडीला जुंपले आणि गाडीत धान्याची पोती घालून बाजाराला निघाला. धाकटा जांवई ठीक वेळेवर आला आणि त्याच गाडीत बसला.

गाडी बाजारात पोचली. थोरला जावई धान्य विकायला एका बाजूला गेला तर धाकटा बैल विकायला दुसरीकडे गेला. दोघांना भाव कसा करायचा माहीत नव्हते.

धान्याचे व्यापारी थोरल्याला घेरून धान्याचा भाव विचारू लागले.

थोरल्या जांवयाने मनातल्या मनात काहीतरी विचार करून काहीतरी भाव सांगितला. सर्व व्यापारी खदखदां हसू लागले. त्याने सांगितला तो किरकोळ धान्याचा भाव होता. व्यापारी कां हसले ते नकळल्यामुळे थोरल्या जावयाने विचारले—"तुम्ही कोणत्या दराने घेणार बोला!"

ते ऐकून आणि हा माणूस कोठून तरी धान्य चोरून घेऊन आला असावा असा संशय आल्यावरून व्यापाऱ्यांनी पोलीसां-करवी त्याला अटक करविली.

धाकटचा जावयाची तीच दुर्गत झाली. बैल विकत घेणारे किंमत विचारू लागले तेव्हा काय उत्तर द्यावे हे त्याला कळले नाही. म्हणून त्याने शेजारी तुपाचा व्यापारी होता त्याला विचारले. बैल खरेदी करायला आलेल्यांना संशय आला की कोणाचे तरी बैल चोरून आणले असावेत याने आणि त्याला पोलीसांकरवी अटक करविली.

लखुजीला दोघां जावयांनी केलेला पराक्रम कळला. त्याने पोलीस ठाण्यावरून त्यांना सोडविले तेव्हां त्याचे पंचप्राण कंठापर्यंत येऊन पोचले होते. जावयांना काही तरी अहेर करता यावा म्हणून तो शेजारच्या गावी कर्ज मागायला गेला होता. ती रक्कम पोलीसां-कडून दोघांना सोडवायलाच पुरेशी ठरली!





# सुवर्णपात्र

पांचव्या कल्पात बोधिसत्वांनी सेरिवा नावाच्या देशात भांडी विकणारा तांबोळी म्हणून अवतार धारण केला. ते जुनी भांडी विकत घेऊन त्यांच्या ऐवजी नवी भांडी देत. या धंद्यात बोधिसत्व उचित लाभ तेवढाच घेत.

त्याच देशात भांड्याचा व्यापार करणारा आणखी एक व्यापारी होता. तो फार लोभी होता. तो व बोधिसत्व परस्परांच्या सल्ल्याने कोठे जायचे ते ठरवून व्यापार करीत.

एकदां दोघे मिळून तेलिवाहा नावाची नदी पार करून आंध्रपुर नांवाच्या गावी पोचले. एकाच्या धंद्याच्या दुसरा आड येऊ नये या हेतूने दोघांनी त्या गावातले निर-निराळे भाग वांटून घेतले. आणि दोघे आपापल्या वाटच्याच्या भागात व्यापाराला निघाले.

त्या आंध्रपुर गावात एक वाण्याचे घर होते. त्या वाण्याचे कुटुंब एका काळी चांगले श्रीमंत होते, परंतु पुढे त्यांना गरीबी आली. त्या कुटुंबातले दोघे भाऊ आणि संपत्ती गेल्यावर उरले काय ते दारिद्र्य अन् एक म्हातारी आई आणि तिची लहान मुलगी. दोघी घरोघरी काम करून आपला उदर निर्वाह चालवीत.

त्यांच्या घरात बरीचशी जुनी भांडी होती. त्यात एक सोन्याचे भांडे होते, चांगली स्थिती असतांना ते वापरात नव्हते. त्यामुळे वापरात नव्हते म्हणून थोडे फिक्के पडले होते. ते सोन्याचे आहे हे दोघींनाही माहीत नव्हते.

लोभी व्यापारी "भांडी घ्या भांडी, पातेल्या तपेल्या! जुन्या द्या व नव्या घ्या!" असे ओरडत त्या बायका रहात त्या घरासमोर आला.

प्रवासापुरते आठ रुपये, ही पिशवी आणि तराजू शिवाय माझ्या जवळ जो माल आहे तो सर्व तुम्हांला देतो, घ्या!" असे सांगून व सर्व माल देऊन बोधिसत्वांनी सोन्याचे भांडे घेतले आणि निघून गेले.

त्यांनी ठेवून घेतलेले आठ रुपये नदी पार जायला तरीवाल्याला द्यायला लागले.

नंतर लोभी लबाड व्यापारी आपण केलेली युक्ती फळाला येते का पाहण्यासाठी पुन्हां त्या बायका रहात त्या घरासमोर येऊन मोठ्या आविर्भावाने म्हणाला—"बरं तर टाका इकडे ते भांडे आणि घ्या त्या बद्दल एकादे भांडे!"

म्हातारी संतापून त्या लबाड व्यापाऱ्याला म्हणाली—"काय रे बाबा! लाख रुपयाच्या भांड्याला कवडी मोलाचे म्हणून टाकून गेला होतास की! दुसरा एक धर्मात्मा तांबोळी आला होता तो एक हजार रुपये देऊन भांडं घेऊन गेला."

ते ऐकतांच त्या लबाड व्यापाऱ्याला भ्रम झाल्यासारखे झाले.

"लाख रुपयाचं भांडं त्याने उडवलं का? माझं केवढं नुकसान झालं?" असे म्हणत, कपाळ बडवीत रडत आणि वेड लागल्या-सारखा जवळचा सर्व माल व पैसा त्या बाईजवळ टाकून देऊन आणि अंगावरचे उपरणे घसरून खाली पडत होते तिकडे ही लक्ष न देता फक्त तराजू हातात घेऊन नदीकाठी धावत गेला. बोधिसत्व तरीत बसून प्रवाहाच्या मध्यभागी पोचलेले दिसले.

त्या लोभी व्यापाऱ्याने तरीवाल्याला तरी परत आणायला हाका मारल्या. "परत कशाला न्यायची रे" बोधिसत्व तरीवाल्याला म्हणाले. बोधिसत्व नदीपार उतरलेले लबाड व्यापाऱ्याने पाहिले मात्र त्याला आवेश चढला आणि तो छाती बडवू लागला. त्याच्या तोंडातून रक्त येऊ लागलं. बोधिसत्वांच्या द्वेषाने त्याची छाती फुटली व तो तेथेच गार झाला.

बोधिसत्वांनी दानधर्म करीत पुढले आयुष्य घालविले.





## बुद्धाचे प्रस्थान

बुद्धत्व प्राप्त झाल्यावर सिद्धार्थ जननमरणांच्या बंधनातून मुक्त होऊन निर्वाणप्राप्तीच्या स्थितीला पोहोचला. परंतु मानवजातीला दुःखात व अज्ञानांधाकारात पडलेले पाहून त्याने निर्वाणप्राप्तीचा विचार सोडला व प्रजेला ज्ञानबोध करण्याचे ठरविले.

अगदी प्रथम सिद्धार्थ त्याला सोडून गेलेले जे पांच तपस्वी होते त्यांच्या शोधार्थ निघाला. वाराणासी जवळच्या वनात ते दिसले. त्यांनी सुरुवातीला दुरून त्याच्याकडे पाहून दुर्लक्ष केले. परंतु तो जवळ आला तेव्हां विवश होऊन त्यांनी उठून त्याला प्रणाम केला.





त्यानंतर बुद्धाचा शिष्य झाला तो यश नावाचा एका सावकाराचा मुलगा. यशाचा बाप संतापून मुलाला परत न्यायला आला. बुद्धाचे त्याच्याशी काही वेळ बोलणे झाल्यावर यशाचा बापही बुद्धाचा शिष्य झाला.

प्रवासापुरते आठ रुपये, ही पिशवी आणि तराजू शिवाय माझ्या जवळ जो माल आहे तो सर्व तुम्हांला देतो, घ्या!" असे सांगून व सर्व माल देऊन बोधिसत्वांनी सोन्याचे भांडे घेतले आणि निघून गेले.

त्यांनी ठेवून घेतलेले आठ रुपये नदी पार जायला तरीवाल्याला द्यायला लागले.

नंतर लोभी लबाड व्यापारी आपण केलेली युक्ती फळाला येते का पाहण्यासाठी पुन्हां त्या बायका रहात त्या घरासमोर येऊन मोठ्या आविर्भावाने म्हणाला—"बरं तर टाका इकडे ते भांडे आणि घ्या त्या बद्दल एकादे भांडे!"

म्हातारी संतापून त्या लबाड व्यापाऱ्याला म्हणाली—"काय रे बाबा! लाख रुपयाच्या भांड्याला कवडी मोलाचे म्हणून टाकून गेला होतास की! दुसरा एक धर्मात्मा तांबोळी आला होता तो एक हजार रुपये देऊन भांडं घेऊन गेला."

ते ऐकतांच त्या लबाड व्यापाऱ्याला भ्रम झाल्यासारखे झाले.

"लाख रुपयाचं भांडं त्याने उडवलं का? माझं केवढे नुकसान झालं?" असे म्हणत, कपाळ बडवीत रडत आणि वेड लागल्यासारखा जवळचा सर्व माल व पैसा त्या बाईजवळ टाकून देऊन आणि अंगावरचे उपरणे घसरून खाली पडत होते तिकडे ही लक्ष न देता फक्त तराजू हातात घेऊन नदीकाठी धावत गेला. बोधिसत्व तरीत बसून प्रवाहाच्या मध्यभागी पोचलेले दिसले.

त्या लोभी व्यापाऱ्याने तरीवाल्याला तरी परत आणायला हाका मारल्या. "परत कशाला न्यायची रे" बोधिसत्व तरीवाल्याला म्हणाले. बोधिसत्व नदीपार उतरलेले लबाड व्यापाऱ्याने पाहिले मात्र त्याला आवेश चढला आणि तो छाती बडवू लागला. त्याच्या तोंडातून रक्त येऊ लागलं. बोधिसत्वांच्या द्वेषाने त्याची छाती फुटली व तो तेथेच गार झाला.

बोधिसत्वांनी दानधर्म करीत पुढले आयुष्य घालविले.





## बुद्धाचे प्रस्थान

बुद्धत्व प्राप्त झाल्यावर सिद्धार्थ जननमरणांच्या बंधनातून मुक्त होऊन निर्वाणप्राप्तीच्या स्थितीला पोहोचला. परंतु मानवजातीला दुःखात व अज्ञानांधाकारात पडलेले पाहून त्याने निर्वाणप्राप्तीचा विचार सोडला व प्रजेला ज्ञानबोध करण्याचे ठरविले.

अगदी प्रथम सिद्धार्थ त्याला सोडून गेलेले जे पांच तपस्वी होते त्यांच्या शोधार्थ निघाला. वाराणसी जवळच्या वनात ते दिसले. त्यांनी सुरवातीला दुरून त्याच्याकडे पाहून दुर्लक्ष केले. परंतु तो जवळ आला तेव्हां विवश होऊन त्यांनी उठून त्याला प्रणाम केला.





त्यानंतर बुद्धाचा शिष्य झाला तो यश नावाचा एका सावकाराचा मुलगा. यशाचा बाप संतापून मुलाला परत न्यायला आला. बुद्धाचे त्याच्याशी काही वेळ बोलणे झाल्यावर यशाचा बापही बुद्धाचा शिष्य झाला.



एका सरोवराच्या काठी काही श्रीमंत तरुण आपापल्या बायकांबरोबर विहार करीत होते. त्यांच्यातला एक ब्रह्मचारी होता. तो एका नर्तकीला बरोबर घेऊन आला होता. सर्व झोपी गेल्यावर त्या नर्तकीने सर्वांच्या अंगावरचे दागिने काढून घेतले आणि पळून गेली.

ते तरुण जागे झाल्यावर त्या तरुणीला धरून आणण्यासाठी निघाले. वाटेत त्यांना बुद्ध भेटला. "एका नर्तकीच्या शोधासाठी का निघाला आहां? आत्म्याच्या शोधार्थ निघाला नाही का? दोन्हीपैकी कोणते श्रेष्ठ?" बुद्धाने त्यांना विचारले. त्यांचे अज्ञान नष्ट झाले व ते बुद्धाचे शिष्य झाले.





उरुवेला नजिक कस्सब (कश्यप) नावाचे थोर तपस्वी होते. आपण थोर ज्ञानी म्हणून त्यांना फार गर्व होता. बुद्धाने आपल्या धर्माचा उपदेश त्या तपस्व्याला केला. झालं, तो व त्याचे शिष्य बुद्धाच्या शिष्यवर्गात सामील झाले

कस्सब व त्याच्या शिष्यांनी आपल्या जटा कातरून नदीत फेंकून दिल्या. अनेक योजनांच्या अंतरावर आणखी दोघां तपस्व्यांच्या शिष्यांनी नदीत स्नान करीत असतां नदीत वहात येत असलेल्या जटा पाहिल्या व कुतूहलवश उरुवेलला आले व बुद्धाजवळ राहू लागले.





बुद्धाची कीर्ती दिग्दिगन्त पसरली. असंख्य शिष्यांना बरोबर घेऊन बुद्ध राजगृहला आला. बिंबिसार राजाने बुद्धाचे अत्यंत आदराने स्वागत केले. बुद्ध त्याचा अतिथि झाला असतां राजा स्वतः बुद्धाला जेवायला वाढी.

बुद्धाचे वडील शुद्धोदन याने बुद्धाला कपिलवस्तूला येण्यासाठी आमंत्रण द्यायला दूत पाठविले. आमंत्रण घेऊन गेलेले दूत परतले नाहीत. ते बुद्धा-बरोबर तेथे राहून गेले. तरी बुद्ध कपिलवस्तूला आला. त्याचे वडील, सावत्र आई व इतर लोकांनी त्याचे उत्साहाने स्वागत केले.

